# कर्मवीर दादासाहेब गायकवाड
# काल आणि कर्तृत्व





**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई**

# कर्मवीर दादासाहेब गायकवाड :
## काल आणि कर्तृत्व

संपादक मंडळ

**डॉ. निर्मलकुमार फडकुले, निमंत्रक**
**डॉ. रावसाहेब कसबे**
**अर्जुन डांगळे**
**उत्तम कांबळे**
**डॉ. सदानंद मोरे**
**रमेश शिंदे**

**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई**

प्रथमावृत्ती : 'दादासाहेब गायकवाड जन्मशताब्दी' १५ ऑक्टोबर २००२

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई - ४०० ०१४



मुद्रक :
न्यू एज प्रिंटिंग प्रेस,
भूपेश गुप्ता भवन,
८५, सयानी रोड,
प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५

मुखपृष्ठ : धनंजय गोवर्धने

किंमत : ६० रुपये

# अनुक्रमणिका



## विभाग पहिला

### लेख

## विभाग दुसरा

### कविता



### आठवणी



## विभाग तिसरा

### लेख

## भाषणे



## पत्रे



## परिशिष्ट

# अध्यक्षांचे निवेदन

"कर्मवीर दादासाहेब गायकवाड : काल आणि कर्तृत्व" हा ग्रंथ वाचकांच्या हाती देताना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचा अध्यक्ष या नात्याने मला विशेष आनंद होत आहे.

दादासाहेबांचे हे जन्मशताब्दी वर्ष महाराष्ट्र शासनाने विविध प्रकारच्या उपक्रमांद्वारे सबंध वर्षभर साजरे करण्याचे ठरविले असून त्या उपक्रमाचा एक भाग म्हणून त्यांच्या जीवनकार्यावर एक गौरवग्रंथ प्रकाशित करण्याचा निर्णय शासनाने घेतला. या गौरवग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी शासनाने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळावर सोपविली. इतकेच नव्हे तर या गौरवग्रंथाच्या निर्मितीसाठी लागणाऱ्या खर्चाची तरतूदही केली.

या गौरवग्रंथाच्या संपादनासाठी मंडळाने लगेचच एका संपादक मंडळाची नियुक्ती केली. या संपादक मंडळाचे गेल्या काही महिन्यातल्या अथक परिश्रमाचे फळ म्हणजेच कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या जीवनकार्याची ओळख करून देणारा हा ग्रंथ होय.

या गौरवग्रंथाला, गौरवग्रंथ असे नाव देणे आम्ही मुद्दामच टाळलेले आहे. कारण गौरवग्रंथ हे नाव आम्हाला तितकेसे अन्वर्थक वाटत नाही. हा ग्रंथ संदर्भग्रंथ व्हावा असा संपादक मंडळाचा प्रयत्न राहिलेला आहे व त्या भूमिकेतून या ग्रंथाचे संपादन झालेले आहे.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्यावर मी काही लिहावे एवढा माझा त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा अभ्यास नाही. एक मात्र खरे की दीपस्तंभ हा त्या मार्गाने प्रवास करणाऱ्या सर्वच प्रवाशांसाठी असतो. या प्रवाशांतलाच मी एक प्रवासी आहे. या ग्रंथाच्या निर्मितीमागे अध्यक्ष या नात्याने माझी हीच भावना आहे.

या ग्रंथाचे संपादन नियोजित वेळेत करून दिल्याबद्दल संपादक मंडळाचे तसेच या ग्रंथाची अल्पावधीत सुंदर, सुबक निर्मिती करून दिल्याबद्दल न्यू एज प्रिंटिंग प्रेसचे श्री. प्रकाश विश्वासराव व त्यांच्या सहकाऱ्यांचे आम्ही आभारी आहोत.

मुंबई
दिनांक : ८ ऑक्टोबर २००२

**रा. रं. बोराडे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# संपादकीय

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या व्यक्तित्वाचा आणि कर्तृत्वाचा आलेख स्पष्ट करणारा हा ग्रंथ त्यांच्या जन्मशताब्दीची सांगता होताना प्रकाशित होत आहे. सामाजिक समतेसाठी झालेल्या संघर्षातलं एक बलदंड व्यक्तित्व म्हणजे कर्मवीर दादासाहेब. शैक्षणिक क्षेत्रात त्यांचं योगदान लक्षणीय आहे. राजकीय क्षेत्रातही त्यांची कर्तृत्वसंपन्न पावलं उमटलेली आहेत. दलित आणि शोषित वर्गाच्या उन्नतीसाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या नेतृत्वाखाली दादासाहेबांनी अथक परिश्रम घेऊन चळवळी उभ्या केल्या. समतेच्या लक्ष्यात त्यांनी आपलं समग्र जीवन व्यतीत केलं. त्यांचं संपूर्ण जीवन म्हणजे मानव्याचा उदात्त आविष्कार होता. डॉ. आंबेडकरांसारख्या श्रेष्ठ क्रांतिकारकाच्या छायेत राहूनही त्यांनी आपल्या व्यक्तित्वाची आणि विचारांची पूर्ण वाढ केली. आंबेडकरी चळवळीला बळ देणारा एक निःस्पृह, सेवाभावी, विचारशील आणि संघटनकुशल कार्यकर्ता म्हणून कोट्यवधी जनतेच्या मनात त्यांची प्रतिमा स्थिर झाली आहे. या ग्रंथातून अनेक व्यासंगी लेखकांचे लेख दादासाहेबांच्या कर्मनिष्ठ जीवनावर शोधक प्रकाश टाकावा म्हणून प्रकाशित केले आहेत. कर्मवीर दादासाहेब हे महाराष्ट्राच्या आणि भारताच्या सामाजिक इतिहासाचं एक अभिमानास्पद प्रकरण आहे.

हा व्यक्तीगौरवात्मक ग्रंथ नव्हे. दादासाहेबांच्या विविधांगी कर्तृत्वाची वस्तुनिष्ठ चिकित्सा करताना महाराष्ट्राचा सामाजिक इतिहासही त्यातून व्यक्त व्हावा हा हेतू मनात ठेवून महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळानं हा ग्रंथ सिद्ध केला आहे. दादासाहेबांची मुलाखत, त्यांची भाषणं, त्यांचा पत्रव्यवहार यातून सामाजिक आणि राजकीय चळवळींचं दर्शन घडावं या अपेक्षेनं ग्रंथाची मांडणी करण्यात आली आहे. यातून लोकप्रबोधनाचा विचार स्पष्ट व्हावा ही संपादक मंडळाची अपेक्षा आहे. आजच्या महाराष्ट्राची जडणघडण करणाऱ्या व्यक्तित्वांची, नेतृत्वांची आणि विचारांची यथार्थतेनं ओळख व्हावी याच दृष्टिकोणातून साहित्य संस्कृती मंडळ अशा ग्रंथांची निर्मिती करतं. कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या कालखंडावर आणि त्यांच्या कार्यावर प्रस्तुत ग्रंथ यथोचित प्रकाश टाकील अशी आशा वाटते.

हा ग्रंथ आकाराला येण्यासाठी ज्यांनी साहाय्य केले त्या सर्वांचे संपादक मंडळाचा निमंत्रक या नात्याने आभार मानणे मला उचित वाटते.

संपादक मंडळातील सर्व सहकारी, विशेषतः या ग्रंथाची प्रस्तावना लिहिणारे डॉ. रावसाहेब कसबे, अर्जुन डांगळे व रमेश शिंदे यांनी विविध पातळीवर मोलाचे सहकार्य कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या आत्मीयतेमुळे केले, तसेच या ग्रंथातील सर्व लेखक, कवी तसेच स्फुट लेखन, मुलाखती, आठवणी आणि लेख ज्या नियतकालिकांतून पुनर्मुद्रित

केलेले आहेत त्या सर्व संबंधितांचे आभार मानतो.

दिवंगत लेखकांचे लेख पुनर्मुद्रित करण्याविषयी त्यांच्या वारसदारांनी परवानगी दिली त्यांचेही मी आभार मानतो.

पिपल्स एज्युकेशन सोसायटीच्या अधिपत्याखाली असलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर रिसर्च सेंटरचे संचालक श्री. आर. जी. रुके, विजय सुरवाडे, रूपाताई साळवे, दादासाहेबांचे पुतणे सुरेश गायकवाड, आनंदराव हिरे, कर्मवीर दादासाहेब गायकवाड सांस्कृतिक केंद्राचे सरचिटणीस श्री. रत्नाकर रिपोटे यांनी या गौरवग्रंथासाठी दुर्मीळ फोटो व कागदपत्रे उपलब्ध करून दिली, तसेच या ग्रंथाची मुद्रिते तपासून देणाऱ्या श्रीमती शकुंतला मुळ्ये यांचेही आभार मानतो.

'न्यू एज प्रिंटिंग प्रेस'चे प्रकाश विश्वासराव, माधवी विचारे, अविनाश परब यांना ग्रंथछपाईच्या कामात जे सहकार्य केले त्यांचे, कामगारवर्गाचे व मुखपृष्ठाचे चित्रकार धनंजय गोवर्धने यांचेदेखील आभार मानतो. महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष प्राचार्य रा. रं. बोराडे, उपाध्यक्ष प्रा. रतनलाल सोनग्रा तसेच प्रभारी सचिव उ. बा. सूर्यवंशी यांनी हा ग्रंथ प्रकाशित करण्यासाठी जी मोलाची भूमिका पार पाडली त्याबद्दल त्यांचे तसेच महाराष्ट्र शासनाच्या समाजकल्याण विभागाचे उपसचिव श्री. ना. ना. भडीकर, अवरसचिव श्री. ग. कि. वाघ, सहायक संचालक (पुणे), श्री. सदानंद पाटील याचेही आभार मानतो.

शासनाने कर्मवीर दादासाहेब गायकवाड जन्मशताब्दी निमित्ताने जी समिती स्थापन केली त्या समितीचे अध्यक्ष मा. विलासराव देशमुख मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी जी आस्था आणि आपुलकी दाखविली त्याबद्दल त्यांचे व त्यांच्या मंत्रीमंडळातील सर्व सहकाऱ्यांचे आभार मानतो.

— **निर्मलकुमार फडकुले**
निमंत्रक, संपादक मंडळ

# प्रस्तावना

**डॉ. रावसाहेब कसबे**

मानवजातीच्या ऐतिहासिक विकासक्रमात इ.स. १४०० ते १६०० ही दोनशे वर्षे अभूतपूर्व अशी होती. कारण या काळात युरोपात झालेल्या 'पुनरुज्जीवन' आणि 'प्रबोधनाच्या' (Renaissance and Reformation) चळवळीने मानवजातीच्या विकासक्रमाला आधुनिक युगाच्या (Modern Age) उंबरठ्यावर आणून ठेवले होते. ही चळवळ म्हणजे मध्ययुगाच्या अस्त आणि आधुनिक युगाची पहाट यातील व्यवच्छेदक रेषा होती. मानवी जीवनाच्या वेगवेगळ्या अंगांना स्पर्श करणारी पुनरुज्जीवनाची चळवळ, विविध देशात वेगवेगळ्या वेळी सुरू झाली होती तरी; स्पेनमध्ये ती इ.स. १४९२ साली, इंग्लंडमध्ये १४८५ साली आणि जर्मनीत १५१९ साली सुरू झाल्याचे दिसते. परंतु प्रबोधनाची (Reformation) चळवळ मात्र कधी सुरू झाली हे निश्चितपणे सांगता येते. इ.स. १५१७ ला मार्टिन ल्युथरने विटेनबर्गच्या चर्चच्या प्रवेशद्वारावर धर्मचिकित्सा करणारे त्यांचे पंचाण्णव विचार (Ninty five theses) एका भव्य पाटीवर लिहून ती पाटी ठोकली तेव्हापासून सुधारणेच्या चळवळीला प्रारंभ झाला. मार्टिन ल्युथर यांच्या या कृतीने मध्ययुग इतिहासजमा केले. राजेशाहीला खिळखिळे करून राजकीय लोकशाहीचा मार्ग खुला केला. प्रचलित ख्रिश्चन धर्म आणि त्याच्या प्रमुख धर्मपीठावर प्रचंड आघात करून मानवजातीला धर्मदास्यातून मुक्तीचा मार्ग स्पष्ट केला. मार्टिन ल्युथर यांच्या या कृतीने जुनी समाजव्यवस्था, जुनी संस्कृती आणि जुना माणूस अस्तंगत होण्याची प्रक्रिया वेगवान बनली आणि त्या जागी नवी समाजव्यवस्था, नवी संस्कृती आणि नवा माणूस घडण्यास प्रारंभ झाला.

### प्रबोधन चळवळीचा परिणाम

युरोपात घडलेल्या या अभूतपूर्व क्रांतीची व्याख्या करणे अशक्य आहे. पुनरुज्जीवन आणि प्रबोधनाचे स्वरूप इतके व्यापक आणि सखोल होते की ते अभिव्यक्त करण्यासाठी शब्द असमर्थ होते. म्हणूनच त्याच्या अभिव्यक्तीसाठी त्या काळातील मानवी जीवनाच्या विविध क्षेत्रांतील दिग्गजांनी प्रतिकांचा उपयोग केलेला होता. त्या दिग्गजांपैकी मायकेल एंजेलो हे एक अग्रभागी असलेले नाव. या जगप्रसिद्ध कलावंताने सिस्टाईन चॅपलच्या छतावर मूळ माणसाचे म्हणजेच जुन्या करारातील पुराण पुरुष 'आदम'चे त्याच्या मूळ रूपातील चित्र रेखाटले. हा आदम त्याच्या मूळ रूपात, म्हणजे पूर्ण नागवा परंतु नि:संकोच,

भरभक्कम हाताचा, तहान-भुकेची तमा न बाळगणारा आणि जीवन व प्रकाशाला अभिमुख झालेला असे हे चित्र होते. मायकेल एंजेलोने हे चित्र रेखाटून नव्या माणसाचा जन्मोत्सव साजरा केला आणि तेव्हापासून या पृथ्वीवर 'माणूस' केंद्रस्थानी बनला. या जगातील प्रत्येक घडामोडीचे, परिवर्तनाचे परिमाण (Dimension) माणूस बनला.

हा पुनरुज्जीवन आणि प्रबोधनाचा विचार ज्या देशात गेला आणि त्याला कृतीत उतरविणारे नेते आणि चळवळी लाभल्या, ते देश मध्ययुगातील सरंजामशाहीच्या जोखडातून मुक्त झाले. तिथे भांडवलशाहीसारखी, सरंजामशाहीच्या तुलनेत प्रागतिक असलेली अर्थव्यवस्था आणि लोकशाहीसारखी राज्यव्यवस्था उदय पावली. या विचाराची एक वाहक नाडी म्हणूनच भारताच्या आधुनिक इतिहासात ब्रिटिश साम्राज्यशाहीला अनन्यसाधारण महत्त्व आहे. भारतात ब्रिटिश साम्राज्यशाहीने अठराव्या शतकाच्या मध्यान्ही प्रवेश केला आणि एका नव्या साम्राज्याचा पाया घातला. साधारणपणे प्लासीच्या लढाईपासून ते इ. स. १८५७ च्या शिपायांच्या बंडापर्यंतच्या शंभर वर्षांच्या काळात ब्रिटिश साम्राज्यशाहीने अनेक महत्त्वाच्या गोष्टी केल्या. त्या साऱ्या गोष्टी भारतीयांना केवळ नव्या होत्या असे नाही, तर त्या आश्चर्यकारक वाटाव्यात अशाच होत्या. त्यातील पहिली आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे भारतातील विविध संस्थानिकांतील स्पर्धा, बंडाळी आणि त्यातून उद्‌भवलेले अस्थैर्य ब्रिटिशांनी मोडून काढले. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे दीर्घ काळानंतर भारताला एका केंद्रीय सत्तेखाली आणले आणि तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भारताला एक पुनरुत्पादनक्षम (Reproductive) देश बनविले.

म्हणून भारतात आलेल्या साऱ्याच ब्रिटिश राज्यकर्त्यांना एकाच मापाने मोजणे फारसे बरोबर ठरणार नाही. भारतात ब्रिटिशांचे आगमन जरी आर्थिक पिळणुकीसाठी झालेले होते, तरी अनेक ब्रिटिश राज्यकर्त्यांनी भारताच्या समृद्धीसाठी मूलभूत स्वरूपाचे प्रयत्न केले होते. रेल्वेचे विस्तीर्ण जाळे, संपर्कासाठी तार यंत्रणा, खाणींचा उपयोग, विविध उद्योगांना चालना, शहरांची उभारणी, शेतकऱ्यांच्या उत्पादन वाढीसाठी धरणांची बांधणी; विज्ञानाचा, तंत्रज्ञानाचा विकासासाठी उपयोग, या सर्वांमुळे भारतातील प्रत्येक जातीत एका नव्या वर्गाचा उदय झाला. पुढे याच वर्गाने स्वातंत्र्य चळवळीत मोलाची भूमिका पार पाडली. ब्रिटिशांनी सैन्यात शूद्रातिशूद्रांची भरती करून त्यांच्यातही एका नव्या वर्गाची निर्मिती केली. भारतातील दलित चळवळ ही एका अर्थाने ब्रिटिश सैन्यदलाचे (Army) अपत्य आहे. कारण शिवराम जानबा कांबळे यांच्यापासून ते रामजी आंबेडकर यांच्यापर्यंतची अनेक दलित मंडळी ब्रिटिश सैन्यात होती. बाबासाहेब आंबेडकरांचा आणि त्यांच्या चळवळीचा उगम याच पार्श्वभूमीवर झालेला होता.

काही ब्रिटिश अधिकाऱ्यांनी तर भारतात एखाद्या समाजकार्यकर्त्याची भूमिका पार पाडलेली दिसते. कारण त्यांनी पश्चिमेकडून भारतात येताना तेथील प्रबोधन चळवळीच्या क्रांतीचे तेज:पुंज बरोबर आणले होते. त्यात गव्हर्नर जनरल लॉर्ड बेटिंग, इलीन बर्ज, लॉर्ड डलहौसी, लॉर्ड कॅनिंग यांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. या राज्यकर्त्यांनी भारतात धर्माच्या नावाने मानवतेची जी क्रूर चेष्टा चालविली गेली होती, तिला कर्तव्य भावनेने पायबंद घातला. न्या. इंपेने खोटा दस्तऐवज केल्याच्या आरोपावरून नंदकुमारला फासावर

लटकविले आणि 'कायद्यासमोर सर्व माणसे समान असतात' हे प्रत्यक्ष कृतीने सिद्ध केले. इ. स. १८२९ मध्ये लॉर्ड बेटिंगने सतीची चाल कायद्याने बंद करून स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा हक्क मान्य केला. २५ जुलै १८५६ रोजी ब्रिटिश सरकारने विधवा विवाहासंबंधीचा कायदा सम्मत करून तिला पुनर्विवाह करण्याचे स्वातंत्र्य दिले. तसेच ती हिंदू मुलांप्रमाणेच मालमत्तेवरील वारसा हक्कालाही पात्र ठरविली गेली. इ. स. १८५७ मध्ये ब्रिटिश संसदेने स्त्रियांचा घटस्फोट घेण्याचा हक्क मान्य केला. त्याही पूर्वी म्हणजे इ. स. १८५० मध्ये लॉर्ड डलहौसीने 'जातीय अपात्रता नष्ट करण्याचा कायदा' (Caste Disabilities Removal Act) पास करून शुद्रातिशूद्रांना जीवनाची विविध क्षेत्रे मोकळी करून दिली. ब्रिटिश साम्राज्यविरुद्धच्या काळातील या आणि यांसारख्या इतर अनेक घटना भारताची एक 'आधुनिक राष्ट्र' म्हणून होऊ घातलेल्या जडणघडणीला उपयुक्त ठरल्या.

**प्रबोधन चळवळीची अपत्ये**

इ. स. १८५७ च्या शिपायांच्या बंडाच्या अपयशानंतर भारत खऱ्या अर्थाने ब्रिटिश साम्राज्यशाहीचा भाग बनला. कारण भारताची सत्ता ईस्ट इंडिया कंपनीकडून ब्रिटिश संसदेकडे गेली. इ. स. १८५८ च्या राणीच्या जाहीरनाम्यापासून १९४७ च्या भारताच्या स्वातंत्र्याच्या कायद्यापर्यंत ब्रिटिश संसदेने भारतासाठी जे कायदे केले, ते भारतात क्रमाने लोकशाही राज्यव्यवस्थेला पोषक ठरणारे होते. त्या प्रत्येक कायद्याला पार्श्वभूमी म्हणून ब्रिटिश शासनाने जे विविध सुधारणा आयोग नेमले आणि त्यांच्याकडून अहवाल घेतले, त्या आयोगांच्या अहवालांचाही या कामी उपयोग झाला. या आयोगासमोरील साक्षीच्या निमित्ताने अथवा त्यावरील मतप्रदर्शनाच्या निमित्ताने भारतातील विविध सामाजिक शक्तींचे भान जसे ब्रिटिशांना आले तसेच ते भारतीयांनाही आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी साऊथबरो कमिशनपासून ते सायमन कमिशनसमोर नोंदविलेल्या साक्षी किंवा त्यांनी केलेले मतप्रदर्शन यांचा तपशील पाहिला तरी भारतात दलित एका समर्थ समाजशक्तीच्या रूपाने कसे संघटित आणि विकसित होत होते, याचा तपशील मिळू शकतो. या सर्व विवेचनाचा हेतू हा आहे की, पाश्चिमात्य जगात प्रबोधनाच्या चळवळीने जशा आधुनिक विचारांच्या विचारवंतांना आणि कलावंतांना जन्माला घातले, तीच प्रक्रिया भारतातही ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या काळात सुरू राहिली. तिकडे जसे जॉर्ज विल्यम, फ्रेडरिक हेगेल आणि कार्ल मार्क्ससारखे विचारवंत त्या चळवळीचीच अपत्ये होती; तशीच म. जोतिराव फुले, राजर्षी शाहू आणि बाबासाहेब आंबेडकरसुद्धा भारतात त्याच महान क्रांतीचे वारसदार होते.

म. जोतिराव फुल्यांचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून आणि त्यांना गुरू मानून विसाव्या शतकातील विशीच्या दशकात बाबासाहेबांनी दलित चळवळीला एक नवी दिशा दिली. त्यांच्यापूर्वी शिवराव जानबा कांबळे यांच्यापासून ते किसन फागूजी बनसोड यांच्यापर्यंतची अनेक नेते मंडळी दलित समाजात काम करीत होती. बाबासाहेबांनी दलित चळवळीला नवी दिशा दिली; याचा अर्थ जागतिक वास्तवाच्या पार्श्वभूमीवर त्यांनी भारतातील दलित चळवळीची आधुनिक जीवनमूल्यांवर आणि आधुनिक राजकीय तत्त्वप्रणालींच्या आधारावर नवी वैचारिक मांडणी केली. त्या वैचारिक मांडणीचा आधार भारतात लोकशाही समाजवादाची स्थापना

करणे हा होता. त्यामुळे त्यांना भारतीय स्वातंत्र्य चळवळीचे नेतृत्व करणाऱ्या इंडियन नॅशनल काँग्रेसशी आणि ब्रिटिश साम्राज्यशाहीशी दलित चळवळीचे कोणते आणि कसे संबंध असावेत हे निश्चित करणे भाग होते. भारतातील जातिनिर्मूलनाचा प्रश्न बाबासाहेबांच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाचा प्रश्न होता. या कामी ज्या समविचारी दलितेतरांची साथ मिळेल ती त्यांना हवीच होती. जातिसंस्थेचे निर्मूलन, जातीचे संस्कार करणाऱ्या धर्माची मान्यता नष्ट केल्याशिवाय आणि आंतरजातीय विवाह झाल्याशिवाय होणार नाही या निष्कर्षापर्यंत ते आले होते. भारतातील कम्युनिस्ट आणि समाजवादी यांच्याशी त्यामुळेच त्यांचे मतभेद होते. म्हणून त्यांना दलितांची स्वतंत्र चळवळ चालविणे भाग पडले. या देशातील डाव्या चळवळीला वर्गसंघर्षाच्या झापडामुळे जातिसंस्थेचे मानसिक पदर समजू शकले नाहीत. ते किती सूक्ष्म आणि खोलवर रुजलेले होते, ते समजून घेतल्याशिवाय दलितांच्या स्वतंत्र चळवळीचे प्रयोजन आणि आवश्यकता समजणार नाही.

**भारतातील 'परात्मतेचे' स्वरूप**

बाबासाहेब आंबेडकरांच्या या चळवळीने महाराष्ट्राला जे नेते दिले, त्यात दादासाहेब गायकवाडांचे नाव अग्रभागी आहे. नाशिक जिल्ह्यातील एका छोट्याशा खेड्यात दादासाहेबांचा जन्म झाला. ते अस्पृश्य होते, परंतु कुटुंब शेती करून उदरनिर्वाह करीत होते. त्यांची शेती बागायती होती आणि त्यातून ते उसाचे उत्पन्न घेत होते. जगातील सारेच मार्क्सवादी माणसाच्या 'परात्मते'संबंधी (Alienation) खूप बोलत असतात. माणूस स्वतःच्या श्रमाने जी निर्मिती करतो तिच्यापासून तो 'परात्म' कसा होतो आणि पुढे तो समाजापासून आणि स्वतःपासूनही 'परात्म' कसा होतो याचे विवेचन मार्क्सवादी चिंतन विविध अंगांनी करते. परंतु भारतीय जातिव्यवस्थेने निर्माण केलेल्या समाजरचनेतील परात्मतेला एक वैशिष्ट्यपूर्ण परिमाण होते हे भारतीय मार्क्सवाद्यांच्या लक्षात येणे शक्य नव्हते. स्वतः दादासाहेबांनी एक अस्पृश्य म्हणून त्याचा अनुभव घेतला होता. दादासाहेबांच्या शेतात ऊस परिपक्व होईपर्यंत शेतावर अस्पृश्य शेतमजूर काम करीत. परंतु उसापासून गूळ निर्माण करण्याची प्रक्रिया सुरू होताच अस्पृश्य शेतमजुरांना काम करण्यास बंदी केली जाई. कारण त्यांच्या हाताने तयार झालेला गूळ सवर्ण कसे खातील? तो कोण विकत घेईल? ही जातिसंस्थेने निर्माण केलेली मानसिकता होती. गुऱ्हाळ सुरू झाले की स्वतः दादासाहेब आणि त्यांच्या कुटुंबीयांनाही त्या जागेत प्रवेश करण्याची बंदी असे, कारण उसाचा रस आणि गूळ 'बाटण्याची' शक्यता होती. स्वतःच्या शेतात स्वतःच्या श्रमाने पिकविलेल्या उसाचा रसही जेव्हा त्यांना त्यांच्यासाठी असलेल्या स्वतंत्र भांड्यातून पिण्याची वेळ येत होती आणि गुळाच्या ढेपीला स्पर्श करण्याची बंदी होती; तेव्हा त्यांच्या मनात कोणत्या भावना उसळत असतील. गुऱ्हाळ सुरू होताच पन्नास-साठ सवर्ण मजुरांना कामाला लावणारे, त्यांना आठवड्याचा पगार वेळेवर देणारे शेतकरी दादासाहेब अस्पृश्य असल्याने त्यांचा स्पर्शही सवर्णांना निषिद्ध होता. या 'परात्मतेची' प्रत कोणती होती? तिला लाभलेल्या या वैशिष्ट्यपूर्ण परिमाणाचे (Dimension) मार्क्सवादी चिंतनात कोणते उत्तर आहे, कोणते विवेचन आहे, याचा शोध त्या वेळच्या पुरोगाम्यांनी घ्यायला हवा होता.

## विलोभनीय गुरू-शिष्य परंपरा

दादासाहेब गायकवाडांच्या आयुष्यात, दलित चळवळीने भारतीय इतिहासाला अभूतपूर्व वाटावेत असे चार जनसंग्राम केले. भारतीय जातिसंस्थेच्या विरोधात, भारतीय इतिहासात हे संग्राम पहिल्यांदाच घडत होते. हे संग्राम म्हणजे महाडच्या चवदार तळ्यावरील पाण्यासाठी सत्याग्रह, नाशिकचा काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह, मुखेडचा सत्याग्रह आणि भूमिहीनांचा, पडिक जमिनी कसण्यास मिळण्यासाठी केलेला सत्याग्रह. यापैकी पहिले तीन सत्याग्रह बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली झाले, तर शेवटचा दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली झाला. पहिल्या तीन सत्याग्रहात जरी नेतृत्व बाबासाहेबांचे होते, तरी जनसंघटनाच्या बाबतीत दादासाहेब अग्रभागी होते. या सर्व संग्रामांच्या इतिहासाचा बारीकसारीक तपशील अभ्यासला तर भारतीय अस्पृश्यतेच्या आणि समाजक्रांतीच्या प्रश्नाकडे बघण्याची दादासाहेबांची दृष्टी स्वतंत्र होती हे स्पष्ट होते. दादासाहेब गायकवाड बाबासाहेब आंबेडकरांचे सहकारी होते, एका अर्थाने अत्युत्तम आणि निकटवर्ती शिष्य होते; परंतु ते प्रश्न विचारणारे चिकित्सक शिष्य होते. गुरूकडून पूर्ण समाधान झाल्याशिवाय त्यांच्या शब्दावर विश्वास ठेवणारे श्रद्धाळू शिष्य नव्हते. बाबासाहेबांनी जसे बुद्धाला गुरू मानले, परंतु त्यांचा प्रत्येक शब्द चिकित्सकपणे तपासून घेतला, प्लेटोने जसे सॉक्रेटिसला प्रश्न विचारून भंडावून सोडले, ॲरिस्टॉलने जसे प्लेटोचे अनेक विचार खोडून काढले आणि कार्ल मार्क्सने जसे आपला गुरू हेगेल याला डोक्याऐवजी पायावर उभे केले, हीच विलोभनीय गुरू-शिष्य परंपरा बाबासाहेबांपासून प्रेरणा घेऊन दादासाहेबांनी पुढे चालविली.

## एका क्रांतिकारी लोकनेत्याचे पहिले दर्शन

भारतीय अस्पृश्यांच्या चळवळींसमोर अनेक आव्हाने होती. भारतीय स्वातंत्र्यांच्या चळवळीसमोर तिच्या तुलनेत एकच आव्हान होते. ब्रिटिश साम्राज्यशाहीपासून भारताची मुक्ती करणे हे एकमेव ध्येय असल्याने ती धोपटमार्गाने पुढे जात होती. अस्पृश्य चळवळीलाही स्वातंत्र्य हवे होते. परंतु स्वातंत्र्यात दलितांच्या मानवी हक्कांची सुरक्षितता असणारी राज्यघटनाही तिला हवी होती. अस्पृश्यतेच्या विरुद्ध लढा उभारणे म्हणजे धर्मश्रद्ध सनातनी सवर्णांशी संघर्षात उतरणे होते. हा संघर्ष केवळ शहरापुरता मर्यादित नव्हता, तर त्याची व्याप्ती ज़िथपर्यंत अस्पृश्य वस्ती आहे त्या संपूर्ण भारताला व्यापून टाकणारी होती. खेड्यातील मूठभर अस्पृश्य आणि बहुसंख्य सवर्ण यांच्यातील हा संघर्ष होता. अस्पृश्यतेच्या विरोधी बोलणारे, लिहिणारे आणि प्रसंगी ठराव करणारे अनेक नेते आणि संघटना त्या काळातही होत्या परंतु प्रत्यक्ष लढ्यात त्या उतरू शकत नव्हत्या. हा लढा अल्पसंख्य अस्पृश्यांना एकाकीपणेच लढविणे भाग होते. त्यासाठी राजकीय शत्रूंची संख्या कमी करणे आणि समविचारी मित्रांची संख्या वाढविणे भाग होते. म्हणून अस्पृश्यांना एकाच वेळी ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध आणि काँग्रेसविरुद्ध संघर्ष करणे परवडणारे नव्हते. उसंत मिळेल त्या प्रमाणे अस्पृश्यांच्या मानवी हक्कांच्या संरक्षणासाठी ब्रिटिश साम्राज्यशाहीचे सहकार्य घेणे आणि काँग्रेसशी त्याचसाठी संघर्ष करणे; त्याचप्रमाणे भारताची एक आधुनिक राष्ट्र म्हणून उभारणी करण्यास काँग्रेसला मदत करणे, ही दलित चळवळीची आंबेडकरप्रणीत रणनीती

होती. हिंदू कोड बिल आणि भारतीय राज्यघटना तयार करण्यात बाबासाहेबांचा सिंहाचा वाटा असणे हा या रणनीतीचा एक भाग होता.

महाडच्या चवदार तळ्याच्या प्रश्नावर तेथे अस्पृश्यवर्गाच्या दोन परिषदा झाल्या. पैकी पहिली १९२७ सालच्या मार्च महिन्यात तर दुसरी डिसेंबरच्या शेवटी झाली. पहिली परिषद सर्वार्थाने यशस्वी झाली परंतु सवर्णांच्या विरोधामुळे दुसरी परिषद घ्यावी लागली. ब्रिटिश शासनाने कायदा सुव्यवस्थेच्या नावाखाली हे प्रकरण न्यायप्रविष्ट असल्याचे सांगून परिषद तहकूब करण्याची सूचना केली. दादासाहेब गायकवाडांचा खरा क्रांतिकारक स्वभाव जनतेने महाडच्या दुसऱ्या परिषदेत अनुभवला. बाबासाहेबांना हा काळ ब्रिटिशांशी संघर्ष करण्यास योग्य वाटत नव्हता; कारण भारतीय स्वातंत्र्य चळवळ आणि ब्रिटिश साम्राज्यशाही यांच्यातील संवादाची सुरुवात होऊ घातली होती. भारतातील नव्याने जागृत झालेल्या अनेक समाजशक्ती, येणाऱ्या स्वातंत्र्यात सुरक्षितता आणि हक्क कसे प्राप्त होतील याच खटपटीत होत्या. पुढे हा संवाद गोलमेज परिषदेच्या रूपाने सुरू झाला. म्हणून बाबासाहेबांनी स्वत:च महाडच्या सत्याग्रह तहकूब करण्याचा ठराव मांडला आणि परिषद चैतन्यशून्य बनली. बाबासाहेब हे युगप्रवर्तक नेते होते, परंतु आपल्या सहकाऱ्यांच्या विरोधी मतांचाही आदर करणारे होते. त्यांनी महाडला केलेल्या या ठरावावरील भाषणाला त्यांच्या अनुयायांनी मनापासून दाद दिली नाही. त्यांच्या ठरावावर या परिषदेत वीस वक्ते बोलले, पैकी बारा ठरावाला अनुकूल होते तर आठ विरुद्ध. तिथे उपस्थित असलेले बहुसंख्य लोक त्या ठरावाविरुद्ध होते. ''हा सत्याग्रह करून तुरुंगात जाण्याची, लढण्याची इतकेच काय मरण्याचीही माझी तयारी आहे.'' या आशयाच्या प्रतिज्ञापत्रावर सह्या आणि आंगठे देण्यासाठी अस्पृश्यांनी प्रचंड मोठी रांग लावली. ३८८४ लोकांचे सही-आंगठे झाल्यानंतर ते काम थांबविण्यात आले कारण रांग अद्यापही फार मोठी होती. महाडच्या दुसऱ्या परिषदेतील हा सारा चमत्कार दादासाहेब गायकवाडांनी घडवून आणला होता. दादासाहेब प्रभावी वक्ते तर होतेच. त्यांनी गर्जना केली की ''सत्याग्रह झालाच पाहिजे, त्या निश्चयानेच आपण सर्वजण इथे आलो आहोत. घरी परत जाऊन काय सांगणार? आपण माघार घेतली म्हणून? नाही. आपला निर्धार कायम ठेवा. काय व्हायचे असेल ते होईल, परंतु आता माघार नाही.'' दादासाहेबांच्या या गर्जनेला बाबासाहेबांच्या उपस्थितीत सर्वसामान्य अस्पृश्य जनतेने जो उस्फूर्त प्रतिसाद दिला; त्याच वेळी दादासाहेब गायकवाडांचे एक भावी क्रांतिकारी लोकनेता म्हणून जनतेला दर्शन झाले.

महाडच्या संग्रामानंतर दलित चळवळीचा महत्त्वाचा संग्राम म्हणजे २ मार्च १९३० पासून दादासाहेबांनी सुरू केलेला नाशिक येथील काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह होय. हा एक दीर्घकाळ चाललेला सत्याग्रह होता. दादासाहेबांच्या संघटनकौशल्यामुळे आणि अस्पृश्येतरांशी त्यांच्या असलेल्या सौहार्दपूर्ण संबधामुळे या काळात अस्पृश्यांना अनेक मित्र लाभले. खुद्द नाशिक शहरातून काँग्रेसचे त्यावेळचे एक ज्येष्ठ नेते गोविंदराव देशपांडे यांनी या सत्याग्रहाचे समर्थन करणे आणि मुंबईच्या काँग्रेस हाऊसमध्ये अस्पृश्यांच्या नाशिक मंदिर प्रवेश सत्याग्रहावर भाषण करून त्याला काँग्रेसजनांनी पाठिंबा देण्याचे आवाहन करणे, यांसारख्या अनेक गोष्टी दलितांच्या प्रश्नावर दलितेतरांच्या सहानुभूतीची प्रक्रिया कशी विकसित होत

होती हे स्पष्ट करणाऱ्या आहेत. बहुसंख्य हिंदू अस्पृशांचे मानवी हक्क त्यांना देण्याच्या विरोधात आहेत हे महाड, नाशिक आणि अन्य ठिकाणी स्पष्ट झाले असल्याने शेवटी १९३५ साली बाबासाहेबांनी धर्मांतराची घोषणा केली. तिथून पुढील १९५६ सालच्या धर्मांतरच्या चळवळीपर्यंतचा सारा काळ अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांच्या सुरक्षिततेसाठी कायदेशीर तरतुदी करण्यात व्यतीत झाला.

## जीवनकार्याचे दोन भाग

दादासाहेब गायकवाडांच्या जीवनकार्याचे मुख्यत: दोन भाग पडतात. पहिला भाग हा बाबासाहेब आंबेडकरांचे एक सहकारी म्हणून त्यांच्या मार्गदर्शनाखाली दादासाहेबांनी दलित चळवळीला दिलेले योगदान आणि दुसरा भाग बाबासाहेबाच्या चळवळीचा एक वारसदार म्हणून त्यांनी स्वतंत्रपणे केलेले कार्य. बाबासाहेबांच्या महापरिनिर्वाणानंतर वर्षभरात रिपब्लिकन पक्षाची स्थापना झाली असली, तरी १९५७ च्या सार्वत्रिक निवडणुका शेड्युल्ड कास्ट फेडरेशनच्या नावानेच संयुक्त महाराष्ट्र समितीचा एक घटक पक्ष म्हणून दादासाहेबांना लढवाव्या लागल्या. या काळात दलित जनशक्ती एकसंध असल्याने दादासाहेब समितीचे एक प्रमुख नेते होते. या निवडणुकीत मुंबई विधानसभेत आणि देशाच्या लोकसभेत जेवढे दलित आमदार-खासदार दादासाहेबांनी निवडून पाठविले तेवढे त्यानंतर कोणालाही निवडून पाठविता आले नाहीत. १९५८ साली रिपब्लिकन पक्षात फूट पडली, तरी दादासाहेब समितीबरोबरच राहिले. कारण समितीतील बहुतेक सर्व राजकीय पक्ष डाव्या विचारांचे होते. भारतातील समाजवादी पक्ष याच काळात क्रमाने विघटित झाला. परंतु कम्युनिस्टांची देशातील शक्ती त्या काळात एकसंध होती. देशातील तरुण वर्ग, विचारवंत आणि साहित्यिक मार्क्सवादी विचारांनी झपाटलेले होते.

बाबासाहेब आंबेडकरांच्या नंतर दलित चळवळीला वैचारिक दिशा देण्याचे आणि वास्तवात प्रत्यक्ष चळवळीचे डावपेच आखण्याची प्रमुख जबाबदारी दादासाहेबांवर येऊन पडलेली होती. भारतीय कम्युनिस्टांनीही संसदीय लोकशाहीच्या मार्गाने समाजवाद स्थापन करण्याचा ठराव केल्यानंतर दलित चळवळ आणि कम्युनिस्ट चळवळ यांच्यातील वैचारिक मतभेदांचे अंतर कमी होऊ लागले होते. १९६२ सालच्या सार्वत्रिक निवडणुकांना चीनच्या युद्धाची पार्श्वभूमी होती, तरी दादासाहेब कम्युनिस्टांच्याच बरोबर संपूर्ण महाराष्ट्र समितीचा एक घटक म्हणून राहिले होते. त्यांच्या अंतर्गत विरोधकांनी त्यांना 'कम्युनिस्ट' ठरविण्याचा प्रयत्न केला तरी ते डगमगले नाहीत. कारण त्यांची वैचारिक बैठक भक्कम होती. १९५८ ते १९७१ या काळातील दादासाहेबांचा वैचारिक प्रवास पाहणे म्हणूनच फार महत्त्वाचे आहे.

## दादासाहेबांचा राजकीय प्रवास

बाबासाहेब आंबेडकरांना त्यांच्या काळात, ब्रिटिश साम्राज्यशाही आणि भारतीय राष्ट्रीय काँग्रेस यांच्याशी संबंध कशा प्रकारचे ठेवायचे हे वेळोवेळी ठरवावे लागले. कारण त्यांच्या काळात त्याच प्रमुख दोन राजकीय शक्ती होत्या. स्वातंत्र्यानंतर ब्रिटिश भारतातून गेल्यामुळे

आणि ब्रिटिशांच्या जागी काँग्रेस सत्ताधारी पक्ष बनल्यामुळे ती सर्वात मोठी राजकीय शक्ती बनली होती. दुसरी प्रमुख शक्ती काँग्रेसच्या विरोधातील कम्युनिस्टांची शक्ती होती. या दोन शक्तींबरोबरच तिसरीही एक शक्ती समाजवाद्यांच्या रूपाने अस्तित्वात होती. परंतु या शक्तीसमोर एक वैचारिक आणि व्यावहारिक पेच होता. समाजवादी पक्षाने काँग्रेसला पर्याय म्हणून उभे रहायचे की काँग्रेसला पोषक आणि पूरक ठरेल अशी धोरणे राबवायची? हा तो प्रमुख पेच होता. हा पेच समाजवाद्यांना आजपर्यंत सोडविण्यात यश न आल्याने तोही रिपब्लिकन पक्षाइतकाच विघटित झाला आणि स्वत:ची एक स्वतंत्र राजकीय शक्ती म्हणून असलेली प्रतिमा स्वत:च धूसर करीत गेला. एकेकाळी भारतीय संसदेत नंबर दोनवर असणारी ही शक्ती या पेचाने विघटित केली.

भारतीय रिपब्लिकन पक्ष हा एका जातीचा राजकीय पक्ष बनल्याने आणि ती जात अल्पसंख्य असल्याने तिला राजकीय दृष्ट्या, वरीलपैकी म्हणजे काँग्रेस किंवा कम्युनिस्ट या राजकीय पक्षांपैकी कोणाशीतरी युती करणे आवश्यक होते. पुन्हा हा पक्ष महाराष्ट्रातच अधिक प्रभावशाली असल्याने महाराष्ट्राचे राजकारण डोळ्यांसमोर ठेवून दादासाहेबांना युतीसंबधी डावपेच ठरविणे भाग होते. म्हणून आंबेडकरोत्तर काळात दादासाहेबांच्या राजकीय कार्याचे दोन कालखंडात विभाजन करता येते. पैकी एक १९५६ ते १९६६ हे एक दशक आणि दुसरा १९६७ ते दादासाहेबांच्या निधनापर्यंतचा काळ. १९५६ ते १९६५ या काळात महाराष्ट्रात कम्युनिस्टांची ताकद प्रभावी होती. त्यातही संयुक्त महाराष्ट्र समितीच्या नेतृत्वाखाली काँग्रेसच्या विरोधात महाराष्ट्र विधानसभेत डाव्या पक्षांना बहुमत मिळेल असे वाटत होते. तसे झाले तर महाराष्ट्रात एका समाजवादी राज्याची स्थापना करता येईल, असे स्वप्न बाळगणारे जे अनेक नेते होते; त्यात दादासाहेब गायकवाडही एक नेते होते. म्हणून हा कालखंड निदान एका राज्यात तरी समाजवाद स्थापन करण्याच्या स्वप्नांचा काळ होता. त्या स्वप्नाच्या पूर्तीसाठी आपल्या मर्यादित परंतु संघटित शक्तीचा उपयोग डाव्या पक्षांच्या मदतीसाठी करणे अधिक उचित आणि रास्त ठरेल, अशी दादासाहेबांची धारणा असावी. परंतु तसे घडले नाही. महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर महाराष्ट्राचे नेतृत्व यशवंतराव चव्हाण यांच्यासारख्या एका रॉयवादी नेत्याकडे गेल्यामुळे निदान महाराष्ट्रातील अनेक डाव्या पक्षांचे बहुजन समाजातून आलेले जिल्हा स्तरावरील नेते काँग्रेसमध्ये सामील होऊ लागले. याचा अटळ परिणाम काँग्रेस अधिक बलवान होण्यात आणि डावे पक्ष अधिक क्षीण होण्यात झाला. या प्रक्रियेत जातिसंस्थेने एक महत्त्वाची भूमिका पार पाडली. काँग्रेस बहुजन समाजाचा राजकीय पक्ष बनला आणि डाव्या पक्षांचे नेतृत्व उच्च जातीय नेत्यांच्या हातात असल्याने ते निमित्त साधून डाव्या पक्षातील बहुजन समाजाला काँग्रेसकडे आकर्षित करणे काँग्रेसच्या नेत्यांना सोपे गेले. त्यातूनच कामगार संघटनाही विघटित झाल्या. त्यामुळे महाराष्ट्रातील डावी चळवळ एक राजकीय शक्ती म्हणून विकलांग बनली. तिच्याशी राजकीय युती करून दलितांचे तातडीचे राजकीय आर्थिक आणि सामाजिक प्रश्न सुटण्याची शक्यता दादासाहेबांना दिसेनाशी झाली. त्यानंतरच त्यांच्या मनात पर्यायी राजकीय मित्रांचा शोध सुरू झाला.

इ.स. १९६२ च्या आसपास यशवंतराव चव्हाण यांचे नेतृत्व महाराष्ट्राने मान्य केले आणि महाराष्ट्रातील बहुजन समाजाचे ते एक निर्विवाद नेते बनले. महाराष्ट्राच्या प्रश्नांची

सखोल जाण, पुरोगामी विचार, माणसे जोडण्याची अप्रतिम हातोटी आणि सुसंस्कृत व्यक्तिमत्त्व यामुळे यशवंतराव चव्हाणांच्या भोवती महाराष्ट्रातील विविध जाती-जमातीच्या नेत्यांचा आणि कार्यकर्त्यांचा गराडा पडला. त्यांच्याकडून सामान्य जनतेच्याही अपेक्षा वाढल्या. त्यातच पं. जवाहरलाल नेहरूंनी त्यांना केंद्रात संरक्षण खात्याची जबाबदारी देण्याचे ठरविले. त्यासाठी त्यांना लोकसभेवर निवडून जाणे आवश्यक होते. नाशिक लोकसभा मतदारसंघातून जेव्हा त्यांनी निवडणूक लढविण्याचे ठरविले, तेव्हा त्यांना एकमेव प्रतिस्पर्धी दादासाहेब गायकवाड होते. परंतु देशापुढील आव्हान, दलितांचे प्रश्न सोडविण्यासाठी करावयाची व्यूहरचना हे सारे लक्षात घेऊन यशवंतरावांना नाशिकमधून बिनविरोध, एकमताने निवडून देण्याचे ठरले. त्या निर्णयात दादासाहेब गायकवाड आघाडीवर होते. त्यांच्या या निर्णयाने दलित चळवळ आणि काँग्रेस यांच्यातील अंतर झपाट्याने कमी झाले आणि दादासाहेबांना यशवंतराव चव्हाणांसारखा एक जिवाभावाचा मित्रही लाभला. राजकीय नेत्याला जिवंतपणी आपला पुतळा उभारलेला पाहण्याचे भाग्य क्वचित लाभते. ते दादासाहेबांना लाभले. नाशिकमधील त्यांच्या पुतळ्याचे अनावरण हजारो समुदायाच्या आणि महाराष्ट्रातील तमाम राजकीय नेत्यांच्या उपस्थितीत यशवंतराव चव्हाणांनी केले. त्या कार्यक्रमात कवी कुसुमग्राज स्वागताध्यक्ष या नात्याने जे बोलले; यशवंतराव चव्हाण आणि वसंतराव नाईक यांनी जी भाषणे केली आणि दादासाहेब गायकवाडांनी त्यांच्या अभूतपूर्व सत्काराला ज्या खुसखुशीत भाषेत उत्तर दिले, ते सर्वच अविस्मरणीय होते. माझ्या व्यक्तिगत आयुष्यातील त्या सभेतील माझी एक श्रोता म्हणून असलेली उपस्थिती मला खूप काही देऊन गेली. अलीकडे असे कार्यक्रम होत नाहीत. कारण जनता आणि नेता यांच्यातील जिव्हाळा आटत चालला आहे.

त्या अविस्मरणीय कार्यक्रमातही भारतीय दलितांचा प्रश्न हा 'राष्ट्रीय प्रश्न' (National Problem) कसा आहे, हे दादासाहेबांनी सर्वांना पटवून दिले. तिथून पुढे महाराष्ट्राच्या सामाजिक आणि राजकीय जीवनात अनेक परिवर्तने झाल्याची इतिहास साक्ष देतो. काँग्रेस-रिपब्लिकन युती ही त्याची सुरुवात होती. महाराष्ट्रातील पंचायत राज्याच्या स्वीकाराने आणि सहकार चळवळीच्या वाढत्या व्यापाने महाराष्ट्रात अनेक सत्तास्थाने निर्माण झाली होती. खुद्द यशवंतराव चव्हाणांना त्या सत्तास्थानांचा लाभ दलितांनाही मिळावा असे वाटत होते. महाराष्ट्रातील सर्व सहकार चळवळ ही जमीनदार शोषकांची चळवळ आहे असे सर्वच डाव्या पक्षांच्या नेत्यांचे मत होते. सहकार चळवळ ग्रामीण अर्थव्यवस्थेला एक नवी दिशा देणारी आणि ग्रामीण समाजजीवनात आमूलाग्र परिवर्तन करणारी चळवळ आहे, याकडे डाव्या पक्षांचे अक्षम्य दुर्लक्ष झाले. सहकार चळवळीने ग्रामीण महाराष्ट्रात जसजसे मूळ धरले, तसतसे डावे राजकीय पक्ष आणि सामान्य जनता यांचे संबंध दुरावले. तालुका स्तरावरील डाव्या पक्षांचे अनेक कार्यकर्ते सहकार चळवळीत भागीदार करण्यासाठी आपापले राजकीय पक्ष सोडून काँग्रेस पक्षात सामील झाले. त्यात अहमदनगर जिल्हा आघाडीवर होता. या जिल्ह्यातील बहुतेक सर्व साखर कारखाने, दूध, संघ इत्यादी आर्थिक विकासाची साधने या एकेकाळच्या कम्युनिस्टांनीच घडविली आणि विकसित केली.

काँग्रेस रिपब्लिकन युतीकडे केवळ सत्ता सहभागाचे साधन अशा सवंग आणि उथळ

दृष्टीने पाहणे म्हणजे समाजात होणाऱ्या परिवर्तनाकडे दुर्लक्ष करणे होय. या युतीला एक सामाजिक परिमाणही होते याची दखल फारशी कोणी घेत नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी १९५६ साली बौद्ध धम्माची दीक्षा घेतली आणि साधारण दहा लाख अस्पृश्यांना ती दिली. धर्मांतरामुळे दलित समाजात विशेषत: महार समाजात एक नवचैतन्याची लाट उठली. आजपासून आपण अस्पृश्य नाहीत, महार नाहीत तर बौद्ध आहोत ही जाणीव त्यांना हजारो वर्षांच्या अस्पृश्यांच्या गुलामगिरीतून मुक्त, स्वतंत्र करणारी होती. हा त्यांच्या जीवनातील अतिशय महत्त्वाचा ऐतिहासिक असा आनंदसोहळा होता. तो साजरा करताना अस्पृश्य वर्ग आणि विशेषत: पूर्वाश्रमीची महार जात बेभान होणे साहजिकच होते. ज्या धर्माच्या सम्मतीने आणि ज्या देवांच्या उपदेशाने जाती आणि अस्पृश्यतेसारख्या संस्था उदय आणि विकास पावल्या, त्यांच्या विरुद्धचा प्रक्षोभ या वर्गाकडून जाहीरपणे अभिव्यक्त होऊ लागला. हिंदू-धर्म आणि त्यांच्या देवांची निर्भर्त्सना करणारी भाषणे तारस्वरात होऊ लागली. प्रसंगी त्यांची टिंगलटवाळी काही उत्साही तरुण करू लागले. या सर्वांचा जातीच्या मानसिकतेत खितपत पडलेल्या बहुजन समाजावर विपरीत परिणाम झाला. अस्पृश्य त्यांची पायरी सोडून आपल्या पायरीवर येत आहेत ही वस्तुस्थिती त्यांना अस्वस्थ करू लागली. त्यांना धर्मांतरचे माहात्म्य समजावून सांगणारी म. फुल्यांची सत्यशोधक चळवळ त्या काळात अस्तंगत झालेली होती. तिचे रूप ब्राह्मणेतर पक्षाने आणि विचाराने घेतले होते. सवर्णातील जातीय अहंकार आणि ऐक्यभावना टोकाला पोहोचली होती. खेड्यातील सारी सत्ता आणि वर्चस्व त्यांच्याच हातात होते. धर्मांतरामुळे जातीच्या मानसिकतेतून वेगाने बाहेर पडू इच्छिणारा, गावगाड्यातील एकेकाळचा त्यांचाच आश्रित असणारा बलुतेदार महार स्वतंत्र होणे म्हणजे त्यांच्या अहंकार आणि श्रेष्ठत्वाच्या भावनेला आव्हान देणे होते. हे सामाजिक परिवर्तन सवर्णांच्या दृष्टीने पन्नास वर्षांपूर्वी असह्य होते. त्यामुळेच महाराष्ट्रातील प्रत्येक खेड्यात बहुसंख्य सत्ताधारी सवर्णांच्या मनात अल्पसंख्य अस्पृश्य महार जातीबद्दल एक असूया आणि द्वेष निर्माण झाला. ज्या खेड्यांना डाव्या-पुरोगामी किंवा सत्यशोधक चळवळींची ओळख नव्हती, तिथे तर ती असूया आणि द्वेष वैरात रूपांतरित झाला. त्यातूनच अस्पृश्यांवरील अत्याचारात, बहिष्कारात वाढ झाली. एक अनामिक सामाजिक तणाव, अविश्वास आणि परकेपणा यांनी महाराष्ट्राचे ग्रामीण जीवन तंग बनले. यात महाराष्ट्रातील अस्पृश्य वर्ग, विशेषत: महार जात काँग्रेसची मतदार नसल्यामुळे छोट्या-मोठ्या निवडणूक प्रसंगी राजकीय तणावही उद्‌भवू लागले. मराठवाड्यातील शिरसगाव येथे अस्पृश्य महिलांना नागवे करून त्यांची धिंड काढण्याचा प्रकार, हा याच सामाजिक राजकीय तणावाचा भाग होता. या प्रकारचा तणाव महाराष्ट्रभर पसरणे अस्पृश्यांच्या जीवन सुरक्षिततेच्या दृष्टीने घातक होते. हा तणाव कमी करण्याचा एक प्रयत्न म्हणजे काँग्रेस रिपब्लिकन यांची राजकीय युती हा होता. राजकीय युतीच्या साधनाने सामाजिक ऐक्याचे ध्येय साध्य करणे ही त्यामागची भावना होती. त्यात यशवंतराव चव्हाण आणि दादासाहेब गायकवाड या दोघांचीही दूरदृष्टी होती. कारण या दोघांनीही काँग्रेस-रिपब्लिकन युती ही 'सामाजिक अभिसरणाचे एक साधन' आहे असे जाहीरपणे सांगितले होते. या युतीने राजकीय लाभाच्या दृष्टीने काय साधले हा चर्चेचा, विवादाचा प्रश्न होऊ शकतो. परंतु या युतीने काँग्रेसजनांना दलितांच्या राजकीय शक्तीचे

भान दिले आणि जातींच्या संख्येच्या बेरजेच्या गणितातून दलितांची संख्या वजा झाली तर राजकीय सत्ता हातातून जाईल याची भीती त्यांना तीव्रपणे जाणवत राहिली. म्हणून आजही एकसंध रिपब्लिकन राजकीय शक्तीच्या साहाय्याशिवाय महाराष्ट्रातील कोणतीही मोठी राजकीय शक्ती सत्ता संपादू शकत नाही, हे इतिहासाने सिद्ध केले आहे. १९६७ सालच्या पंचायतीच्या आणि जिल्हा परिषदांच्या सार्वत्रिक निवडणुकांत दादासाहेबांनी काँग्रेसशी युती करून जे साधले, त्याचा विचार या विशाल सामाजिक पार्श्वभूमीवर केला, तर दादासाहेब गायकवाडांचे राजकीय द्रष्टेपणा आपल्याला अधिक चांगल्या प्रकारे समजू शकेल.

**एका क्रांतिपर्वाचा जनक**

याच दृष्टीने दादासाहेब गायकवाड यांनी केलेल्या भूमिहीनांच्या सत्याग्रहाकडे पाहिले पाहिजे. माझ्या दृष्टीने दादासाहेबांचे भूमिहीनांचा सत्याग्रह हे त्यांनी भारतीय राजकारणाला केलेले सर्वात महत्त्वाचे, मूलगामी आणि विधायक असे योगदान आहे. भारताच्या आणि विशेषत: महाराष्ट्राच्या सामाजिक-राजकीय परिवर्तनाच्या अनुषंगाने ज्या प्रागतिक भूमिका घेण्यात डाव्या पक्षांना अपयश आले; त्या मूलभूत भूमिका दादासाहेब गायकवाडांनी घेतल्या. हे त्यांचे वेगळेपण आणि वैशिष्ट्य होते. भारत प्रजासत्ताक होऊन आज अर्ध्या शतकापेक्षा अधिक काळ लोटला आहे. भारत सरकारने जनतेच्या काही प्रश्नांची सोडवणूक केली असली आणि पं. जवाहरलाल नेहरूंच्या काळापासून विकासाच्या विविध योजना राबविण्यात काही प्रमाणात यश आले असले तरी, भारतासमोरील काही मूलभूत प्रश्न अद्याप सुटलेले नाहीत. या मूलभूत प्रश्नांपैकी सर्वात महत्त्वाचा प्रश्न जमीन सुधारणा कायदे करून शेतजमिनीचे फेरवाटप करणे, हा आहे. भारतातील काही घटक राज्यांनी हा प्रश्न आपापल्या मर्यादेत सोडविला असला तरी, उत्तरेकडील अनेक राज्यांत मात्र या प्रश्नाने अधिक उग्र रूप धारण केलेले आहे. उत्तर प्रदेश आणि बिहार ही राज्ये मागासलेली, अशांत आणि जातियुद्धाची शिकार बनण्याच्या कारणांपैकी त्यांना जमीन सुधारणा करण्यात आलेले अपयश ही प्रमुख कारणे आहेत. जमीनमालक उच्चजातीय आणि शेतमजूर कनिष्ठजातीय अशी जातवार विभागणी त्या प्रदेशात झाल्यामुळे त्या प्रदेशातील जमीनदार विरुद्ध शेतमजूर या मूलत: वर्गसंघर्ष असलेल्या प्रश्नाला भारतीय भूमीत जातीय संघर्षाचे स्वरूप आले आहे आणि ते अधिक तीव्र बनले आहे. दलित चळवळीला या प्रश्नाची जाण बाबासाहेब आंबेडकरांच्या काळापासूनच होती. म्हणून तर त्यांनी कोकणातील खोतीपद्धतीविरुद्ध लढा संघटित केला होता. मराठवाड्यातील एक दलित नेते बी. एस. मोरे यांनी बाबासाहेबांना अनेकदा पत्रे धाडून मराठवाड्यातील पडीक जमीन भूमिहीन अस्पृश्यांना कसण्यासाठी द्यावी, या दृष्टीने प्रयत्न करण्याची विनंती केलेली होती. दादासाहेब गायकवाड हे तळागाळातील जन-नेते असल्याने त्यांनीही शेड्युल्ड कास्ट फेडरेशच्या व्यासपीठावरून या प्रकारची मागणी केली होती. त्या काळात शांताबाई दाणी आणि इतर अनेक जिल्हा स्तरावरील नेत्यांनी त्यासाठी जनजागरणाची मोहीम चालूच ठेवलेली होती. परंतु १९६४-६५ साली या चळवळीला दादासाहेबांनी अखिल भारतीय रूप दिले आणि बॅ. खोब्रागडे, रा. सु. गवई, बुद्धप्रिय मौर्य, संघप्रिय गौतम इत्यादी नेत्यांनी या निमित्ताने महाराष्ट्रात आणि देशात दौरे काढून अभूतपूर्व असे प्रबोधन केले. दादासाहेबांनी आरंभिलेला लढा हा महाड आणि

नाशिक सत्याग्रहाची पुढील पायरी होती. तो एका अर्थाने आर्थिक प्रश्नांना स्पर्श करणारा दलित चळवळीचा नैसर्गिक विकासक्रम होता. या लढ्यात जातीची बंधनं झुगारून सर्व जातींच्या भूमिहीनांत आर्थिक सुधारणेच्या आकांक्षा वाढवून कनिष्ठ जातीत सामाजिक अभिसरणाची दूरदृष्टी होती. म्हणूनच ते दलित चळवळीतील एक क्रांतिपर्व होते. या सत्याग्रहात दादासाहेब गायकवाड तीन लाख चाळीस हजार शेतमजूर घेऊन तुरुंगात गेल्याची नोंद आजही सरकारी दप्तरात आहे. हा लढा उत्तरेत त्या काळात यशस्वी झाला असता तर उत्तर भारतीय दक्षिण भारतासारखा प्रगतिशील बनला असता. परंतु तिथल्या सशस्त्र जमीनदारांनी तो लढा उत्तरेकडे फैलावू दिला नाही. त्यामुळे तो भाग अद्यापही मागासलेला आणि अशांत आहे. महाराष्ट्राचे 'कसेल त्याची जमीन' हे घोषवाक्य वास्तविक पाहता सर्वच डाव्या राजकीय पक्षांची अग्रभागी असलेली घोषणा बनणे आवश्यक होते आणि त्या दिशेने प्रत्यक्ष कृतीची आवश्यकता होती. परंतु तसे घडले नाही. समाधान एकच आहे की, समाज परिवर्तनासाठी भारतीय शोषित जनतेला त्यांच्या उत्थापनासाठी एक मूलभूत कार्यक्रम देणारा नेता महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासात होऊन गेला. त्याचे नांव 'भाऊराव कृष्णराव गायकवाड' असे होते. हे इतिहासकारांना नोंदवून ठेवावेच लागेल.

अशा या दादासाहेब गायकवाडांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष आहे. महाराष्ट्र शासन त्या निमित्ताने काही कार्यक्रम राबवीत आहे. यासाठी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री विलासराव देशमुख आणि त्यांचे सर्व सहकारी यांना धन्यवाद दिले पाहिजेत. त्याचाच एक भाग म्हणून महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळ दादासाहेबांच्या जीवनकार्याची माहिती देणारा एक गौरवग्रंथ मंडळाचे अध्यक्ष प्राचार्य रावसाहेब बोराडे म्हणजेच प्रसिद्ध साहित्यिक रा. रं. बोराडे आणि मंडाळाचे जेष्ठ सदस्य आणि पुरोगामी विचारवंत प्रा. निर्मलकुमार फडकुले यांच्या मार्गदर्शनाखाली प्रसिद्ध करीत आहे. या गौरवग्रंथासाठी महाराष्ट्रातील प्रमुख राजकीय नेते, विचारवंत आणि साहित्यिक यांनी लिहावे असा प्रयत्न करण्यात आला. त्याला प्रतिसादही बऱ्यापैकी मिळाला असे मानण्यास हरकत नाही. या ग्रंथात दादासाहेबांच्या जीवन आणि कार्यावर प्रकाश टाकणारे महत्त्वाचे लेखक, साहित्यिक आणि राजकीय नेत्यांचे लेख प्रसिद्ध होत आहेत, ही आनंद देणारी गोष्ट आहे. त्याचप्रमाणे दादासाहेबांच्या काही आठवणींचेही संकलन करण्यात आले आहे.

या ग्रंथातील समाविष्ट केलेल्या लेखकांच्या लेखांची चर्चा करीत बसलो, तर हे लेखन अधिक लांबण्याची शक्यता आहे. ते सर्व लेख समजून घेण्यासाठी आणि दादासाहेबांच्या जीवनकार्याचे मर्म उकलण्यासाठी जी प्रास्ताविक स्वरूपाची माहिती वाचकांना देणे आवश्यक वाटले, तेवढीच माहिती या प्रस्तावनेत देणे अधिक उचित ठरेल असे वाटते. या ग्रंथाचे, 'दादासाहेब गायकवाड जन्मशताब्दी' वर्षात महाराष्ट्रातील जनता स्वागत करील, असा विश्वास वाटतो. या निमित्ताने दादासाहेबांसारख्या एका महान राजकीय योद्ध्याला आदरांजली वाहण्याची संधी मिळाली; याबद्दल मंडळाचे अध्यक्ष, या ग्रंथाच्या संपादक मंडळाचे सर्व सदस्य आणि निमंत्रक या सर्वांचा मी आभारी आहे.

# विभाग पहिला

## लेख

# अनुक्रम

## लेख

# सामाजिक समतेसाठी झालेल्या चळवळी : एक अवलोकन

डॉ. निर्मलकुमार फडकुले

भारताला स्वातंत्र्य मिळून अर्धशतक उलटून गेलं. पण गेल्या पन्नास-पंचावन्न वर्षांत समतेचा विचार या राष्ट्रात मूळ धरत आहे असं चित्र मात्र अद्यापी दिसलेलं नाही. या देशात जाती, धर्म, वर्ण आणि पंथोपपंथ यांचा बुजबुजाट झालेला आहे. हिंदू धर्मात दोन हजारांपेक्षा अधिक जाती आणि उपजाती अस्तित्वात आहेत. असं समाजशास्त्रज्ञांचं मत आहे. मुसलमान, शीख, जैन, बौद्ध आणि ख्रिस्ती या धर्मातही जातिभेद व पंथभेद आहेत. त्यामुळं भारतीय जनता सामाजिक दृष्ट्या एकतेच्या पातळीवर येणं दुरापास्त बनलं आहे. या राष्ट्राला त्याचा स्वत:चा एक चेहरा गेल्या कित्येक शतकात लाभलेला नाही. प्रत्येक माणसाच्या कपाळावर जातीची व पंथाची परंपरेनं एक चिठ्ठी चिकटवलेली आहे. ती चिठ्ठी महत्त्वाची. माणूस फार मात्र गौण किंवा नगण्य अशी दीर्घकाळापासून दृढमूल झालेली (अ) व्यवस्था आहे. आजही या व्यवस्थेचा पाया ढासळलेला दिसत नाही. त्यामुळं भारतीय माणूस स्वत:ची ओळख आपल्या जातीवरून करून देतो. वस्तुत: केवळ भारतातलाच नव्हे तर साऱ्या जगातला माणूस इथून तिथून एकच असताना अनेक प्रकारच्या कृत्रिम भेदांच्या भिंती मानवी ऐक्याच्या विरोधात का उभ्या राहाव्यात, या प्रश्नाचं उत्तर मिळत नाही. रुसो नावाच्या विचारवंतानं म्हटलं आहे, 'Man is born free and yet he is in chains everywhere'

जन्मत: मनुष्य स्वतंत्र आहे. पण तरीही तो सर्वत्र साखळदंडांनी बांधला गेला आहे. समता आणि स्वातंत्र्य यांचं समर्थन करण्याचंही कारण पडू नये, इतकी ही तत्त्वं स्वयंसिद्ध आहेत. पण माणसाला बांधून टाकणारी, त्याला पावलोपावली कुंठित करणारी काही अशास्त्रीय कुंपणं माणसानंच उभी केली आहेत. धर्म, ईश्वर आणि परंपरा अशा संकल्पनांचा धाक दाखवून माणसाला ठराविक कुंपणात कोंडून टाकण्यात आलं आहे. धर्म आणि ईश्वर या संकल्पनांची निर्मिती माणसानंच केली. त्यामुळं विषमता आणि पारतंत्र्य यांच्या भोवती ईश्वरी आज्ञेचं वलय उत्पन्न करण्याचं बौद्धिक चातुर्य, काही मूठभर माणसांनी दाखवलं. विषमतेचं समर्थन करणारी जातिसंस्था हे मनुष्याच्या स्वार्थी बुद्धीला आलेलं विषारी फळ आहे. या जातिसंस्थेचा उगम केव्हा झाला, याचा शोध घेताना ती ख्रिस्तपूर्व पाचव्या-सहाव्या शतकात रूढ झाली असावी असा तर्क आहे. सातव्या आणि आठव्या शतकात

तिला स्थिरता येत गेली असा उल्लेख सापडतो. 'धर्मसूत्रात' गौतम, आपस्तंब, वसिष्ठ इत्यादींनी चांडाल आणि श्वपच आणि अन्य अनेक अस्पृश्य जातींचे उल्लेख केले आहेत.

विषमतेच्या पायावर आधारलेली जातिसंस्था आणि अस्पृश्यता वेदकालानंतर अधिकच दृढ होत गेली असावी. 'मनुस्मृती', 'याज्ञवल्क्य स्मृती' या ग्रंथात वर्ण आणि जाती यांचं स्पष्ट समर्थन असून ब्राह्मण हा वर्ण सर्वोच्च मानला आहे. धर्म व संस्कृती यांच्या संदर्भात अत्युच्च अधिकार याच वर्णाला प्राप्त झाले. चार वर्णांची उत्पत्ती कशी झाली, यासंबंधीची एक उपपत्ती मांडण्यात आली आहे. तिची भ्रममूलकता वाचतानाच लक्षात येते. वर्णव्यवस्थेचं समर्थन करताना ज्या श्लोकाचा आधार गंभीरपणानं घेतला जातो, तो श्लोक असा,

*ब्राह्मणोऽस्य मुखमासीत*
*बाहू राजन्य : कृत :*
*उरुतदस्य यद्वैश्य :*
*पद्भ्यां शूद्रो अजायत (पुरुषसूक्त)*

यज्ञपुरुषाच्या मुखातून ब्राह्मण, बाहूंतून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य, आणि पायांपासून शूद्र उत्पन्न झाले. यात उच्चनीचतेचा क्रम श्लोककर्त्यानं लावून दिला आहे. विषमतेला ग्रांथिक बळकटी देण्याचा हा प्रयत्न यशस्वी ठरला. परमेश्वरानंच ही व्यवस्था निर्माण केली. हे सांगून अज्ञानी जनतेला, परमेश्वरी आज्ञा मानली पाहिजे हा विचार तिच्यावर ठसवण्यात आला. ईश्वर आणि धर्म या शब्दांच्या भोवती भीतीचं आणि विश्वसनीयतेचं एक वर्तुळ तथाकथित धर्माचार्यांनी निर्माण करून ठेवलं होतं. सर्वसामान्य माणूस या स्वार्थी आचार्यांवर विसंबून राहिला आणि पदरात पडलेला अन्याय ईश्वरी न्याय म्हणून त्यानं शतकानुशतकं सहन केला. पण या अन्यायामुळंच देशात एकात्मतेचं वातावरण कधीच निर्माण होऊ शकलं नाही. माणसांपासून माणूस तोडण्याचं व त्यांच्यात उच्चनीच भाव जोपासण्याचं काम इथल्या धर्मपीठांनी आणि पीठांवर अधिष्ठित झालेल्या आचार्यांनी प्रामाणिकपणानं केलं. धर्मानं माणूस जोडला पाहिजे पण तो विभक्त करण्याचा विपरीत धर्म कित्येक शतकं प्रतिष्ठित होऊन बसला. अनेक वेळा भारत देश परकीयांच्या आक्रमणाला बळी पडून परतंत्र झाला याचं प्रमुख कारण जातीय आणि वर्णीय विषमता हेच सांगावं लागेल. गेल्या दोनहजार वर्षांच्या काळात हा आपला देश किती वेळा आक्रमकांना शरण गेला याचं लाजिरवाणं उत्तर इतिहासात सापडेल. ईश्वर आणि धर्म आणि जातिसंस्था हा सारा मानवी विचारांचा दुर्दैवी परिपाक आहे. सामाजिक विषमतेमुळं भारतीयांचं जीवन शतखंडित होऊन गेलं. माणूस आपला आत्मप्रत्यय हरवून बसला. देश आणि दैव, पाप-पुण्य, इहलोक-परलोक, पुनर्जन्म या भ्रांतिष्ट कल्पनांच्या आहारी गेल्यामुळं माणूस हतबळ झाला, एक चमत्कारिक भयगंड व न्यूनगंड त्याच्या मनात निर्माण झाला. शेकडो वर्ष कनिष्ठ समजल्या गेलेल्या कोट्यवधी लोकांचं माणूसपण विषम समाजरचनेमुळं फुलू शकलं नाही. भारताचा इतिहास हा पराभवांचा इतिहास आहे, असं मत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी व्यक्त केलं, हे सयुक्तिकच आहे.

धार्मिक आणि सामाजिक विषमतेला छेद देणारी समता विचाराची चळवळ अनेक क्रांतिकारक विचारवंतांनी उभी करण्याचा प्रयत्न केला. इसवी सन पूर्व सहाव्या शतकात

भगवान बुद्ध आणि भगवान महावीर यांनी विषमतेच्या विषारी तत्त्वज्ञानावर तीव्र प्रहार करून सामान्य माणसाला प्रतिष्ठित करण्याचा प्रयत्न केला.

'बहुजनहिताय' 'बहुजनसुखाय' हे तर भगवान बुद्धाचं परम उद्दिष्ट होतं. जात, वर्ण आणि वंश यांच्या आधारावर माणूस उच्च किंवा नीच ठरत नाही. जन्मामुळं तो महान अथवा लहान मानता येत नाही. सारी माणसं समान आहेत ही तर्कशुद्ध भूमिका या महापुरुषांनी घेऊन विषमतेला प्रतिष्ठा देणाऱ्या पुरोहितशाहीविरुद्ध चळवळ उभी केली. बुद्धाच्या संघात आणि महावीराच्या समवशरणात सर्वजातीच्या, सर्व पंथांच्या स्त्री-पुरुषांना मुक्त प्रवेश होता. अस्पृश्यतेच्या भिंती तिथं कोसळून पडल्या. राजाच्या मांडीला रंकही मांडी लावून बसत होता. शूद्रांच्या पंक्तीत बसवल्या गेलेल्या स्त्रीवर्गालाही समानतेची वागणूक मिळू लागली. त्यामुळं विषमतेच्या पुरस्कर्त्यांचं धाबं दणाणलं. कारण समतावादी उदार विचारधारा समाजात मुक्तपणानं वाहू लागली, तर ब्राह्मण्याची प्रतिष्ठा धुळीला मिळेल ही भीती निर्माण झाली. भगवान बुद्धाच्या समतेचा आणि ममतेचा प्रभाव पसरत गेला, त्यांच्यासंबंधीची एक कथा उल्लेखिणं मला या लेखातल्या मध्यवर्ती विचाराच्या दृष्टीनं आवश्यक वाटतं.

उन्हाळ्याचे दिवस होते. रानातून विहार करताना भगवान बुद्धांना तहान लागली. पण त्या निर्जन भागात पाणी मिळणं कठीण झालं. ते तसेच आणखी काही अंतर चालून गेले. दूरवर एक झोपडी दिसली. बुद्धांनी तिथं जाऊन आत चुलीपाशी बसलेल्या स्त्रीला साद घातली. "भद्रे, मला तहान लागली आहे. प्यायला पाणी देशील कां?" ती स्त्री लगबगीनं उठली. आणि नम्रतेनं म्हणाली, "भगवन् मी हलक्या जातीची आहे. मी तुम्हाला पाणी कसं देऊ?" बुद्ध हसले. ते म्हणाले "भद्रे, मी तुला पाणी मागितलं. जात नव्हे! जात ही कल्पना आहे. पाणी हे सत्य आहे." हे उद्‌गार विचार ऐकताच त्या स्त्रीच्या विषण्ण चेहऱ्यावर आनंदाचे किरण पसरले. जातीपातींच्या काल्पनिक बेड्या खळखळा तुटून पडल्या. एका भ्रमातून ती बाहेर पडली. आपल्या माणूसपणाची, आपल्या अस्मितेची तिला जाणीव झाली. समता विचाराची त्या काळात भगवान बुद्धाच्या प्रयत्नांमुळं प्रगती झाली असली, तरी ही लाट पुढे क्षीण होत गेली. जन्मसिद्ध उच्चनीचत्वाची कल्पना अधिक दृढमूल होत गेली. वर्णजातीच्या आणि उपजातींच्या कोंडवाड्यात बहुसंख्य लोकांना राहावं लागलं. समतेची चळवळ अंधुकपणानं पाऊल टाकीत होती. हजार दीडहजार वर्षांच्या कालखंडात विषमतेच्या भिंती मात्र बुलंद झालेल्या दिसतात. पुढं इसवी सनाच्या तेराव्या शतकापर्यंत ही स्थिती मनुस्मृतीमुळं आणि अन्य पुराणग्रंथांमुळं कायम राहिली. तिला आव्हान देणारी चळवळ या दीर्घकाळात उभी राहू शकली नाही. जुनाट जातिव्यवस्थेला धर्माच्या नावाखाली अधिक मजबुती आली. 'एषः धर्मः सनातनः' असं म्हणून धर्मपंडितांनी ही व्यवस्था सुप्रतिष्ठित केली.

विषमतेवर आधारलेल्या जातिसंस्थेमुळं व्यक्तीच्या स्वतंत्र प्रेरणेची क्रूर गळचेपी होत राहते. जात आणि वर्ण व्यक्तींवर परंपरेनं लादण्यात येते. व्यक्तीच्या ठायी असलेल्या कर्तृत्वाला या समाजरचनेत कोणताही अर्थ उरत नाही. वरिष्ठवर्णीय व कनिष्ठवर्णीय यांचं जीवन कोणत्या चाकोरीतून व्यतीत व्हायचं ते जन्मसिद्ध वर्णजातींवरच ठरत असतं.

व्यक्तिस्वातंत्र्याला पूर्णपणे मारक असलेली ही जातिरचना अन्यायकारक आहे यात कसलाही संदेह नाही. हा अन्याय हे पूर्वजन्मीचं फलित म्हणून स्वीकारलंच पाहिजे अशी समाजाची मानसिकता बनवण्यात आली. भारतीय समाजात पुरुषार्थापेक्षा ईश्वरेच्छा आणि नियती या धारकांना प्राधान्य मिळालं. प्रारब्धवादाची पोलादी पकड लोकमनाभोवती असल्यामुळं माणूस अगतिक होऊन दैवाच्या प्रवाहाबरोबर एखाद्या निर्जीव काटकीसारखा वाहत चालला. ज्ञान-विज्ञानाच्या आणि व्यापार उद्योगाच्या व सैनिकी सामर्थ्याच्या क्षेत्रात भारताची जी केविलवाणी पीछेहाट झाली, त्याला इथली विषमतावादी समाजरचना कारणीभूत आहे. तेराव्या शतकात महानुभाव आणि वारकरी या दोन धार्मिक पंथांचा उदय झाल्यानंतर सामाजिक समतेच्या विचाराला थोडीफार गती मिळाली. महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर आणि गोविंदप्रभू यांनी वर्णव्यवस्थेला व ती व्यवस्था मानणाऱ्या शास्त्र-पुराणांना ठामपणे विरोध केला. सारे स्पर्शास्पर्शभेद चक्रधरानं धुडकावून लावले. कुळ, जात, वर्ण यांचा कर्तृत्वाशी आणि श्वेष्ठकनिष्ठतेशी काहीही संबंध नसतो ही घोषणा करून समतेच्या विचाराला चक्रधरांनी चालना दिली. महानुभावांच्या साहित्यातही या विचारांची मुळं सापडतात. पण या विचारातून एक समर्थ चळवळ उभी राहू शकली नाही. महानुभाव पंथाच्या आचार्यांचं समाजव्यवहारापेक्षा आध्यात्मिक अंगाकडे अधिक लक्ष होतं. पण तरीही जातिवर्गरहित समाजाची उभारणी करण्याचं स्वप्न महानुभाव पंथानं रंगवलं होतं. सामान्य माणसांना आपुलकीनं जवळ घेण्याचं कार्य या पंथानं काही अंशी केलं. पण या पंथाची समाजाभिमुखता वेगवेगळ्या कारणांमुळं पुढं कमी झाली. चक्रधरांचा व्यापक दृष्टिकोण त्यांच्या अनुयायांत फारसा उतरला नाही. महाराष्ट्राच्या समाजमनावर आणि संस्कृतीवर या उदारमतवादी धर्मपंथाचा खोलवर परिणाम होऊ शकला नाही. त्यानंतर भागवत संप्रदायाची म्हणजेच वारकरी पंथाची धार्मिक व सामाजिक चळवळ आकारला येऊ लागली. तेराव्या आणि चौदाव्या शतकात ही चळवळ महाराष्ट्रात सर्वत्र पसरत गेली.

वारकरी पंथाच्या आचारविचारांचा परिणाम महाराष्ट्रावर त्या काळात सर्वाधिक झाला. या पंथाचं नेतृत्व उच्चवर्णीयांपेक्षा बहुजनसमाज आणि दलित समाज यातील साधुसंतांकडं गेलं हे उल्लेखनीय आहे. ब्राह्मणानं विचार सांगावा आणि सामान्य लोकांनी तो शिरोधार्य मानावा ही चाकोरी बुजवण्याचं कार्य वारकरी पंथानं केलं. या पंथातून उदयाला आलेले संत, विचारवंत, कवी इत्यादींच्या उदार विचारांचा प्रभाव बहुसंख्य लोकांवर पडू लागला. जनमानसात आजही वारकरी पंथाला जे महत्त्वपूर्ण स्थान आहे ते अन्य कोणत्याही धर्मपंथाला मिळवता आलेलं नाही. 'अवघियांपुरते वोसंडले पात्र' ही या संप्रदायाची भूमिका होती. जन्मसिद्ध उच्चनीचतेला तात्त्विकदृष्ट्या या पंथात स्थान नाही. तेराव्या शतकात चंद्रभागेच्या वाळवंटावर संत ज्ञानेश्वर आणि संत चोखामेळा एकमेकांना उराउरी भेटत होते. हे दृश्य सामाजिक समतेच्या संदर्भात खरोखरच लक्षणीय होते. जातीपातींच्या भिंती वारकऱ्यांच्या चळवळीमुळं काही प्रमाणात ढासळल्या, हे एक ऐतिहासिक सत्य आहे. या सत्याला मर्यादाही आहेत. पण समतेची चळवळ गतिमान करण्याचं श्रेय वारकरी पंथाला देणं सयुक्तिक ठरेल. जात आणि वर्ण यांपेक्षा हृदयातली भक्ती हीच व्यक्तीच्या मदतीची निशाणी ठरते, असा विचार या पंथानं मांडला. वर्णजातींचा विचार न करता ईश्वर सर्वांना आपल्या

असे ठरले. भाऊरावांना विचारले, "तुम्ही बोर्डिंगचे १५० रू. हडप केले, त्वरित द्या. नाहीतर पोलिसात देऊ." त्या वेळी भाऊराव म्हणाले, तुम्ही दहा महिन्याचा पगार थकविला आहे. ३० रु. प्रमाणे त्याचे ३०० रु. झाले. तुमचे १५० वजा जाता माझेच तुमच्यावर १५० रु. आहेत, ते त्वरित द्या व माझा राजीनामा मंजूर करा. क्षणभरदेखील इथे राहण्याची माझी इच्छा नाही. पोस्ट अँड टेलिग्राफ खात्यात ९० रु. पगार सोडून मी इथे आलो; तेदेखील तुम्ही आंब्याला येऊन मला विनंती केली म्हणून. महिना २० रुपयावर मी राहिलो. (सुरुवातीला महिन्याला २० रु. पगार होता) शेवटी २० जुलै १९२९ रोजी कार्यकारिणीची बैठक झाली. अध्यक्ष अमृतराव रणखांबे व सदस्य भादुजी निकाळे यांनी भाऊरावांचा राजीनामा मंजूर करा, असे लेखी कळविले होते त्याप्रमाणे ३१ जुलै १९२९ पर्यंत ते सुपरिन्टेन्डेन्ट राहिले.

महाड सत्याग्रह झाला. नाशिकलादेखील काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रहाचे आयोजन करावे अशी नाशिककर मंडळींनी डॉ. आंबेडकरांना गळ घातली. त्या वेळी ते म्हणाले, "मंदिरात प्रवेश मिळाल्याने आपण अमर होऊ असे नाही. शिवाय देवावर माझा विश्वास नाही. दगडाच्या देवाकरिता पैसा आणि वेळ कशाला खर्च करता. वर्षभरात मला लंडन येथे भरणाऱ्या गोलमेज परिषदेला जायचे आहे. आपल्या समाजाला काही मिळवून देणे हे माझ्या दृष्टीने महत्त्वाचे आहे." तेव्हा नाशिककर मंडळी म्हणाली, "तुम्ही फक्त नेतृत्व करा आणि संमती द्या तुम्हाला. आम्ही तुम्हाला अडविणार नाही." डॉ. आंबेडकरांनी नेतृत्व करण्यास संमती दिली.

दुसऱ्या दिवशी विहितगावला कार्यकर्त्यांची बैठक झाली. अध्यक्ष केशव नारायण देव ऊर्फ पतितपावनदास, सेक्रेटरी भाऊराव गायकवाड, सभासद अमृतराव रणखांबे, सावळाराम दाणी, रावबा ठेंगे, तुळशीराम काळे, संभाजी रोकडे, विठ्ठलराव रणखांबे नानाजी रावबा चंद्रमोरे इत्यादींची निवड केली.

सभेत ठरल्याप्रमाणे भाऊराव गायकवाड यांनी काळाराम मंदिराचे पुजारी गणेश रामचंद्र पुजारी यांना नोटीस दिली की, आम्ही अस्पृश्य मंडळी मंदिरात प्रवेश करून रामाचे दर्शन घेणार आहोत. तुम्ही विरोध केल्यास आम्ही सत्याग्रह करू. आपले मत त्वरित कळवा.

पुजाऱ्यांनी पत्राचे उत्तर न देता 'कोहिनूर' या वृत्तपत्रात जाहीर केले की, हे मंदिर सार्वजनिक नाही. या मंदिराचे मालक ओढेकर हे असून, त्यांचा वंश हल्ली विद्यमान असून, पूर्वजांनी मंदिराचा उत्सर्ग केलेला आहे. पंचाचा या मंदिराशी अगर देवस्थानाशी कमी जास्त करण्याचा अगर कोणास सोडण्यास किंवा मज्जाव करण्याचा अधिकार नाही. आम्ही पुजारी म्हणून देवस्थान आमच्या ताब्यात आहे. कदाचित स्वार्थ बुद्धीने आपल्या अधिकाराचा उपयोग करून पंच अस्पृश्यांना मंदिर प्रवेश करण्याची परवानगी देतील; तर ते निरर्थक ठरून प्रतिकार केला जाईल, हे लक्षात ठेवावे.

२ मार्च १९३० रोजी सत्याग्रह सुरू करायचा असा सत्याग्रह कमिटीने निर्णय घेतला. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना हा निर्णय कळविला. आर्य समाज मंदिर या पंचवटीमधील ऑफिसमध्ये भाऊराव गायकवाड दिवसभर असत. जेवणही तिथेच घेत. त्यांच्याबरोबर पतितपावनदास, अमृतराव रणखांबे, टी. बी. काळे, बापूराव गायकवाड, सावळाराम

दाणी, भादुजी निकाळे इत्यादी असत.

सगळ्यांनी येसकर वाड्याजवळ जमायचे ठरविले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर ठीक १० वाजता सभास्थानी आले. सोबत दादासाहेब गायकवाड, पतितपावनदास, टी. बी. काळे, सावळाराम दाणी, अमृतराव रणखांबे, रंगनाथ भालेराव, संभाजी रोकडे, वस्ताद रूपाजी पगारे, पुंजाजी नवसाजी जाधव, रावबा ठेंगे हे होते बाहेरून आलेले, पी. जे. रोहम, पुनाजी लव्हिंगकर, सुभेदार घाडगे, भास्कर कद्रेकर, देवराव नाईक, डी. व्ही. प्रधान, ग. नी. सहस्त्रबुद्धे, शिवतरकर, आर. डी. कवळी इत्यादी होते.

प्रास्ताविक दादासाहेबांनी केले, ते म्हणाले, "अस्पृश्यांच्या गुलामगिरीचा एक काळ होता. अस्पृश्य लोक गुलामगिरीचे जीवन जगत होते, आज खेडेगावात आपल्याला दोन वर्ग दिसतात. गावकुसाच्या आत एक व दुसरा गावकुसाच्या बाहेर. गावकुसात राहणारा जीवनाचा सारा उपभोग घेणारा हा वर्ग, तर गावकुसाबाहेर सुतकी चेहरे असणारा, सर्वार्थाने मृतवत जीवन जगणारा, माणुसकीला पारखा झालेला हा दुसरा वर्ग. गुणावरून माणसाचे श्रेष्ठत्व न मानता जातीवरून श्रेष्ठत्व मानले जाते, अशी जातिभेदाची तटबंदी वा भिंत या धर्मशास्त्रांनी निर्माण केली आहे. त्यात अस्पृश्य वर्ग एका अंधार कोठडीत कोंडल्याप्रमाणे डांबला गेला आहे. एक जात दुसरीपासून दूर ठेवली जात आहे, त्यामुळे जातीजातीत बंधुभाव, प्रेम आणि सहानुभूती कधीच निर्माण होऊ शकली नाही."

"आपल्या लोकांचे दैनंदिन जीवन पशुवत आहे, कुत्र्यामांजरासारखे. आपली नुसती सावली सवर्णाच्या अंगावर पडली, तरी त्यांना विटाळ होतो. सार्वजनिक पाणवठा, विहिरी, तलाव या ठिकाणी आपला स्पर्श चालत नाही. वाण्याच्या दुकानात फळीला शिवले तरी विटाळ होतो न्हाव्याने केस कापणे, परटाने कपडे धुणे तर दूरच! दुरूनच हॉटेलमध्ये चहा घ्यावा लागतो, सार्वजनिक रस्त्यांवरून लग्नाची वरात काढता येत नाही; असा हा रूढीचा पगडा. यातून आपल्याला वाट काढायची आहे. उच्चनीच जाती पद्धतीवर आधारलेली ही समाजरचना आपल्याला नष्ट करायची आहे आणि त्या ठिकाणी समतेवर आधारलेली एकजिनसी, समानता, बंधुता स्वतंत्रता या तत्त्वांना मानणारी समाजरचना तयार करावयाची आहे. रूढीच्या परंपरेच्या अंधाऱ्या साम्राज्यात घोर निद्रेत पडलेल्या आपल्या समाजाला जागृत करण्याच्या दृष्टीने हा मंदिर प्रवेशाचा सत्याग्रह आयोजित केला आहे."

नंतर देवराव नाईक, डी. व्ही. प्रधान, प्रा. सबनीस, शिवतकर, आर. डी. कवळी यांची भाषणे होऊन शेवटी डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले, "आज आपण काळाराम मंदिर सत्याग्रह करणार आहोत, मंदिर प्रवेशाने आपले सगळेच प्रश्न सुटतील, असे मुळीच मानता येणार नाही. आपले प्रश्न राजकीय, माणुसकीच्या हक्कापासून दूर ठेवले, तेच हिंदू हे अधिकार द्यावयास तयार आहेत की नाहीत हा प्रश्न आहे. हा सत्याग्रह हिंदूंच्या हृदयमंदिरात बदल करण्यासाठी आहे. रामाच्या मंदिरात प्रवेश मिळाल्याने आपले प्रश्न सुटणार नाहीत पण आम्ही उच्चवर्गीय हिंदूमनाची कसोटी घेत आहोत."

सूर्य मध्यावर आला होता. ती रविवारची दुपार होती आणि मार्च (फाल्गुन) महिन्याचे ते ऊन होते. अशा प्रसंगी ही विराट मिरवणूक रामाच्या दर्शनाकरिता निघाली होती. चार चार

माणसांची शिस्तबद्ध रांग होती. १५ हजाराच्या समूहामध्ये अंदाजे ३ हजार महिला होत्या.

मिरवणुकीच्या आघाडीला डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड, देवराव नाईक, डी. व्ही. प्रधान होते. मागच्या रांगेत कद्रेकर, सहस्त्रबुद्धे, शिवतरकर, बापूराव गायकवाड, आप्पासाहेब गायकवाड, अमृतराव रणखांबे, भीमराव कर्डक, पतितपावनदास, सावळाराम दाणी, नानाजी चंद्रमोरे, टी. बी. काळे, भादुजी निकाळे इत्यादी होते.

मिरवणूक मावळतीच्या वाटेने बाहेर पडली. मशीद, फाळके फिल्म कं. घास बाजार, त्र्यंबक दरवाजावरून नाशिकच्या मेनरोडवर पोचली, तरी पिछाडी अजून येसकर वाड्यातच होती.

सत्याग्रहीचा हा मोर्चा धीराने कारंजे चौक टाकून गोदावरीवरील पूल ओलांडून पुढे चालला होता. तो रामाच्या मंदिराकडे वळला पण मंदिराचे चारही दरवाजे बंद होते. कलेक्टर, डी. एस. पी., सेशन जज्ज वगैरे अधिकारी आपल्या दलासह सज्ज होते. कुणीही सनातनी तिथे नव्हते, परंतु श्रीरामाला बंदिवासात टाकून ते पसार झाले होते.

मिरवणूक दक्षिण दरवाजातून बाहेर पडून गोदावरी घाटावर गेली, तेथे भाजी मार्केटच्या पटांगणात शेठ तेरसी यांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. डॉ. आंबेडकर, दादासाहेब नीळकंठ पाटणकर, गो. ह. देशपांडे, महंत सीतारामशास्त्री, जनुभाऊ अभ्यंकर इत्यादींची भाषणे झाली.

१६ हजार सत्याग्रहींना पाथर्डी येथील मंडळींनी शिऱ्याचे जेवण दिले.

३ मार्चपासून मागण्या मान्य होईपर्यंत धरणे धरायचे असे ठरविण्यात आले.

३ मार्च १९३० रोजी सकाळी ९ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे भाषण झाल्यावर ३५ स्त्रिया आणि १०५ पुरुष यांनी मंदिरासमोर धरणे धरण्याचा मान मिळविला. काळाराम मंदिराला एकूण चार दरवाजे आहेत. सत्याग्रहींची विभागणी पुढीलप्रमाणे करण्यात आली.

१) उत्तर दरवाजा : नेतृत्व, श्री पतितपावनदास : सोबत ४० जण

२) पूर्व दरवाजा : नेतृत्व, श्री कचर मथुजी साळवे : सोबत ३५ जण

३) दक्षिण दरवाजा : नेतृत्व, पा. ना. राजभोज : सोबत ३६ जण

४) पश्चिम दरवाजा : नेतृत्व, श्री शंकरदास बर्वे : सोबत ३५ जण

मंदिराचे दरवाजे बंद होते परंतु बाहेर सत्याग्रही धरणे धरीत होते. त्या वेळी कर्मठांना दर्शन घेणे शक्य होईना. मग पुजाऱ्याच्या घरातून मंदिरात जाण्यासाठी एक दरवाजा होता तेथून ते दर्शन घेऊ लागले. ही गोष्ट सत्याग्रहींच्या लक्षात आल्यावर तशी तक्रार भाऊरावांनी कलेक्टरकडे केली पण त्याचा काही उपयोग झाला नाही. ही हकिकत १९ मार्च १९३० रोजी भाऊरावांनी डॉ. आंबेडकरांना पत्राने कळविली. त्यांनी गव्हर्नर फ्रेडरिक साईक्स यांना २० मार्चला पत्राने कळविली. शिवाय ९ एप्रिल १९३० रोजी स्पृश्य व अस्पृश्य यांच्यात जी दंगल उसळली त्यासंबंधी गव्हर्नरला ११ एप्रिल १९३० रोजी पत्राने कळविले. पत्रात ते लिहितात –

'९ मार्च १९३० रोजी रामाचा रथ स्पृश्य व अस्पृश्य यांनी एकत्र ओढायचा होता. तिथे ५ हजार अस्पृश्यांचा जमाव होता. निवडक फक्त ५० जण आम्ही बरोबर घेतले. परंतु

हिंदूंनीच तो रथ ओढून आणला. टोकाला थोडीशी जागा होती परंतु अस्पृश्यांना दोर पकडणे शक्य नव्हते. अस्पृश्य दोर पकडायला जायचे त्या वेळी पोलीस त्यांच्या हातावर दंडुके मारायचे किंवा बंदुकीच्या नळीचा तडाखा बसे. शेवटी रथ रस्त्यावर सोडून दिला व स्पृश्य शेतात पळाले आणि दगडांचा वर्षाव सुरू केला. कित्येक जखमी झाले. माझ्यावर भाऊराव गायकवाड यांनी छत्री धरल्यामुळे मी वाचलो.

'परंतु आमचा सहकारी भास्कर कद्रेकर दगडाच्या माराने बेशुद्ध झाला; परंतु अस्पृश्यांनी शेवटपर्यंत संयम सोडला नाही. शेवटी स्पृश्यांनी सत्याग्रह समितीच्या पंचवटी येथील कार्यालयात घुसून मारझोड केली. महिलांनादेखील मारले. अमृतराव रणखांबे यांच्या मोटारीची मोडतोड केली. यात नाशिक कलेक्टरचे धोरण अनुचित होते.

'या प्रकारानंतर कलेक्टरने मला सांगितले, सत्याग्रह मागे घ्या नाहीतर पोलीस संरक्षण काढून घेतो. आम्ही सत्याग्रह मागे घेणार नाही. तुम्ही फक्त आयुक्तांना समज द्या.' अशा आशयाचे पत्र डॉ. आंबेडकर यांनी गव्हर्नरला पाठविले होते.

१४४ कलम असल्यामुळे सत्याग्रह काही काळ बंद ठेवावा लागला.

त्याच दरम्यान पाथर्डीच्या महार मंडळींनी सत्याग्रहींना जेवण दिल्यामुळे गावकऱ्यांची माथी भडकली आणि महारवाड्यावर त्यांनी हल्ला चढविला. स्त्री-पुरुषांना मारहाण केली. पोलिसात तक्रार नोंदविली, तरी आरोपींना पकडले नाही.

भाऊराव गायकवाड हे सत्याग्रहाची मोहीम राबवीत असताना हिंदू आणि सरकार दोघेही विरोधात अशा या दिव्यातून भाऊराव नेटाने चळवळ चालवीत होते.

स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांनी सनातन्यांना उपदेश करताना सांगितले, "अस्पृश्य हे तुमचे बांधव आहेत. आपण सारे एकाच धर्मात जन्म घेतलेले लोक आहोत, तेव्हा त्यांना आता मंदिरात घेतल्याशिवाय तरणोपाय नाही."

१५ जानेवारी १९३१ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी भाऊरावांना पत्र पाठवून, सत्याग्रह सुरू करा अशी सूचना केली. त्याप्रमाणे भाऊरावांनी जाहीर करताच १५ एप्रिल पर्यंत १४४ कलम पुकारले.

स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी रत्नागिरीला अस्पृश्यांकरिता पतितपावन नावाचे एक मंदिर बांधले होते. भागोजी कीर यांनी एक लाख रुपये मंदिर बांधण्याकरिता दिले होते. भाऊराव गायकवाड स्वत: या कार्यक्रमाला रत्नागिरीला गेले होते. सावरकरांबरोबर सत्याग्रहासंबंधी चर्चादेखील झाली. परंतु नाशिक सत्याग्रहाला एका नव्या पैशाची मदत सावरकर किंवा कीर यांनी केली नाही.

१२ मार्च १९३१ रोजी भाऊराव गायकवाड यांना स्वा. सावरकरांनी एक पत्र पाठविले होते. त्यांत स्पृश्य समाजास विनंती होती. ते लिहितात, 'माझी तुम्हास अत्यंत नम्र पण आग्रहाची विनंती आहे, श्रीरामाचे देऊळ इतर स्पृश्य हिंदूंप्रमाणे अस्पृश्यांस उघडे करावे, त्यांची मागणी अत्यंत धर्म्य, न्याय्य आणि हिंदूहितसंवर्धक आहे तो हिंदूधर्माचाच विजय आहे. राक्षस कुळातील बिभीषणादिकांना त्यांच्या भक्तीचा उदय होताच अयोध्येचा आपला राजवाडा मुक्तद्वार करणारा श्रीराम; त्यांच्याच जातीच्या, धर्माच्या आणि राष्ट्राच्या या परंपरागत भक्तास या पूर्वस्पृश्य हिंदू बंधूंस आपल्या देवालयाची दारेही मुक्त करण्याची सद्बुद्धी आम्हा

स्पृश्य हिंदूंस देवो ही मनोभावे करुणा भाकणारा,[१] (वि. दा. सावरकर.)

डॉ. बाबासाहेब आंबेडकर विलायतेहून परत येईपर्यंत सत्याग्रह स्थगित करावा असा ठराव डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशनने केला. त्याचे कारण असे होते की, सनातनी व सरकार दोघांनाही दरम्यान लंडनहून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भाऊरावांना पत्र पाठविले.

*११ ऑक्टो १९३०*

*प्रिय भाऊराव,*

*नाशिक रोडवर झालेल्या प्रकारातून निष्पन्न झालेल्या फौजदारी खटल्याचे काय झाले? या संबंधात मला लवकर कळविल्यास आनंद होईल.*

*आपण व अमृतराव यांच्यावर किती मोठी जबाबदारी आहे मी सांगण्याची मला आवश्यकता वाटत नाही. तुम्ही दोघे माझे सहकारी आहात ही एक सुदैवाची गोष्ट आहे. माझ्या गैरहजेरीत आपण सर्व जबाबदारी पार पाडाल याबद्दल मला तिळमात्र शंका नाही.*[२]

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

डॉ. बाबासाहेब आंबेडकर विलायतेतून परत येईपर्यंत सत्याग्रह स्थगित करावा असा ठराव डिप्रेस्ड क्लासेस असोशिएशनने केला. त्याचे कारण असे होते की सनातनी व सरकार दोघांनाही सत्याग्रह नको होता. या दोघांनी असोसिएशनचे श्री. निकाळजे व भोसले यांना हाताशी धरून हा ठराव केला. या दोघांनी कधी सत्याग्रहाकडे ढुंकूनही पाहिले नाही किंवा सत्याग्रह स्थगित ठेवावा की चालू रहावा याचा अधिकार या दोघांकडे नसताना, त्या ठरावाची प्रत जिल्हाधिकारी व कमिशनर यांना पाठविली.

मध्य विभागाचे कमिशनर मि. क्लेंटन यांनी सत्याग्रहाचे मुख्य पुढारी भाऊराव गायकवाड यांना भेटीला बोलविले. ''मि. भोसलेंच्या पत्रावरून डॉ. बाबासाहेब हिंदुस्थानात येईपर्यंत सत्याग्रह स्थगित ठेवावा, हे तुम्हाला समजले असेल. तुमची अस्पृश्यता हळूहळू नष्ट होत आहे. गेली तीस वर्षं मी या देशात आहे. अस्पृश्य सुखी होते परंतु सत्याग्रहामुळे स्पृश्यास्पृशांमध्ये बेबनाव झाला व दंगली झाल्या. म्हणून सत्याग्रह बंद ठेवावा. नाहीपेक्षा; सत्याग्रहाच्या पुढाऱ्यांना सरकारला अटक करून तुरुंगात पाठवावे लागेल.'' क्लेंटनसाहेबांची ही भूमिका ऐकून गायकवाड म्हणाले, ''डॉ. बाबासाहेब आंबेडकर त्यांच्या संमतीनेच सिंहस्थातील सत्याग्रह सुरू करण्याचे आम्ही ठरविले आहे. भोसले आणि निकाळजे यांनी जो बुद्धिभेद चालविला आहे, तो त्यांना कमीपणा आणणारा आहे हा सत्याग्रह सरकारच्या विरुद्ध नसून तो स्पृश्य सनातनी हिंदूंच्या विरुद्ध आहे. सरकारने तटस्थता पाळून गंमत पाहण्यापेक्षा आम्हाला सहकार्य करून आमची सहानुभूती मिळवून घ्यावी. इंग्रज सरकार समर्थ आहे ते आम्हाला नुसते तुरुंगातच काय, पण दुसऱ्या वाटेल त्या आपत्तीत ढकलू शकतील. त्यांच्या ब्रीदाला शोभेल तसे त्यांनी करावे. दीडशे वर्षांत पुष्कळ झाले. तीस वर्षांत मोठी क्रांती घडली. सर्व आपोआपच होऊन, राहिले आहे या गोष्टीवर विश्वास ठेवावा असा आमचा अनुभव नाही. हिंदूसमाजाचे अंतर्याम बिलकूल बदलले नाही. माणुसकीला शोभेलसे कुठलेही कृत्य आम्ही केले; तरीही हिंदूसमाज आमच्यावर चिडून जातो असा आमचा अनुभव आहे. गावकरी देतील ती भाकरी व सांगतील ती चाकरी या कायद्याप्रमाणे, आम्ही त्यांच्याशी

त्यांच्या कुत्र्याप्रमाणे वागतो तोपर्यंत त्यांच्या दृष्टीने आम्ही फार इमानी व सालस ठरतो, पण आम्ही जर चांगले कपडे घातले; घाणेरडी कामे करण्याचे नाकारले की महार माजले; उन्मत्त झाले; त्यांना त्यांची पायरी दाखविली पाहिजे असे कठोर शब्द आजही ऐकावे लागतात. तुमच्या प्रत्यक्ष प्रयत्नांनी नसले तरी तुमच्याबरोबर तुम्ही आणलेल्या संस्कृतीच्या अप्रत्यक्ष प्रभावाने हे अपमान सहन करण्याची मुर्दाड वृत्ती आमच्या ठायी आता राहिली नाही. याबद्दल वास्तविक तुम्हाला अभिमान व कौतुक वाटायला पाहिजे.''

भाऊरावाच्या खुलाशाने क्लेंटनसाहेबांच्या स्वातंत्र्यप्रिय अंत:करणाला या गोष्टी पटल्याच पाहिजेत. पण त्यांच्या राजकीय धोरणाशी कशा काय जुळतात ते पहावे लागेल.

डॉ. आंबेडकरांनी सिंहस्थापर्यंत सत्याग्रह बंद ठेवावा असे सांगितले तर तुम्ही ऐकाल. काय? ते आमचे पुढारी आहेत, सत्याग्रह कमिटीला ते विचारात घ्यावेच लागेल, असे उत्तर भाऊरावांनी दिले व मुलाखत संपली.[४]

नाशिकच्या विद्यार्थी मंडळाने गणेशोत्सव साजरा करण्याचे ठरविले. प्रमुख वक्ते म्हणून सत्याग्रहाचे पुढारी भाऊराव गायकवाड यांना २१ सप्टेंबर १९२१ रोजी त्यांचा आवडता विषय 'अस्पृश्यता निवारण' या विषयावर बोलण्यासाठी निमंत्रण देण्यात आले. व्याख्यान श्री. बर्वे यांनी नवीन बांधलेल्या बंगल्याच्या ४थ्या मजल्यावरील प्रशस्त दिवाणखान्यात ठरले. परंतु सनातन्यांनी श्री. बर्वे यांना दम भरला. भाऊराव गायकवाड यांना गणपतीसमोर तुमच्या बंगल्यात व्याख्यानाला बोलावले, तर तुमच्या घराची वास्तुशांती आम्ही करणार नाही. नंतर देशभक्त दादासाहेब गद्रे यांनी जागा देऊ केली पण ती लहान असल्याने विद्यार्थ्यांनी नाकारली. मग शहराच्या वेशीत असलेल्या राजेबहादराच्या वाड्यात तळमजला मिळाला. संध्याकाळी ५-६ वाजता गणपतीची स्थापना केली. दे. भ. गोविंदराव देशपांडेंसारख्या सल्लागारांनी दाखविलेल्या तत्त्वनिष्ठेबद्दल अभिनंदनच केले. सनातन्यांनी विरोध करून वाड्याच्या मालकाचे मन वळवून वाड्याला कुलूप लावणार आहे तेव्हा गोविंदराव देशपांडे ''चारचौघासमक्ष म्हणाले, ते तोडून टाकू.'' गणपतीसमोर एका अस्पृश्यांचे भाषण म्हणजे मंदिर प्रवेशच आहे. या कल्पनेने सनातन्यांचा जळफळाट झाला.

अध्यक्ष म्हणून श्री. सबनीस होते. भाषणात ते म्हणाले, ''गायकवाड हे खरे समाजसेवक आहेत. ते पोटाच्या धंद्याकरिता क्षणभरही न घालवता अहर्निश समाजकार्यात गढलेले असतात. अमुक खेड्यात महाराचा मराठ्यांनी छळ केला त्याची दाद वरिष्ठाकडे लावणे; अमक्या शाळेतून अस्पृश्यांच्या मुलाला हाकून लावले तर तो प्रश्न स्कूलबोर्ड अधिकाऱ्यांच्या मार्फत नेटास लावणे; मामलेदार कलेक्टर, इंजिनिअर वगैरे अधिकाऱ्यांना भेटून अस्पृश्य उमेदवाराच्या नोकरीची सोय करणे; शाळेच्या हेडमास्तरांना भेटून अस्पृश्य विद्यार्थ्यांना नादाऱ्या मिळवून देणे आणि मंदिर प्रवेशासाठी चळवळ करणे ही कामे सदोदित चालू असतात. समाजकार्यापुढे खाण्यापिण्याची आठवण होत नाही. एका गावाला समाजकार्याकरिता जात असताना भुकेने जीव व्याकूळ झाला; तेव्हा रस्त्यात सापडलेला कांदा खाऊन भूक भागविली.'' अशा शब्दांत अध्यक्षांनी व्याख्यात्याचा परिचय करून दिला.

विद्यार्थ्यांच्या मनोधैर्याबद्दल भाऊरावांनी अभिनंदन केले. अस्पृश्यांची कशी कुचंबणा होते यावर ते म्हणाले, ''उदरनिर्वाहाकरिता उदीम व्यापार करता येत नाही. क्षुल्लक धंदा

म्हणजे विड्या बांधण्याचा. पण विड्यांना दोरा बांधलेला असतो म्हणून अस्पृश्यांच्या विड्या खपत नाहीत. अस्पृश्यांनी शिक्षण घ्यावे, राहणी स्वच्छ ठेवावी म्हणजे अस्पृश्यता जाईल, असे हिंदू म्हणतात, पण डॉ. आंबेडकरांचे उदाहरण पहा. ते अत्यंत विद्वान आहेत. शेकडो जन्मजात ब्राह्मणांपेक्षा जास्त विद्वान आहेत. स्वच्छ राहणी आहे, तरी त्यांना मान मिळत नाही. एका रस्त्याने त्यांची मोटार गेली म्हणून महार या रस्ताने का गेला म्हणून गावकरी संतप्त झाले. इथे स्कूलबोर्डाच्या ८० शाळा आहेत. तिथे अस्पृश्य मुलांना बाहेर उन्हातान्हात बसावे लागते. मास्तर खिडकीतून शिकवितो. लोकलबोर्डाच्या विहिरीवर त्यांना पाणी मिळत नाही. इतके बोलून झाल्यावर भाऊराव मंदिर प्रवेशावर बोलले. रेल्वे कंपन्यांनी युरोपियनांना काही डबे राखून ठेवले आहेत. त्यामुळे आपली काहीही गैरसोय होत नसली, तरी आपल्याला ते हीन लेखतात व त्यांच्यात मिसळू देत नाहीत. म्हणून आपण चळवळ करतो तिला कुणीही नावे ठेवीत नाही. केवळ अस्पृश्यांना मज्जाव पण सर्वांना खुली असलेली देवळे म्हणजे अस्पृश्यांचा अपमान नव्हे काय? परदेशी कापड विणणाऱ्या व दारूची विक्री करणाऱ्या दुकानदारांना व्यक्तिस्वातंत्र्य, नाही कां? मग आम्ही पिकेटिंग का करतो हे चालते पण अस्पृश्य देवळावर पिकेटिंग करतात त्यांना विरोध का करता?"

"आता सत्याग्रह सुरू झाल्यावर आपण भाग घेऊन अस्पृश्यता निवारण्याला हातभार लावा. ते शक्य नसल्यास घरातील मंडळींचे मनपरिवर्तन करा." एवढे बोलून भाषण संपविले.[५]

नाशिक जिल्ह्यात येवल्याजवळ मुखेड हे २ हजार वस्तीचे गाव आहे. बहुतेक वस्ती मराठ्यांची. ४-५ मारवाडी, ६-७ ब्राह्मणांची घरे आहेत. मराठवाडा गावालगत पण वेगळा आहे. येथे २३ सप्टेंबर १९३१ रोजी चातुर्मासानिमित्त 'पांडवप्रताप' ग्रंथाचे पारायण सुरू केले. समाप्ती समारंभ करण्याचा प्रघात आहे. त्याप्रमाणे कार्यक्रम ठरला. नातेवाईक, सोयरेधोयरे व पुढारी यांना बोलाविले. भाऊराव गायकवाड, अमृतराव रणखांबे, विठ्ठलराव रणखांबे, पतितपावनदास, सावळेराम दाणी यांना आग्रहाने बोलविले. 'पांडवप्रताप' ग्रंथांची एका शृंगारलेल्या पालखीत ठेवून महारवाड्यातून दुपारी अडीच वाजता मिरवणूक काढली. १५०० लोक होते, वेशीजवळ मिरवणूक ठीक ३ वाजता आली. परंतु गावकऱ्यांनी ठणकावून सांगितले, आज तुम्ही देवाची व पोथीची मिरवणूक काढाल, उद्या महाराचांभाराचा नवरदेव गावातून मिरवाल, परवा आमच्या ओटीवर व घरादारात शिराल. अस्पृश्य पुढाऱ्यांनी त्यांना समजावून सांगितले. पण त्या वेळी भाऊरावांच्या तोंडावर एकाने ठोसा मारला.

येवल्याच्या पोलिसांना खबर देण्याकरिता भाऊराव गायकवाड व अमृतराव रणखांबे मोटारने गेले. साडेसहा वाजता एक पोलीस इन्स्पेक्टर व दोन हवालदार यांना घेऊन परत आले. हे तिघेही साध्या पोशाखात होते.

मध्यंतरी आजूबाजूच्या गावातून निमंत्रित मराठे आले. त्या वेळी त्यांचा दांडगेपणा वाढत चालला. त्यांच्या हातात काठ्या होत्या. फौजदाराला सांगितले, पण त्याचा काहीही परिणाम झाला नाही. त्यांनी फक्त येथील परिस्थिती गंभीर आहे असा रिपोर्ट लिहिला. तो रिपोर्ट घेऊन रणखांबे येवल्याला मामलेदार साहेबांना भेटावयास गेले. यानंतर पो. इन्स्पेक्टर तेथून निघून गेले. एक पोलीस ११ वाजता मराठ्यांबरोबर पत्ते खेळून निघून गेला.

नंतर गावकऱ्यांनी दगडफेक सुरू केली. मग आगीचा डोंब पेटविला. धूर, ठिणग्या व राख अस्पृश्यांच्या अंगावर पडेल, असा प्रकार सुरू केला. शिव्या देऊ लागले. एवढ्यांनी त्यांचे समाधान झाले नाही; तेव्हा रात्री १२ वाजता 'ग्यानबा तुकाराम', 'म. गांधीकी जय' व 'हरहर महादेव' अशा घोषणा देत चालून आले. भाऊराव गायकवाड, रूपाजी पगारे, कर्डक, विठ्ठलराव रणखांबे वगैरे १५-२० जण जागत बसले होते. त्यांच्यावर हल्ला केला भाऊरावांच्या छातीवर व विठ्ठलराव यांच्या डोकीवर विशेष मार बसला. शेवटी पालखी आणि 'पांडवप्रताप' ग्रंथ एकत्र करून घासलेट टाकून आग लावली.

पहाटे तीन वाजता मामलेदारसाहेब आले. परंतु काहीही न पाहता पाटलाच्या घरी मुक्कामाला गेले. सकाळी मामलेदारसाहेबांचे बोलावणे आले म्हणून गायकवाड, रणखांबे आदी मंडळी गेली. तेव्हा ब्राह्मणी धर्माचे पिशाच्च त्यांच्या अंगात संचारले व पुढाऱ्यांना अरे-कारे म्हणू लागले. शिव्या आणि अपशब्द बोलू लागले. तुम्ही अस्पृश्य आजकाल फार माजू लागलात, असे उर्मटपणाने वागून त्यांना वाटेला लावले. शेवटी हे प्रकरण कलेक्टरसाहेबांकडे गेले.

असा एकूण प्रकार मुखेड या गावी घडला. याचा संपूर्ण तपशील आणि छायाचित्रे भाऊरावांनी लंडनला डॉ. आंबेडकरांना पाठविली.[६]

या संदर्भात गोलमेज परिषदेवरून डॉ. आंबेडकर यांनी भाऊरावांना पत्र पाठविले आहे.

*ता. १४.१०.१९३१*

*प्रिय भाऊराव,*

*मुखेड येथे आपले लोक व स्पृश्य लोक यांच्यात झालेल्या झगड्याच्या बाबतीत आलेल्या तारा मी वाचत आहे. कसल्याही परिस्थितीत लढा देण्याची आपल्या लोकांची तयारी पाहून मला आनंद होतो. तुम्ही ता. ५ ला. सत्याग्रह करणार आहात असे मला वाटते. तुम्ही उत्तम तयारी केली असावी असे मला वाटते. तुम्हाला मदत करण्यास मी तिथे नाही याचेच मला दुःख होते. नाशिक जिल्ह्यातील आपली जनता आपल्या प्रश्नाबाबत जागृत आहे हे मी जाणतो.*

*मला अमृतराव यांच्याकडून तार आलेली आहे. त्याने माझे हात अधिकच बळकट होतील. सर्व मित्रांना व मि. काळे, दाणी व इतरांना नमस्कार.*[७]

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

*त्याचप्रमाणे २६-११-१९३१ हे पत्र लंडनहून डॉ. आंबेडकर यांनी 'जनता' साप्ताहिकाकरिता पाठविले आहे.*

*नाशिक व मुखेडच्या सत्याग्रहासंबंधी सर्व हकिकत मला वाचावयास मिळाली, नाशिक प्रांतातील अस्पृश्य जनतेच्या मनोधैर्याबद्दल व त्यांच्या तयारीबद्दल मला अत्यंत अभिमान व धन्यता वाटते, आपल्या अतुल धैर्याने सर्व प्रांतातील अस्पृश्य जनतेला स्वावलंबनाचा व आत्मोद्धाराचा मार्ग त्यांनी प्रत्यक्ष कृतीने दाखवून दिला आहे.*[८]

*आपला*

*भीमराव*

मुखेड प्रकरणाचा समझोता स्पृश्य व अस्पृश्य एकत्र येऊन झाला. स्पृश्यांनी एक पत्रक प्रसिद्ध केले. त्यात ते म्हणतात, 'आम्ही सह्या करणारी मंडळी रा. मुखेड, ता. येवला, जि. नाशिक जाहीर करतो की, २३ सप्टेंबर १९३१ रोजी मुखेड येथे अस्पृश्य बंधूंच्या 'पांडवप्रताप' ग्रंथाच्या मिरवणुकीच्या वेळी आमच्या लोकांच्या अज्ञानामुळे सार्वजनिक रस्त्यावर जी हरकत झाली त्याबद्दल आम्हास वाईट वाटते. कोणत्याही सार्वजनिक रस्त्याच्या ठिकाणी हरकत करणे हे अन्यायाचे व बेकायदेशीर आहे तरी यापुढे अडथळा न होण्याबद्दल आम्ही शक्यतो खटपट करू व बंधूभावाने वागू.' या पत्रकावर २५ मराठे मंडळींच्या सह्या असून ११ मार्च १९३२ रोजी खटला काढून घेतला. रावसाहेब वंडेकर यांच्या अध्यक्षतेखाली सलोखा कमिटी स्थापन करण्यात आली. रावसाहेब भाऊसाहेब थोरात, उपाध्यक्ष, स्पृश्यास्पृश्य मतभेद निवारक कमिटी यांनी हे पत्रक प्रसिद्ध केले. अशा रीतीने मुखेड प्रकरणाचा निकाल लागला.[१]

**रामकुंड सत्याग्रह**

काळाराम मंदिरात जसा अस्पृश्यांना प्रवेश नाही तसा रामकुंडावर आंघोळ करण्यास देखील प्रवेश नाही. इतकेच नव्हे, तर महारास बाजूने जाण्यासदेखील मज्जाव होता. तिथेही सत्याग्रह करून रामकुंड प्रवेशाचा हक्क बजवावा म्हणून सत्याग्रह कमिटीने १३ डिसेंबर १९३१ रोजी तिथे सत्याग्रह करण्याचे ठरविले.

तत्पूर्वी भिक्षुकशाही व सरकार यांनी संगनमत करून अस्पृश्यांची कोंडी करायची असा घाट घातला. २९५ कलमाखाली पुढाऱ्यांवर खटले भरण्याची वदंता नाशिकभर पसरली. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व कलेक्टर मि. गार्डन यांनी भाऊराव गायकवाड यांना बोलून दाखविले त्या वेळी भाऊरावांनीदेखील बाणेदार उत्तर दिले, ते म्हणाले, "सरकारला योग्य वाटेल ते त्यांनी करावे. आमची चळवळ कायदेभंगाची नसून रूढीभंगाची आहे, पण रूढीभंग करताना एखादा पक्षपाती सरकारी कायदा आमच्या मार्गात आडवा आला, तर त्याचाही भंग आम्हाला करावा लागेल."

गोदावरी नदीवर रामकुंड, सीताकुंड, धनुष्यकुंड, लक्ष्मणकुंड, अहिल्याकुंड आणि महारकुंड एवढे पाण्याच्या प्रवाहामध्ये कुंड होते. परंतु सत्याग्रह फक्त रामकुंडावर होता. मग सरकारने म्युनिसिपालिटीकडून सगळे कुंड कोरडे करून घेतले. याचा अर्थ कुंड सार्वजनिक मालकीचे होते. मग तिथे सनातन्यांनी प्रवेश का नाकारला? परंतु अचानक पाऊस पडल्याने कुंड पुन्हा भरले. कुंडास विटाळ होऊ नये किंवा ते बाटू नये याकरिता, साफसफाई करण्याकरिता अस्पृश्य मजूर न लावता कोळी, वडारी, मराठे वगैरे जातींचे मजूर लावून कुंड पुन्हा कोरडे केले.

१३ तारखेला ९ सत्याग्रहींचा एक जथा पुष्पहारांनी मंडित होऊन छावणीतून बाहेर आला. देवराम नाईक यांनी शांततेने व शिस्तीने वागण्याची कल्पना दिली. त्यांच्याबरोबर भाऊराव गायकवाड, अमृतराव रणखांबे, तुळशीराम काळे, सावळाराम दाणी वगैरे निवडक मंडळी चालली होती. वरून पाऊस पडत होता. ही मंडळी ५ तास पावसात उभी होती. परंतु शेकडो ब्रह्मवृदांनी मार्ग रोखून धरला होता. तालीमखान्यातील वस्तादही होते. पायापासून

डोक्यापर्यंत खादी वस्त्रे परिधान केलेले देशभक्त कॉंग्रेसजनही होते. मारवाडी, मराठे, तेली, तांबोळी, वडारीदेखील होते. संध्याकाळी ५ वाजेपर्यंत सत्याग्रही थांबले आणि छावणीत परतले.

त्याच दिवशी मुंबईचा एक तरुण आधीच रामकुंडावर सनातन्यांच्या घोळक्यात फिरत होता. शेवटी 'आंबेडकर की जय' म्हणून मोठ्याने ओरडला. त्या वेळी सनातनी आणि पोलीस धावले व त्याला बाहेर काढले.

१४ तारखेला २० सत्याग्रहींची तुकडी निघाली. सोबत भाऊराव गायकवाड व तुळशीराम काळे होते. आजही कालच्यासारखा सनातन्यांनी लपंडाव सुरू केला. तेवढ्यात 'पकडा', 'ठोका' असा कोलाहल ऐकू आला. शंकर श्रावण गायकवाड याने सरळ कुंडात उडी मारली व आंबेडकर की जय अशी घोषणा दिली. त्याला यथेच्च बदडले. रक्तबंबाळ अवस्थेत तो कुंडातच उभा होता. पोलिसांनी त्याला बाहेर काढले.

मुंबईचे झकेरिया मनियारसाहेब यांच्या मुस्लिम रेड क्रेसेंट सोसायटीच्या ॲम्ब्युलन्सने त्याला दवाखान्यात नेऊन उपचार केले.

त्याचवेळी रामकुंड परिसरात १४४ कलम लावले. तिथे हजर असलेल्या अस्पृश्य पुढाऱ्यांनी सरकारला सांगितले. रामकुंड सर्वांनाचा मोकळे राहिले पाहिजे किंवा सर्वांनाच बंद झाले पाहिजे, अशी आमची भूमिका आहे.

सत्याग्रहींवर सतत दगडफेक चालू होती. त्यात ४ जानेवारी १९३२ रोजी वासुदेव रामचंद्र वडनेरे या नावाच्या सोनाराच्या एका मुलाला दगड लागून त्याला मृत्यू आला. स्पृश्य म्हणत, अस्पृश्यांनी मारलेल्या दगडाने त्याला मृत्यू आला; तर अस्पृश्य म्हणत स्पृश्यांनी मारलेल्या दगडाने त्याला मृत्यू आला. कुणाच्या दगडाने त्याला मृत्यू आला हे काहीच कळेना. नुसते आरोप-प्रत्यारोप करीत होते. एका सनातन्याने सांगितले, गायकवाडने दगड मारला. मी प्रत्यक्ष पाहिला. मी कोर्टात ॲफिडेव्हिट द्यायला तयार आहे. सनातनी किती खालच्या पातळीवर गेले याचा हा नमुना होता. गायकवाड हे म. गांधींचे अनुयायी नसले तरी ज्या तत्त्वाचे गांधी पुरस्कर्ते आहेत; त्याच तत्त्वाचे गायकवाह हे नम्र उपासक आहेत.

रामकुंडावरील १४४ कलमाची मुदत १४ फेब्रुवारी १९३२ रोजी संपली पण पुढे ७ दिवस पुन्हा वाढविली म्हणजे २१ फेब्रुवारी १९३२ झाली.[१०]

१८ मार्च १९३२ रोजी भाऊराव गायकवाड यांनी नाशिक येथील नगरपालिकेत १ एप्रिल १९३२ पासून अस्पृश्य, मुसलमान व मागासलेले या उमेदवारांनाच नोकरी द्यावी. त्यावर सनातनी श्री. तळाजिया यांनी उत्तर दिले की, निम्म्यापेक्षा अधिक पैसा महार आणि भंगी कामगारांना देण्यात येतो. तेव्हा गायकवाड म्हणाले "ऑफिसमध्ये कारकुनाच्या व इतर अधिकाऱ्यांच्या जागा अस्पृश्य व इतरांना द्याव्यात. ऑफिस ॲडमिनिस्ट्रेशन कसे चालते हे शिकायचे असेल तर यांची भरती करावी, असे मी म्हणालो होतो. परंतु तळाजिया म्हणतात या लोकांचा सफाई खात्यात प्रमाणाबाहेर भरणा आहे. त्याकरिता यापुढे भंग्यांच्या व झाडूवाल्यांच्या जागा खाली झाल्यास त्या जागेवर ब्राह्मणांना आधी लावावे व खालच्या जातींची भरती प्रमाणाबाहेर झाल्याने हा अन्याय दूर करावा."[११]

रामनवमीच्या उत्सवात सत्याग्रह पुन्हा सुरू करावा कारण, सत्याग्रहाचे क्षेत्र रामकुंड-सीताकुंड इथपर्यंत वाढले होते.

**सत्याग्रही स्त्री-पुरुषांची धरपकड**

१५ एप्रिल १९३२ रोजी तुळशीराम काळे यांच्या वृद्ध मातोश्री पवळाबाई वय ७२ वर्षे, अमृतराव रणखांबे यांच्या वृद्ध मातोश्री सीताबाई, भाऊराव गायकवाड यांची पत्नी, बहीण आणि कुटुंबातील सर्वजण तुरुंगात जाऊन बसले. सावळाराम दाणी यांच्या मातोश्री आदल्या दिवशी निधन पावल्या; तरी दुसऱ्या दिवशी ते स्वतः तुरुंगात गेले.

तुरुंगवास पत्करलेल्या महिला : पवळाबाई संभूजी काळे, सीताबाई धोंडिबा रणखांबे, सीताबाई भाऊराव गायकवाड, गीताबाई भाऊराव गायकवाड, शांताबाई यशवंत दाणी, यमुना गोविंद जाधव, रंभाबाई राजाजी जाधव, येसाबाई भीमराव जाधव, रमाबाई पतितपावनदास, इंदिराबाई पतितपावनदास, ताईबाई किसन गांगुर्डे, लक्ष्मीबाई शिवराम गांगुर्डे, काशीबाई गणपत पगारे, सावित्रीबाई किसन गांगुर्डे, चिमाबाई गंगाराम काळे, सावळाबाई सुकाजी कदम, शेवंताबाई अण्णाजी कांबळे, सीताबाई महादू तेजाळे, साळुबाई दगडूची रोकडे यांपैकी वयाच्या मानाने पवळाबाई काळे यांना १५ दिवस व बाकीच्यांना १ महिना शिक्षा झाली.

तुरुंगवास पत्करलेले पुरुष : भाऊराव कृष्णराव गायकवाड, अमृतराव धोंडिबा रणखांबे, सावळाराम बापू दाणी, अनंत नारायण शिरोळकर, श्रीपत आंबुजी पवार, तुळशीराम भगवंत गांगुर्डे, काशिनाथ लहूजी पगारे, यमा रामजी साळवे, बाबू रामजी साळवे, कोंडाजी राघोजी गांगुर्डे, रावजी रंभाजी केदारे, पुनाजी लिंगाजी पहिलवान, हरिभाऊ रायाजी जाधव या सर्वांना २ महिन्यांची शिक्षा होऊन धुळ्याच्या जेलमध्ये पाठविले.[१२]

डॉ. बाबासाहेब आंबेडकर सिमल्याला होते. त्यांनी भाऊराव व अन्य सत्याग्रहींना अटक झाली हे समजल्यावर एक पत्र पाठविले. ते कुठेही असले तरी सत्याग्रहाकडे किती आपुलकीने आणि जिव्हाळ्याने बघत असत; त्याचा हे पत्र उत्कृष्ट नमुना आहे.

"नाशिकला रामनवमीच्या दिवशी घडलेल्या प्रकाराची बातमी मला येथे लागलीच तारेने समजली. स्थानिक सरकारी अधिकाऱ्यांच्या हातून घडलेल्या अन्यायी व पक्षपातीपणाच्या वर्तनाबद्दलची सविस्तर माहिती मागाहून वाचण्यात आली. अस्पृश्य प्रजेच्या दृष्टीने विचार करता इंग्रज सरकारचे स्वामित्व हे मिळमिळीत सौभाग्याप्रमाणे आहे. ज्यांचा अस्पृश्य जनतेशी संबंध येतो, ते सारे सरकारी अधिकारी स्पृश्य वर्गापैकीच असतात आणि मराठेशाही अगर पेशवाई जाऊन आंग्लाई आल्यामुळे जरी या लोकांचे पोशाख बदललेले दिसले; तरी यांचे अंतःकरण काही बदलले नाही. जिल्ह्याचा मुख्य अधिकारी जरी युरोपियन अगर इंग्रज असला तरी तो बहुधा या बाबतीत अजाण, तटस्थ व बेदरकार असतो. त्याच्या हाताखालचे अधिकारी सांगतील तेवढेच त्याला ऐकू येते व दाखवितील तेवढेच त्याला दिसते. असे नसते तर नाशकाला परवा घडला तसा प्रकार इंग्रजांच्या राज्यातही कसा व का घडला असता?

"भाऊराव गायकवाड, रणखांबे, दाणी वगैरे कार्यकर्त्यांना याप्रसंगी तुरुंगवास पत्करावा

लागला. त्यातल्या त्यात श्री. तुळशीराम काळे यांच्या वृद्ध मातोश्री त्याचप्रमाणे अमृतराव रणखांबे यांच्या मातोश्री बंदिवान झाल्याचे ऐकून खेदही वाटला आणि एक प्रकारची धन्यताही वाटली. नाशिक जिल्ह्यातील माझ्या अस्पृश्य बांधवांबद्दल मला मोठा अभिमान वाटतो. अस्पृश्यांची सर्वतोपरी असलेली विपरीत व बिकट परिस्थिती लक्षात घेता, त्यांनी गेल्या तीन-चार वर्षांत जे स्वावलंबन व जे संघटन प्रत्यक्ष व्यवहारात प्रकट करून दाखविले व ज्या सोशीक व धैर्यवृत्तीचा माझ्या या बंधूभगिनींनी परिचय करून दिला; ती ही सारी घटना खरोखरच अपूर्व अशी आहे. दुसऱ्या कुणाचे साहाय्य नाही, कोणाची सहानुभूती नाही, उलट कोणत्या ना कोणत्या तरी निमित्ताने सर्वजण नाखूष व विरोधी बनलेले. अशा परिस्थितीत अस्पृश्यांनी, अस्पृश्यांकरता व अस्पृश्यांच्या साहाय्यावर नाशिक सत्याग्रहासारखी चळवळ सतत तीन-चार वर्षे एवढ्या मोठ्या प्रमाणात एवढ्या उत्साहाने व इतक्या संघटितपणे चालवावी ही एकट्या हिंदुस्थानातीलच नव्हे, तर जगातील सर्व पददलित जनतेने अभिमान बाळगण्याजोगी घटना आहे, असे म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ती मुळीच नाही.

पण ब्राह्मणी धर्माने मूढ, अनुदार व असहिष्णू बनविलेल्या हिंदूसमाजाला या सर्व गोष्टींचे काय होय? या सत्याग्रहाच्या रूपाने अस्पृश्य बांधवांनी स्पृश्य हिंदूंजवळ समतेची कमीत कमी मागणी केली. आपल्या हिंदूबांधवांजवळ अस्पृश्यांनी समतेची व प्रेमाची भाकरी मागितली, पण भाकरीऐवजी पदरात ब्राह्मणादी स्पृश्य हिंदूंनी दगडधोंडे टाकले.[१३]

भीमराव आंबेडकर

सिमला - २६-४-१९३२

नाशिक रामकुंडाचा निकाल अस्पृश्य समाजाच्या विरुद्ध; जिल्हा न्यायाधीश मि. ब्राऊन यांनी दिला. तसेच धुळ्याच्या जेलमधून गायकवाड रणखांबे यांची सुटका १६ जून १९३२ रोजी झाली.[१४]

२४ जुलै १९३२ रोजी सत्याग्रह कमिटीच्या वतीने अमृतराव रणखांबे यांच्या अध्यक्षतेखाली सभा होऊन रामकुंड निकालाविरुद्ध अपील करण्याचा ठराव पास झाला. श्री. रामनाथ शिवलाल व असईकर वकिलांनी मुंबईच्या हायकोर्टात अपील सादर केले, त्याचाही निकाल अस्पृश्यांच्या विरुद्ध लागला.[१५]

९ ऑगस्ट १९३२ रोजी १० सत्याग्रहींना शिक्षा होऊन धुळ्याच्या जेलमध्ये पाठविले. १४४ कलम लागले की सत्याग्रह स्थगित करायचा किंवा फिरता सत्याग्रह करायचा हा कार्यक्रम अव्याहत चालू असे.

१९३४ च्या एप्रिलमध्ये येणाऱ्या रामनवमीला पुन्हा सत्याग्रह करायचा की नाही याचे योग्य मार्गदर्शन डॉ. आंबेडकरांनी करावे अशा आशयाचे पत्र भाऊरावांनी पाठविले होते त्याचे उत्तर आले.

३ मार्च १९३४

*प्रिय भाऊराव*

*तुमचे २३ फेब्रुवारीला लिहिलेले पत्र मला मिळाले. आपण अस्पृश्य मंडळींनी सत्याग्रह चालू ठेवावा की नाही याबद्दल माझे मत तुम्ही मला विचारले, याबद्दल मला समाधान*

*वाटले. हा सत्याग्रह येत्या रामनवमीला पंचवटीतील काळ्या राममंदिराच्या दरवाजावर पूर्वीप्रमाणे तुम्हाला करायचा आहे. मी तर अगदी निक्षून सांगू इच्छितो की, ही चळवळ करण्याची आता मुळीच जरुरी नाही; ती नुसती स्थगित करायची असे नव्हे; तर पुन्हा काळ्या राममंदिरावर सत्याग्रह करण्याचे नावही कधी काढायचे नाही.*

*या सत्याग्रह चळवळीचा जनक मी; हे सांगतो आहे याचे तुम्हाला आश्चर्य वाटेल, पण त्याला आता इलाज नाही. इतके दिवस या सत्याग्रह चळवळीला मी विरोध करीत नव्हतो याचे कारण म्हणजे आपल्या अस्पृश्य मंडळींनी मूर्तीची स्वत: पूजा करावी, असेच मला वाटे. कारण मूर्तिपूजेचा साधा मामुली हक्कही वर्षानुवर्षे त्यांच्यापासून हिरावून घेतला गेला होता. त्याचवेळी मला असेही वाटत होते की, मंदिर प्रवेशामुळे अस्पृश्यांना हिंदू धर्मात समानतेने हक्क मिळतील आणि हिंदू धर्मात त्यांचा मानाने समावेश होईल.*

*या गोष्टीचा मी जसजसा विचार करतो, तसतसे मला वाटते की हिंदू समाजात अस्पृश्यांनी शिरण्यापूर्वी हिंदुधर्मातील अस्पृश्यतेच्या कल्पनेचा पूर्ण कायापालट झाला पाहिजे.*

*मी मुद्दामच पाच वर्षांपूर्वी सत्याग्रहाला संमती दिली होती. कारण त्यामुळे अस्पृश्यांना हिंदू धर्माची वास्तव कल्पना येईल असे मला वाटले होते आणि हिंदू धर्मात आपले स्थान काय दर्जाचे आहे हेही त्यांना कळेल. त्या दृष्टीने माझा हेतू साध्य झाला आहे. आता मला मंदिर प्रवेश चळवळीची मुळीच आवश्यकता वाटत नाही. यापुढे अस्पृश्यांनी आपली सारी शक्ती, आपले सारे बळ आणि आपले सामर्थ्य राजकारण आणि शिक्षण या बाबींवर खर्च करावे असेच मला मनापासून वाटते. मला खात्री आहे की अस्पृश्य बांधवांना यामुळे राजकारण आणि शिक्षण या दोन्हीचेही महत्त्व किती आहे हे समजून येईल.*

*आपला*

*भीमराव आंबेडकर*

***ता. क. :** मी लिहिलेले हे पत्र शब्दश: भाषांतर करून प्रसिद्धीसाठी देऊ नये. पत्राचा तेवढा आशय द्यावा, आणि सांगावे की यापुढे मी सत्याग्रह करावा असा सल्ला देत नाही.*

आम्ही हिंदूच आहोत, आम्हाला मानाने जगता यावे याकरिता १९२७चा चवदार तळ्याचा सत्याग्रह केला. आमच्या आत्मिक उन्नतीकरिता मंदिरात प्रवेश करून देवाची पूजा करू द्या, एवढेच नव्हे, तर आपल्या लेटर हेडवर भवानीचे चित्र ठेवले होते! बुद्धिवादी दृष्टिकोणातून या पेचातून म. गांधी आणि हिंदूंना सुटणे कठीण गेले. केवळ बहुसंख्य समाजाच्या जोरावर आंबेडकरांनी ही चळवळ दाबून टाकली. अस्पृश्यांना पाणी पिण्याचा अधिकार नाही, देवळात जाण्याचा अधिकार नाही. म्हणून आंबेडकरांनी आम्ही हिंदूच नाहीत; असा नवीन पेच गोलमेज परिषदेत म. गांधींच्या समोर टाकला. हिंदूंपेक्षा निराळा हा लोकसमूह आहे असे ते म्हणाले. पुढे हिंदू आणि मुसलमान यांच्याप्रमाणे अस्पृश्यांचा विचार होणे आवश्यक आहे. हिंदूंच्या कटू अनुभवातून या विचारापर्यंत यावे लागले. या देशात मुसलमानांचा जसा विचार होतो, तसा अस्पृश्यांचाही व्हायला पाहिजे. म्हणून त्यांना स्वतंत्र मतदारसंघ आणि राखीव जागा द्या; असा अट्टहास केला होता.

गोलमेज परिषदेत असा रोखठोक सवाल डॉ. आंबेडकरांनी मांडल्यावर म. गांधींची तारांबळ उडाली. एका निष्णात वकिलाच्या समोर गांधीजी निष्प्रभ झाले. केविलवाण्या

अवस्थेला ते आले. हिंदू असल्यामुळे स्वतंत्र मतदारसंघ मागण्याचा अस्पृश्यांना अधिकार नाही, असा युक्तिवाद गांधीजींनी केला. तेवढ्यात आंबेडकर म्हणाले, ख्रिश्चनांमध्ये इंग्लिश-ख्रिश्चन, भारतीय-ख्रिश्चन व अँग्लो इंडियन हे सर्व एकाच धर्माचे असूनही त्यांना सवलती का? शीखदेखील हिंदूंचाच भाग. त्यांना सवलती आणि स्वतंत्र मतदारसंघ आहे. असा बिनतोड युक्तिवाद डॉ. आंबेडकरांनी केल्यावर म. गांधी म्हणाले, "अस्पृश्यता हा हिंदूंनी केलेला घोर अपराध आहे. त्यांना स्वतंत्र मतदारसंघ दिल्याने प्रायश्चित घेण्याची स्पृश्य हिंदूंची संधी नष्ट होईल. त्यावर आंबेडकर म्हणाले," तुमची प्रायश्चित्त घेण्याची संधी नष्ट होऊन तुम्ही नरकात जाऊ नये म्हणून आम्ही अस्पृश्यतेच्या नरकातच सडत राहिले पाहिजे हा कोठला न्याय? गांधीजी म्हणाले, अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ दिल्याने हिंदू धर्म नष्ट होईल. त्यावर आंबेडकर म्हणाले, तुमचा हिंदू धर्म जिवंत ठेवण्यासाठी आम्ही गुलामगिरीतच राहिले पाहिजे, हा युक्तिवाद महात्मा म्हणवून घेणाऱ्यांच्या तोंडी शोभण्यासारखा नाही. गांधीजींना बौद्धिक पातळीवर हार खावी लागली. म्हणून उपोषण करावे लागले. शेवटी अस्पृश्यांच्या स्वतंत्र अस्तित्वाचा मुद्दा महात्माजीना मान्य करावा लागला. यातच डॉ. आंबेडकराचा विजय होता.

राममंदिराचे दरवाजे बंद, प्रवेश नाही, रामकुंडावर सतत मारझोड आणि दगडफेक, मुखेडला पांडवप्रताप ग्रंथाच्या मिरवणुकीला अटकाव शिवाय अस्पृश्यांना रक्तबंबाळ केले. या गोष्टीचे सगळे इतिवृत्त आणि छायाचित्र लंडनला डॉ. आंबेडकरांना पाठविण्याचे काम दादासाहेब सातत्याने करीत असत, शिवाय अध्यक्ष आणि इंग्लंडचे पंतप्रधान यांना पाठविण्याचे काम भाऊरावांनी चोखपणे बजावले. परिणाम असा झाला की, डॉ. आंबेडकरांना स्वतंत्र मतदारसंघ मिळाला.

सत्याग्रह चालू असताना लक्ष्मीबाई टिळकांचे सर्व लक्ष भाऊराव गायकवाडांकडे असायचे. लक्ष्मीबाईंचे पाच मानसपुत्र होते १) रावसाहेब वंडेकर (दिवाण बहादूर रामचंद्र विठ्ठल वंडेकर) २) अशोक देवदत्त टिळक ३) सोपानदेव चौधरी ४) पाटणकर आणि ५) म्हातारपणचे तान्हे आणि आक्राळविक्राळ भाऊराव गायकवाड. भाऊराव येथील हरिजन पुढारी, राममंदिर सत्याग्रहात सगळा पुढाकार त्यांचाच, मार खाण्यातही त्यांचाच पुढाकार असे. आई त्यांना म्हणे, "बाबारे, तू माझे म्हातारपणाचे तान्हे नि आक्राळविक्राळवाणे आहेस."

तिकडे मंदिर सत्याग्रह चाले व इकडे आई घरात काळजी करीत असे. दारावरून महारवाड्याकडे जाण्याचा रस्ता होता, तिकडून एखादी महारीण जाताना दिसली की, आईने तिला थांबवून हकिकत विचारावी.

आई (लक्ष्मीबाई टिळक) संबंधाने भाऊराव लिहितात, "श्रीयुत दे. ना. टिळक सार्वजनिक कार्यात जसजसे पडू लागले तसतसे त्यांच्या व माझ्यामधील संबंध जिव्हाळ्याचे होत गेले. त्या वेळी माझी व आईची अधिक ओळख झाली. अस्पृश्य समाजाच्या उन्नतीविषयी काय करायचे याबाबत वारंवार आईचा सल्ला घेऊ लागलो. मी नाशिक म्युनिसिपालिटीचा कौन्सिलर होतो. त्याच वस्तीत मांग लोकांची वस्ती होती. या लोकांकरिता संडासाचे टुमणे माझ्याकडे लावले. म्युनिसिपालिटीची कामे अत्यंत दिरंगाईने व्हायची. शेवटी मांग लोकांचा

पायखाना (संडास) उभा करून दिला, तेव्हा तिचे समाधान झाले.[१६]

महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह झाला. पाणी प्यायला मिळाले नाही. २ मार्च १९३० पासून काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह सुरू होऊन १३ ऑक्टोबर १९३५ रोजी संपविला. पण मंदिरात प्रवेश मिळाला नाही. भाऊराव गायकवाड आणि अमृतराव रणखांबे यांनी नाशिक जिल्ह्यातील येवला गावी एक परिषद आयोजित केली. परिषदेचे अध्यक्ष डॉ. आंबेडकर होते. स्वागताध्यक्ष अमृतराव रणखांबे आणि सेक्रेटरी भाऊराव गायकवाड होते. अमृतरावांचे भाषण छापलेले होते. त्यांचे भाषण झाल्यावर डॉ. आंबेडकर बोलावयास उभे राहिले. ते म्हणाले, "सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक आणि राजकीय या प्रत्येक बाबतीत दलित वर्गाची कुचंबणा होत आहे. हिंदू धर्माच्या दडपणाखाली मनुष्यत्वाचे साधे हक्कसुद्धा संपादन करणे अशक्य झाले आहे, त्यासाठी आजपर्यंत केलेला पराकोटीचा स्वार्थत्याग व्यर्थच ठवला आहे. गेल्या पाच वर्षांत नाशिकच्या काळारामाच्या देवालयात प्रवेश मिळवून त्या योगाने हिंदू समाजात आपला समान हक्क व दर्जा मान्य करून घेण्यासाठी त्यांनी केलेले प्रयत्न, तसेच सत्याग्रहाचा उपाय उच्चवर्णीयांची मने वळविण्यास निरुपयोगी ठरला. साधे मूलभूत हक्क आम्हाला लाभू देण्यासाठी स्पृश्य म्हणून गणल्या गेलेल्या हिंदू लोकांची मनधरणी करण्याच्या निरर्थक प्रयत्नात, जे काही थोडेसे द्रव्यसाधन आम्ही जमा केले होते तेही खर्ची घालून बसलो. त्यांच्याकडून झालेली कल्पनातीत मानखंडनाही आम्ही सहन केली, पण हा सारा स्वार्थत्याग निष्फळच ठरला! निमूटपणे व धीमेपणे आजपर्यंत आम्ही जे जे हाल सहन केले, त्याचा यत्किंचितही परिणाम ह्या हिंदू लोकांच्या अंत:करणावर दिसून आलेला नाही! आम्ही दुसऱ्या धर्माचे अनुयायी असतो आणि त्या वेळी आताचे आमचे उदरनिर्वाह, उद्योगधंदे आम्ही पत्करले असते, तर हिंदूलोकांना आम्हाला आताप्रमाणे अपमानकारकरीत्या वागविण्याचा किंचितही धीर करवला असता का?

हिंदू धर्मात जन्म घेतल्याचा आम्हाला लागलेला हा डागच आमच्या प्रगतीच्या आड येत आहे. आमच्या साऱ्या मानहानीचे, सवर्ण हिंदूंच्या आमच्या बाबतीतील तुच्छतापर वर्तनाचे तेच एक कारण आहे. असे जर आहे; तर त्या धर्माच्या नावाचा केवळ शिक्का घेऊन बसण्यात काय अर्थ आहे? ज्याप्रमाणे आम्हाला मनुष्याच्या मोलाने वागता येण्याससुद्धा मज्जाव केला जात आहे, त्या हिंदू धर्माच्या कळपाचा एक भाग होऊन आम्ही का म्हणून आयुष्य व्यर्थ घालवावे? अशा स्थितीत राहण्यापेक्षा या धर्मातून बाहेर पडून दुसऱ्या एखाद्या धर्माच्या—ज्यामध्ये आपल्याला आजच्यासारखी मानखंडना सहन करण्याचा प्रसंग येणार नाही व हलक्या नीच दर्जाने वावरण्याची सवय होणार नाही—त्या धर्माचा अंगीकार करणे उचित नाही का?

अस्पृश्यांनी हिंदू धर्माचा त्याग केल्यानंतर कोणता धर्म स्वीकारायचा, हे प्रत्येकाच्या मर्जीवर अवलंबून आहे. फक्त समानतेचे हक्क मिळतील असाच धर्म त्यांनी स्वीकारावा. दुर्दैवाने अस्पृश्य हिंदू असा डाग घेऊन मी जन्माला आलो, पण ती गोष्ट माझ्या स्वाधीन नव्हती. तथापी हा नीच दर्जा झुगारून देऊन ही स्थिती सुधारणे मला शक्य आहे आणि ते मी करणारच याबद्दल मुळीच संशय नाही. मी तुम्हाला स्पष्ट सांगतो की, हिंदू म्हणवून घेत मी मरणार नाही."

हिंदू धर्मात आपण समान दर्जा प्रस्थापित करण्यासाठी सत्याग्रहाच्या मार्गाने जाऊन काही मिळणार नाही. त्या धर्माची आता काही आवश्यकता उरलेली नाही. आपला समाज आता हिंदू धर्मापासून विलग व स्वतंत्र असा मानला पाहिजे. अर्थातच नागरिकत्वाचा व राजकीय हक्कासाठी आपला झगडा पुढे चालू ठेवणे आवश्यकच आहे आणि याकरिता आपले आपसातले मतभेद, अंतस्थ कलह विसरून जाऊन एकजुटीने, संघटितपणे आपले ध्येय गाठण्याचा प्रयत्न करणे; हेच आपले आजचे कार्य होय. नव्या घटनेत दलितवर्गाने आपले हक्क जोराने पुढे मांडण्यासाठी खरे कळकळीचे प्रतिनिधी निवडणे जरूर आहे. हिंदू धर्माच्या शृंखलांनी जखडून न राहता स्वतंत्रपणे आपले भवितव्य ठरविण्याची आपली मनापासून इच्छा आहे, हे दलित वर्गाने जगाला स्पष्ट दाखवून द्यावे एवढीच माझी विनंती आहे.[१७]

ही परिषद यशस्वी व्हावी म्हणून भाऊराव दोन महिने प्रचार करीत होते. सभा घेऊन परिषदेचे महत्त्व सांगत असत. कधी पायी, कधी सायकलवर, कधी बैलगाडी अशा विविध मार्गांनी प्रचार करून परिषद यशस्वी केली. सेक्रेटरी म्हणून सुरुवातीच्या भाषणात सत्याग्रहाचा संपूर्ण इतिहास कथन केला.

काळाराम मंदिर सत्याग्रह सुरू झाल्यानंतर काँग्रेसचे गोविंद हरी देशपांडे आणि बाळासाहेब खेर यांनी सहकार्य केले असले, तरी बहुसंख्य काँग्रेसजन हे विरोधी फळीत होते. म्हणून सत्याग्रह समितीचे सेक्रेटरी या नात्याने भाऊराव गायकवाड यांनी म. गांधी यांना पत्र पाठवून सत्याग्रहाला सहकार्य करा किंवा पाठिंबा द्या, असे लिहिले होते सदर पत्र 'टाइम्स ऑफ इंडिया' या वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले होते :

मा. श्री. बी. के. गायकवाड अस्पृश्य नेते व नाशिक काळाराम प्रवेश सत्याग्रह समितीचे सचिव यांनी म. गांधी व पं. जवाहरलाल नेहरू काँग्रेस अध्यक्ष याच्याशी खालील प्रमाणे पत्रव्यवहार केला आहे :

या देशाच्या स्वातंत्र्य लढ्यामध्ये या देशातील बहिष्कृत लोकांची समस्या कायमची बंदिस्त करून ठेवल्यामुळे माझ्या समितीला अत्यंत खेद होत आहे आणि या संबंधात समितीला अशी भीती वाटते की जोपर्यंत बहिष्कृत वर्गाची समस्या सोडविली जात नाही तोपर्यंत या देशाच्या राजकीय स्वातंत्र्याला काही अर्थ राहणार नाही.

वर्णाश्रम स्वराज्य संघाच्या धोकादायक आणि दुष्ट प्रवृत्ती कार्यरत असल्यामुळे आमची भीती वृद्धिंगत होत आहे.

माझ्या समितीमार्फत मी आपणास असे कळवू इच्छितो की, भविष्यात काहीही घडो परंतु आम्ही आमचे सामाजिक स्वातंत्र्य व सामाजिक हक्क प्राप्त करण्याचा बहिष्कृत वर्गाने निर्धार केला आहे आणि हे ध्येय डोळ्यांसमोर ठेवून समितीने काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह नाशिक येथे १५ मार्च १९३१ पासून सत्याग्रहाच्या लढ्यास पुन्हा प्रारंभ करण्याचे ठरविले आहे.

या पवित्र संघर्षात आपले आशीर्वाद आणि उत्तेजन मिळाल्यास बहिष्कृत समाजाला पाठिंबा प्राप्त होईल.[१८]

बहिष्कृत हितकारिणी सभा १९३४ साली स्थापन करून प्रत्यक्ष चळवळीला डॉ. आंबेडकर यांनी प्रारंभ केला. १९३५ च्या कायद्याप्रमाणे वयात आलेल्या प्रत्येक स्त्री-

पुरुषाला मतदानाचा हक्क प्राप्त झाला.

१९३७ मध्ये निवडणुका आल्या. नाशिकमधून भाऊराव गायकवाड आणि अमृतराव रणखांबे दोघेही उत्सुक होते. रणखांबे हे मातब्बर आणि श्रीमंत होते. सत्याग्रहात त्यांचा सिंहाचा वाटा होता. ९ एप्रिलला झालेल्या दंगलीत त्यांच्या मोटारीची तोडफोड झालेली होती. परंतु त्यांनी हट्ट धरला की राखीव जागेवर मला उभे करा. तर डॉ. आंबेडकर म्हणत, "तुम्ही जनरल जागेवर उभे रहा आणि भाऊरावांना राखीव जागेवर उभे राहू द्या." चळवळीत रणखांबे यांच्यापेक्षा भाऊराव अनेक पटींनी सरस होते. ते शिकलेले होते, इंग्रजीचे ज्ञान होते, उत्कृष्ट वक्ते होते, संघटक होते, रात्रंदिवस मेहनत करण्याची कुवत होती. थोडक्यात, चळवळीत असा माणूस आवश्यक आहे असे बाबासाहेब आंबेडकरांना वाटत होते. डॉ. आंबेडकर आणि भाऊराव या दोघांनीही रणखांबे यांना समजवण्याचा प्रयत्न केला. परंतु तो व्यर्थ ठरवला. संभाजी रोकडे, भादुजी निकाळे आणि सावळाराम दाणी हे रणखांब्याच्या पाठीशी भक्कम उभे राहिले. शेवटी उघड विरोध करून ही सर्व मंडळी काँग्रेसमध्ये गेली.

अमृतराव रणखांबे यांच्या बरोबर पुंजाजी ठेंगे, सावळाराम दाणी, के. बी. जाधव, भादुजी निकाळे, एन्. टी. जाधव, रामचंद्र संभाजी रोकडे, साळुंके बुवा, दत्तू काळे, तुळशीराम संभाजी काळे ही प्रमुख मंडळी होती. सत्याग्रहाच्या वेळी डॉ. आंबेडकर नाशिकला आल्यावर सावळाराम दाणी यांचे घरी उतरत; कारण ते घर माडीचे असून बाथरूम आणि लॅवेटरीची सोय होती. बाबासाहेबांकरिता नदीच्या गोड पाण्याचे मासे आणीत आणि स्वत: बाबासाहेब ते कापून देत आणि म्हणत, "तुमच्या देशावरच्या लोकांना मासे कसे कापायचे हे माहित नाही, तुम्हापेक्षा मी कोकणी म्हणून मला जास्त माहिती आहे." असे म्हणून मासे स्वत: कापून देत. वास्तविक ही सर्व मंडळी एकमेकाच्या नात्यातील होती. भाऊरावांचे सावळाराम दाणी हे सासरे होते, परंतु जो प्रकार घडला तो वाईटच होता. आंबेडकर पार्टीचे लोक यांना 'हरिजन' म्हणत, एवढेच नव्हे, तर त्या गावातील मुलीवर मागणे घालायचे नाही किंवा त्या गावात मुलगी द्यायची नाही. रणखांबे गटाच्या लोकांनी डॉ. आंबेडकर आणि भाऊराव यांच्यावर खालच्या पातळीवर टीका केली. घणाचे घाव, सावळा गोंधळ, महार आणि चांभार, मजूर वर्गाची गुंडगिरी, अस्पृश्यांचे धर्मांतर अशी पुस्तके आंबेडकरवाद्यांचा रोष ओढवून घेतला. रणखांबे स्वत: धर्मांतर परिषदेचे स्वागताध्यक्ष असून शेवटपर्यंत धर्मांतर प्रक्रीयेला विरोध करून शेवटी हिंदू म्हणूनच मरण पत्करले. आज त्यांचा गटही अस्तित्वात नाही आणि त्यांचे सर्व समर्थक भाऊराव गायकवाडांना शरण गेले.

येवल्यातील सार्वजनिक हौदावर महारांना पाणी भरू देत नसत अनेकदा भाऊरावाकडे स्थानिक महारांनी तक्रारी केल्या तेव्हा १२-६-१९३८ रोजी भाऊरावानी तेथे सत्याग्रह केला आणि हौद पाण्यासाठी मोकळा केला.

धर्मांतराची घोषणा येवल्यास केल्यानंतर मुंबईला ३१ मे, १९३६, १ जून आणि २ जून यादिवशी डॉ. आंबेडकरानी परिषद भरविली. परिषदेला तुम्ही सहकुटुंब यावे असे पत्र भाऊरावांना पाठवले.

*दि. १५. ५. १९३६*

*प्रिय भाऊराव,*

*तुम्ही मुंबईस कधी येणार? तुमच्या सोबत किती लोक येणार आहेत? तुम्ही शुक्रवारी सायंकाळी वा शनिवारी सकाळी येथे येण्याची मी अपेक्षा करतो. तुम्ही, दाणी व अमृतराव यांनी मजकडे उतरावे. अध्यक्ष देखील मजकडेच उतरणार आहेत. तुमच्या घरच्या काही महिला येणार असतील तर त्यांनाही घेऊन यावे. माझे पाहुणे म्हणून मी त्यांचे आनंदाने स्वागत करीन. त्यांची राहण्याची स्वतंत्र सोय करण्यात येईल.*

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

१९३४ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी एक मृत्युपत्र तयार केले होते, कारण १९३२ च्या पुणे कराराच्या वेळी त्यांना खुनाची धमकी देणारी अनेक पत्रे आली होती म्हणजे माझा कधीही खून होऊ शकेल या करिता यदाकदाचित् माझा खून झालाच तर चळवळ कुठल्याही परिस्थितीत बंद ठेवू नका. पैशाची आवश्यकता भासल्यास माझा 'राजगृह' विकून पैसा उभा करा व चळवळीला खर्च करा. याची एक प्रत नाशिकला भाऊराव गायकवाड यांना पाठविली होती.[११]

१९३७च्या निवडणूकीमध्ये उमेदवार उभे करून राजकारणाच्या माध्यमातून आपल्या समाजाचे भले करावे म्हणून डॉ. बाबासाहेबांनी उमेदवार उभे केले. त्यावेळी प्रचंड यश मिळून डॉ. आंबेडकर (मुंबई) व्ही. ए. गडकरी (पुणे पूर्व) आर. आर. भोळे (पुणे पश्चिम) आर. जी. भातकर (ठाणे, दक्षिण) ए. व्ही. चित्रे (रत्नागिरी, उत्तर) बी. के. गायकवाड (नाशिक पश्चिम) जी. आर. घाडगे (रत्नागिरी) डी. जी. जाधव (खानदेश पूर्व) आर. एस. काळे (विजापूर उत्तर) पी. जे. रोहम (अहमदनगर दक्षिण) के. एस. सावंत सातारा (उत्तर) बी. एच्. वराळे (बेळगाव उत्तर) जे. एस्. ऐदाळे (सोलापूर उत्तर) एस. व्ही. परुळेकर (रत्नागिरी, दक्षिण)

असे १४ उमेदवार निवडून गेले आणि डॉ. पी. जी. सोलंकी व एस्. सी. जोशी यांना विधानपरिषदेवर घेतले.

दत्तात्रय वामन राऊत, नामदेवराव बुधाजीराव मराठे आणि रावसाहेब बापूसाहेब थोरात यांना स्व. म. पक्षाने पाठिंबा देऊन निवडून आणले.

डॉ. पी. जी. सोलंकी, सुरबा टिपणीस, वि. गं. सवादकर, के. एम्. काळोखे आणि डी. एस्. पवार यांना पराभव पत्करावा लागला.

मध्य प्रदेश विधानसभेत एल्. एन्. इरदास, डी. बी. खोब्रागडे, आर. जी. घोडीचोर स. के. भगत, सिताराम एल्. महार आणि डी. एल्. पाटील हे उमेदवार विजयी झाले.

भारतातील अस्पृश्यांचा मी एकमेव प्रतिनिधी आहे. डॉ. आंबेडकरांच्या मागे कुणीही नाही, या म. गांधीजीच्या दर्पोक्तिला या निवडणुकीने चांगलीच चपराक दिली.

१६ जाने १९३६ला डॉ. बाबासाहेब नाशिक येथे भाऊराव गायकवाड यांच्या प्रचार सभेत बोलत होते, भाषणात ते म्हणाले, "आपल्यापुढे दोन उमेदवार आहेत. एक भाऊराव गायकवाड व दुसरे रामचंद्र संभूजी रोकडे, भाऊराव गेली कित्येक वर्षे समाजसेवा करीत

आहेत. लोकल बोर्ड, व म्युनिसिपालिटी येथे अनेक जबाबदारीची कामे सांभाळली आहेत, सत्याग्रहात कित्येक प्रसंगी मारहाण तर कित्येक प्रसंगी दंड किवा सक्त मजुरीची शिक्षाही भोगल्या आहेत.

काही लोक सांगतात, दोन मते गायकवाडास द्या व दोन मते रोकड्यांना द्या. दोन्हीही आपलीच लेकरे आहेत. मी तुम्हाला स्पष्ट सांगतो, जिल्ह्यातर्फे एकच उमेदवार निवडून द्यावयाचा आहे. मताची अशी विभागणी करून भागणार नाही; एका जागेसाठी अशी विभागणी केल्यास आपला आत्मघात होईल. तसेच मताकरिता काही लोक पैशाची लालूच दाखवितील कामापुरता मामा या न्यायाने गोड थापा मारतील. परंतु तुम्ही कोणत्याही मोहाला बळी पडू नका. मताचा मिळालेला अधिकार हे तुमच्या मुक्तीचे साधन आहे. मुक्तीचे मिळालेले साधन जर तुम्ही पैशावारी विकाल, तर मग तुमच्यासारखे आत्मघातकी समाजद्रोही व मूर्ख तुम्हीच. बंधु आणि भगिनीनो कुठल्याही परिस्थितीत तुम्हास मिळालेला हा अधिकार पैशावारी विकू नका अशी नम्र सूचना आहे.

मराठ्यांचा वाटोळ्या पगडीचा व अडाणी इसम कायदेमंडळात गेला तरी चालेल परंतु तुमचा मनुष्य मात्र तसा पाठवून चालणार नाही; तर तो त्यापेक्षा १५ पट हुशार व कर्तबगार असायला हवा.

आपल्या या नाशिक जिल्ह्यात गायकवाड व रणखांबे यापैकी गायकवाडानाच तिकीट का? याबद्दल बराच संशय माजल्याचे माझ्या ऐकिवात आहे, चार दिवस असताना मी स्पष्टपणे सांगितले की, नाशिक जिल्ह्यातर्फे कायदेमंडळाच्या निवडणूकीस कोणी उभे राहावे हे तुम्ही उभयता आपसात ठरवून मला कळवा. जर एकमत झाले नाही तर निकाल देण्याची पाळी माझ्यावर आली तर मी भाऊराव गायकवाड यांच्या बाजूने मत देईन. या उभयतात अधिक लायक कोण, हे तुम्हापेक्षा मी चांगले जाणतो. आतापर्यंत रणखांबे यांनी अध्यक्ष व स्वागताध्यक्ष म्हणून अनेक सभेत जी भाषणे केली; ती अमृतरावांची नसून भाऊराव गायकवाडांनी लिहून दिली आहेत, हे मी जाणतो. रणखांब्यांचा बोलविता धनी वेगळाची असल्याची मूळकथा मला पूर्णपणे माहीत आहे. म्हणून अमृतराव रणखांबे याच्यापेक्षा भाऊराव मला अधिक लायक वाटतो.

दुसरे असे की, रणखांबे यांनी राजीखुषीने अंमलबजावणी न करता स्वत:च्या सहीने पत्र पाठवून मला स्पष्टपणे कळविले आहे की, कायदेमंडळात नाशिक जिल्ह्याच्या राखीव जागेवर श्री भाऊराव गायकवाड यांनाच द्या. तेव्हा गायकवाड यांच्या उमेदवारीस मदत करायला हवी होती, परंतु तसे न करता अगर तटस्थही न राहता रणखांबे उघड उघड भाऊरावाच्या उमेदवारीस विरोध करीत आहेत, यास काय म्हणावे? रोकडे घराण्याचा व रणखांबे घराण्याचा सात-आठ वर्षे काही कारणाने वाद होता. उभयतात सलोखा अगर प्रेमभाव तर मुळीच नव्हता. असे रणखांबे यांचे नाव मी कायदेमंडळासाठी सुचविले नाही. म्हणून गेली कैक वर्षे भावाभावाप्रमाणे गुण्यागोविंदाने राहिलेल्या गायकवाडाविरुद्ध रणखांब्यांनी जाऊन विरोधी गटाच्या गळ्यात मिठ्या माराव्यात व ज्याला आजपर्यंत मित्र म्हणवून घेतले; त्याला विरोध करावा हे रणखांब्याचे वागणे न्यायचे नाही, अयोग्य आहे. नाशिक जिल्ह्यात असलेली संघटना दुभंगून जो निरर्थक बेबनाव व बखेडा माजविला आहे त्यास रणखांबे

जबाबदार आहेत.

अमृतराव रणखांबे आणि भाऊराव गायकवाड वाद नाशिक जिल्ह्यात फार गाजला. यावर अगोदर आपण विचार केलेलाच आहे. या निवडणूक प्रचाराच्या काळात प्रत्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मनोगत आपल्याला दिसून आले. दृष्ट लागण्यासारखी नाशिक जिल्ह्याची संघटना क्षणात विघटित झाली.

बुधवार दि. १७ जानेवारी रोजी दादासाहेब, 'घोडा' या निशाणीवर प्रचंड बहुमताने निवडून आले. खेड्यापाड्यातील गोरगरिबांना भाऊरावांचा मोठा आधार. कुणाच्या जमिनीत मराठ्यांनी नांगर घातला; विहिरीवर पाणी भरू दिले नाही; शाळेत मुलांना बाहेर बसविले; कुणाला तगाई पाहिजे. कुणाची तगाई अडविली; अशी एक नव्हे, अनेक लहानमोठी कामे सकाळपासून संध्याकाळपर्यंत करण्याचा भाऊरावांचा दैनंदिन पायंडा असे आणि त्यातही कायदेमंडळाच्या निवडणुकीमध्ये निवडून आल्यावर सगळीकडे आनंदीआनंद पसरला. अनेक ठिकाणी त्यांचे सत्कार झाले. असाच एक सत्कार ॲन्टॉप व्हिलेज, वडाळा येथील जनतेने २० नोव्हेंबर १९३६ ला आयोजित केला होता. त्यावेळी मानपत्र देखील अर्पण करण्यात आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर अध्यक्ष होते. अध्यक्षीय भाषणात ते म्हणाले, ब्राह्मण-क्षत्रिय यांच्या मांडीला मांडी लावून कायदेमंडळात बसण्याची, त्यांच्याबरोबर विचारविनिमय करण्याची संधी ही केवळ ईश्वरी कृपा नव्हे काय? हे सारे मिळवून घेण्याला मी निमित्तमात्र झालो आहे. दुसरी गोष्ट, भाऊराव गायकवाडासारख्यांचे सहाय्य मिळाले नसते, तर एकटी परमेश्वरी कृपाही काही करू शकली नसती. आज जनतेकडून माझ्या कामगिरीबद्दल जे मला धन्यवाद मिळत आहेत, त्यापैकी शेकडा ८० टक्के भाग गायकवाडांचा आहे. श्री भाऊराव गायकवाड यांची आपल्या पक्षातर्फे उमेदवार म्हणून निवड केली आणि काँग्रेसबरोबर सामना दिला. काँग्रेस उमेदवारास १६९०० मते तर भाऊरावांना १६६५० मते पडली. अवघ्या २५० मताचे अंतर होते पण माझ्या मते हा हिशेब चुकीचा आहे. कारण आमच्यातील एक इसम आयत्यावेळी विरुद्ध उठला. त्याचे नाव घेणेही याप्रसंगी योग्य वाटत नाही. त्याला ४ हजार मते पडली. ती मते विभागली गेली नसती तर श्री गायकवाडांनी काँग्रेसच्या उमेदवाराला ३७५० मतांनी मारला असता. मला सांगायला आनंद वाटतो की, कायदेमंडळात निवडून आलेली सर्व माणसे लायक आहेत आणि ज्या माणसाविषयी कायदे कौन्सिलमध्ये लोकांना आदर वाटतो; त्यापैकी भाऊराव एक आहेत.[१०]

त्याचप्रमाणे येवले येथे १४ एप्रिल १९३७ही डॉ. आंबेडकरांच्या ४५व्या जयंतीचा दिवस म्हणून एक कार्यक्रम आयोजित केला. भाऊराव गायकवाड व स्वतः बाबासाहेब त्या प्रसंगी हजर होते. ते म्हणाले, "तुम्ही माझा नेहमी जयजयकार करता, माझ्या कर्तृत्वाचे गोडवे गाता, माझ्या कर्तबगारीची तारीफ करता, मलाच तुमचे नेते समजता पण मी प्रत्यक्ष असे काहीच कार्य करीत नाही. मी माझी नोकरी सांभाळून जेवढे जमेल तेवढेच सार्वजनिक कार्य करतो, आणि सार्वजनिक कार्य करतो म्हणजे विचार देतो. विचार कुणीही देईल, शास्त्र सांगणे तसे फारसे अवघड कार्य नसते. पण विचार आचारात उतरवणे, शास्त्राला व्यवहाराची जोड देणे; हेच प्रत्यक्ष कार्य असते व ते अत्यंत बिकट असते, कितीतरी संकटाना तोंड द्यावे लागते. कायिक, वाचिक, मानसिक अत्याचार सहन करावे लागतात. मानहानी एवढी होते

की, त्याची शब्दात किंवा संख्येत गणतीच करता येत नाही. काळाराम मंदिर सत्याग्रहाचा वेळी हा माझा भाऊराव गायकवाड या प्रत्येक कसोटीवर शंभर नंबरी सोन्यासारखा उतरला आहे. हे सोने अतिशय शुद्ध आहे. सर्व प्रकारच्या आगीतून ते तावून सुलाखून जसेच्या तसे शुद्ध राहिले आहे तेव्हा तुमचा खरा नेता हाच आहे. हाच माझा उजवा हात आहे.

भाऊराव गायकवाड यांच्यावर बाबासाहेबांचा किती जीव होता; हा माझा उजवा हात आहे असे बाबासाहेब का म्हणाले, त्याचे कारण असे आहे की विचार बाबांनी द्यायचा आणि सर्वसामान्यापर्यंत पोचविण्याचे काम भाऊरावांनी करायचे. प्राणाची बाजी लावून नाशिक सत्याग्रह सतत साडेपाच वर्षे टिकविण्यासाठी प्रसंगी मारही खाल्ला. परंतु प्रयत्न चालू ठेवल्यामुळे गोलमेज परिषदेत बाबासाहेबांना यश मिळाले म्हणून ते अंत:करणापासून येवल्याच्या सभेत बोलले.

अशीच एक परिषद महार, मांग आणि वेठिया यांची अहमदनगरमधील हरेगाव येथे १६ सप्टेंबर १९३९ला डॉ. आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केली, स्वागताध्यक्ष भाऊराव गायकवाड होते. ३७ पाने असलेले त्यांचे भाषण छापलेले होते. भाषणात ते म्हणाले, "अस्पृश्य मानलेल्या वर्गातील बहुसंख्याक असा वर्ग स्वत:ला वतनदार समजतो, ज्या वतनाचा आपण कल्पनेबाहेर अभिमान बाळगतो, त्यावर एकत्र जमून विचार करायला पाहिजे म्हणून ही परिषद बोलवावी लागली."

आजच्या सभेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी इ. स. १९२८ साली कायदेमंडळात महार वतन दुरुस्ती बिल मांडले. वतनदार घराण्यातील दरेक माणसास आपल्या वतनाबद्दल अभिमान वाटतो. महार, मांग, वेठिया वगैरे वतनदाराखेरीज इतरही अनेक जातीत वतनदार आहेत, परंतु त्यांच्या वतनाशी महार, मांग, वेठिया यांच्या वतनाची तुलना केल्यास त्यांना जमीनअस्माना इतके अंतर दिसेल, इतर वतनदार आपल्या वतनाच्या जोरावर मानसन्मानाचे व खाऊन पिऊन सुखी असे जीवन कंठतात. तर त्यांच्या उलट अपमानाने गडगच्च भरलेले व सदा दारिद्र्याच्या खोलखोल गर्तेत आम्हास लोळण्यात लावीत असलेले आमचे हे वतन दुसरीकडे, आज दरेक गावचा वतनदार महार अगर मांग अगर वेठिया म्हणाल तर कोणते दृश्य आपल्या दृष्टीसमोर उभे राहते? डोक्याला मूठभर चिंध्या, अंगभर फाटकी लक्तरे परिधान केलेला, हातात काठी व अनवाणी भटकणारा माणूस पाहिला की, हा वतनदार बच्चा असावा अशी कोणासही सहज कल्पना येते. सर्वस्वी वतनावर अवलंबून असलेला वतनदार महार, मांग, वेठिया याचे हे वर्णन आहे. त्याची वस्ती जर पहाल तर गावाच्या पूर्व बाजूस अगर गैरसोईच्या ठिकाणी, घरातला संसार म्हटला म्हणजे थोडी मडकी गाडगी व सकाळी जेवला तर संध्याकाळी मिळेल की नाही याची पंचाईत, अशा कठिणावस्थेत दिवस कंठित असताही हजारो रुपयांचा सरकारी वसूल, बिनबोभाट सरकारी तिजोरीत नेऊन भरणारा महार, मांग, वेठिया यांच्या प्रामाणिक पणास जगाच्या इतिहासात तोंड मिळणार नाही.

जगाच्या पाठीवर वतनदार महार, मांग अगर वेठिया यांच्या इतका कंगाल, सर्वांनी लाथेखाली तुडविलेला असा इतर जातीत एकतरी वतनदार सापडेल काय? वतन रजिस्टरी; गावच्या सर्व प्रमुख असलेल्या महार लोकांची नोंद असे. ही संख्या काही गावात चारपासून

३२पर्यंत असे. परंतु वरिष्ठ अधिकारी आला म्हणजे नोंद असलेला असो अथवा नसो; सर्व महार हजर राहून काम करीत.

महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह, नाशिकच्या काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह रामकुंड सत्याग्रह, मुखेडची सार्वजनिक रस्त्याची मिरवणूक व जागोजागी विहिरीवर समानतेने पाणी भरण्याचे लढे हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सुरू केल्याबरोबर चळवळीनी स्पृश्य मानलेल्या समाजाचे पित्त खवळले. ज्या ज्या भागात या चळवळी झाल्या त्या त्या भागातील अस्पृश्य मानलेल्या जनतेस, त्यांनी 'दे माय धरणी ठाय' अशी परिस्थिती केली. असताही तो डगमगत नाही असे पाहताच स्पृश्यांनी सरकारी कायद्याच्या कचाट्यात पकडून छळण्यास सुरूवात केली. सकाळपासून संध्याकाळपर्यंत गावच्या चावडीवर बसून रहावे. सरकारी अधिकारी गावी आले म्हणजे घोड्याला घास आणण्यास, जा खातेदाराला बोलावून आण अशी कामे पाटील तलाठ्यांनी सांगून, शिवाय महार फार मगरूर झाले अशा चहाड्या वरिष्ठांना सांगून, महाराकडून दंड वसूल केला जाई, नाशिक जिल्ह्यात विल्होळी त्रिंबक वगैरे गावची महारवतने खालसा करून त्यांच्या जमिनी काही दिवस दुसऱ्यांना दिल्या. इतकेच नव्हे तर सरकारी अधिकाऱ्यांनी महाराच्या इनाम जमिनीवर जादा पट्टी उर्फ जुडी वाढविण्याचा उपक्रम सुरू केला. महार इनाम जमिनीवर जादा पट्टी वाढविताना ती निवडक तालुक्यातील, निवडक अशा दहाबारा गावावर दरसाल बसविण्यात येऊ लागली.

कामगार महाराची संख्या कमी केल्यामुळे, राहिलेल्या महारांवर कामाचा जादा बोजा पडणार नाही का व त्याबद्दल त्यांना जास्त पगार मिळतो का, तर नाही! मग जुडी का वाढविली? असलेली जुडीपट्टी वेळेवर देऊ शकत नाही, तेव्हा वाढलेली जुडी ते कसे देणार, जुडी भरली नाही तर जप्तीची वारंट काढून नाशिक जिल्ह्यातील नांदूर मध्यमेश्वर या गावी २६ महारांवर जप्तीची वारंटे काढून त्यांची गाडगी मडकी लिलावाने विकून वसूल केली.

सरकार जादा कामे महाराकडून करून घेतात. पाटील तलाठ्यांची कामे करायची आणि शिवाय जादा जुडी भरावयाची हा एक प्रकारचा अन्याय नाही काय?

सरकारकडे विनंती केल्यानंतर सरकारी ठराव ७४२०/३३ ता. १३/९/३८ अन्वये महांराच्या १९ कामाची यादी मंजूर झाली. या कामापैकी सरकारी टपाल तालुक्याच्या व इतर ठिकाणी पोचते करणे; जे गाव तालुक्याचे ठिकाणापासून २० मैल दूर असेल व तेथे पोस्टाची सोय असेल तर सरकारी खर्चाने ते पाठवावे. हा सरकारी ठराव ३० वर्षापूर्वीचा होता. नंतर मर्यादा १० मैल करण्यात आली. परंतु हिंदुत्ववादी अधिकाऱ्याने हा ठराव दाबून ठेवला. एवढेच नव्हे, तर कुठलेही टपाल सरकारी खर्चाने पाठविले नाही. याकरिता कायदेमंडळात आम्ही प्रश्न विचारले, तेव्हा मागील सरकारी अधिकाऱ्याबद्दल आम्ही जबाबदार नाही असे उत्तर मोरारजी देसाई यांनी दिले.

ज्या गावी पोस्ट नाही, तेथील टपाल महारांनी तालुक्याच्या गावी नेले; तर काय मोबदला दिला. तर सरकारचे उत्तर असे, मोबदला दिला नाही. आमच्या नाशिक जिल्ह्यात १७०० खेडी आहेत. पोस्ट फक्त ७५ गावी आहेत. १६२५ गावांना पोस्ट नाही. म्हणजे एवढ्या गावांना महाराने टपाल का पोचवावे?

सरकार महार, मांग, वेठिया वगैरे लोकांना सरकारी नोकर म्हणून म्हणते. हे जर सरकारी नोकर आहेत, तर पट्टेवाल्यापासून तो इलाखाधिपती (गव्हर्नर) हे फिरतीवर गेले असता त्यांच्या हुद्याप्रमाणे भत्ता मिळत असतो; तसा भत्ता महारांना का नाही?

महारादी कामगार फिरतीवर गेले, तर त्यांना ८ आणे भत्ता द्यावा, असे ना. खेराना सांगितले तर त्या मागणीला केराची टोपली दाखविली.

महार जर टपाल देण्याकरिता गेला तर पाटील तलाठी यांची कामे करणार नाहीत. जन्ममृत्यूची नोंद महाराने ठेवली नाही तर त्यांच्यावर दंड आकारला जाई. कारण राममंदिर प्रवेश सत्याग्रह, विहिरी पाणी भरण्याचा कार्यक्रम किंवा मुखेडला सत्याग्रह केला; यात ज्या गावच्या महारांनी भाग घेतला त्यांच्यावर गावकऱ्यांनी बहिष्कार पुकारला. मग जन्ममृत्यूची नोंद कशी होईल, फिरतीवर असलेले वरिष्ठ, याचा विचार न करता, पाटील तलाठी जे सांगतील त्यावर विश्वास ठेवून महारावर दंड आकारतात हा अन्याय नाही काय? हे काम महारांकडून काढावे असे निवेदन आम्ही कलेक्टरला दिले. परंतु बॅकवर्ड क्लास बोर्डाचे अध्यक्ष ना. खेर यांनी ठराव क्र. ४४२०-३३ ता. १३ सप्टेंबर १९३८ रोजी पुन: महाराच्या गळ्यात अडकविते.

मुंबई प्रांतात हजारो गावी महारांना वतनी जमिनी नसताना सरकारी सर्व कामे शिवाय सरकारी अधिकाऱ्याचा व गावकऱ्यांचा जुलूम सहन करावा लागतो. परंतु एक पैसाही मोबदला मिळत नाही.

डॉ. बाबासाहेबांच्या चळवळीने लोक संघटित होत आहेत. जुलूम सहन करण्याची वृत्ती नाहिशी होत चालली आहे. स्वत:चे पायावर उभे राहून स्वाभिमानाने विरोध करणार की केविलवाण्या मुद्रेने दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणार? 'दे ग बाई, जोगवा' म्हणून काही न मिळता लाचारीने जीवन जगण्याचा प्रसंग आला. आजवर जिवंत मुडद्यांसारखे वागून अवंदसेच्या फेऱ्यात सतत फिरणार की माणसासारखे सन्मानाने जगणार! समाजहिताची कळकळ वाहणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्याला लाभले आहेत. आपण त्यांच्या नेतृत्वाखाली एकत्र येऊन जोर जुलूम निवारण्याचे झगडे संघटनेने, स्वाभिमानाने, स्वावलंबनाने दुसऱ्याच्या टाटाखालचे मांजर न बनता निर्भयतेने लढू. ही कळकळीची विनंती करून भाषण संपविले.[२१]

महार, मांग, वेठिया यांच्या दैन्यावस्थांचा अतिशय बारकाईने अभ्यास करून प्रत्येक खेड्यात फिरून, आकडेवारीसह हा समाज भोगीत असलेल्या जुलूमाचा संपूर्ण आलेख या परिषदेच्या माध्यमातून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या पुढे सादर करण्याचे काम भाऊराव गायकवाड यांना आत्मीयतेने केले.

अध्यक्षीय भाषणात डॉ. बाबासाहेब म्हणाले, "जुडिवाढ हे वतनदाराचे पहिले गाऱ्हाणे. सरकारी नोकरांना वतन देण्याची चाल पेशवाईत व मुसलमानी राज्यात होती. १८२७ ते १८७५ पर्यंत न वाढवता हे आश्वासन पाळले. १८७५ मध्ये महारांचा पगार वाढविण्यासाठी जुडी वाढविण्यात येईल, असे एक कलम आहे मग आता जुडी का वाढविली. हे बेकायदेशीर आहे. रामोशाचा पगार वाढविण्यासाठी ही जुडीवाढ केली असे सरकार म्हणते. महाराचे वतन दुसऱ्या महाराला जाऊ शकत नाही मग रामोशासाठी महाराची जुडी का वाढविली?

सरकारचे कवडीएवढेही काम न करता वतने भोगणारे अनेक फुकटखाऊ वतनदार आज हिंदुस्थानात आहेत. इंग्रजी राज्यात त्यांच्या नोकऱ्या गेल्या, पण दिलेल्या जमिनी मात्र त्यांच्याकडे कायम आहेत.

गावोगावच्या पाटलांना सरकार पासोडीजमीन, शेतसाऱ्याच्या प्रमाणात पोटगी व किरकोळ खर्चासाठी कागदबाद रक्कम देत असते शिवाय ठिकठिकाणी जमीनी दिल्या आहेत. कोकणात महारांना जमिनी नाहीत देशावरही काही भागात जमीनी नाहीत. जमीनी अभावी या महारांना केवळ बलुत्यावर अवलंबून रहावे लागते. सरकारी कामाबद्दल कामगारांना पगार देण्याची जबाबदारी सरकारची असूनही ते देत नाहीत. म्हणून धनी पगार देत नाहीत तर त्या धन्यास ठोकर मारण्यास नोकरांनी शिकले पाहिजे.

सरकारने १९ कामे जाहीर केलेली आहेत त्याकरिता मंजूरी देणे आवश्यक आहे. सरकारचा वसूल तिजोरीत भरणे, सरकारी दप्तर नेणे, आणणे सरकारी टपाल नेणे, आणणे, कोंडवाड्या, गुरे लिलावासाठी नेणे, अधिकाऱ्यांच्या तंबू राहुट्या बांधणे ही कामे रोजदारी शिवाय करू नये. बेपत्ता मयताची व्यवस्था लावणे हे कुणीही स्वाभिमानी महार करणार नाही. जन्म मृत्यूची नोंद करणे महारावर अन्याय करणारे ठरेल, सरकारी देण्यासाठी ठाकरांना बोलावणे हे दवंडी पिटून करावे.

आपण वतने सोडल्याशिवाय तरणोपाय नाही, १९२६ पासून मी हे सांगत आहे. त्यावेळी वतने, महारकी, डल्ल्या सांगुती यांचा मोह आपणास सुटत नव्हता.

वतन सोडा, पण हातच्या जमीनी मात्र गमाऊ नका. शेतसारा भरा व वतनाच्या गुलामगिरीतून मुक्त व्हा, स्वाभिमानी शेतकरी व्हा.''[११]

## मुंबईच्या विधानसभेत भाऊराव

### खेड्यातील अस्पृश्यांना पाणी पुरवठा करणे

सप्टेंबर १९३७ पाण्याच्या बाबतीत अस्पृश्यांची कशी सोचनीय अवस्था आहे. व कशी कुचंबणा होते हे सर्वांना ठावूक आहे नाशिक जिल्ह्यातील ११०० सार्वजनिक विहिरीवर अस्पृश्य बांधवांना पाणी भरू देत नाहीत. रा. ब. बोले यांच्या १९२८च्या ठरावाप्रमाणे सार्वजनिक विहिरी सर्व वर्गांना खुल्या असलेल्याच्या पाट्या लावल्या असे ठरेल असूनही तालुका लोकल बोर्डानी त्याची अजून अंमलबजावणी केलेली नाही. काही ठिकाणी अशा पाट्या लावलेल्या होत्या त्या काढून फेकून देण्यात आल्या आहेत. अशा प्रकारच्या खडतर परिस्थितीशी अस्पृश्य वर्ग टक्कर देत असता, स्पृश्यवर्गीय पुढारी अस्पृश्य वर्गाशी आपुलकीचा भाव उत्पन्न होत असल्याची भाषा बोलत आहेत. तसेच बोर्डाच्या विहिरीप्रमाणे सरकारी कंपाऊंडात असलेल्या विहिरीवरसुद्धा अस्पृश्यांना पाणी भरू देत नाहीत. अशा परिस्थितीत प्रत्यक्ष कायदा केल्याशिवाय हिंदूच्या मनोवृत्तीवर परिणाम होणार नाही. सतीच्या कायद्याने प्रचीती पाहता येतेच. आम्हा अस्पृश्यवर्गाचे एकमेव पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे अस्पृश्यवर्गातील भेद नष्ट करण्यासाठी चळवळ करीत आहेत. मांग व महार यांचा तंटा उत्पन्न झाल्यास आपण मांगाचीच बाजू घेण्यास तयार आहोत असे त्यांनी याच

पुण्यास दोन वर्षांपूर्वी जाहीर केले होते. आमचेही तेच धोरण आहे मी जर उद्या बाटून मुसलमान झालो की मला कोणी पाणी भरू देण्यास विरोध करणार नाही, हा हिंदु संस्कृतीचा दोष आहे. नाशिक जिल्ह्यात ज्या ज्या सार्वजनिक विहिरीवर आम्ही सत्याग्रह करून पाणी भरले, त्या त्या विहिरीवर स्पृश्यांनी पाणी भरण्याचे नाकारले, व काही विहिरीत विष्टा टाकण्यात आल्या तर काही विहिरी पाडण्यात आल्या. (शेम शेम) दिंडोरी येथील विहिरीवर सत्याग्रह केल्यानंतर दुसऱ्याच दिवशी या विहिरीत विषारी पदार्थ टाकण्यात आले. पाणी पिण्यास मिळत नाही म्हणून केवळ नाईलाजाने सत्याग्रह करावयास गेले की, अस्पृश्यांना पोलिसांकडून दम देण्यात येतो व त्यांच्यावर खोटेनाटे आरोप लादून खटले भरण्यात येतात असा आमचा स्वानुभव आहे. (अस्पृश्य बांधवांच्या पाणी पुरवठ्याकडे लक्ष वेधण्यासाठी आर. आर. भोळे यांनी कपातीची सूचना मांडली) नामदार गिल्डर यांनी शक्यतो प्रयत्न करून अस्पृश्यांच्या पाण्याची सोय करू असे आश्वासन दिल्यानंतर भोळे यांनी कंपनीची सूचना परत घेतली.

**४ सप्टेंबर ३९** - दुय्यम शिक्षणाबाबत बोलताना - श्री. प्रेटर यांच्या कपात सूचनेस पाठिंबा देण्याकरिता मी उभा आहे. कारण अस्पृश्य समाज व इतर मागासलेले वर्ग यांचा मागासलेपणा नाहिसा करण्यासाठी सरकारने प्रयत्न करावयास पाहिजे. प्रवेशाचे प्रमाण अल्प आहे म्हणजे ते पुढे येण्यास मार्गच नाही. पांढरपेशांच्या मुलांना अनेकपटीनी शाळेत प्रवेश मिळतो. इष्ट ते धोरण सरकारने आखणे आवश्यक आहे. सरकारी हायस्कूले खाजगी संस्थांकडे देण्याचे धोरण सरकार आखते, असे कळले. सरकारी शाळेतून ज्या नादाऱ्या मिळतात ते खाजगी शाळातून मिळणार नाही. तरी सरकारी हायस्कूले तशीच ठेवावी.

**२२ जाने. ३८** Local Board Act Amendment Bill - गव्हर्नमेंट ऑफ इं. ॲक्ट १९३५ प्रमाणे अस्पृश्यांना शेड्युल्ड कास्ट्स् असे संबोधिले आहे. आम्ही अनेक परिषदा व सभेतून हरिजन या शब्दाला विरोध केला आहे. आम्हाला हा शब्द आवडत नाही. कदाचित सन्माननीय सभासद असा दावा करतील की, हा शब्द फार चांगला आहे. याचा अर्थ ही देवाची लेकरे आहेत. एवढ्या चांगल्या शब्दाला तुमचा विरोध का? त्याचे उत्तर असे की, अस्पृश्यांच्यासंबंधी हा शब्द आहे मग स्पृश्यांना काय म्हणावे, ते काय राक्षस आहेत काय. तेव्हा या शब्दाने स्पृश्य आणि अस्पृश्य यांच्यात भेदभाव करता या सर्वांना हरिजन म्हणत असाल, तर आमचा कसलाही विरोध नाही. सरकारने या शब्दाला कायदेशीर मान्यता देऊ नये. कायदेमंडळावर काँग्रेसचे बहुमत असल्याने हरिजन शब्दाचा आग्रह आहे. परंतु उद्या महासभावाले म्हणजे सावरकर पक्षाची सत्ता आली तर ते दुसरे नाव देतील जर १९३५ च्या कायद्याप्रमाणे महार मांग चांभार व भंगी या सर्वांना केंद्र सरकारने शेड्युल्ड कास्ट असे नामाभिधान केले असेल तर तेच राहू द्या.

अस्पृश्यांची परिस्थिती 'नाव सोनुबाई हाती कथलाचा वाळा' असे करू नका, बरे हरिजन नाव ठेवल्यामुळे आमचा काय उद्धार झाला?

तरी मी अशी विनंती करितो हे नाव काढून टाका आणि माझी दुरुस्ती स्वीकारा. शेवटी बहुमताच्या जोरावर काँग्रेसने हा शब्द बदलला नाही याचा निषेध म्हणून डॉ. आंबेडकरांसह सर्व स्व.म. पक्षाच्या आमदारांनी सभात्याग केला.[१३]

**२५ सप्टें. ३९** Tenancy Bill - श्री. करंदीकर यांनी मांडलेल्या सूचनेला मी विरोध करण्यासाठी उभा आहे. ज्यांच्याकडे लहान जमीनी असतील त्यांना या कायद्याच्या कचाट्यातून वगळले पाहिजे, लहान जमीन धारण करणाऱ्याना का वगळावे? कारण त्यांना जमीन कसण्याची परवानगी देण्यात आली आहे. १८८० सालीच हा कायदा लागू केलेला असताना १९३९मध्ये केला असे का म्हणता; पुन्हा ते म्हणतात, ही उपसूचना सुचवून मी निष्कामसेवा करीत आहे. तथापी ते ज्या पक्षातर्फे निवडून आलेले आहेत, त्या पक्षाची विशेषत: खोतांची सेवा, ही निष्काम की सकाम हे त्यांनी पाहून घ्यावे.[२४]

**२६ सप्टेंबर ३९** - ए.व्ही. चित्रे यांनी मांडलेल्या सूचनेला मी पाठिंबा देण्याकरिता उभा आहे. जमिनीच्या बांधवराळ्या शेतकऱ्यांच्या अथवा कुळांच्या कोणत्याही दोषामुळे अगर निष्काळजीपणामुळे नादुरुस्त झाल्या तरी त्याची दुरूस्ती करण्याकरिता लागणारा खर्च गरीब शेतकऱ्यांवर पडू नये. शेताचे बांध काही ठराविक मुदतीनंतर दुरुस्त करण्याची प्रथा आहे आणि हे काम सरकार स्वत:मार्फत करतात. झालेला खर्च शेतकऱ्यावर पडू नये.

बांधवराळ्या दुरुस्त करण्याची जबाबदारी आपण कुळावर टाकता. ती त्यांच्यावर न टाकता जे जमीन मालक कोणत्याहि प्रकारचे कष्ट न करता जमीनीचे उत्पन्न खातात त्यांच्यावर टाकावी. कुळाने कोणत्याही प्रकारे नादुरुस्ती केलेली नसताना केवळ प्रथा म्हणून बांधबंदिस्ती करण्याची रीत आहे. आणि ती करण्याची जबाबदारी जमीनदाराची आहे. तात्पर्य कुळाला जबाबदार धरू नये, म्हणून मी पाठिंबा देत आहे.[२५]

**१४ सप्टेंबर १९३९** Agricultural Debtors Relief Bill - डेटकॅन्सीलिएशन बोर्ड स्थापण्यात येत आहे त्याच्या मी विरोधात आहे. यावरचे सभासद कोण असणार? त्यांची लायकी काय असणार याचा खुलासा केलेला नाही. असा एक प्रयोग संयुक्त प्रांतात झाला आहे. त्याचा अनुभव असा आहे की, कर्जाची तडजोड करण्याकरिता नेमलेल्या बोर्डाकडून लोकांच्या हिताचे कार्य होण्याच्याऐवजी अत्यंत अहिताचे काम बोर्डाचे सभासदाकडून झाल्याचे ऐकले आहे. या सभासदांनी वादीस भेटून तुझ्या दाव्यात तुझ्याबाजूने निकाल देण्याची व्यवस्था करतो, असे सांगून प्रतिवादीस भेटून त्यासहि तसलेच आश्वासन देऊन उभयतांकडून लाच घेत असल्याच्या तक्रारी अनेक आहेत. अशी परिस्थिती आपल्या प्रांतात व्हावयास नको असेल तर कायद्यात योग्य ती दुरुस्ती वेळीच केली पाहिजे. Save me from my friends, save me from the congress Government असे म्हणण्याची पाळी आपल्या प्रांतातील जनतेवर न यावी म्हणून ही उपसूचना सुचविली आहे.

**पहिली सूचना** - आपण चेअरमनची नेमणूक केल्यानंतर व्हाइस चेअरमन असणे आवश्यक आहे, म्हणून ती नेमणूक करावी.

**दुसरी सूचना** - शेतकऱ्यांचे कर्ज निवारण्यासाठी चेअरमन किंवा सभासद हा सावकाराचा जवळचा नातेवाईक नसावा. कारण कर्जाचा निवाडा करताना पक्षपात होता कामा नये. ७ नोव्हेंबरच्या मुंबईच्या संपाच्यावेळी गोळीबाराची चौकशी करण्यासाठी जी कमिटी नेमली तीत जस्टीस कनय्या यांना नेमल्यामुळे लोकांच्या मनात संशय निर्माण झाला, पुण्याच्या बैठकीत याबाबत टीकात्मक चर्चा झाली असल्याने, त्याबाबतीत अधिक सांगण्याची गरज नाही. असे पुन्हा घडू नये म्हणून ही उपसूचना सुचविली आहे.

कोर्टाचा न्यायाधीश, स्थानिक स्वराज्य संस्थेचा सभासद, राजकीय पक्षाचा सभासद असू नये. यापैकी कोणीही स्कूल बोर्डाचा सभासद होऊ शकत नाही. परंतु श्री. बाबुभाई पटेल यांच्या उपसूचनेप्रमाणे जो राजकीय पक्ष माहीत नाही, असा सभासद घेऊ नये असे सुचविले आहे. परंतु असा एकही पक्ष किंवा कार्यकर्ता सापडणार नाही. प्रत्येक पक्षाला कोणीतरी अनुयायी असतोच व तो सर्वांना माहिती असतो. काँग्रेसने गेल्या अडीच तीन वर्षांच्या राजवटीत ज्या ज्या ठिकाणी शक्य असेल त्या त्या ठिकाणी आपल्या पक्षाचे लोक घुसवून आपले बहुमत प्रस्थापित केलेले आहे, हे आपणा सर्वांना माहित आहे. बहुमताच्या जोरावर संस्थांतून चाललेला अनागोंदी कारभार पाहिला म्हणजे त्याला संमती देऊ नये. ज्या काँग्रेसने आतापर्यंत सरकारनियुक्त पद्धतीला नावे ठेवली त्याच काँग्रेसने पूर्वीच्या सरकारवर कडी करण्यासाठी, सवाईने नको असतील अशा कमिट्यांवर नेमणूकीचे सत्र सुरू केले ते तितकेच निषेधार्थ आहे.

जातीनिष्ठ मानलेल्या मुस्लीम लीगचे उदाहरण घेऊ. हा पक्ष कोणाही मुसलमानास माहीत नाही असा मनुष्य सापडणार नाही. श्री. बाबुभाई पटेल यांना काँग्रेसशिवाय दुसरा पक्ष दिसत नाही. दुसरे उदाहरण स्वतंत्र मजूर पक्षाचे घेऊ. हा पक्ष कोणत्याही मजुराला अगर शेतकऱ्याला माहित नाही असा मनुष्य मिळणे शक्य नाही.

अशा परिस्थितीत कोणत्याही राजकीय पक्षाचा सभासद या बोर्डाचा सभासद होऊ शकत नाही. ज्या कोणास या बोर्डावर आपण नेमाल, त्याच्याकडून नि:पक्षपातीपणाने न्याय दिला जावा ह्या हेतूने ही उपसूचना केली आहे सरकारने सहानुभूतीपूर्वक विचार करावा अशी माझी विनंती आहे.[१६]

**१६ ऑक्टोबर ३९** - बोर्डाचा सभासद कुठल्याही राजकीय पक्षाचा असू नये. त्यावर माझा तोडगा असा आहे की, सरकारी नोकरीतून निवृत्त झालेले सबॉर्डिनेट जज्ज किंवा ॲड. जज्ज हे कोणत्याही राजकीय पक्षात नाहीत. त्यांना मानधन देऊन त्यांना सभासद करावे.

काँग्रेस अधिकारारूढ झाल्यापासून ज्या ज्या ठिकाणी नॉमिनेशनची संधी मिळेल, त्या त्या ठिकाणी आपल्या पक्षाचे बहुमत करून; मनमानेल तसा गोंधळ घालायला ही राज्यकर्त्यापक्षाच्या वृत्तीला आळा घालण्याकरिता मी उपसूचना मांडली आहे.

मंत्र्यांनी बोर्डाच्या सभासदांना पगार देऊ नये अशी सूचना केली आहे ती सर्वथैव चुकीची आहे. मानधनामुळे तो प्रामाणिक राहून काम करतो कर्जदार शेतकऱ्याला आपण न्याय देण्यासाठी इथे बसलो आहोत म्हणून माझ्या उपसूचना स्विकाराव्यात अशी विनंती आहे.[१७]

**१८ ऑक्टोबर ३९** - शेतसारा वाढवू नये कारण या प्रांतात ७५ ते ८० टक्के लोक शेती करतात. सरकारने प्रथमत: शेतकऱ्यांना संरक्षण द्यावे. काँग्रेसने आपल्या जाहीरनाम्यात सारा वाढविणार नाही असे आश्वासन दिले होते. त्यावर चिडून एस.के. पाटील (काँग्रेस) हे म्हणाले, ज्याप्रमाणे सैतान वेळप्रसंगी बायबलचा आधार घेतो. त्याप्रमाणे विरोधीपक्ष जाहीरनाम्याचा आधार घेतो असे ते म्हणतात. त्यावर; मला वाटते तुम्ही आम्हाला सैतान म्हणता म्हणून आम्ही तुमच्या जाहीरनाम्याला बायबल म्हणणार नाही. उलट जबाबदारी शिरावर नसताना बेजबाबदारपणे लिहिलेले पत्रक आहे असे मानतो. जनतेला दिलेली आश्वासने तुम्ही पाळा

एवढेच मला म्हणायचे आहे.

खादी विणणे, घरगुती धंदे, लहान लहान धंदे, सूत कातणे या धंद्यावर सरकार लाखो रुपये खर्च करते. परंतु मी म्हणतो हे धंदे बुडाले तर जगाच्या संसाराचा गाडा तितकासा अडून बसणार नाही. परंतु जर का शेतीचा धंदा बुडाला तर जगाच्या नाड्या आखडल्या जातील. म्हणून महसूल खात्याची आकारणी होतेवेळी शेतसारा मुळीच वाढवू नये असी विनंती आहे.

**२१ ऑगस्ट ३०** - कोणताही कायदा दुरुस्तीसाठी म्हणून ज्या-ज्या वेळी गृहापुढे येतो त्या त्या वेळी त्यात असलेले दोष काढून टाकून त्यात दुरुस्ती करणे हा मुख्य हेतू असतो. शेतकऱ्यांना द्याव्या लागणाऱ्या शेतकऱ्यामुळे कर्जबाजारी झाले आहेत त्यांच्याजवळचा असलेला सर्व जमीनजुमला या ना त्या नात्याने सावकारास देऊन टाकून आज प्रत्येक शेतकरी भुकेकंगाल बनलेला आहे. कायद्यात ज्या दुरुस्त्या होत्या तशा सुचविण्यात आल्या नाहीत म्हणून मी विरोध करतो. या कायद्यामध्ये जमिनीचे तीन प्रकार सांगण्यात आलेले आहेत. त्यावरील सारा जमीनीच्या खंडाच्या शेकडा २५ टक्क्यांपेक्षा अधिक नसावा. हे जमिनीचे तीन प्रकार जिराईत जमीन, भाताची जमीन आणि बागबगीच्याची जमीन असे तीन प्रकार सुचविले आहेत. जमिनीच्या खंडाच्या शेकडा ३५ टक्के प्रमाणे कर आकारला जाईल असे सांगितले आहे. परंतु इतर जमिनीवर किती कर आकारणार हे कायद्यात ठरविले नाही. तरी नामदार मुरारजी देसाई यांनी दुरुस्ती करावी. कारण अत्यंत पिकाऊ अशी जमीन असते तिला गार्डन लँड असे म्हणतो, तिच्यावर आणि ज्या भागांना रस्ते बाजार वगैरेच्या सोई आहेत; अशा भागातील जमिनीवर खंडाच्या शेकडा ३५ प्रमाणे कर आकारल्यास कुणी तक्रार करणार नाही. परंतु जिराईत जमीन असेल आणि त्या भागाला ह्या सोई असल्यातर काय सारा असेल हे ठरविले नाही.

सर्व जमिनीवर खंडाच्या शेकडा ३५ प्रमाणे सारा आकारणे हे घातक आहे, ज्यात पीक येत आहे अशा गार्डन लँडवर हा सारा ठीक आहे. परंतु ज्याला आपण ड्रायलँड अथवा जिराईत जमीन म्हणतो; की ज्यात मुळीच पीक येत नाही, त्यावर तोच सारा ठेवणे अन्यायकारक आहे. जमिनीचे जर तीन प्रकार असले तर साऱ्याचे तीन प्रकार असायला पाहिजे.

एखाद्याने एका जमीनदाराकडून जमीन वहितीस घेतली आहे, उत्पन्न १०० रु. आहे. तर शेतकऱ्यास सदर जमिनीबद्दल जमिनदारास बटाई अगर निम्मा हिस्सा म्हणून ५० रु. जमीनमालकाला द्यावे लागतील. काही ठिकाणी शेतसारा दोघे मिळून देतात, अशावेळी त्या कुळाला ५० रु. जमिनीची बटाई म्हणून आणि शेकडा ३५चा अर्धा हिस्सा म्हणजे १७॥ रु. शेतसारा म्हणजे एकूण ६७॥ रु. द्यावे लागतात. म्हणजे १०० रु. उत्पन्न निघणाऱ्या जमीनीत हाडाची काडे करणाऱ्या शेतकऱ्यास सालअखेर ३२॥ रु. पदरात पडणार.

ज्या जमिनीवर सारा कमी असेल तेथे वाढ करू नये. परंतु ज्यावर जास्त लादला आहे तो कमी करावा, एकंदरीत ही जमीन महसुलाची पद्धत पूर्वी जशी दोषास्पद होती तशीच आता राहिली आहे म्हणून मी विरोध करीत आहे.[१८]

**१० फेब्रुवारी ३९ - ग्रामपंचायत दुरुस्ती बिल** - पंचायत भागात अस्पृश्यांचा समावेश करु नये. याकरिता या दुरुस्तीवर मी बोलत आहे. अस्पृश्यांना गावपंचायतीने दिलेल्या विहिरीचा आणि दिव्यांचा उपयोग नाही. कायदेशीर सोईचा उपयोग, अस्पृश्यांना त्रास देण्यास होतो आणि याकरिता गावपंचायतीमध्ये अस्पृस्यांचा समावेश करू नये.

राज्यात आजदेखील काही भागात अस्पृश्यांना डोक्यावर छत्री धरता येत नाही, चप्पल पायात घालून चालता येत नाही, किंवा सार्वजनिक रस्त्यावरून लग्नाची मिरवणूक नेता येत नाही.

**१३ फेब्रुवारी ३९** - झाबवाला यांच्या दुरुस्तीवर मी विरोध करण्यासाठी उभा आहे. खेड्यातील परिस्थिती झाबवाला यांना माहिती नाही. काही जातीचे प्रतिनिधी आपल्याच विभागात सर्वसुधारणा करतात. चांगले रस्ते, त्यांच्याच विभागात करतात असा अस्पृश्यांचा अनुभव आहे. झाबवाला यांना हे काहीही माहीत नाही.

अल्पसंख्यांकांचे हित पाहण्यासाठी त्यांच्या जातीचा प्रतिनिधी गावपंचायती मध्ये हवा.

अस्पृश्यांकरिता निराळा प्रतिनिधी केवळ त्यांच्या सुधारणेकरिता हवा. परंतु अशी जातीय मागणी केली तर सनातनी म्हणतात हे देशद्रोही आहेत. एक जात दुसऱ्या जातीकडे बघताना हा दुश्मन आहे. अशा पद्धतीने पाहते.

नाशिक जिल्ह्यात स्पृश्य लोक विहिरीवर पाणी भरू देत नाहीत, गावात प्रवेश करू देत नाहीत. त्यांच्यावर सामाजिक बहिष्कार टाकतात. त्याकरिता स्वतंत्र प्रतिनिधित्वाची आवश्यकता त्यांना हवी. त्यांच्या सोई कोणी पाहाव्यात अनेकजण म्हणतात, ग्रामपंचायतीने गावाला सर्व सोई देऊनही अस्पृश्यांची ही ओरड का? पण अंतर्गत जुलूम बाहेरच्या माणसांना दिसत नाही. ग्रामपंचायतीमध्ये अस्पृश्यांचा स्वतंत्र प्रतिनिधी निवडून गेल्याशिवाय त्या भागाचा विकास होणार नाही. स्पृश्य लोक संपूर्णतः दलित वस्तीकडे दुर्लक्ष करतो. मुसलमानाप्रमाणे अस्पृश्यांना स्वतंत्र मतदार संघ असता तर हमखास त्यांचे प्रतिनिधी निवडून गेले अशते. पण आम्ही पुणे करारात अडकल्यामुळे त्याबाबतीत आम्ही वंचित झालो आहोत.[१९]

मुंबईच्या कायदेमंडळात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी, Measures for Birth Control म्हणजे या देशात संतती नियमन करणे किती आवश्यक आहे; याकरिता बिल आणण्याचे ठरविले. ज्या दिवशी बिल येणार त्या दिवशी डॉ. आंबेडकर मुंबईत नव्हते. म्हणून स्व.म. पक्षाचे आमदार पी.जे. रोहम यांनी ते बिल ११ नोव्हें. १९३९ सभागृहात मांडले. त्यावर भाऊराव गायकवाड यांनी या बिलाला पाठिंबा दर्शविणारे भाषण केले. ते म्हणाले, या प्रांतात अन्नधान्याचा तुटवडा असल्याने गोरगरिबांना पुरेसे अन्न मिळत नाही. शिवाय, दिवसेंदिवस बेकारी वाढत आहे, नोकरी मिळत नाही म्हणून सरकारने यावर उपाय म्हणजे संतती-नियमन स्कीम स्वीकारणे हा एकच पर्याय आहे. अनेक लोकांना दोन वेळची भाकरी मिळत नाही, अनेक लोक भीक मागतात, अनेक तरुण आणि तरुणी सरकारने नोकरी द्यावी म्हणून खेपा घालतात. कित्येक आत्महत्या करतात. कारण कुटुंबाला पोसणे त्यांच्या आवाक्याबाहेरचे होते. संतती नियमन म्हणजे लोकसंख्या व बेकारी याला आळा घालणे असा होतो.

सरकारने फक्त प्रचार करणे आणि जे तयार होतील त्यांना सवलत देणे हा साधा उद्देश

या बिलामागे आहे. बळजबरी न करता हा प्रचार करायचा आहे. श्री. अलिबहादूर खान म्हणतात, मुस्लीम आणि ख्रिश्चन आणि इतर जाती विरोध करतील. पर्यायाने अल्पकाळात सरकार असंतोषाला बळी पडेल. शिवाय मूल होणे ही देवाची देणगी आहे असा लोकांचा समज आहे. अशा पद्धतीने गरिबी आणि बेकारी हटविण्याचा संतती नियमन हा मार्ग नव्हे.

श्री. जमनादास मेहता व श्री. तुळशीदास जाधव म्हणतात, स्वतः नियमन करणे हा एक मार्ग आहे. म. गांधींनी स्वतः प्रयत्न करून स्वनियंत्रण केले आहे.

त्यावर भाऊराव गायकवाड म्हणाले, "म. गांधींच्या जीवनावर मी चार पुस्तके वाचली आहेत. शिवाय त्यांचे आत्मचरित्रही वाचले आहे. वडील मृत्यूच्या शेवटच्या घटकेला आले असताना म. गांधी पत्नीसमवेत सेक्स उपभोगित होते. कारण स्वतः गांधीजींनी ब्रह्मचर्याचे प्रयोग किती कठीण आहेत हे काकासाहेब कालेलकरांनी संपादित केलेल्या पुस्तकातील उतारे वाचून दाखविले. तेव्हा स्वनियंत्रण हा संतती नियमाला पर्याय ठरू शकत नाही.

मी काँग्रेस पक्ष आणि सरकार यांना विनंती करतो की, या ठरावाला पाठिंबा देऊन या प्रांतातील गरिबी आणि बेकारी नष्ट करा.[३०]

संतती नियमन या देशाला करावेच लागेल; त्याशिवाय लोकसंख्यावाढीला पर्याय नाही; हे बाबासाहेब आंबेडकरांना अनेक वर्षे अगोदर समजले होते. परंतु बहुमताच्या जोरावर काँग्रेसने हे बिल फेटाळले.

मुंबईच्या कायदेमंडळाने दादासाहेबांची भाषणे अभ्यासपूर्ण असन प्रत्येक प्रश्नावर ते किती जागरूक असत हे त्यांच्या भाषणावरून लक्षात येईल.

भाऊरावाची पत्नी गीताबाई या शिकलेल्या होत्या. ५ एप्रिल १९३८ ला स्वतः भाऊरावांनी नाशिक जिल्हा स्कूल बोर्डाच्या निवडणूकीचा नॉमिनेशन दिडोरीला जाऊन भरला त्या बिनविरोध निवडून आल्या.

त्यानंतर पुन्हा २४ मेला, नाशिक जिल्हा लोकल बोर्डाची त्रैवार्षिक निवडणूक आली. पुन्हा गीताबाईने निवडणूकीला उभे रहावयाचे ठरविले. तिथेही त्या प्रचंड बहुमताने निवडून आल्या.

त्याचवेळी दुसरे महायुद्ध सुरू झाले. ब्रिटिश लोकांनी भारतीयांच्या मनाविरुद्ध ब्रिटन, जर्मनी यांच्या युद्धामध्ये सहभागी केले म्हणून जुलै १९३९ च्या पहिल्या आठवड्यात मंत्री मंडळाचा राजीनामा दिला व ब्रिटिशांशी असहकार पुकारला.

जुलै १९४१ मध्ये व्हाईसरॉयने आपल्या कार्यकारी मंडळात ८ भारतीयांचा समावेश केला. पण डॉ. आंबेडकरांना वगळले. परंतु संरक्षण समितीत त्यांना सभासद म्हणून घेतले. दलित समाजावर सरकारने मोठा अन्याय केला म्हणून डॉ. आंबेडकरांनी सरकारचा निषेध केला. भाऊराव गायकवाड यांनी जिल्ह्याजिल्ह्यांतून व्हाइसरॉयना निषेधाच्या तारा पाठविल्या. डॉ. आंबेडकरांना कार्यकारी मंडळावर घ्यावे म्हणून बॅ. सावरकरांनी देखील तार केली. त्याबरोबरच आर.डी. भंडारे, पी.जे. रोहम, डी.जी. जाधव, डी.एम्. शिर्के, के.एस्. सावंत, अनंतराव चित्रे यांनाही विनंती केली.

८ ऑगस्ट १९४२ ला म. गांधी यांनी 'छोडो भारत' ही घोषणा दिली व त्यामुळे कांग्रेस नेत्यांची भारतभर धरपकड केली.

त्याचदिवशी नाशिक रोडच्या सेंट्रल जेलमध्ये काँग्रेसचे गोविंदराव देशपांडे, वसंतराव नाईक, भाऊसाहेब हिरे, गद्रे इत्यादि कैद्यांना भाऊराव गायकवाड जाऊन भेटले. काँग्रेसचे जरी हे नेते असले तरी व्यक्तिगत भाऊरावांचे आणि त्यांचे जिव्हाळ्याचे, आपुलकीचे संबंध होते.

भारतातील राजकीय पेचप्रसंग सोडविण्याकरिता सर स्टॅफर्ड क्रिप्स भारतात आले. दुसरे महायुद्ध संपताच भारतात घटना समिती बोलवावी. तिने संस्थानिकांच्या सहकार्याने घटना तयार करावी, अशी भूमिका त्यांनी मांडली.

डॉ. आंबेडकरांनी १७ मार्च १९४३ला दादासाहेब गायकवाड यांना भेटीला बोलाविले. क्रिप्स बरोबर काय वाटाघाटी करायच्या यासंबंधी चर्चा झाली. त्यावेळी इतरही नेते हजर होते. ३० मार्च १९४२ ला डॉ. आंबेडकरांनी क्रिप्सची भेट घेतली. परंतु डॉ. आंबेडकर यांनी आपल्या सहकाऱ्यांशी चर्चा करून ही योजना फेटाळली. या योजनेमुळे पुन्हा अस्पृश्यांना गुलामगिरीत रहावे लागेल.

क्रिप्स आणि आंबेडकर या चर्चेच्यावेळी क्रिप्स म्हणाले, "तुम्ही कामगारांचे प्रतिनिधी की अस्पृश्यांचे? स्वतंत्र मजूर पक्ष, कामगार आणि शेतकरी यांचे प्रश्न सोडवित होते. परंतु राष्ट्रीय प्रवाहामध्ये अस्पृश्यांचे काय स्थान राहील, हा प्रश्न डॉ. आंबेडकरांच्या दृष्टीने महत्वाचा होता. वास्तविक अस्पृश्यांची स्वतंत्र संघटना असावी असे डॉ. आंबेडकरांना कधीही वाटले नव्हते. समाज समता संघ हा पहिल्यांदा इतर पुरोगामी पांढरपेशाच्या सहकार्याने स्थापन करून सार्वजनिक कार्याला सुरुवात केली. नंतर स्वतंत्र मजूर पक्ष स्थापन करून कामगारांचे प्रश्न हाती घेतले. परंतु स्वातंत्र्य समीप आल्यावर अस्पृश्य समाजाचा सहभाग त्यांना महत्त्वाचा वाटला. ब्रिटिश सरकारने अशी ग्वाही दिली होती की, स्वातंत्र्य देताना मुस्लीम, काँग्रेस आणि आंबेडकर यांच्या संमतीशिवाय देणार नाही. परंतु प्रत्यक्ष चर्चेच्यावेळी डॉ. आंबेडकरांना डावलले. आणि काँग्रेस आणि मुस्लीम लीग यांच्याशीच बोलणी करू लागले. डॉ. आंबेडकरांनी ठणकावून सांगितले होते, अस्पृश्यांच्या सल्ल्याशिवाय मिळणाऱ्या स्वातंत्र्याला आम्ही मान्यता देणार नाही. क्रिप्सने अशी अट घातल्याने डॉ. आंबेडकरांना विचार करावा लागला आणि अस्पृश्यांची स्वतंत्र संघटना स्थापन करण्याकरिता सहकाऱ्यांशी चर्चा केली.

दरम्यान ४ ऑगस्ट १९४२ ला नाशिक जिल्हा स्कूल बोर्डाच्या चेअरमनपदी निवडणूक आली. त्या जागेवर भाऊराव गायकवाड व खान बहादूर काजी या दोघांच्या नावाच्या सूचना आल्या. मतदान झाले. परंतु दोघांना समान मते पडली. शेवटी चिट्ठ्या टाकल्या. त्यात भाऊरावांचे नाव आले. त्यांच्या स्वत:च्या शिक्षणविषयक कल्पनांना मूर्त स्वरूप देण्याची या निमित्ताने वेळ आली. प्रत्येक शाळांना प्रत्यक्ष भेटी देऊन विधायक सूचना शिक्षकांना केल्या.

५ ऑक्टोबरला राष्ट्रीय सेवक संघाचा वार्षिक समारंभ भाऊरावांच्या अध्यक्षतेखाली पार पडला. जातीभेद या विषयावर त्यांनी परखड पण सनातन्यांना झोंबेल असे विचार मांडले.

खेड्यापाड्यातील सर्व लोक भाऊरावांना 'दादा' (मोठा भाऊ) म्हणून संबोधू लागले. कुणी दादासाहेब म्हणत, परंतु बाबासाहेब त्यांना भाऊराव म्हणूनच संबोधित असत. प्रत्यक्ष किंवा पत्ररूपी My dear Bhaurao असाच ते उल्लेख करीत.

भाऊराव त्या काळात सिव्हिल गार्ड (हल्ली होमगार्ड म्हणतात.) म्हणून ही जनतेची सेवा केली. ते कंपनी कमांडर होते. त्यासाठी परेडला देखील जावे लागे. २ डिसेंबरला मुंबई प्रांताच्या गव्हर्नरनी भोसला मिलिटरी स्कूलला भेट दिली त्यावेळी भाऊरावांनी त्यांची मुलाखत घेतली. मुलाखतीत महारवतन जमिनीवर सरकारने वाढविलेल्या जादा जुडी बाबत चर्चा केली. ती त्वरित रद्द व्हावी असे निवेदन दिले, नाशिकात महारांना गावठाणाकरिता सरकारी फॉरेस्ट डेपोची जमीन द्यावी, तसेच सरकारी नोकरीत वरिष्ठ जागी अस्पृश्यांना घ्यावे.

२६ जानेवारी १९४२ ला आनंदाची बातमी समजली. वतनी जमिनीवरील जादा जुडी सरकार आकारीत होते ती बंद केली. डॉ. आंबेडकर आणि भाऊराव गायकवाड यांच्या अथक प्रयत्नाचे ते फळ होते.

२३ मे १९४२ ला नाशिकच्या वसंत व्याख्यानमालेत भाऊरावांचे अस्पृश्यांना स्वतंत्र मतदार संघ का हवा' या विषयावर व्याख्यान झाले. तीन साडेतीन तास ते बोलत होते.

३ जुलै १९४२ ला व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलवर बाबासाहेबांची नेमणूक झाली. मजूर व पी.डब्ल्यू.डी. खाते त्यांच्याकडे सोपविण्यात आले. त्यावेळी बाबासाहेब नाशिकलाच ५-६ दिवस होते.

१९, २० जुलै १९४२ ला अखिल भारतीय दलित वर्ग परिषद नागपूर येथे मोहन पार्क येथे झाली. अखिल भारतीय दलित फेडरेशन स्थापन करण्याचा ठराव दादासाहेब गायकवाड यांनी मांडला. प्रमुख पाहुणे डॉ. बाबासाहेब आंबेडकर होते. ते व्हॉईसरॉयच्या कौन्सिलमध्ये असल्याने अध्यक्षपद त्यांना स्वीकारता आले नाही. म्हणून मद्रासचे एन्. शिवराज यांना अध्यक्ष केले. त्या ठिकाणी तीन परिषदा झाल्या. १) राजकीय, २) महिला, ३) समता सैनिक दल तिन्ही परिषदेत डॉ. आंबेडकरांची भाषणे झाली. भाऊराव गायकवाड यांना शे.का.फे.चे महाराष्ट्र प्रदेशचे अध्यक्ष केले.

पुण्याचे रिक्रूटिंग ऑफिसर मि. हुलंड यांनी ८ ऑगस्ट १९४२ ला दादासाहेबांना पत्र पाठविले. सैन्यात महारांची भरती करणारे ऑर्गनायझर म्हणून आपली नेमणूक होत आहे संमती लवकर कळवावी.

ही जागा स्वीकारू की नको अशा आशयाचे पत्र भाऊरावांनी ता. ८.८.१९४२ बाबासाहेबांना पाठविले. त्यानंतर प्रत्यक्ष पुण्याला जाऊन मि. हुलंडची भेट घेतली व कामाचा तपशील समजावून घेतला. परंतु त्याच दरम्यान २४ ऑगस्ट १९४२ ला भारत सरकारच्या मजूर खात्याकडून एस्. एच. झाकीर यांचे पत्र भाूरावांना आले.

पश्चिम विभागातील वायुदल विभागासाठी वेल्फेअर ऑफिसरची एक जागा निर्माण होणार आहे. दरमहा रु. ५०० पगार असूनही नेहमीचे प्रवास भत्ते दिले जातील, मध्यप्रांतातील विमान तळावरचे मजूर बांधकामासाठी नेमण्यात आले आहेत. त्यांचे स्वास्थ्य बघणे, भरती व ए. आर. पी. ची व्यवस्था बघणे संमती असली दिल्लीला येऊन भेटावे.

२५ तारखेला भाऊरावांनी डॉ. आंबेडकरांना या पत्रासंबंधाने पत्र पाठविले ताबडतोब डॉ. आंबेडकरांनी भाऊरावांना पत्राने कळविले की तुमच्या समाजसेवेच्या आड ही नोकरी येणार नाही तुम्ही त्वरित होकार कळवा दिल्लीला आल्यावर मी स्टेशनवर तुमच्या करिता माणूस पाठवितो.

तुम्ही येथे जेव्हा याल तेव्हा तुमचा पोषाख कसा असावा हे सांगितले पाहिजे. तुम्ही धोतर कोट हा तुमचा नेहमीचा पोशाख सोडून दिला पाहिजे तुम्ही अचकन आणि चुस्त पायजमा चुणीदार पायजमा घातला पाहिजे. आधुनिक कर्तबगार आणि बाणेदार माणसासारखे दिसणे. केव्हाही महात्मा दिसण्यापेक्षा चांगले नाही का? महात्मापदामुळे काही फायदा होत नसतो.

दुसऱ्या पत्रात बाबासाहेब लिहितात तुम्हाला महिन्याला ८०० रु. पगार वाढविण्यात यशस्वी झालो आहे. शिवाय पहिल्या वर्गाचा प्रवास भत्ता मिळेल.

८ सप्टेंबर १९४२ ला भाऊराव दिल्लीला गेले आणि २२ पृथ्वीराज रोड या बाबाच्या निवास्थानी उतरले.

नेहमीच्या सवयीप्रमाणे बाबासाहेबांनी पोशाखाबद्दल सांगूनही नेहमीच्या पोशाखात ते दिल्लीला गेले. या कपड्यात बाबासाहेब यांना जाऊ देईनात. शेवटी स्वत:चा भारी सूट व बूटही दिले आपल्या देखरेखेखाली घालावयास लावले नंतर पाठविले.

त्या दिवशी दादासाहेबांची मुलाखत फार चांगली झाली. सफाईदार इंग्रजीमध्ये चांगली उत्तरे दिली. बाबासाहेबांनी मनापासून भाऊरावांचे अभिनंदन केले, भाऊरावांना नेमणुकीचा हुकूम मिळाला नंतर ते मुंबईला आले सामान राजगृहावर ठेवले, सुपरिन्टेशेन्ट इंजिनियरला बॅलार्ड पीयर येथे जाऊन रुजू झाल्याचा रिपोर्ट दिला.

कर्नाटक, गुजरात, मध्यप्रांत सिंध या प्रांतात विमानतळ बांधले जात होते तिथे तिथे भाऊराव जात तेथे मजुरांचे आरोग्य, स्वास्थ्य, राहण्याची, खाण्याची, पाणी पुरवठ्याची सोय पहावी लागे, झोपडे व्यवस्थित आहे कां? डॉक्टर येतात का? या सर्व बाबी भाऊराव जातीने पहात असत.

७ नोव्हें. ४२ ला मुंबईच्या कामगार मैदानावर अस्पृश्याची जाहीर सभा होती. एन्. शिवराज नेहमी इंग्रजीत बोलत त्यावेळी ते भाषण मराठीत सांगण्याचे काम भाऊराव करीत.

भाऊराव गायकवाड यांच्या गैरहजेरीत नाशिक येथील पार्टीचे काम शांताबाई दाणी आणि रोहन संभाळीत असत एवढी दगदग करूनही २० जून १९४३ ला शांताबाई मुंबई विद्यापीठाची इंटर आर्टस्‌ची परिक्षा पास झाल्या दादानी त्यांचे अभिनंदन केले.

एके दिवशी मेसर्स पाटकर आणि कंपनीचा एक माणूस ऑफिसमध्ये आला आणि भाऊरावाच्या हातामध्ये एक पाकीट दिले व तो जाऊ लागला, दादासाहेब म्हणाले बसा, तुमच्या समक्ष मी पाकीट उघडतो, पाकिटात एक पत्र होते व ५०० रु. होते. पत्रात लिहिले होते. आमच्या विरुद्ध आपण वर काहीही लिहीत जाऊ नये, आपण तडजोड करून ही प्रकरणे आपसात मिटवीत जाऊ. ते पैसे त्याला परत केले व तुझ्या मॅनेजरला सांग मला ८०० रु. पगार मिळतो. पैसे देत असता ते न घेणारा अधिकारी मला अजून पहायला मिळाला नव्हता, असे पुटपुटला आणि निघून गेला.

ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर या तीन महिन्यात दादासाहेबांनी साऱ्या विमानतळांना भेटी दिल्या. मजुरांना प्रत्यक्ष देव भेटल्याचा भास झाला.

कानपूरला अखिल भारतीय दलित परिषद २९, ३०, ३१ जानेवारी १९४४ ला झाली. त्यावेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड, पा. ना. राजभोज व

शांताबाई दाणी यांची भाषणे झाली त्यावेळी नाशिकच्या डॉ. मिस लोंढे या देखील हजर होत्या.

८ जून १९४५ ला श्री. गायकवाड यांच्या हातात एक हुकूम पडला. त्यात लिहिले होते. युनिव्हर्सिटी वेल्फेयर कोर्ससाठी कलकत्त्याला जा. तुमची त्या कोर्ससाठी निवड केलेली आहे. त्याप्रमाणे ते कलकत्त्याला गेले. तेथे लेनिन व हिटलरचे चरित्र वाचले. बाबासाहेबांचे पाकिस्तानवरील विचार हे पुस्तक वाचले. परंतु तेथील हवा मानवेना, पोटही बरे राहिना. आजारी पडले. शेवटी कोर्स अर्धवट सोडून निघून आले. त्यामुळे वेल्फेअर ऑफिसरची नोकरी सुटली.

१९४६ ला सार्वत्रिक निवडणुका झाल्या. शे.का.फे.चा एकही उमेदवार निवडून आला नाही.

काँग्रेस पक्षाच्या ए.आय.सी.सी.ची बैठक कावसजी जहांगीर हॉलमध्ये भरली असता फे. नेते दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली ७ जुलै ४६ प्रचंड निदर्शने केली. शिवाय म. गांधी यांना काही प्रश्न विचारायचे होते. परंतु म. गांधींचे मौन आहे असे सांगितले. ते ९ प्रश्न पुढीलप्रमाणे होते.

१. स्वराज्यात अस्पृश्यांचे स्थान काय राहील, अल्पसंख्याकांना संरक्षण देण्याच्या बाबतीत स्वतंत्र योजना का प्रसिद्ध केली नाही, तुमच्या गप्प बसण्यामुळे आमच्या मनात संशय निर्माण झाला आहे.

२. अस्पृश्य हे अल्पसंख्याक आहे हे मानते का? १९३९ च्या 'हरिजन'मध्ये भारतात फक्त अस्पृश्य अल्पसंख्याक आहे. असे असताना मौलाना आझाद यांनी व्हाईसरॉयना लिहिलेल्या शेवटच्या पत्रात अस्पृश्यांना अल्पसंख्याक म्हणून मान्यता देण्यास काँग्रेस तयार नाही.

३. अस्पृश्यांना अल्पसंख्यांक म्हणून मान्यता देण्यास काँग्रेस तयार नाही या विधानाचा अर्थ काय? अस्पृश्यांनी लढून कायद्याने मिळविलेली संरक्षण काढून घेण्याचा काँग्रेस विचार करते काय?

४. प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणूकीत शेड्युल्ड कास्टच्या उमेदवारास प्राथमिक निवडणुकीत शेकडा ९० टक्के मते मिळाली हे काँग्रेसला मान्य आहे का? शेवटच्या निवडणुकीत काँग्रेसचे अस्पृश्य उमेदवार हिंदूंच्या मतावर निवडून आलेले उमेदवार अस्पृश्यांचे खरे प्रतिनिधी नाहीत ही गोष्ट काँग्रेस नाकारणार आहे काय?

५. पुणे कराराच्या वेळी अस्पृश्यांच्या राखीव जागेच्या निवडणूकीत हिंदू लोक ढवळाढवळ करणार नाहीत असे वचन म. गांधींनी दिले होते. ते वचन मोडून अस्पृश्यांचा विश्वासघात का केल?

६. सिमला येथे लॉर्ड वेव्हेल यांनी बोलाविलेल्या पक्षनेत्यांच्या बैठकीत एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्ये अस्पृश्यांचे दोन मंत्री असावेत, याला काँग्रेसने विरोध केला नाही. परंतु प्रत्यक्ष एकच मंत्री केला. पण आपल्या हातात सूत्रे आल्यावर काँग्रेस वचन मोडते म्हणून तुमच्यावर विश्वास ठेवता येत नाही, असे का?

७. हरिजन सेवकसंघाचे कार्यकर्ते व म. गांधी यांनी मान्य केले आहे की, अस्पृश्यता

निवारण्याच्या दृष्टीने काही प्रगती झाली नाही. उलट हिंदूंकडून होणाऱ्या अत्याचारात वाढ झाली. यातून मुक्ति मिळविण्यासाठी अस्पृश्यांच्या खऱ्या प्रतिनिधीमार्फतच या अन्यायाला वाचा फोडता येईल; मग काँग्रेस स्वतंत्रमतदार संघाला विरोध का करते.

८. एखाद्या जमातीचा, जातीचा धर्म आणि स्वतंत्र मतदार संघ यांच्या काही संबंध नाही. एकाच धर्माच्या जातीजमातींनी स्वतंत्रमतदार संघ मिळविले आहेत. युरोपियन, अँग्लो इंडियन व इंडियन ख्रिश्चन एकाच धर्माचे पालन करूनही प्रत्येकाला स्वतंत्र मतदारसंघ आहे. त्यांच्या मतदार संघाला काँग्रेसने किंवा अन्य कोणीही विरोध केला नाही. मग अस्पृश्यांच्या बाबतीत धर्माचा मुद्दा का निर्माण करतात.

९. शीख आणि हिंदु एकच. एका कुटुंबात एक शीख असतो एक हिंदू असतो. पण त्यांच्या स्वतंत्र मतदारसंघाला विरोध न होता. अस्पृश्यांच्या मतदार संघाला विरोध का अस्पृश्य हे स्पृश्यापासून दूरचे आहेत. मुसलमान आणि शीख यांना स्वतंत्र मतदारसंघ आहे पण अस्पृश्यांना नाही हे का?

म. गांधी यांची प्रत्यक्ष भेट झाली असती तर शेड्युल्ड कास्ट फेडरेशनचे प्रांतिक अध्यक्ष दादासाहेब गायकवाड यांनी हे ९ प्रश्न विचारले असते हे प्रश्न स्वत: डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी तयार करून म. गांधींना विचारण्याकरिता भाऊरावांची नियुक्ती केली होती. प्रत्यक्ष भेट न झाल्याने स. का. पाटील यांच्यातर्फे म. गांधींना पोहचविली.

१९४६ च्या सार्वत्रिक निवडणुकीत शे.का. फेडरेशनचा एकही प्रतिनिधी निवडून आला नाही. त्याचे कारण संयुक्त मतदार संघ. पुणे करारामुळे निव्वळ अस्पृश्यांच्या मतावर अस्पृश्य उमेदवार निवडून येणे शक्यच नव्हते. गोलमेज परिषदेमध्ये मुसलमान आणि शीख यांना स्वतंत्र मतदार संघ मिळाले. पण म. गांधींनी अस्पृश्यांच्या स्वतंत्र मतदार संघाला विरोध केल्यामुळे, १९४६ च्या निवडणुकीत आंबेडकर पक्षाचा एकही उमेदवार निवडून आला नाही.

शेवटी ४ जून १९४६ च्या बैठकीत राजकीय हक्कासाठी १५ जुलैपासून पुण्याच्या कौन्सिल हॉलवर सत्याग्रह करण्याचे ठरले. कौन्सिल हॉलवर प्रचंड बहुसंख्येने जाणे, नंतर सभा व शेवटी सत्याग्रह असा कार्यक्रम ठरला. बारा दिवस चाललेल्या या सत्याग्रहात सुमारे ११५० सत्याग्रहींनी भाग घेतला. त्यात १२८ महिला होत्या. १५ दिवसापासून ३ महिन्यांपर्यंत शिक्षा झाल्या.

सत्याग्रहाचे नेतृत्व दादासाहेब गायकवाड यांनी केले होते. सोबत पा.ना. राजभोज, आर.आर. भोळे, आर.डी. भंडारे, शांताबाई दाणी, गीताबाई गायकवाड होते. शांताबाई दाणी व गीताबाई गायकवाड यांना तुरुंगवासही पत्करावा लागला. कायदेमंडळाचे अधिवेशन समाप्त झाल्यावर डॉ. आंबेडकरांच्या आदेशाने सत्याग्रह स्थगित करावा लागला.

भाऊराव गायकवाड यांची प्रकृती फारच खालावलेली होती. बाबासाहेबांना चिंता लागून राहिली होती, शिवाय त्यांची स्वत:ची प्रकृती खालावत चालली होती, who were the Shudras हे नवीन लिहिलेले पुस्तक भाऊरावांना पाठविले होते. त्यावर अभिप्राय कळवा अशा आशयाचे पत्र बाबासाहेबांनी २५-१२.१९४६ लिहिलेले आहे.

*प्रिय भाऊराव,*

*मी गेल्या शनिवारी दिल्लीहून मुंबईला आलो, दिल्लीला जाण्यापूर्वी तुम्हास भेटण्याची इच्छा होती. पण भेट होऊ शकली नाही, मुंबईस येण्यासारखी तुमची प्रकृती बरी नाही हे कमलकांत चित्रे यांना आलेल्या पत्रावरून कळले. तुमची प्रकृती लवकर बरी होऊन आपल्या नेहमीच्या कार्यास लागल्यावर सर्वांनाच बरे वाटेल. याचा अर्थ असा नव्हे की, आपण पूर्ण बरे होण्यापूर्वीच आणखी काही कामगिरी आपल्यावर सोपवावयाची आहे. आपली प्रकृती झपाट्याने सुधारण्याच्या मार्गावर आहे, असाच मला विश्वास पाहिजे आहे.*

*माझी प्रकृती निश्चितपणे अधोगतीस लागली असावी. अशी डॉक्टरांना भीती वाटली, अर्थात याची आपण चिंता करू नये, पडत्या काळात मी सावरून उभा आहे. आपल्या समाजाला जोपर्यंत माझ्या अस्तित्वाची आवश्यकता आहे तोपर्यंत मी जगेने अशी मला खात्री वाटते. त्याचबरोबर मी ईश्वराला अशी प्रार्थना करतो की अधिक नसले तरी आवश्यक ते आयुष्य मला दे!"*

*मी शूद्रावर लिहिलेले पुस्तक तुमच्या अवलोकनात आले का? एक प्रत आपल्याला पाठवीत आहे. माझी खात्री आहे की, ते आपल्याला आवडेल.*

*आपण मला पत्र लिहावे, आपण प्रकृतीची काळजी घ्यावी.*

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

भारताला १५ ऑगस्ट १९४७ साली स्वातंत्र्य मिळाले. डॉ. आंबेडकर यांना मंत्रीमंडळात कायदामंत्री केले. शिवाय घटनेच्या मसुदा समितीचे महत्त्वाचे पद त्यांच्याकडे आले. फाळणी करण्यापूर्वी पाकिस्तानातील हिंदूंना भारतात येऊ द्या व भारतातील मुस्लिमांना पाकिस्तानात पाठवा अशी सूचना काँग्रेस पक्षाला केली होती. पण डॉ. आंबेडकरांची सूचना कुणी ऐकली नाही.

शेवटी व्हायचे तेच झाले. पाकिस्तानातील अस्पृश्यांना हिंदुस्थानात यायला मुस्लिमांनी बंदी केली. कारण ते सर्व भंगी समाजाचे होते, येथील साफसफाईचे काम कोण करील. आम्ही भारतात जे अस्पृश्य निर्वासित आले होते त्यांना केवळ ते अस्पृश्य म्हणून मदत मिळत नव्हती. स्पृश्य निर्वासितांना मात्र मदत मिळे.

अनेक अस्पृश्य निर्वासितांनी डॉ. आंबेडकरांकडे तक्रारी केल्या. त्यांनी पं. नेहरूंना एक पत्र पाठवून निर्वासित अधिकारी पाठविण्याची विनंती केली. पं. नेहरूंनी ती मान्य केली.

डॉ. आंबेडकरांनी सर्वतोपरी विचार करून या कठीण प्रसंगी योग्य आणि अनुभवी कार्यकर्ता म्हणून भाऊरावांची त्यांना आठवण झाली. भाऊराव ही एकमेव व्यक्ती हे जिकिरीचे आणि जबाबदारीचे काम पार पाडू शकेल. म्हणून त्यांना १९.११.१९४७ रोजी पत्र लिहिले.

*प्रिय भाऊराव,*

*सिंध प्रांत व भावलपूर संस्थानातून अस्पृश्यांचा मुसलमान छळ करीत असल्याच्या अनेक तक्रारी मजकडे येत आहेत.*

*या बाबतीत सिंधला जाणारा स्वतंत्र अधिकारी नेमून त्यांच्यामार्फत आपल्या लोकांना संरक्षण द्यावे असे माझे म्हणणे सरकारने मान्य केले आहे.*

*अर्थात, ही अधिकाऱ्यांची जागा किती मुदतीची असेल हे सांगता येत नाही. या अधिकाऱ्यांच्या जागेसाठी आपल्याच समाजातील अनुभवी अधिकारी असावा म्हणून तुमची शिफारस केलेली आहे. दोन-तीन दिवसांत नेमणुकीचे पत्र मिळेल. आपण या जागेचा स्वीकार करावा असे मला वाटते व सिंधला ताबडतोब जावे.*

*आपला*

*बी.आर. आंबेडकर*

त्याप्रमाणे दादासाहेबांना २६ नोव्हेंबर १९४७ ला तार मिळाली की ताबडतोब सिंधमध्ये जाण्यासाठी दिल्लीवरून तयारीनिशी यावे, २९ नोव्हेंबरला दिल्लीला पोचले. ६ डिसेंबरला त्यांच्या हातात नेमणूकीचा हुकूम पडला. पगार ५०० रु. अधिक सर्व भत्ते त्याप्रमाणे दादासाहेब ९ डिसेंबरला जालंदरला गेले.

९ डिसेंबरला दादासाहेब जालंदरला आले व निर्वासितांच्या कॅम्पना भेटी दिल्या. यामध्ये अस्पृश्य होते, भंगी होते. गांधी कँपमध्ये १६ हजार निर्वासित होते. त्यांच्या अंगप्रत्यंगात वैफल्य आणि निराशा पुरेपूर दाटून आलेली होती. त्यात अस्पृस्य निर्वासितांची कहाणी अत्यंत करुण आणि शोकजनक होती.

१८ डिसेंबर १९४७ ला डॉ. आंबेडकरांनी पंतप्रधानांना पत्र पाठवून सविस्तर निवेदन केले होते.

"शेड्युल्ड कास्टच्या लोकांना पाकिस्तान सरकार भारतात येऊ द्यायला तयार नाही. हे लोक पाकिस्तानला हलकी कामे करण्यासाठी, शेतावर मजूर म्हणून राबण्यासाठी हवे होते. त्यातल्या त्यात झाडूवाल्यांची तर त्यांना अत्यंत गरज होती म्हणून झाडूवाल्याची नोकरी पाकिस्तानने आवश्यक नोकरी (Essential Service) म्हणून जाहीर केली होती. त्यांना तर ते सोडायला तयार नव्हते. सरकारने पाकिस्तान सरकारला सांगून लवकरात लवकर अस्पृश्यांची मुक्तता करावी. उत्तरप्रदेश व भावलपूर येथे अधिकारी नेमून ते पाकिस्तान हद्दीत जातील आणि कुठेकुठे अस्पृश्यांना भारतात येण्यास मज्जाव होतो ते पाहतील.

जे अस्पृश्य निर्वासित पूर्व पंजाबमधील कँपमध्ये आले आहेत, तेथे स्पृश्य हिंदू आणि अस्पृश्य यात भेदाभेद करतात.

जे निर्वासित कँपमध्ये आहेत, त्यांनाच रेशन कपडा इ. पुरवठा केला जाईल. अस्पृश्यांना ते कँपमध्ये राहू देत नाहीत. म्हणून त्यांना मदत मिळत नाही म्हणून अस्पृश्यांना मदत मिळाली पाहिजे.

प्रत्यक्ष पाहिलेले अनुभव दादासाहेबांनी, बाबासाहेबांना सांगितल्यावरून त्यांनी पंतप्रधानांना पाठविलेल्या पत्रात नमूद केलेल्या होत्या.

३ जानेवारी दादासाहेबांची बदली कुरुक्षेत्र येथे झाली होती तेथे अस्पृश्य निर्वासितांची व्यवस्था करण्याचे काम त्यांच्याकडे होते.

कुरुक्षेत्र टाऊन नं. १ कँपात ७० हजार निर्वासित होते. तेथे त्यांच्या तक्रारी ऐकून निवारण करण्याचे काम दादासाहेब करीत.

दूधवाटप केंद्रातून अस्पृश्यांच्या मुलांना दूध मिळत नव्हते. ते मिळण्याची त्यांनी सोय केली.

गायकवाड भंग्याची कड घेतात म्हणून सर्व अधिकारी त्यांच्यावर रुष्ट झाले. हे इथे आल्याने भंगी शेफारले आहेत. हेल्थ डिपार्टमेंटमधील भंगी सतत दादासाहेबांकडे तक्रारी घेऊन येत, दादासाहेब त्यांना फूस लावतात, म्हणून भंगी इतर कामगारांना त्रास देतात. या सर्व बाबी पाहून दादासाहेबांनी बाबासाहेबांना कळविल्या व मी राजीनामा देऊ का अशी विचारणा केली.

बाबासाहेबांनी परवानगी दिल्यावर दादासाहेबांनी निर्वासित अधिकारी पदाचा राजीनामा पाठविला तो २३ एप्रिल रोजी मंजूर झाला. त्यावेळी सर्व भंगी आणि चांभार यांना वाईट वाटले.

२९ मार्च १९४९ ला बाबासाहेबांचे भाऊरावांना एक पत्र आले -

*प्रिय भाऊराव,*

*हे पत्र निराळ्या विषयावर पाठवीत आहे. मुंबई महागनरपालिकेत श्री. एस्.के. पाटील हे मेयर पदाकरिता उभे राहत आहेत. सोशालिस्ट पक्षाशिवाय तिथे विरोधी उमेदवार नाही, गाडगीळांच्या वतीने मला ते म्हणाले तुमच्या कॉर्पोरेटर्सनी मला मतदान करावे. म्युनिसिपालिटीकडून आपणास अनेक कामे करून घ्यायची आहेत आणि आपणास मदत करावयास पाटील एकमेव गृहस्थ आहेत. राजकारणाशिवाय व्यक्तिश: ही गोष्ट समाधानकारक आहे. तुम्ही मुंबईला जाऊन आपल्या कार्पोरेटर्सना त्यांना मते द्यायला सांगा.*[११]

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

भाऊराव मुळातच काँग्रेसच्या विरोधात आणि त्यांना मते द्यायचे ही कल्पनाच सहन झाली नाही. म्हणून त्यांनी उत्तर लिहिले.

*डॉ. बाबासाहेब आंबेडकर,*

*आपण माझे गुरू आहात, आपले व माझे गुरुशिष्याचे नाते आहे. तेव्हा आपण सांगावे आणि मी ऐकावे ह्याच भूमिकेतून आजपर्यंत मी वागत आलो. परंतु आता आपण मला जे काम सांगितले आहे ते करण्यास मन घेत नाही. कारण श्री. पाटील हे काँग्रेसचे आहेत आणि काँग्रेसपक्ष व आपला शे.का.फे. पक्ष यांचा संबंध पाहता, हे काम मी करू नये असे मला वाटते. याऐवजी बाबासाहेब तुम्ही मला तुमची धोतरे धुण्याइतकी हलकी कामे सांगा ती मी खुषीने करीन.*

एवढे पत्र लिहून झाल्यावर त्यांना काय वाटले कुणास ठाऊक पत्राचा शेवट करताना त्यांनी लिहिले -

*आपण आमचे नेते आहात, आम्ही आपले शिष्यत्व पत्करलेले आहे तेव्हा आपण जे काम सांगाल ते करणे माझे कर्तव्यच आहे. मग त्या कामाचे स्वरूप कसेही असो मी मुंबईला जाऊन आपल्या सदस्यांना आपला निरोप सांगतो, फक्त माझ्या मनात एवढेच आले की आपल्यासारख्यांनी अशांना जवळ करू नये.*

*सदैव आपला सेवक*

*भा. कृ. गायकवाड*

दादासाहेब मुंबईला आले, त्यावेळी आर. डी. भंडारे, व्ही. वाय्. मोहिते (धयविलकरबुवा)

शंकर लक्ष्मण वडवलकर व आर.जी. खरात या चार कार्पोरेटर्सना स. का. पाटील यांना मते द्यायला सांगून ते एप्रिल १९४९ ला मेयर झाले.

डॉ. आंबेडकरचा एकुलता एक मुलगा यशवंत याचे लग्न करावे, कारण त्याचे वय वाढत चालले आहे, त्याला मुलगी पाहावी ही कौटुंबिक सुखदु:खाची कामे अति जिव्हाळ्याचा जो असेल त्यालाच सांगतात, त्याप्रमाणे बाबासाहेबानी दि. ३.६.१९४९ भाऊरावांना पत्र पाठविले आहे.

*प्रिय भाऊराव,*

*एक महत्वाच्या गोष्टीबद्दल मला आपल्याला लिहावयाचे होते, परंतु ते लिहू शकलो नाही चि. यशवंताची लग्न करण्याची इच्छा आहे, त्याच्याकरिता मी मुलगी पाहत आहे, चांगली मुलगी आपल्या पाहण्यात आहे का? १) ती दिसायला चांगली असावी २) तिला चांगले व्यक्तिमत्व असावे व दिसण्यात ती सुंदर असावी ३) कुलशीलाने ती चांगली असावी ४) ती अगदीच लहान वयाची नसावी.*

*ती पदवीधर नसली तर चांगली सुशिक्षित असावी. हे फारच जरुरीचे पत्र समजावे*

*आपला*

*बी. आर. आंबडेकर*

त्यानंतर डॉ. आंबेडकरांनी यशवंताच्या लग्नासंबंधी भाऊरावांना ५.६.४९ व २०.१२.४९ २२.३.५० अशी तीन पत्रे पाठविली, भाऊरावांना नागपूर मुंबई आणि पुणे येथील मुली दाखविल्या परंतु यशवंत यास पसंत न पडल्याने बाबासाहेबांनी त्या विषयावर कधी वक्तव्य केले नाही.

आपल्या जीवनातील अत्यंत नाजूक प्रश्नासंबंधी बाबासाहेब भाऊरावांना एक पत्र लिहितात, आणि लग्नासंबंधी माहिती देतात. ही बातमी ऐकून सगळा समाज हवालदिल होतो, लग्न होणार हे खरे आहे काय? सगळ्यांना हा प्रश्न भेडसावू लागला, कोणत्या डॉक्टरानी हा सल्ला दिला, त्यांच्या वयाच्या एवढा उशीरा का दिला, लग्न कोणत्या बाईशी करणार, ती बाई कशी असणार, आमच्या बाबांना ती व्यवस्थित सांभाळणार काय त्यांच्या पोटापाण्याचे नीट बघणार काय, त्यांचे काही दुखले खुपले तर औषधपाणी करणार काय, गोरगरीब आणि दीनदुबळ्या समजाला मायेरी पाखर घालणार का, बाबासाहेबांचे हृदय तिला असणार का, आता आमच्या बाबासाहेबांचे पुढे कसे होणार, लग्नानंतर गरीबांशी ताटातूट करणार काय, समाजावर आजपर्यंत बाबासाहेबांनी आईची माया दाखविली होती, ही दाखवेल का? आजपर्यंत तळहातावरील फोडासारखे समाजाने बाबासाहेबांना जपले होते ही जपेल काय? बाबांच्या प्राणाकरिता अनेक जण जीवाची आहुती द्यायला तयार होते ही आहुती देईल काय? रात्रच्या रात्र बाबासाहेबांच्या जीवाकरिता लोकांनी जागरण केले आहे ही करले काय? लक्तरे धारण केलेले दीनदुबळे बाबासाहेबांना आपली दीनवाणी कथन झालेली अन्याय कथन करीत होती ही ती दीनवाणी ऐकेल का?

२६ मे १९३५ ला रमाबाईचे निर्वाण झाले होते, तब्बल १३ वर्षे बाबासाहेब विधुर होते. सुखदु:ख सांगण्याची फक्त दोन नाती असतात, एक आई व दुसरी पत्नी, त्यांना आई नव्हती आणि पत्नीही नव्हती. १३ वर्षे कुणाकडे हे सुखदु:ख सांगत असतील, अनेक दुर्धर

प्रसंग निर्माण झाले, जीवघेणे प्रसंग निर्माण झाले, अपमानाचे प्रसंग निर्माण झाले, कौतुकाचे, मोठेपणा मिळण्याचे प्रसंग निर्माण झाले? कुणाला बाबासाहेबांनी हे प्रसंग सांगितले असतील? दु:ख कसे कमी केले असेल? अनेकदा त्यांचे आजार बळावत होते. मायेने पाठीवरून कुणाचा हात फिरला तर ते दु:ख थोड्याफार प्रमाणांत कमी होते. विधूरावस्थेच्या १३ वर्षांच्या कालखंडात जीवनांत निर्माण झालेले चढउतार बाबासाहेबांनी लिहून ठेवायला पाहिजे होते; पण लिहिल्याचे आढळत नाही. त्यांचे संपूर्ण जीवन दु:खाने भरलेले होते. देशात कुणीही त्यांच्यासंबंधी कौतुकाचे उद्‌गार काढले नाहीत. आले ते अपमानित जीवनच वाट्याला आले, फार अल्पक्षणच आनंदाचे आले असतील.

त्यांच्या जीवनातील कालखंडाचे सर्व प्रसंग समाजाच्या पुढे आल्यामुळे या शंका लोक स्वत:लाच विचारीत आणि त्याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करीत. आमचे बाबा समाजाला अंतर देणार नाहीत, शेवटपर्यंत कोंबडी जशी आपल्या पिलांना सांभाळते, त्यांच्यावर पाखर घालते त्याप्रमाणे लग्न झाल्यावरही बाबासाहेब आमच्याकडे पाहणार कां?

हे ऐकून धक्का बसला तो भाऊराव गायकवाड यांना. १९२६ पासून बाबासाहेबांशी त्यांचा संबंध आलेला होता. अनेक प्रसंगी ढालीसारखे भाऊराव उभे राहिले होते. नाशिक सत्याग्रहाचे वेळी बाबासाहेबांवर हल्ला होणार हे ऐकल्याबरोबर दादासाहेब जीवाचे रान करीत. कोणत्याही कठीण प्रसंगी बाबासाहेबांनी फक्त आदेश द्यायचा भाऊरावांनी कधी नकार दिल्याचे आढळत नाही. आज मुंबईला या, उद्या नगराला, परवा दिल्लीला या. भाऊराव तयारच. म. गांधींना निदर्शने आणि प्रश्न विचारायचे. भाऊराव जा, विमानतळावर लेबर ऑफिसर म्हणून जा. भाऊराव तयारच, फाळणीच्या प्रसंगी Refugee Commissioner म्हणून सिंध आणि भावलपूर येथे जा. भाऊरावाचा नकार नाही, यशवंताचे लग्न ठरवायचे, मुलगी पहा. भाऊराव धावले मुलगी शोधायला. असे शेकडो प्रसंग दाखविता येतील. गुरुच्या हुकुमाची अवज्ञा झाली आहे असे उदाहरण सापडणार नाही. चारचार सहासहा दिवस नाशिकला बाबासाहेबांच्या मुक्काम असायचा. रात्रभर दोघांनीही झोप न घेता सामाजिक, राजकीय, शैक्षणिक कार्याची रुपरेषा आखता आखता दिवस उजाडायचा. हे सर्व प्रसंग भाऊरांवाच्या समोर उभे राहिले. लग्नानंतर बाबासाहेब बदलतील काय? त्याच्या वागण्यात बदल होईल का, या गोष्टींना नवीन पत्नी परवानगी देईल का? ७ कोटी दलितांचा एकमेव तारणहार समाजापासून दूरावेल का? या शंकेने भाऊरावांना ग्रासले होते. बाबासाहेबांचे १६-३-४८ला भाऊरावांना पत्र आले.

*प्रिय भाऊराव,*

*माझे मित्र वैद्यकीय सल्लागार यांनी निश्चितपणे मला असे सांगितले आहे की, माझी या मधुमेहाचा विकारापासून निकोप होण्याची मोठी शक्यता आहे पण जरा का तो रोग बळावला तर धोकादायक आहे मधुमेहाचा आजार हा खाण्यापिण्यावर अवलंबून असणारा आजार आहे. माझी दैनंदिन भोजनाची व इन्सुलिन इंजेक्शन वगैरेबाबत काळजी घेणारे कोणी नसेल, तर हा आजार उलट उचल खाणार नाही, असे मुळीच सांगता येणार नाही, माझ्या त्या मित्रांचे असे म्हणणे आहे की, जर माझी लग्न् करण्याची तयारी असेल तर मी शुश्रूषेसाठी एखादी नर्स किंवा घरदार सांभाळणारी एखादी बाई घरी ठेवल्याने लोकांच्या*

*मनात शंकाकुशंका निर्माण होतील. याचकरिता 'लग्न करणे' हा अधिक चांगला मार्ग आहे. चि. यशवंताच्या आईच्या मृत्यूनंतर लग्न करायचे नाही असा माझा निश्चय होता.परंतु प्राप्त परिस्थिती मजवर माझा निश्चय मोडण्याची पाळी आलेली आहे. डॉक्टर स्पष्टपणे म्हणतात की 'लवकर मरणे किंवा लग्न करणे' यातून कोणतीतरी एक गोष्ट करणे भाग आहे.*

*यासाठी माझ्या पसंतीनुसार पत्नी मिळणे अशक्य नसेल तरी अवघड आहे. माझी सौभाग्यवती होणारी स्त्री सुशिक्षित असली पाहिजे. तसेच ती डॉक्टरकीचा व्यवसाय करणारी असली पाहिजे व त्याचबरोबर ती स्वयंपाकपाण्यात चांगली हुशार पाहिजे. या गोष्टीचा विचार करता आपल्या समाजात तिन्ही गुणानी फक्त व माझ्या वयाला अनुरुप अशी एखादी स्त्री मिळणे अशक्य कोटीतील गोष्ट आहे. तसेच इतर दुसऱ्या समाजाशी माझे काही संबंध नसल्याने माझ्याशी लग्न करावयास अशी स्त्री मिळणेही अवघड दिसते.*

*माझे जीवन इतके एकलकोंडे झाले आहे की त्यामुळे स्पृश्य हिंदू पुरुष व स्पृश्य हिंदू स्त्रिया यांच्याशी माझे मुळीच संबंध नाहीत. पण सुदैवाने माझ्या पसंतीची एक महिला आहे. ती सारस्वत ब्राह्मण जातीची आहे ता. १५ एप्रिल रोजी दिल्ली येथे तिच्याबरोबर लग्न होईल.*

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

मुंबई प्रदेश काँग्रेसचे नेते श्री. स. का. पाटील हे १९५२ मध्ये होणाऱ्या लोकसभा, विधानसभा व मुंबई महानगर पालिका या निवडणूकीमध्ये काँग्रेस आणि शे.का.फे.ला सर्वांनी एकत्र येऊन समझोत्याचा एक मार्ग काढू अशा आशयाचे एकपत्र स. का. पाटील यांनी दि. १०.८.५१ रोजी डॉ. आंबेडकरांना पाठविले त्याला १४.८.५१ रोजी त्यांनी उत्तर दिले.

*प्रिय श्री. पाटील,*

*आपले ता. १०.८.५१ चे पत्र पोंचले. पत्राबद्दल मी आभारी आहे. आपले पत्र शे.का.फे.ला फेडरेशन उद्देशून आहे असे मी समजतो आपल्याला माहित आहेच की मी भारत सरकारचे मंत्रीपद स्वीकारल्यानंतर व्यक्तिश: शे.का. फेडरेशनला मार्गदर्शन करणे वगैरे इतर कार्यात कधी पडलो नाही, हे सर्व स्थानिक लोकांवर सर्वस्वी अवलंबून आहे, मुंबई प्रांतापुरते बोलायचे झाल्यास प्रांताचे अध्यक्ष श्री. भाऊराव गायकवाड (किस्मतबाग नाशिक) हे आहेत, आपण त्यांना चागले जाणताच, आपण या बाबतीत त्यांना भेटून त्यांच्याशी बोलणी करावीत.*

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

पुढे काँग्रेसबरोबर न जमल्याने प्रजासमाजवाद्याबरोबर युती झाली. कारण काँग्रेसच्याबाबतीत डॉ. आंबेडकरांचा फार नाराज होते. येत्या निवडणुकीच्या प्रचारकार्याला डॉ. आंबेडकर यांनी सुरूवात केली होती. परंतु प्रकृतीअस्वास्थामुळे सगळीकडे प्रचार करणे त्यांना अशक्य झाले होते. म्हणून ते पत्रात भाऊरांवाचा सांगतात की, हैद्राबाद आणि नागविदर्भ येथील निवडणूक दौरा तुम्ही केल्यास मला थोडी विश्रांती मिळेल, निवडणूक दौऱ्याने मी अगदीच दमलो आहे.

एकूण या दगदगीचा विचार करता आणि सातत्याने आजारपण मागे लागल्याने मी फार काळ जगू शकेन जसा भरवसा राहिला नाही आता संघटनेनी जबाबदारी शिरावर घेण्याकरिता भाऊरावांनी तयार झाले पाहिजे, असे निराशाजनक पत्र दि. १४ मे १९५२ला भाऊराव गायकवाड यांनी पाठविले.

*प्रिय भाऊराव,*

*माझी प्रकृती आहे तशीच आहे. अर्थात तुम्हा सर्वांच्या काळजीचे व दुःखाचे ते कारण झाले आहे. आता मी माझी काळजी करण्याचे सोडून दिले आहे. आता पुन्हा प्रकृती निकोप राहिलसे वाटत नाही. भगवान बुद्धाने सांगितले आहे की, जे जन्माला आले आहेत ते नष्टप्रत जाणार आहे. आपण हे मनाला लावून घेऊ नये.*

*माझ्या प्रकृतीची आता चिंता करण्याऐवजी, माझ्या शिरावरील आपल्या समाजाच्या सर्व कार्याची जबाबदारी घेण्याची होय आणि तुम्ही ती जबाबदारी घेण्यासाठी लवकर तयार झाले पाहिजे, माझी खात्री आहे की मी आता अधिक काळ जगू शकणार नाही.*

*आपला*

*बी. आर. आंबेडकर*

अस्पृश्यांनी सरकारी पडीक जमीन शेतीसाठी ताब्यात घ्याव्यात ही डॉ. आंबेडकरांची मूलभूत भूमिका होती. विशेषतः मराठवाड्यात अस्पृश्यांवर वेगवेगळ्या मार्गांनी अत्याचार चालू होते. म्हणून डॉ. आंबेडकरानी हैद्राबाद सरकारचे शेतकी मंत्री यांना २९-७-५३ रोजी पत्र पाठविले होते. त्या पत्राचे त्यांनी उत्तर दिले नव्हते. म्हणून सरकारी पडिक जमिनी सत्याग्रह करून ताब्यात घ्या व त्यांना आपल्या पोटापाण्यासाठी शेतकी सुरू करा. असा आदेश दिल्यावरून पाचही जिल्ह्यात सत्याग्रह सुरू झाला. १० हजार सत्याग्रहींनी भाग घेतला. सत्याग्रहात २००० पर्यंत सत्याग्रहींना अटक झाली व १६०० सत्याग्रहींना शिक्षा झाली. सत्याग्रहाचे नेते दादासाहेब गायकवाड बी. एस. मोरे, आर. जी. खंडाळे, खरात व सुरवसे यांना स्थानबद्ध केले होते.

महार वतनाचा प्रश्न अजूनही सुटला नव्हता. गुलामगिरीचे जीवन अजूनही अस्पृश्य जगत होता. कनिष्ठ वतनदाराचा प्रश्न सोडविण्यासाठी मुंबई राज्य कनिष्ठ गावकामगार असोशिएशन ही संस्था डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी ३१.८.५५ रोजी स्थापन केली. स्वतः डॉ. आंबेडकर अध्यक्ष होते भाऊराव गायकवाड उपाध्यक्ष, जी. टी. परमार, आर. डी. भंडारे, बी. सी. कांबळे व उपशम गुरुजी हे त्या संस्थेचे होते.

मुंबईच्या कौन्सिलमध्ये डॉ. आंबेडकर यांनी १९ मार्च २८ रोजी मांडले. त्यावर पहिले वाचन ३ ऑगस्ट १९२८ला झाले. डॉ. आंबेडकर फार कमी वेळा कौन्सिल किंवा कायदेमंडळात हजर राहत. परंतु महत्त्वाचा विषय असल्यास हमखास ते हजर राहत. ज्या दिवशी त्यांचे भाषण असे त्यादिवशी गॅलरी गच्च भरलेली असे, वतन बिलावर ते २॥ तास बोलत होते. निःस्तब्ध शांतता होती. वतनापोटी महारांचे जीवन कसे लाजिरवाणे, किळसवाणे, माणुसकीला काळिमा फासणारे होते. याचे हृदयद्रावक पण वास्तव असे विवेचन त्या भाषणांत होते. अनेकदा डॉ. आंबेडकर, महारांच्या हृदय हेलावणाऱ्या प्रसंगाचे वर्णन करताना सद्‌गदीत होत. क्षणभर थांबत आणि भाषण पुन्हा सुरू करीत. सुई पडली

तरी मोठा आवाज होई. एवढी धीरगंभीर शांतता सभागृहात होती.

वतन दुरूस्ती बिल बाबासाहेबांचा जिव्हाळ्याचा प्रश्न होता खेड्यात असणारा महार समाज वतनसाठी गुलामीचे जीवन जगत होता त्यांत सुधारणा व्हावी आणि मानाने खेड्यात जगायला मिळावे, म्हणून त्यांचा अट्टाहास होता. कौन्सिलमध्ये बिल मांडल्यावर पुन्हा डॉ. आंबेडकरांनी कायदेमंडळात १९३७ साली हे बिल मांडले. पुढे आमदार बी.सी. कांबळे यांनी विधानसभेत हेच बिल मांडले. परंतु कॉंग्रेसचे बहुमत असल्याने ते बिल तिनदा मांडूनही पास होऊ शकले नाही. पुढे १९५८ मध्ये प्रा. आर. डी. भंडारे यांची चवथ्यांदा कायदेमंडळात ते बिल सादर केले. यशवंतराव चव्हाणाच्या कारकिर्दीत ते पास झाले आणि महारांची गुलामगिरीतून सुटका झाली.

खेड्यातील समाजाकडे भाऊरांवाचे सतत लक्ष असे म्हणून प्रत्येक वेळी सत्याग्रहाच्या माध्यमातून लोकजागृती म्हणून सातत्याने पाठपुरावा केला. १९५३ साली मराठवाडा, १९५८ साली महाराष्ट्र आणि १९६४ राष्ट्रव्यापी आंदोलन भाऊरावांना करावे लागले.

बौद्धधम्म स्वीकार हा डॉ. आंबेडकराच्या जीवनातील महत्त्वाचा टप्पा होता. त्यापूर्वी भाऊरारांना ३-५-१९५२ रोजी पाठविलेल्या पत्रात बाबासाहेब म्हणतात;

बुद्ध जयंतीच्या दिवशी गरीब व गरजू अशा शेकडो महिलांना पातळे वाटण्याची माझी मनीषा आहे. घाऊक पद्धतीने एखाद्या मोठ्या व्यापाऱ्याकडून इतकी पातळे मिळू शकतील का, याची आपण चौकशी करावी व मला त्याप्रमाणे कळवावे.

संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन उभे राहिले डॉ. आंबेडकरांच्या शे.का.प.ने समितीत सामील व्हावे म्हणून समितीचे नेते एस.एस.जोशी, दत्ता देशमुख, भाई डांगे, खाडिलकर, महाजन व आचार्य अत्रे हे दिल्लीला ११ नोव्हेंबर १९५६ मध्ये गेले. अर्थात महाराष्ट्राचे नेते म्हणून भाऊरावांचा महत्त्वाचा सहभाग असल्याने ते प्रामुख्याने हजर होते सविस्तर चर्चा झाल्यावर डॉ. आंबेडकरांनी काही अटींवर सहकार्यास संमती दिली.

डॉ. आंबेडकरानी भाऊराव गायकवांडाना पहिले पत्र ११-४-१९२७ पाठविले तर शेवटचे पत्र २४-९-१९५६ला पाठविले. अनेक महत्त्वाच्या विषयावर शेकडो पत्रे बाबासाहेबांनी फक्त भाऊरांवानाच पाठविलेली आहेत.

शेवटच्या पत्रात धर्मांतराचा कार्यक्रम मुंबईला घ्यायचे ठरले होते. परंतु त्यात बदल करुन १४ ऑक्टोबर १९५६ला नागपूर येथे धर्मांतराचा कार्यक्रम निश्चित झाला, अशा आशयाचे होते. शिवाय 'बौद्धधम्म दीक्षा पाठ' या नावांच्या पुस्तकाचे हस्तलिखित भाऊराव गायकवाडाकडे दिले होते ते मुंबईला जाऊन उपश्याम गुरुजाना द्यावे व पुस्तक धर्मांतरापूर्वी प्रसिद्ध करावे. परंतु मुंबईहून काहीही कळले नाही म्हणून डॉ. आंबेडकर यांनी चिंता व्यक्त केली होती. परंतु मुंबईला मुकुंदराव आंबेडकराना ते हस्तलिखित व पत्र भाऊरावांनी पाठविले होते व काही सूचना केल्या होत्या. शेवटी ते पुस्तक रुपाने छापून काही प्रती डॉ. आंबेडकरांनी दिल्लीला तपासून व काही सूचना कराव्यात म्हणून पाठविले होते. परंतु धर्मांतराच्या कार्यक्रमात आंबेडकर एवढे व्यस्त होते की, ते पुस्तक तपासायला वेळच मिळाला नाही, त्या पुस्तकात डॉ. आंबेडकर यांनी **संघ सरणं गच्छामि** हे चरण गाळले होते.

धर्मातरांच्या कार्यक्रमांनतर ६ डिसेंबर १९५६ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे महापरिनिर्वाण झाले. ७ डिसेंबरला मुंबईत प्रचंड प्रेतयात्रा निघाली. त्यांच्या शवासमोर अनेकांनी श्रद्धांजली वाहिली. मुंबईला येऊन डॉ. आंबेडकर दीक्षा देणार होते परंतु त्याआधीच त्यांचे महापरिनिर्वाण झाले म्हणून भाऊराव गायकवाड यांनी प्रसंगावधान राखून भन्ते आनंद कौसल्यायन यांच्याकडून लाखो लोंकाना प्रत्यक्ष डॉ. आंबेडकर यांच्या शवाला साक्षी ठेवून धम्मदीक्षा दिली. शेवटी भाऊरांव म्हणाले, ''माझ्या जीवात जीव असेपर्यंत या समाजाला कुणाच्याही लवावळचणीला जाऊ देणार नाही. त्यांचे संपूर्ण संरक्षण करीन हे मी बाबांच्या शवाला साक्षी ठेवून बोलत आहे. भाऊराव जिवंत असेपर्यंत बाबासाहेबांवर असलेली निष्ठा क्षणभरही विचलित होऊ दिली नाही आणि शेवटपर्यंत समाजकार्य करीत राहीले.

डॉ. बाबासाहेबांची कुवत आपणा कुणामध्ये नाही म्हणून समाजाचे नेतृत्व सामुदायिकरीत्या करायचे असे ठरले. अहमदनगर येथे दि. १ जानेवारी १९५७ ला प्रिसिडियम (सर्वोच्च मध्यवर्ती मंडळ) स्थापन करण्यात आले. बॅ. राजाभाऊ खोब्रागडे, दादासाहेब गायकवाड, जी. टी. परमार, ए. रत्नम, आर. डी. भंडारे, के. बी. तळवटकर व बी. सी. कांबळे अशी ७ लोकांची कार्यकारिणी स्थापन करण्यात आली.

३ ऑक्टोबर ५७ला नागपूरला रिपब्लिकन पक्षाची स्थापना होऊन एन. शिवराज अध्यक्ष एच. डी. आवळे उपाध्यक्ष व बॅ. खोब्रागडे सरचिटणीस म्हणून घोषित केले. पक्षाची घटना तयार करण्यासाठी एन. शिवराज, एच. डी. आवळे, बी. डी. खोबरागडे, बी. सी. कांबळे, आर. डी. भंडारे, ए. जी. पवार, दा. ता. रुपवते यांची नियुक्ती केली. एकूण ३६ जणांची कार्यकारिणी जाहीर केली.

पक्ष संघटना व ऐक्य अबाधित ठेवण्याकरिता प्रोव्हिजन जनरल कौन्सिलची मुदत ३१ मार्च १९५९ पर्यंत वाढविण्यात आली. प्रिसिडियमची ही बैठक २७, २८ ऑक्टोबर १९५८ रोजी बुद्धभूषण प्रिंटिंग प्रेसच्या गच्चीवर झाली व हा निर्णय घेतला.

३ ऑक्टोबर ५८ पर्यंत घटना तयार नाही, सभासद मोहिम नाही, याचा अर्थ पक्ष बरखास्त हा मुद्दा खासदार बी. सी. कांबळे यांनी निर्माण करून १४.५.१९५९ला नागपूर येथे स्वतंत्र अधिवेशन भरवून दुरूस्त गट स्थापन केला. त्यांच्यासमवेत हरदास आवळे, दा. ता. रूपवते, ए. जी. पवार, एस. एस. कांबळे आदी लोक गेले. एन. शिवराज, दादासाहेब गायकवाड, बॅ. खोब्रागडे, भैयासाहेब आंबेडकर, आर. डी. भंडारे, यांना नादुरुस्त ठरविण्यात आले.

१९५८ला बॅ. खोब्रागडे राज्य सत्तेवर निवडून गेले. त्यातही दादासाहेब गायकवाड यांचा हात होता, अशी तक्रार हरदास आवळेंनी केली.

दा. ता. रूपवते १९६६ मध्ये पुन्हा दादासाहेबांना येऊन मिळाले.

१९७० मध्ये पुन: खोब्रागडे फुटले.

१९६४ मध्ये आर. डी. भंडारे यांनी वेगळा गट स्थापन केला व १५-८-६६ काँग्रेसमध्ये गेले. १-१०-६४ एन. शिवराज निधन पावले. नंतर दादासाहेब अध्यक्ष झाले.

१९६८ विधान परिषदेच्या उपसभापती पदासाठी गवईंची निवड झाल्याने दा. ता. रूपवते नाराज होऊन काँग्रेसमध्ये गेले.

काँग्रेसयुतीचा फायदा रा. सु. गवई आणि बॅ. खोब्रागडे यांनी दादासाहेबांना हाताशी धरून मिळविला. परंतु त्यामुळे फाटाफूटही भरपूर झाली. अनेक गट तयार झाले.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी सर्वांना समजून सांगण्याचा प्रयत्न केला, एकीकरणाचे प्रयोग केले. परंतु वैयक्तिक हेवेदावे विकोपाला गेले. प्रतिष्ठा आड आली आणि सगळे वेगवेगळ्या छावण्यात स्थानबद्ध झाले. आंबेडकर निष्ठा व समाजाच्या प्रश्नांची कळकळ ही श्रेष्ठ की व्यक्तिगत प्रतिष्ठा श्रेष्ठ हा प्रश्न शिल्लक राहतोच.

ही वाताहत दादासाहेबांनी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिली. पण समाजांची कामे झाली पाहिजेत याकरिता नाईलाज म्हणून १९६७ साली जिल्हा परिषद व ग्रामपंचायती निवडणुकीत काँग्रेसबरोबर रिपब्लिकन पक्षाला युती करावी लागली. यावेळी दादासाहेब म्हणाले होते, आजची काँग्रेस ही शेटजी भटजीची राहिली नाही. पुरोगाम्यांच्या आणि बहुजन समाजाच्या हाती आली आहे. विरोधी पक्षात राहून मोर्चे आणि निवेदन सादर करणे एवढेच काम राहते. परंतु राज्यकर्त्या पक्षाबरोबर राहिल्यास समाजाचे प्रश्न सुटतात अर्थात स्वत्व न सोडता पक्ष अबाधित ठेवून हे घडले पाहिजे. पुढे ते म्हणतात काँग्रेसने एखाद-दुसरा आमच्या पक्षाचा मंत्री केला तर तो निळी टोपी परिधान करून तिथे बसेन. पुढे ते विनोदाने म्हणतात 'गाजराची पुंगी वाजली तर वाजली नाहीतर चावून खाल्ली' यातच आंबेडकरी निष्ठा स्पष्ट होते.

संयुक्त महाराष्ट्र समितीशी युती केल्याने लोकसभेत बी. सी. कांबळे, दादासाहेब गायकवाड, बाळासाहेब साळुंके, डी. ए. कट्टी, एस. के. दिघे, के. एस. परमार आणि मद्रासमधून निवडून आलेले एन. शिवराज हेदेखील रिपब्लिकन गटात सामील झाले.

विधानसभेत आर. डी. भंडारे, डॉ. बंदिसोडे, पी. एच. बोरीचा, पी. टी. मधाळे, जे. जी. भातनकर, तानाजी गायकवाड, ए. जी. लोंढे, पंजाबराव शंभरकर, जे. एस. पाटणे, दादासाहेब शिर्के, एस. एल. कांबळे, पी. एम. चोरे, राम पवार, जी. बी. कांबळे, टी. आर. कंकाळ असे १५ आमदार मुंबईच्या कायदेमंडळात बसले.

मुंबईच्या महानगरपालिकेत एस. एस. गायकवाड, बी. बी. अशय्या, पी. टी. बोराळे, एस. डी. चिपळूणकर, एन. एम. कांबळे, आर. जी. खरात, सी. एच. खरे, व्ही. एस. पगारे, जी. टी. परमार व आर. बी. फाले असे १० जण निवडून गेले. त्यापैकी एप्रिल १९५९ला पहिले बौद्ध महापौर म्हणून डॉ. पी. टी. बोराळे यांना बहुमान मिळाला होता.

महाराष्ट्रात हे जे यश मिळाले, यांत संयुक्त महाराष्ट्र समितीचा निश्चित वाटा आहे पण दादासाहेबांची समाजावरील पकड आणि खेडोपाडी सतत संपर्क हाही भाग नजरेआड करण्यासारखा नाही.

वक्तृत्वाची देणगी त्यांना सुरूवातीपासूनच लागली होती जसा श्रोतृवर्ग तशी भाषा. खेड्यातील लोकांसमोर त्यांच्याच भाषेत बोलणारे एकमेव दादासाहेब होते. जाहीर सभा जशा त्यांनी गाजविल्या तसे मुंबईचे कायदेमंडळ, लोकसभा आणि राज्यसभा इथेही त्यांच्या वक्तृत्वाचा ठसा चिरकाल स्मरणात राहील असा उमटविला होता.

सं.म.समितीचे दुसरे अधिवेशन मुंबईच्या शिवाजीपार्कवर भरले होते तुडुंब गर्दी होती दादासाहेब अध्यक्ष, भाषण छापलेले परंतु अगोदरच भाई एस. ए. डांगे, आचार्य अत्रे,

एम. एस. जोशी इत्यादी दिग्गजांनी सभा जिंकली होती. एकही मुद्दा शिल्लक ठेवला नव्हता परंतु महाराष्ट्राचा मंगलकलश आणल्याबद्दल तोडं भरून यशवंतराव चव्हाणांची स्तुती करायला एकही वक्ता विसरला नव्हता.

शेवटी अध्यक्ष उभे राहिले, मुद्दा एकही शिल्लक नाही, छापलेले भाषण प्रत्येकाच्या हाती होते. पहिल्यांदा त्यांनी सांगितले, छापलेले भाषण बाजूला ठेवा, आणि भाषणाला सुरूवात केली. मी नाशिकचा खेडवळ माणूस. माझ्या शेजारी एक जोडपे राहत होते. ७-८ वर्षे लग्नाला झाली. मूलबाळ काही नाही. नवस अंगारे, धुपारे, जत्रा. खत्रा सगळ्या गेल्या, एकदाची बाई गरोदर राहिली. ९ महिने ९ दिवस भरल्यावर पोटात दुखायला लागले. नवऱ्याने दवाखान्यात नेले व तो बाहेर बसला. एकदोन तासांनी मुलाच्या रडण्याचा आवाज आला. तेव्हढ्यांत दवाखान्यातील दाई त्या बाळाला घेऊन वडिलांना दाखविण्याकरिता आली, हा मुलगा तुम्हाला झाला. कथा संपली. क्षणभर दादासाहेब स्तब्ध झाले, श्रोर्तृवर्ग चलबिचल झाला. कशाकरिता हा प्रसंग सांगितला हे त्यांच्या लक्षात येईना! त्यांची उत्कंठा शिगेला पोंचली. मग हळूच दादासाहेब म्हणतात, 'यशवंतराव चव्हाणाने फक्त दाईचे काम केले. यापलीकडे काहीही केले नाही. सं.म.समिती हा त्या मुलाचा बाप. १०५ बळी आमचे गेले. तुम्हाआम्हा सर्वांच्या प्रयत्नाने हा मंगल कलश आला. यशवतरावांनी दिल्लीहून फक्त आणण्याचे काम केले. हे ऐकल्यावर सतत ५ मिनिटे सभागृहात टाळ्या वाजत होत्या - श्रोर्तृवर्गाने अशी दाद दिली.

तेच यशवंतराव चव्हाण १४ नोव्हेंबर १९६२ साली संरक्षणमंत्री झाले. सहा महिन्यात निवडून येणे आवश्यक होते त्याचवेळी नाशिक काँग्रेसचे खासदार, गोविंद हरी देशपांडे यांच्या निधनाने ती जागा रिकामी झाली. माझी निवड बिनविरोध झाल्यास दिल्लीत माझी शान वाढेल असे यशवंतराव चव्हाण यांना वाटते. परंतु विरोधी उमेदवार म्हणून रिपब्लिकन पक्षाचे भाऊराव गायकवाड उभे राहतीलच म्हणून यशवंतरावांनी त्यांची भेट घेतली व विनंती केली. मला नाशिकमधून बिनविरोध निवडून द्या! भाऊरावांनी तात्काळ मान्यता दिली. यशवंतराव बिनविरोध निवडून गेले. यशवंतरावांनी पुन्हा त्यांची भेट घेऊन विचारले, "भाऊराव, तुम्हाला काय पाहिजे बोला?" तेव्हा भाऊराव म्हणाले, "कुणाकरीता मागू? जसे तुम्ही तसा मी." कारण भाऊराव आणि यशवंतराव दोघांनाही मूलबाळ नव्हते. तरी पण सामाजिक कार्याकरीता पैशाची सतत गरज तुम्हाला भासते. हा कोरा चेक सही करून देत आहे. आकडा फक्त तुम्ही टाका! दादासाहेब म्हणाले, 'मला तुम्ही ओळखले नाही. बाबासाहेब आंबेडकरांच्या तालमीत तयार झालेला हा पठ्ठ्या आहे. मी पैशांकरीता हा सौदा केला नाही तर 'मिग' कारखाना बंगलोरला होऊ घातला आहे, तो नाशिकला ओझर इथे येऊद्या. अनेक दलित कुटुंबांचा पोटापाण्याचा प्रश्न सुटेल. ही अट यशवंतरावांनी मान्य केली. आज हजारो कुटुंबे एच्. एल्. कारखान्यांत नोकरी करतात. वैभवात राहतात. ते केवळ दादासाहेब गायकवाड यांच्या प्रयत्नाने.

## <u>लोकसभेत दादासाहेब</u>

लोकसभेत ४ मार्च १९६० रोजी प्रकाशवीर शास्त्रींनी अस्पृश्यांना धार्मिक सरंक्षण

मिळावे म्हणून बिल आणले होते. दादासाहेब गायकवाड यांनी विरोध केला. ते म्हणाले इतर धर्मीयांना बंदी घालण्याचा तुम्हाला काय अधिकार? खिश्चन लोक बहुजन समाजाची उन्नती करण्याचा प्रयत्न करतात. कारण त्या धर्माची तत्त्वे उदात्त आहेत. हिंदूधर्मग्रथांने अस्पृश्याची गळचेपी केली, उन्नतीचे सर्व मार्ग रोखून धरले', परंतु इतर सभासदांनी अडथळे आणले, यांनी बाजू मांडूच नये असा जणू चंगच बांधला होता. सत्य आणि न्याय्य बाजू मांडण्यास विरोध करतात, म्हणून दादांचा स्वाभिमान जागृत झाला. बाबासाहेबांच्या फडात तयार झालेला गडी लोकसभेला थोडीच दाद देतो!

न्याय्य आणि रास्त बाजू पुराव्यानिशी मांडण्याकरिता हिंदूधर्माचा श्रेष्ठग्रंथ मनुस्मृतीच्या इंग्रजी, मराठी व संस्कृत अशा प्रतीत आणल्या होत्या. अस्पृश्यांनी हीन दर्जाचे जिणे जगावे असा मजकूर ज्या पानावर आहे, तो भाग सभागृहाला वाचून दाखविला. मनृस्मृती ही काही महारांनी लिहिली नाही. पुन्हा अडथळे आणि विरोध सुरू झाला. तेव्हा या क्रांतिपुरुषाने निर्भिडपणे सांगितले.

**बी. के. गायकवाड** - उतारे वाचून दाखविण्यास मला जर अडथळे आणले तर मी तुम्हाला सांगू इच्छितो की, या प्रति केवळ टेबलावर ठेवण्याकरीता आणलेल्या नाहीत. तर अस्पृश्यांच्या सबंधाने ज्या पानावर वाईट मजकूर आहे ती पाने असा रीतीने फाडण्याकरिता आणलेल्या आहेत (ती पाने टराटरा फाडली व तुकडे केले)

**उपसभापती** - अशा तऱ्हेचा विरोध करण्यास मी तुम्हाला देणार नाही.

**बी. के. गायकवाड** - अशा तऱ्हेने भावना दुखविणारे ग्रंथ आम्ही डोक्यावर घेऊन नाचावे असे आपणास वाटते काय? (गोंधळ)

**रघुनाथ सिंग** - माननीय सभासदाने हा साधारण गुन्हा केलेला आहे, त्यांना विनंती करण्यात येते की, वापरलेले शब्द परत घ्यावेत (गोंधळ)

**बी. के. गायकवाड** - एकही शब्द मी मागे घेणार नाही.

**प्रकाशवीर शास्त्री** - या मागील भावना लक्षात न घेता माझ्या एका मित्राने धार्मिक ग्रंथाची पाने फाडून अपमानकारक असे वातावरण सभागृहात निर्माण केलेले आहे. अशी माझी विनंती आहे की, भविष्यात असे प्रकार घडणार नाहीत, त्याकरीता काही नियम अथवा धोरण सभागृहाने निश्चित करावे, की जेणेकरून अशी घटना पुन्हा घडणार नाही.

**बी. के. गायकवाड** - माझी अशी विनंती आहे की, सरकारने असले प्रकार बंद करण्यापेक्षा अशा धार्मिक ग्रंथावरच बंदी घालावी.[११]

मागासलेल्या जातीजमातींच्या विद्यार्थ्यांची कशी ससेहोलपट होते, यावर प्रकाश टाकणारे दादासाहेबांचे भाषण निश्चितच उद्बोधक ठरेल. एवढेच नव्हे तर, लोकसभा आणि पुढे राज्यसभा यातील सर्व भाषणे अभ्यासपूर्ण असायची. अभ्यासाशिवाय भाषण द्यायचे नाही हा त्यांचा पूर्वीपासूनचा नियम होता.

''मागासलेल्या जातीजमातीकरीता नेमलेल्या कमिशनच्या नवव्या अहवालाच्या ६९, परिच्छेद क्र. दुसरा यांत सन १९५६-५८ मध्ये १,१४,०४,९०२ प्राथमिक आणि माध्यमिक शाळेत प्रवेश मिळाला. परंतु फक्त ८२, ६८० विद्यार्थ्यांनी कॉलेजमध्ये प्रवेश मिळविला याचा अर्थ असा की, ११३२२,२२२ विद्यार्थ्यांनी मध्येच शाळा सोडली,

त्यांनी शाळा का सोडली तर आर्थिक परिस्थिती नाजूक होती.''

पुढे निवेदन १ मध्ये किती विद्यार्थ्यांनी शिष्यवृत्तीसाठी अर्ज केले, मंजूर किती आणि प्रत्यक्षात किती जणांना मिळाली, प्रत्येक राज्याची आकडेवारी पाहता ३५२९ विद्यार्थ्यांना मंजूर झाली. परंतु त्यापैकी३५२९ जणांना देण्यात आली नाही. का दिली नाही? शिष्यवृत्ती मंजूर होऊनही ती का दिली जात नाही, याची चौकशी सरकारने केली पाहिजे.

विश्वविद्यालयीन शिक्षण पात्रतेनुसार मिळणार म्हणजे काय? याचा अर्थ दलित वर्ग, वन्यजाती आणि मागासलेल्या विद्यार्थी उच्चशिक्षणापासून वंचित राहिले आणि मग मनुस्मृतीमध्ये म्हटल्याप्रमाणे एकाच वर्गाला शिक्षणाचा अधिकार राहिला. आता नव्या मनुने अवतार घेतला आहे आणि तो हे षड्यंत्र निर्माण करीत आहे, मागासवर्गीयांना कमी गुण का मिळतात तर त्यांची राहाण्याची सोय नसते. अभ्यासाला जागा नसते, घरात दिवा बत्तीची सोय नसते म्हणून त्यांना कमी गुण मिळतात.

याबाबतीत नवीन कायदा झाला पाहिजे. पुढारलेल्या वर्गाचे त्यांना गुलाम व्हायचे नाही. त्यांना उच्च शिक्षण मिळालेच पाहिजे.

स्टेट ट्रेडिंग कॉर्पोरेशन मागासलेल्या जातीने तयार केलेले जोडे बाहेरच्या देशात पाठवितात. श्री गुप्ता हे मध्यस्थाचे काय करतात. ते बनीया आहेत; चांभार नाहीत मग त्यांच्याच वतीने माल का पाठविला जातो?

शालीमार म्हणून एक गाव आहे. तीन वर्षापासून स्पृश्यांनी त्यांना गावाबाहेर हाकलले आहे. पोलिसांना ही माहिती मी दिली. दिल्लीच्या पोलिस ऑफिसरला भेटलो. शिवाय कमिशनर श्रीकांत यांना घेऊन गावांत फिरलो. याबाबत फरक पडला पाहिजे.[३३]

अन्नधान्याच्या मागण्यावर लोकसभेत बोलताना दादासाहेब म्हणाले-१९६०-६१ सालची परिस्थिती १९५९-६० पेक्षा फारच बरी आहे सदर विधानावरून अन्नधान्याच्या बाबतीत देश स्वावलंबी झाला आहे. वास्तविक आजही भारत स्वावलंबी झालेला नाही.

अहवालाचा ७ व्या पानावर सरकारने अन्नधान्याच्या आयातीची वार्षिक आकडेवारी दिलेली आहे. ३,१७३,००० टन अन्नधान्य १९५८-५९ साली, ३८०७००० टन व १९६० साली ५,०५६००० टन अन्न आयात केले. यावरून दरवर्षी अधिकधिक अन्नधान्य परदेशातून आयात केलेले दिसते. अन्नधान्याच्या बाबतीत देश स्वावलंबी झाला तर आयात का केली जाते? कदाचित शेतकी मंत्री म्हणतील की, साठा करण्यासाठी धान्य आयात करावे लागते.

१९५५ ते १९६० या पाच वर्षात ६८.९ लक्ष टन अन्नधान्याचे आपल्या देशात उत्पादन झाले. गेल्या वर्षी ना. एस्. के, पाटील यांनी दिलेल्या माहितीप्रमाणे १० कोटी एकर जमीन पडीक आहे. मग ही जमीन लागवडीखाली का आणू नये? शेतमजूर अशा जमिनीची मागणी करूनही त्यांना दिली जात नाही.

देशामध्ये अन्नधान्य आणि बेकारी या दोन समस्या आहेत. पडीक जमिनी शेतमजुरांना दिल्यास बेकारी नष्ट होऊन अन्नधान्याचा प्रश्न सुटेल.

आज भारतामध्ये ५१००० फेअर शॉप्स आहेत. दोन हजार लोकसंख्या असलेली ५,५५,७५४ खेडी आहेत. ही शॉप्स शहरे, तालुके व मोठमोठी गावे येथेच आहेत.

खेड्यात नाहीत. वास्तविक पहिल्यांदा खेड्यात ही शॉप्स असायला हवीत. जमीनदार दुप्पट भावाने माल विकतात. खरे तर वाजवी भावाने खेड्यामध्ये दुकाने सुरू करायला हवीत.

जमीन नांगरण्याकरीता सरकारी ट्रॅक्टर्स मोठ्या शेतकऱ्यांना मिळतात, त्याकरिता लहान शेतकऱ्यांना सवलतीच्या दरात ट्रॅक्टर मिळाले पाहिजे.[३४]

दि. २५.२.६५ रोजी रेल्वे अंदाजपत्रकावर राज्यसभेत बोलताना दादासाहेब गायकवाड म्हणाले, 'लाखो लोक रेल्वेमध्ये रोजंदारीचे काम करतात. त्यांना महिन्याला ३५ ते ४० रु. मिळतात. चौथ्या वर्गाच्या कामगारांना जो भत्ता मिळतो त्यापेक्षाही कमी आहे. इतर कामगारांना मिळणाऱ्या सवलती देखील त्यांना मिळत नाहीत. घटनेच्या ४६व्या कलमात म्हटले आहे की, कोणत्याही प्रकारच्या आर्थिक पिळवणुकीला पायबंद घालणे हे सरकारचे कर्तव्य आहे. यांना दिवसाला ३ रु. ५० पैशापेक्षा कमी वेतन मिळू नये, अशी सूचना मी करतो.

एकवर्ष नोकरी केल्यावर त्यांना कायम करून इतरांना मिळणाऱ्या सर्व सवलती त्यांना द्याव्या. शिवाय रविवार व रजेच्या दिवशीचे वेतन मिळावे.

रेल्वेने प्रवास करणाऱ्यांची संख्या सतत वाढत आहे त्याकरिता एखादी डेली एक्स्प्रेस सुरू करून प्रत्येक स्टेशनावर थांबवावी. दिल्ली ते मुंबई जादा लोकल सोडावी.

शेड्युल कास्ट व शेड्युल ट्राइब्ज वर्गातील उमेदवारांना नोकऱ्या मिळत नाहीत, योग्य उमेदवार मिळत नाहीत, अशी सबब सांगून ती जागा स्पृश्यांना देतात हे बंद झाले पाहिजे. रोस्टर पाईन्सप्रमाणे ४० उमेदवार एक रोस्टर काढले होते. १,९,१७,२५,२३ शेड्युल कास्ट करता १,२,२१ या शेड्युल ट्राइब्जकरता राखीव आहेत सिनिऑरिटी कन्फर्मेशनसाठी या विचारात घ्याव्यात.[३५]

डॉ. बाबासाहेब आंबेडकर एखादा विचार मांडला की, तो अमलात आणायचा हे दादासाहेब गायकवाडांच्या बाबातीत ठरलेलेच असायचे. शिक्षण हा महत्त्वाचा विचार बाबासाहेबांनी मांडल्याबरोबर नाशिकमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर ज्ञान विकास केंद्र स्थापन केले. मनमाड येथे डॉ. आंबेडकर विद्यार्थी आश्रम हे वसतीगृह १९३३ला स्थापन केले. १७ नोव्हेंबर १९५१ भव्य आणि प्रशस्त इमारत बांधून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते उद्‌घाटन केले.

१९५८ मध्ये नाशिक हायस्कूल ग्राऊंडवर वसतीगृहला जागा मिळाली स्टेट + सेंट्रलकडून मदत मिळाली. २ लाखाची इमारत आहे. शांताबाई दाणी, गीताबाई गायकवाड सहभाग १६ मे १९४७ला नाशिक येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अध्यक्षतेखाली होती. बाबासाहेब म्हणाले, मागासलेल्या वर्गात प्रथम स्त्री शिक्षणाचा प्रसार व्हायला पाहिजे, म्हणून दादासाहेबांची ही कल्पना मूर्त स्वरूपात आणून मातोश्री रमाबाई आंबेडकर वसतीगृह हे सुरू केले.

१९४० मध्ये सरकारकडून दादासाहेब गायकवाड यांना १० एकर ९ गुंठे जागा मिळली होती. त्यापैकी ४ एकर ९ गुंठे गांधी नगर प्रेससाठी सरकारने घेतली. उरलेली ६ एकरात दादासाहेबांना डॉ. आंबेडकर सरकारी हौसिंग सोसायटी स्थापन केली. नाशिक पुणा हमरस्त्यावर ही जागा होती. तिथे 'आंबेडकर नगर' ही वसाहत स्थापन केली. तेथे मोठे सभागृह बांधले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर ज्ञान विकास केंद्र ही शैक्षणिक संस्था भाऊरावांनी १९५९ मध्ये स्थापन करून

१) तक्षशिला माध्यमिक विद्यालय देवळाली-नाशिक १४ जूनला स्थापन केले.

२) गौतम छात्रालय - देवळाली - नाशिक - १४ जूनला स्थापन केले.

३) रमाबाई आंबेडकर कन्या विद्यालय. नाशिक १४ जून १९६५ ला सुरू केले.

४) कुणाल बालमंदिर आणि प्राथमिक शाळा, जून १९८३ मध्ये सुरू झाले.

या शैक्षणिक संस्था स्थापन करण्यात व पुढे देखभाल करण्यात श्रीमती शांताबाई दाणी यांनी फार मोठे सहकार्य केलेले आहे. दादासाहेब १९५७ पासून १९७१ पर्यंत. खासदार म्हणून दिलेला असत. इकडे शांताबाई दाणी आणि गिताबाई गायकवाड यांचे मोलाचे सहकार्य झाले.

खासदार असताना मिळणारा सर्व पगार प्रत्येक महिन्याला दादासाहेब मनीऑर्डरने रमाबाई वसतीगृहाला न विसरता पाठवित असत.

२ मार्च १९३० ते १३ ऑक्टोबर १९३५ असा साडेपाच वर्षे नाशिक काळाराम प्रवेश सत्याग्रह दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली अखंडित चालला - अनेक महिला व पुरूष यांना ३ ते ४ महिनेपर्यंत शिक्षा झाल्या. दगडफेकीत अनेक जखमी झाले. अमृतराव रणखांबे यांची मोटार (car) तोडण्यात आली.

१९५३ मध्ये मराठवाड्यात पडीक जमिनी ताब्यात घेण्याकरिता सत्याग्रह झाला. बी. एस्. मोरे समवेत दादासाहेब गायकवाड प्रमुख होते. त्यांना ४ महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली. पहिल्यांदा औरंगाबाद जेलमध्ये ठेवले व नंतर पैठणच्या जेलमध्ये आणले. तीन हजार सत्याग्रहींना तुरूंगवास भोगावा लागला.

१९५८ मध्ये महाराष्ट्रभर पडीक जमीनी ताब्यात घेण्याकरिता २ महिने सत्याग्रह केला. ३५ हजार लोक तुरूंगात गेले. त्यांचे नेतृत्व देखील दादासाहेबांनी केले.

१९४६ साठी पुण्याला कायदेमंडळासमोर सत्याग्रह प्रचंड प्रमाणात झाला. जातीय निवाड्यामध्ये २४.११.१९३२ साली पुणे करार म. गांधी आणि डॉ. आंबेडकर यांच्यामध्ये झाला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना मनाच्या विरूद्ध या कराराला मान्यता द्यावी लागली. त्यावेळची परिस्थितीच त्याला कारणीभूत होती. स्वतंत्र मतदार संघ सोडून संयुक्त मतदार संघ पत्करावा लागला. फक्त अस्पृश्यांची मते ज्या उमेदवाराला पडतील तोच खरा अस्पृश्यांचा प्रतिनिधी ठरेल, अशी योजना स्वतंत्र मतदार संघात होती. परंतु स्पृश्य आणि अस्पृश्य यांच्या मतावर निवडून आलेला उमेदवार अस्पृश्यांचा प्रतिनिधी कसा होईल? १९४६ मध्ये ज्या निवडणूका झाल्या त्यावेळी सबंध देशात एकही शे. का. फे.चा उमेदार निवडून येऊ शकला नाही, ते केवळ संयुक्त मतदार संघामुळे. याचा निषेध करण्याकरिता १५ जुलै ते २७ जुलै १९४६ या दरम्यान पुण्याच्या कौन्सिल हॉलवर प्रचंड मोर्चा, सभा व शेवटी सत्याग्रह असा कार्यक्रम डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आखला. सत्याग्रहाचा १२ दिवसात ११५० सत्याग्रहींना अटक झाली. त्यात १२८ महिला होत्या. १५ दिवसापासून ३ महिन्यापर्यंत सत्याग्रहींना शिक्षा झाल्या. या सत्याग्रहाचे नेतृत्व अर्थात दादासाहेब गायकवाड यांच्याकडे होते. सोबत पा. ना. राजभोज, आर. आर. भोळे, आर. डी. भंडारे,

ब. ह. वराळे इत्यादि होते असे सत्याग्रह नागपूर आणि उत्तर प्रदेशातही झाले.

सार्वजनिक विहिरीवर अस्पृश्यांनी पाणी पिण्याचा हक्क बजावावा, याकरिता अनेक गांवी दादासाहेब गायकवाड यांनी सत्याग्रह केलेले आहेत. वैशिष्ठ्य असे की, प्रत्येक सत्याग्रह करण्यापूर्वी दादासाहेबांनी डॉ. आंबेडकर यांची परवानगी घेतलेली अनेक पत्रे उपलब्ध आहेत.

६ डिसेंबर १९५६ला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे महापरिनिर्वाण झाले. समाज हवालदिल झाला. डॉ. आंबेडकरांनी आपली शेवटची इच्छा अनेकाजवळ बोलून दाखविली होती की, शहरातील लोकांकरिता मी बरेच काही केलेले आहे परंतु खेड्यातील बांधवांकरिता वेळेअभावी काही करता आले नाही. त्यांच्या आर्थिक परिस्थितीमध्ये काही सुधारणा होणे आवश्यक आहे, ही खंत सतत मनाला सतवीत असे. त्याकरिता अनेकदा त्यांच्या डोळ्यातून अश्रू आलेले अनेकांनी पाहिले होते.

३ ऑक्टोबरचा मुद्दा निर्माण करून ॲड. बी. सी. कांबळे पक्षातून बाहेर पडले होते. आर. डी. भंडारे मार्गावर होते. राहिलेल्या नेत्यांमध्ये मोठेपणासाठी सतत तणाव निर्माण होत होते. तात्पर्य, पक्ष विकलंग अवस्थेकडे जाण्याच्या मर्गावर होता.

एवढी पक्षाची वाताहत होत असतानादेखील भारतीय रिपब्लिकन पक्षाच्या मध्यवर्ती कार्यकारिणीने राष्ट्रव्यापी सत्याग्रह डॉ. बाबासाहेब आंबेडकराच्या ८ व्या स्मृतीदिनानिमित्त ६ डिसेंबर १९६४ला सत्याग्रह सुरू केला.

मध्यंतरी पंतप्रधान लालबहादूर शास्त्री मुंबईला आले असताना दादासाहेब गायकवाड यांना ट्रंक कॉल करून बोलाविले होते. त्यावेळी देखील या मागण्यांचा आम्ही सहानुभूतीपूर्वक विचार करतो, असे आश्वासन देऊनही काही केले नाही.

१ ऑक्टोबर १९६४च्या प्रचंड मोर्चाचे नेतृत्व करण्यासाठी पक्षाचे अध्यक्ष रा. ब. एन्. शिवराज यांचे २९ सप्टेंबर ६४ ला पहाटे हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले. त्यांचा मृतदेह मद्रासला नेण्याचे काम दादासाहेब गायकवाड यांनी केले आणि पुन्हा मोर्चाकरिता दिल्लीला आले.

त्यावेळी सरकारला १० मागण्यांचे निवेदन सादर केले आणि या मागण्यांचा सहानुभूतीपूर्वक विचार झाला नाही तर ६ डिसेंबरला राष्ट्रव्यापी सत्याग्रह करावा लागेल तो अतिशय शांततेने आणि सनदशीर मार्गाचा असेल. याची सरकारने नोंद घ्यावी.

दरम्यान पक्षाचे अध्यक्ष एन्. शिवराज यांचे आकस्मिक निधन झाल्याने ३० सप्टें. १९६४ दिल्लीमध्ये कार्यकारिणीची बैठक झाली. स्वत: दादासाहेब गायकवाड यांनी अध्यक्ष म्हणून बॅ. खोब्रागडे व सरचिटणीस प्रा. बी. पी. मौर्य यांचे नांव सुचविले होते. परंतु सर्वांनी एकमताने दादासाहेब गायकवाड यांना पक्षाचे अध्यक्ष निवडले. सत्याग्रह बरोबर ६ डिसेंबरला सुरू झाला. एकूण दहा मागण्या होत्या.

१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे तैलचित्र पार्लमेंटच्या सेंट्रल हॉलमध्ये लावणे

२) कसेल त्याची जमीन असावी

३) भूमिहीनांना पडीक जमिनी उपलब्ध करून द्याव्यात

४) जीवनावश्यक वस्तूंचे भाव कमी करावेत

५) झोपड्यात राहणाऱ्यांना पक्की घरे दिल्याशिवाय झोपडे पाडू नये
६) किमान वेतन कायद्यात आजची महागाई लक्षात घेऊन सुधारणा करावी
७) ज्यानी बौद्ध धर्म स्वीकारला, त्यांना पूर्वीच्या सवलती चालू ठेवाव्यात
८) दलित समाजाची छळवणूक त्वरित थांबवावी
९) अस्पृश्यता निवारण कायद्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी व शेवटची
१०) शेड्युल्ड कास्ट व शेड्युल्ड ट्राइब्ज साठी घटनेने दिलेले सरकारी नोकरीतील राखीव प्रमाण पूर्ण करावे.

हा सत्याग्रह नवबौद्धांचा नव्हता तर रिपब्लिकन पक्षाचा होता. रिपब्लिकन पक्षात ख्रिश्चन, हिंदू, मुस्लिम व बौद्ध या सर्व थरातील होते. भूमिहीनांचा सत्याग्रह म्हणून तो प्रसिद्ध झाला. जो जो भूमीहीन आहे त्याला जमीन मिळाली पाहिजे हे मुख्य तत्त्व त्यात होते. म्हणून ब्राह्मणापासून साळी, कोळी, माळी, गाबीत, मराठे सर्व जातीचे भूमिहीन सामिल झाले होते.

जगामध्ये आणि भारत देशामध्ये एवढा प्रचंड सत्याग्रह झाल्याची नोंद कुठेही आढळत नाही. पडीक जमीन भूमीहीनाना मिळावी असा प्रयत्न या देशात कधीही झाला नव्हता. 'कसेल त्याची जमीन' हा मुद्दा स्वार्थी लोकांनी सतत जागृत ठेवला. १९४८ साली कूळकायदा आणून ब्राह्मणांच्या जमीनीचे काही ठराविक जाती मालक झाले. कारण या देशातील ब्राह्मणांनी कधीही जमीन कसली नाही. ते फक्त मालक राहिले. साम्यवाद हा गोरगरिबांच्या भल्याकरिता तयार झालेला. कामगार आणि दलित, नाडलेला, पिडलेला हे त्याच्या चळवळीचे प्रवेशद्वार. पण कामगार आणि संप या पलिकडे इथला साम्यवादी गेला नाही. इथे साम्यवाद का मूळ धरू शकला नाही तर डॉ. आंबेडकर म्हणायचे, इथली साम्यवादी चळवळ ब्राह्मणांच्या हाती गेल्याने ती इथे रूजू शकली नाही. म्हणून दादासाहेब गायकवाड यांच्या **'कसेल त्याची जमीन पण नसेल त्याला काय'** या घोषणेला विशेष अर्थ आहे. ह प्रश्न इथल्या पुरोगामी विचारवंतांनी उचलून धरला नाही.

या देशातील सर्वहारा असा समाज फक्त दलितांचा आहे. हा विचार करीत असताना डॉ. आंबेडकर यांच्या विचारांचा आणि चळवळीचा मोठेपणा सिद्ध होतो. दलितांनी माणूस म्हणून स्वाभिमानाने उभे रहावे आणि मानाचे जीवन जगावे असे कुणालाही वाटले नाही. ज्यांच्यावर हजारो वर्षे अन्याय झाला त्यांच्यावरील अन्यायाचे परिमार्जन करावे अशी सुबुद्धी या देशातील पुढारलेल्या वर्गाजवळ नसल्याने हे असे घडले. म्हणून या सत्याग्रहाला विशेष महत्त्व आहे.

संपूर्ण देशातून ३ लक्ष ४० हजार सत्याग्रहीना कारावास भोगावा लागला एकही प्रांत वा प्रदेश शिल्लक नव्हता की जेथे सत्याग्रह झाला नाही.

वर्तमानपत्र आणि सरकारी मंत्र्याकडून टीकाही झाली. परंतु अतिशय सनदशीर आणि शांततेच्या मार्गाने चाललेला हा सत्याग्रह, ६ डिसेंबर १९६४ला सुरू झाला आणि ६ फेब्रुवारीला मागे घेण्यात आला.

नाशिक धुळे जळगाव आणि यवतमाळ या चार जिल्ह्यात २ ते ४ लाख एकर जमीन पडीक आहे. एवढेच नव्हे, तर देशातील ९३ दशलक्ष जमीन शेतीच्या उपयोगी असून

पडीक आहे. भूमिहीनांना ही जमीन दिली तर शास्त्रीय पद्धतीने लागवडीखाली आणून अन्नधान्याचा प्रश्न सोडविता येईना.

शेवटचा रिपब्लिकन सत्याग्रही तुरुंगात जाईपर्यंत सत्याग्रह चालू राहील. अन्यायाविरुद्ध सुरू झालेला लढा थांबविणे अशक्य आहे, सत्याग्रहाचा दिवसेंदिवस वाढणारा जोर आणि त्याचे विशाल स्वरूप पाहिल्यावर सरकारलाही जाणीव झाली की, रिपब्लिकन जनतेने पुकारलेला सत्याग्रहाचा लढा त्यांच्या न्याय्य मागण्याचा योग्य विचार करून मान्य केल्याशिवाय संपणार नाही.

३०.१.१९६५ रोजी भारताचे पंतप्रधान मा. लालबहादूर शास्त्री यांच्या निमंत्रणावरून दादासाहेब गायकवाड, बॅ. राजभाऊ खोबरागडे, बी. पी. मौर्य, आर. एस. गवई, डी. ए. कट्टी. आरमुगम, अशोक निळे, भैय्यासाहेब आंबेडकर, एन्. एम्. कांबळे व सुमंत गायकवाड हे उपस्थित होते. सरकारच्या बाजूने पंतप्रधान लालबहादूर शास्त्री गृहमंत्री गुलझारीलाल नंदा व संरक्षणमंत्री यशवंतराव चव्हाण उपस्थित होते.

४ फेब्रुवारी १९६५ रोजी अमरावती येथे रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडियाच्या मध्यवर्ती कार्यकारिणीने सत्याग्रह मागे घेतल्याचा ठराव केला. सत्याग्रहात तेरा वीर निरनिराळ्या तुरुंगात मृत्यू पावले. त्यांना श्रद्धांजली वाहिली. या आंदोलनात कम्युनिस्ट पक्ष, जनसंघ, सं. सो. पार्टी, शे.का.प. हिंदूमहासभा या पक्षांनी व कॉ. डांगे, कॉ. गोपालन, राममनोहर लोहिया, जॉर्ज फर्नांडिस यांनी नैतिक व सक्रीय पाठिंबा दिल्याबद्दल कार्यकारिणी आभार मानते.

१ सप्टेंबर १९६७ रोजी खासदारांचे एक शिष्टमंडळ भारत-नेपाळ मैत्री वृद्धिंगत करण्यासाठी नेपाळला गेले होते. त्यांत दादासाहेबांचा समावेश होता. तिथे बुद्ध विहार व म्युझियमला भेट दिली. तिथे पोखरा या गांवी गेले तिथे भारत सरकारच्या सहकार्याने चाललेल्या कामाची पाहणी केली पुन्हा खाटमांडूला आले. एकूण वातावरण प्रगतीचे व उत्साहवर्धक वाटले.

भूमिहीनांच्या सत्याग्रहामध्ये सेंट्रल हॉलमध्ये डॉ. आंबेडकरांचा फोटो लावण्यात यावा अशी मागणी होती, ती अद्याप पुरी झाली नव्हती. दादासाहेबांनी यशवंतराव चव्हाण यांच्याकडे हा विषय काढला आणि लोकसभेच्या प्रागणांत डॉ. आंबेडकराच्या पुतळ्याला जागा उपलब्ध झाली तर प्रयत्न करावा. पुतळ्याचा खर्च करण्यास मी करण्यास तयार आहे. त्याप्रमाणे यशवंतराव चव्हाण यांनी प्रयत्न करून जागा मिळविली. डॉ. आंबेडकर मेमोरियल कमिटी स्थापन करण्यात आली. गोव्याचे त्यावेळचे मुख्यमंत्री दयानंदजी बांदोडकर यांनी २५ हजाराची देणगी दिली बाकीचा पैसा उभा करून २ एप्रिल ६७ ला पुतळ्याच्या उद्घाटनचा कार्यक्रम राष्ट्रपती राधाकृष्णन यांच्या हस्ते झाला. अशा रीतीने डॉं. बाबासाहेब आंबेडकर यांचे कायम स्वरूपाचे स्मारक उभारण्याचे श्रेय दादासाहेबांनी पटकाविले.

दादासाहेब गायकवाड यांचे सामाजिक शैक्षणिक आणि राजकीय कार्य बघून भारत सरकारने 'पद्मश्री' हा बहुमानाचा किताब राष्ट्रपती डॉ. झाकिर हुसेन यांचे हस्ते १६ एप्रिल १९६८ रोजी दिला.

भारतातील अस्पृश्यांची शैक्षणिक, सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीची पहाणी करण्याकरिता

२७ एप्रिल १९६५ रोजी एल्. इलाया पेरूमल यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती भारत सरकारने स्थापन केली. उपाध्यक्ष म्हणून दादासाहेब गायकवाड यांना घेतले. या समितीने भारतातील प्रत्येक प्रांतात दौरे काढून अस्पृश्यांच्या परिस्थितीचा अभ्यास केला. आजही किती भयानक आणि माणुसकीला काळीमा फासणारे अत्याचार दलितावर होतात, याचे विदारक चित्र त्यात पहावयास मिळते, त्यांची शैक्षणिक प्रगती कशी रोखली जाते हे ही दाखविण्यात आले आहे. रिपोर्ट तयार करण्यास अपार कष्ट दादासाहेबांनी केले. स्वत: पेरुमल बरेच दिवस आजारी असल्याने सर्व जबाबदारी दादासाहेबांवर येऊन पडली. तो रिपोर्ट ३० जानेवारी १९६९ला पूर्ण झाला. Report of the committee on untouchability, economic and educational Development of the scheduled castes and connected Documents १९६९ या नांवाने केंद्र सरकारने तो प्रसिद्ध केला आहे. समाजशास्त्राच्या विद्यार्थ्यांना या रिपोर्टाची फार मदत होते.

आयुष्यभर भाऊराव गायकवाड यांनी डॉ. बाबसाहेब आंबेडकर यांना प्रमाणिकपणे साथ दिली. कुठलेही काम सांगितले तर दादासाहेबांनी करायचेच हे ठरलेले होते. एवढे पदवीधर कार्यकर्ते चळवळीत असून देखील महत्त्वाच्या प्रसंगी दादासाहेबावर ती कामगिरी सोपविल्याचे आपणास जाणवते. १९२७ ते १९५६ या कालावधीत अंदाजे ४५० पत्रे डॉ. आंबेडकर यांनी भाऊरावांना पाठविल्याचे दिसते. कुणाच्याही वाटेला एवढा मोठेपणा आल्याचे दिसत नाही. एकदा दिल्लीला बाबासाहेबांना भेटण्याकरिता भाऊराव गेले. माईसाहेबांनी त्यांना अटकाव केला. प्रकृती बरी नसल्याचे कारण सांगितले. दादासाहेबांना ते सहन झाले नाही आम्ही भेटतो ते बाबांची प्रकृती बिघडविण्याकरिता नाही, त्यांच्या प्रकृतीला आराम पडावा म्हणून आम्ही प्रयत्न करतो आणि ही माईसाहेबांना आम्हाला अटकाव करते. दादासाहेब गरम झाले आणि माईसाहेबांना म्हणाले, 'आयुष्यभर आम्ही तळहाताच्या फोडाप्रमाणे बाबासाहेबांना जपले आहे. प्रसंगी जीव धोक्यात घालून त्यांना वाचविण्याचा प्रयत्न केलेला आहे तुम्ही कानामागून आल्या आणि तिखट झालात. स्वत:ला समजता काय? असे परखड उद्‌गार दादासाहेबांनी मोठ्या आवाजात काढले. तेवढ्यात बाबासाहेबांनी आतून विचारले, 'कोण आहे?' तेव्हा भाऊराव म्हणाले, 'मी आलो बाबासाहेब. परंतु माईसाहेब आपणास भेटू देत नाही.' तेव्हा आत गेले आणि बोलू लागले.

अनेक पत्रावरून त्या दोघामधील जिव्हाळा, प्रेम आत्मीयता आपल्या लक्षात येते. भाऊरावांना विरोधही भरपूर होते कारण एकच. धोतर, कोट, टोपी घालणारा बाबांच्या जवळ कसा असतो? प्रत्येक वेळी विचार विनिमय करताना दादासाहेबांना का बोलवितात, ही असूया त्यांच्या मनामध्ये होतीच. एकदा अशीच उच्च पदव्या धारण करणाऱ्यांनी भाऊरावांच्या संबंधी तक्रार बाबासाहेबाकडे केली. त्यावेळी त्यांनी उत्तर दिले, "सूटबूट घालून सभेत भाषणे केली म्हणजे नेता होत नाही, भाऊरावाचे कार्य मी पाहिले आहे, त्यांनी खेड्यातही समाजजागृती केली, उपाशीपोटी उन्हातान्हात फिरणारा भाऊराव मी पाहिला आहे, सत्याग्रहात बेदम मार खाल्लेला भाऊराव मी पाहिला आहे, क्रांतीकारक भाऊराव माझ्या नजरेसमोर आहे, खेड्यातील हजारो बांधवापुढे त्यांच्याच भाषेत बोलणारा भाऊराव मला स्मरतो आहे, विधानसभेत अभ्यासपूर्ण बोलणारा भाऊराव मला स्मरतो आहे. जेवण्याची

पर्वा न करता, गूळ आणि शेंगदाणे खाऊन रात्रंदिवस कार्य करणाऱ्या भाऊरावांचा विसर मला कसा पडेल? भाऊरावांनी जीवाचे रान करून प्रत्यक्ष प्राण धोक्यात घालून, डॉ. आंबेडकर हेच अस्पृश्यांचे एकमेव नेते आहेत; हे मला लंडनच्या गोलमेज परिषदेत सिद्ध करण्यास त्यांचे अथक प्रयत्न कारणीभूत ठरले आहेत. इतकेच नव्हे, तर माझ्या या यशाचा शिल्पकार भाऊराव आहे या ऐतिहासिक घटनेचे मला विस्मरण कसे होईल? मी रत्नपारखी आहे. रत्नाची पारख मला चांगली करता येते. माझ्या चळवळीतील ते रत्न आहे अशा तऱ्हेची विरोधकांची कानउघडणी केल्यावर ते निमूटपणे बाहेर पडले.

भाऊरावांनी नाशिकचा काळराम प्रवेश सत्याग्रह आणि भूमिहिनांचा सत्याग्रह या दोनच गोष्टी केल्या असल्या तरी ते मोठे झाले असते.

भाऊरावांच्या नाशिक जिल्ह्याने तीन ऐतिहासिक चळवळी दिल्या १) नाशिक सत्याग्रह २) मुखेड सत्याग्रह आणि ३) धर्मांतराची येवला परिषद. या तीन प्रसंगांनी जागतिक विचारवंताचे लक्ष वेधले गेले, सातासमुद्रापलिकडे या चळवळी प्रसिद्ध झाल्या. भाऊरावच त्याचे सेनानी होते. त्यांची कल्पकता फार मोठी झेप घेत असे. असा सेनानी या समाजाला लाभला हे या चळवलीचे यश ठरते.

१९८२चा डिसेंबर महिना. शुक्रवार ता. २४ या दिवशी बाबासाहेबांचे निकटचे सहकारी मिलिंद महाविद्यालयाचे प्राचार्य आणि एक अभ्यासू व्यक्ति म्हणून, पुण्याचे विमलकीर्ती यांनी त्यांची मुलाखत घेतली. त्यावेळी प्रा. म. भि. चिटणीस म्हणाले, 'बाबासाहेब बुद्धाच चरित्र लिहित होते. आमची चर्चा ४६-४७ मध्ये मरीन लाइन्सला जे सिद्धार्थ कॉलेज होतं, तिथं रिठ्याचं एक झाड होतं; तिथे बाबासाहेब बसत. त्यावेळी बाबासाहेब म्हणाले, ''अश्वघोषाने जे बुद्ध चरित्र लिहिले आहे, तो भाग आपण घेऊ. त्यात २९व्या वर्षी बुद्धाने जरा, मरण, व्याधी पाहिल्या, म्हणून त्याने गृहत्याग केला असा विचार होता. तेव्हा भाऊरावांनी म्हटलं, हे कसं काय बुवा घ्यायचं की, २९ वर्षे ज्याने दु:खही पाहिले नाही. हे शक्य तरी आहे काय?'' हा आक्षेप घेतला भाऊराव गायकवाड यांनी. हे ऐकल्यावर बाबासाहेबांचे विचार बदलत गेले.[१६]

भाऊराव धोतर, कोट, टोपी घालणारे असले तरी डॉ. आंबेडकर यांच्या सतत संगतीत ३० वर्षे घालविली होती, शिवाय विविध विषयावर वाचन होते त्यांच्या खाजगी ग्रंथ संग्रहात अनेक विद्वानांचे ग्रंथ होते. बाबांच्या १९३७ साली आलेल्या पहिल्या पत्रापासून सर्व पत्र त्यांनी संग्रहीत केलेली आहेत. शिवाय बाबासाहेबांचे प्रसिद्ध झालेले पुस्तक, भाषण, कैफियत यांच्या प्रती भाऊरावांना भेट म्हणून पाठवायच्या. यावरून भाऊरावांच्या बौद्धिक उंचीची त्यांना कल्पना होती. त्यांच्या संग्रहात बाबासाहेबांनी लिहिलेली अनेक पुस्तके आढळतात 'डिअर भाऊराव' हा बाबांचा त्याच्यासंबंधीचा आवडता शब्द त्या पुस्तकात दिसतो.

त्यांच्या निवासस्थानी गेलेला अतिथी उपासपोटी गेलेला कधी पाहिला नाही, आदरातिथ्य हा त्यांच्या पत्नी सीताबाई आणि गीताबाई यांचा स्थायीभाव होता.

दलितांचा फार मोठा आधार नाहीसा झाला. हे शल्य दलित समाज कधीही विसरणार नाही.

आयुष्यभर कष्ट करणाऱ्या दादासाहेबांचे शरीर खिळखिळे झालेले होते. आयुष्यभर विश्रांती कधी मिळालीच नाही. त्यातच १९६९ साली अर्धांगवायूचा झटका आला आणि ते विकलांग झाले. नाशिकराव तिरपुडे, पुण्याचे माजी महापौर भाऊसाहेब चव्हाण, डॉ. शांताबाई दाणी, रा. सु. गवई, गीताबाई गायकवाड, रूपाताई साळवे यांनी त्यांच्यासाठी अपार कष्ट उपसले. फार सेवा केली. या परिस्थितातही लोक त्यांना शांत बसू देत नसत. सतत तक्रारी घेऊन येत. नाशिक येथे श्रीमती इंदिरा गांधी पंतप्रधान आल्या असताना, त्यांना भेटण्यासाठी आणि लोकांचे प्रश्न सोडविण्यासाठी दादासाहेब सभास्थानी व्हिलचेअरवरून गेले. श्रीमती इंदिरा गांधी या खाली उतरल्या आणि जवळ येऊन म्हणाल्या, "गायकवाडजी, आपने यहाँतक आने का कष्ट क्यूं उठाया? मैं आपके घर आती थी।" तेव्हा दादासाहेब अतिशय लीननेने म्हणाले, "काम आपका नही, मेरा था। इसलिये मैने यहाँतक आनेका कष्ट उठाया।"

काही दिवसांनी दिल्लीच्या विलिंग्टन हॉस्पिटलध्ये दादासाहेबांना उपचार करण्याकरिता ठेवले. शेवटी २९ डिसेंबर १९७१ ला त्यांची जीवनज्योत मालविली. त्यांचे शव नाशिकला आणले आणि ३१ डिसेंबर १९७१ रोजी गंगाघाटावर त्यांच्या शवाला अग्नि देण्यात आला.

समाजाकरिता अविरत परिश्रम आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरावरील निष्ठा नि:स्वार्थपणे कसलीही प्रतिष्ठा वा अभिलाषा न बाळगता त्यांनी जोपासली.

## संदर्भ


१. मराठ्यांच्या संबंधाने चार उद्‌गार - ले. राजाराम शास्त्री भागवत, पृ. १७७
२. जनता - २३ मार्च १९३१
३. विलायतेहून डॉ. आंबेडकराची पत्रे - संपा. रत्नाकर गणवीर, दुसरी आवृत्ती १९८४, पृ. १२
४. जनता - १४ सप्टेंबर १९३१
५. जनता - २८ सप्टे. १९३१
६. जनता - २२ ऑक्टो. १९३१
७. विलायतेहून डॉ. आंबेडकरांची पत्रे - संपा. रत्नाकर गणवीर, दुसरी आवृत्ती १९८४, पृ. ५०
८. जनता - १९ डिसें. १९३१
९. जनता - २ एप्रिल १९३२
१०. जनता - १६ जाने. १९३२
११. जनता - ९ एप्रिल १९३२
१२. जनता - २३ एप्रिल १९३२
१३. जनता - ३० एप्रिल १९३२
१४. जनता - ११ जून १९३२
१५. जनता - १९ नोव्हेंबर १९३२
१६. संपूर्ण स्मृतीचित्रे भाग १,२,३,४ - ले. लक्ष्मीबाई टिळक, देवदत्त टिळक संपा. अ. दे. टिळक, पृ. ६३२,
१७. धर्मांतराची भीमगर्जना - प्रा. अरुण कांबळे, पृ. १८,१९
१८. टाईम्स ऑफ इंडिया - १७ फेब्रुवारी १९३१
१९. डॉ. आंबेडकर चरित्र - चां. भ. खैरमोडे, खं. २रा. पृ. ९ प्रस्तावना.

२०. जनता - २७ नोव्हेंबर १९३७
२१. महार मांग वेठिया परिषद - दादासाहेबांचे स्वागताध्यक्षीय भाषण, १९३९
२२. जनता २३ डिसें. १९३९
२३. Bombay Legislative Assembly Debates vol. II 1938 page 509-511
२४. Bombay Legislative Assembly Debates vol. 7 1939 page 67-68
२५. Bombay Legislative Assembly Debates vol. 7 1938 page 192-193
२६. Bombay Legislative Assembly Debates vol. 7 1938 page 1325-31
२७. Bombay Legislative Assembly Debates vol. 7 1938 page 1394-1401
२८. Bombay Legislative Assembly Debates vol. 6 1939 page 551-554
२९. Bombay Legislative Assembly Debates vol. 5 , Part I,1939 page 530-534
३०. Bombay Legislative Assembly Debates vol. 5, Part I, 1938 page 4083-4086
३१. डॉ. आंबेडकरांचे पत्र १९ मार्च १९४९ - रमेश शिंदे, खाजगी संग्रह
३२. Lok Sabha Debates - Vol. XXXIX, No. 20, Date 4.3.60
३३. प्रबुद्ध भारत - ९.९.१९३१
३४. प्रबुद्ध भारत - २०.५.१९३१
३५. प्रबुद्ध भारत - २०.३.१९६५
३६. बाबांचे स्मरण - संपा. धम्मचारी विमलकीर्ती १९८३, पृ. २०

## याव्यतिरिक्त खालील पुस्तके

१. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची पत्रे - शंकरराव खरात १९६१
२. पद्मश्री दादासाहेब गायकवाड चरित्र - सौ. भावना भार्गवे १९६८
३. दादासाहेब गायकवाड - जीवन व कार्य - ॲड्. हरिभाऊ पगारे १९८७

# दादासाहेब गायकवाड आणि संतती नियमन

डॉ. मा. प. मंगुडकर

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे विचाराने खऱ्या अर्थाने पूर्णपणे आधुनिक होते. त्यांच्या संस्कारक्षम वयात त्यांच्यावरील सर्व संस्कार इंग्लंड-अमेरिकेत लोकशाही, मानवी समता, स्वातंत्र्य आणि विज्ञाननिष्ठा अशा मूल्यांचे झालेले होते. त्यांचे सर्व शिक्षण देखील अमेरिकेतील कोलंबिया विद्यापीठातून व इंग्लंडमधील 'लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स' पॉलिटिकल सायन्स अशा जागतिक कीर्तीच्या विद्यापीठातून झालेले होते. त्यांनी कोलंबिया विद्यापीठातून १९१७ साली पीएच्.डी. ही पदवी मिळविली होती. याशिवाय, लंडन विद्यापीठाची डी.लिट. ही सर्वोच्च पदवी मिळविली होती. इंग्लंड-अमेरिकेसारख्या अत्यंत सुधारलेल्या राष्ट्रात त्यांचे सर्व संस्कारक्षम वय गेल्याने त्यांच्यावर आधुनिक विचाराचे संकार खोलवर होते. जन्मभर आधुनिक मूल्ये त्यांनी निष्ठेने जोपासली आणि भारतीय संविधानामध्ये ही मूल्ये लागू करण्याचा प्रयत्न केला.

त्यांच्या या आधुनिक दृष्टीकोनाचा प्रत्यय त्यांच्या अनेक भाषणांतून व विचारांतून येतो. १९३७ साली मुंबई प्रांतात झालेल्या प्रांतिक निवडणूकीत त्यांनी आपल्या स्वतंत्र मजूर पक्षातून निवडणुका लढविल्या आणि या निवडणुकीत त्यांना १७ पैकी १४ जागा मिळाल्या होत्या. त्या काळातील त्यांचे हे यश घवघवीत होते, यात शंकाच नाही. १९३२ साली झालेल्या पुणे कराराच्या वेळी संयुक्त मतदारसंघ मिळाले तर, दलित समाजावर अन्याय होईल, अशी भीती व्यक्त करण्यात येत होती. पण, ही भीती १९३० साली झालेल्या निवडणुकीत निराधार ठरली व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या पक्षाला मोठे यश मिळाले. मुंबई विधानसभेतील त्यांच्या या स्वतंत्र मजूर पक्षाचे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर हेच नेते होते आणि श्री. आर. आर. भोळे हे उपनेते होते. ह्या मुंबई असेंब्लीचा कालखंड १९३७ ते १९३९ असा अल्पजीवी ठरला. या काळात, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्वतंत्र मजूर पक्षाने मुंबई विधानसभेत महत्त्वाची कार्ये केली. याच काळात त्यांचा उजवा हात म्हणून ओळखले जाणारे दादासाहेब गायकवाड यांचे मुंबई विधानसभेतील कार्यदेखील अत्यंत महत्त्वाचे ठरलेले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १० नोव्हेंबर १९३८ रोजी मुंबई विधानसभेतून संतती नियमनाबद्दलचा बिनसरकारी ठराव मांडला होता. त्यावेळी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी या प्रश्नावरील आपले संपूर्ण भाषण लिहून काढले होते, असे दिसते. परंतु, आयत्यावेळी

त्यांना दुसरीकडे अत्यंत तातडीचे व महत्त्वाचे काम निघाल्याने त्यांना तिकडे जावे लागले, आणि ते हा ठराव सभागृहात मांडू शकले नाहीत. त्यावेळी, हा ठराव मांडण्याची जबाबदारी श्री. पी. जे. ऊर्फ दादासाहेब रोहम यांच्याकडे सोपविण्यात आली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे संपूर्ण भाषण त्यांनी सभागृहात जसेच्या तसे व्यवस्थित म्हणून दाखविले. हे भाषण जरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे असले तरी ते सभागृहात श्री. दादासाहेब रोहम यांनी मांडल्याने सभागृहाच्या वृत्तान्तात श्री. दादासाहेब रोहम यांच्या नावावरच गेलेले आहे. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या या भाषणाकडे कोणाचेही लक्ष गेले नाही. ते अनेक वर्षे उपेक्षित राहिले. मी आमदार असताना वेळ मिळाला म्हणजे विधानभवनाच्या ग्रंथालयात जाऊन बसत असे. त्यावेळी, मला संतती नियमावरील उत्कृष्ट दर्जाचे भाषण वाचावयास मिळाले. हे संपूर्ण भाषण वैचारिकदृष्ट्या उच्च दर्जाचे होते व त्यात अनेक मूलगामी विचार प्रभावीपणे मांडलेले होते. त्यामुळे मला श्री. रोहम यांच्या नावासंबंधी कुतूहल निर्माण झाले व हे कोण आहेत म्हणून मी त्यावेळच्या विधान परिषदेतील आमच्या भगिनी शांताबाई दाणी यांच्याकडे चौकशी केली आणि मी म्हणालो की, ''मला त्यांना त्यांच्या गावी जाऊन भेटावयाचे आहे व सविस्तर चौकशी करावयाची आहे.'' त्यावेळी त्या म्हणाल्या की, ''तुम्ही त्यांच्या गावाला कशाला जाता? मीच त्यांना आमदार निवासात बोलवते.'' त्याचप्रमाणे त्यांनी लवकरच त्यांना बोलावून घेतले.

त्यावेळी श्री. दादासाहेब रोहम यांना मी विचारले की, संतती नियमांवरील आपले भाषण उत्कृष्ट दर्जाचे आहे. परंतु, आपली इतर भाषणे उच्च दर्जाची नाहीत. आपले हे एकच भाषण उंच शिखराप्रमाणे इतके चांगले कसे झालेले आहे? त्यावेळी त्यांनी मला प्रांजलपणे सांगितले की, हे संपूर्ण भाषण डॉ. बाबासाहेब यांनी लिहून काढले होते, ते मी सभागृहासमोर वाचून दाखविले. श्री. दादासाहेब रोहम यांच्या शब्दात सांगायचे झाले तर ते म्हणाले की, ''डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी माझ्या पक्षाच्या वतीने बिनसरकारी ठराव मांडण्यास मला सांगितले हा मी माझ्या आयुष्यातील मोठा भाग्याचा क्षण मानतो. माझ्या तोंडून हे विचार वदविणारे माझे ज्ञानेश्वर म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकर होत.''

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १९३६ साली आपल्या स्वतंत्र मजूर पक्षाचा निवडणूक जाहीरनामा प्रसिद्ध केला होता. त्यातदेखील त्यांनी संतती नियमनाचा उल्लेख केला होता. याशिवाय, १२ डिसेंबर १९३८ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी याच प्रश्नावर दिलेल्या भाषणाचा वृत्तान्त 'जनता' या त्यांच्या साप्ताहिकातून प्रसिद्ध झाला होता. याशिवाय, १७ डिसेंबर १९३८ रोजी त्यांनी मुंबई येथे भरलेल्या 'अस्पृश्य विद्यार्थी परिषदेत' केलेल्या अध्यक्षीय भाषणामध्ये या प्रश्नाचा उल्लेख केलेला आहे. त्यावरून त्यांनी संतती नियमनाचा आग्रहाने पुरस्कार केला आहे. या प्रश्नावरील त्यांचे सर्व विचार अत्यंत मूलगामी स्वरूपाचे होते. १९३८ सालीच मुंबई प्रांताने व भारताने जर संतती नियमनाच्या मार्गाने जाण्याचा निर्णय घेतला असता, तर आजच्या भारतासमोरील आजचे अनेक प्रश्न निर्माण झाले नसते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा दृष्टिकोण त्यांच्या अशा विचारातून दिसून येतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी संतती नियमनाचा वरील ठराव मांडलेला होता. त्याला श्री. जमनालाल मेहता यांनी एक दुरुस्ती सुचविली होती. ही उपसूचना नंतर दादासाहेब गायकवाड

यांनी स्वीकारली होती. ती दुरुस्ती अशी की, 'संतती नियमनाची केंद्रे मुंबई, अहमदाबाद, पुणे, बेळगाव अशा शहरात सुरू करावीत.'

या ठिकाणी एक गोष्ट स्पष्ट करू इच्छितो की, १९५२ पर्यंत आपल्या देशात 'संतती नियमन' असा शब्द सर्वत्र प्रचलित होता. नंतर, या शब्दाच्या ऐवजी 'कुटुंब नियोजन' असा शब्द आपण वापरू लागलो. परंतु, १९७७ साली त्यावेळच्या जनता पक्षाने इंदिरा गांधी यांच्या सर्वच गोष्टींना विरोध करण्यासाठी त्यांनी 'कुटुंब नियोजन' हा शब्द बदलून 'कुटुंब कल्याण नियोजन' हा शब्द वापरायला सुरूवात केली. परंतु, १९३८ साली 'संतती नियमन' हा शब्द देशभर वापरला जात असल्यामुळे तो शब्द मुंबई विधानसभेत चर्चेच्या वेळी वापरण्यात आला होता.

या मूळ ठरावावर काँग्रेसच्या बाजूने त्यावेळचे महसूलमंत्री श्री. मोरारजी देसाई आणि आरोग्यमंत्री डॉ. गिल्डर यांनी काँग्रेसची भूमिका मांडली, तर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्वतंत्र मजूर पक्षाची भूमिका भाऊराव ऊर्फ दादासाहेब गायकवाड यांनी व नंतरच्या काळातील मुंबई उच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती श्री. आर. आर. भोळे यांनी मांडली. याशिवाय, मुस्लिम लीगची भूमिका काही सभासदांनीच मांडली. ही सर्व चर्चा आजच्या दृष्टीनेदेखील अतिशय महत्त्वाची असल्यामुळे या संबंधीचा आढावा उद्बोधक ठरेल, असा मला विश्वास वाटतो.

दादासाहेब गायकवाड यांनी संतती नियमनाच्या प्रश्नावर जे विचार व्यक्त केले तो सर्व कालखंड आपण डोळ्यासमोर ठेवला पाहिजे. १९३८ साली गांधीवादाचा प्रभाव देशामध्ये शिगेला पोहोचला होता. म. गांधी यांच्या विचाराने सर्व वातावरण भारून टाकलेले होते. त्यामुळे, अशा या काळात विधानसभेमध्ये गांधीवादी युक्तीवाद आग्रहाने पुढे येणे स्वाभाविक होते. त्याचप्रमाणे, त्याकाळात विधानसभेमध्ये हिंदू महासभा, मुस्लिम लीग, कम्युनिस्ट, समाजवादी आणि राष्ट्रवादी अशा वेगवेगळ्या विचाराचे आमदार हे आपले विचार त्यांच्या दृष्टीकोनातून मांडत होते. दादासाहेब गायकवाड यांनी या सर्वांच्याच भूमिकेचा समाचार न घेता मुख्यत: गांधीवादी भूमिका व मुस्लिम लीग यांचे विचार कसे चुकीचे आहेत, हे दाखवून देण्यावरच अधिक भर दिला.

भाषणाला सुरुवात करतानाच दादासाहेब गायकवाड यांनी सांगितले की, माझे मित्र श्री. रोहम यांच्या ठरावाला पाठिंबा देण्यासाठी मी उभा आहे. त्याचप्रमाणे, श्री. जमनालाल मेहता यांनी या मूळ ठरावाला जी दुरुस्ती सुचविली आहे, ती मला मान्य असल्याने त्या दुरुस्तीला पाठिंबा देण्यासाठी मी उभा आहे. सध्या काँग्रेसचे मंत्री व आमदार संतती नियमनाचे समर्थन करताना असे सांगतात की, आमचा संतती नियमनाला विरोध नाही. परंतु, हे संतती नियमन कोणत्याही कृत्रिम साधनाने होता कामा नये. माणसाने संयम बाळगूनच किंवा ब्रह्मचर्य सांभाळूनच संतती नियमन केले पाहिजे. गांधीवादी विचारावर दादासाहेब गायकवाड यांनी चौफेर हल्ला केला व ते म्हणाले, असा संयम खुद्द महात्मा गांधी यांनादेखील आपल्या आयुष्यात प्रारंभीच्या काळात सांभाळता आला नाही. त्यांच्या आत्मचरित्रातून आपणास असे पाहावयास मिळते की, महात्मा गांधींचे वडील मृत्युशय्येवर असतानादेखील महात्मा गांधी हे आपल्या पत्नीबरोबर संभोग सुख घेण्यात

रममाण झालेले होते. त्याचप्रमाणे, महात्मा गांधी यांनी काका कालेलकर यांना पाठविलेल्या पत्रातूनदेखील; महात्मा गांधींनी अविवाहित मुलींना पाठविलेल्या पत्राचे जे उल्लेख आपणास पाहावयास मिळतात, यातूनही महात्मा गांधींचा संयम कसा सुटला होता, हे आपणास दिसून येते. महात्मा गांधी यांच्यावर टीका करावी किंवा त्यांना बदनाम करावे म्हणून मी या गोष्टींचा उल्लेख करीत नाही. तरीदेखील महात्मा गांधी यांनी वयाच्या ७०व्या वर्षी अविवाहित मुलींना पाठविलेल्या पत्रातून देखील त्यांचा संयम सुटू शकतो यावर प्रकाश टाकण्याच्यादृष्टीने त्यांनी कालेलकरांना लिहिलेल्या पत्रातून दिसून येते. असे म्हणून महात्मा गांधी यांनी लिहिलेल्या पत्रातील काही भाग दादासाहेब गायकवाड यांनी सुमारे १५ मिनिटे सभागृहासमोर वाचून दाखविला. यावेळी त्यांनी असे सांगितले की, ही पत्रे लिहिताना महात्मा गांधींनी दाखविलेला प्रांजलपणा मला महत्त्वाचा वाटतो. तरीदेखील, एक गोष्ट आपण लक्षात ठेवायला पाहिजे की, महात्मा गांधींनी आपल्या वयाच्या ३०व्या वर्षानंतर ब्रह्मचर्य पाळण्यास सुरूवात केली. तरीदेखील वयाच्या ७०व्या वर्षी महात्मा गांधी यांच्यासारख्या पुरुषाचा संयम सुटू शकतो, तर मग सामान्य माणसाला संयम ठेवून ब्रह्मचर्य पाळणे कितपत शक्य आहे, याचा विचार करावयास हवा. सामान्य माणसाला २० ते ४० या काळात संयम किंवा ब्रह्मचर्य सांभाळून संतती नियमन करणे अवघडच नव्हे, तर अशक्य आहे.

त्या काळातील सभागृहाचे दुसरे सभासद श्री. अली बहादूर खान असे म्हणाले होते की, कॉंग्रेस पक्षाने जर संतती नियमनाचे धोरण स्वीकारले तर, ख्रिश्चन, मुस्लिम व इतर समाज या धोरणाला सतत विरोध करतील व हे सरकार जनतेमध्ये अप्रिय होईल. मला येथे एक गोष्ट स्पष्ट करावयाची आहे की, माझे मित्र श्री. रोहम यांनी आपल्या ठरावात असे कुठेही म्हटले नाही की, संतती नियमनाचे धोरण सर्वांना सक्तीचे करावे. ज्यांना आपली मुले वाढवायची असतील, त्यांनी ती खुशाल वाढवावीत. ती देवाची देणगी आहेत, असे जर त्यांना वाटत असेल तर त्यांना कोणीच अडवू शकणार नाही, परंतु गरीब कुटुंबात लाखो माणसे आज अशी आहेत की, ते आपल्या मुलामुलींना दोन वेळेस पुरेसे अन्नही देऊ शकत नाहीत, त्यांना अंगावर पुरेसे वस्त्रही देऊ शकत नाहीत; त्यांना शिक्षण देण्याचा प्रश्न तर दूरच राहिला. अशा परिस्थितीत समाजात गरिबी दूर करणे, हे शासनाचे काम आहे आणि गरिबी दूर करण्याचा एक प्रभावी मार्ग म्हणजे लोकसंख्या नियंत्रण हा आहे. ह्या ठरावाद्वारे आम्हाला एक सुचवायचे आहे की, ज्यांना संतती नियमन करावयाचे असेल त्यांच्यासाठी समाजात अनुकूल वातावरण निर्माण व्हावे म्हणून वेगवेगळ्या संस्थांनी आर्थिक मदत करावी आणि अशा लोकांना संतती नियमन करण्यास मदत करावी. संतती नियमनाचे धोरण सक्तीचे करावे, असे कोणीही व कधीही म्हटले नाही.

माझे मित्र श्री. अली बहादूर खान यांनी जर्मनी व इटलीचे उदाहरण दिले व सांगितले की, त्या देशात मुले वाढविण्यासाठी सरकार मुले वाढविणाऱ्याला विशेष आर्थिक मदत करते, त्यांना बोनस देते. लोकसंख्या वाढविण्याचे त्यांचे हे धोरण आपण विचारात घ्यायला हवे. या युक्तिवादाचा समाचार घेताना दादासाहेब गायकवाड म्हणाले की, जर्मनी व इटली येथील हुकूमशाही राष्ट्रांना, माणसांचा वापर हा बंदुकीत वापरत असलेल्या दारूसारखा करावयाचा असतो. ती राष्ट्रे युद्धखोर आहेत व इतर राष्ट्रांवर आक्रमण करून त्यांना युद्ध

पेटवायचे असते. अशा युद्धात उपयोगी पडावी म्हणून त्यांना लोकसंख्या आवश्यक असते. आपल्या देशाला अशी युद्धखोर भूमिका घ्यावयाची आहे, असे मला वाटत नाही. इतर देशांवर आक्रमण करून तो प्रदेश जिंकावा, असे आपले धोरण नाही. त्यामुळे जर्मनी व इटली यांची उदाहरणे आपणास उपयोगी पडणार नाहीत.

दादासाहेब गायकवाड यांनी एक विचार पुन:पुन्हा आग्रहाने मांडला. ते म्हणाले, आपल्या देशात अपार दारिद्र्य आहे. या देशातील लाखो लोकांना दोन वेळेला पोटभर जेवणही मिळत नाही. हजारो माणसे बेकार आहेत. अशा या परिस्थितीला आमचे मंत्री असे सांगतात की, आपल्या देशात अन्नधान्ये वाढण्याचा वेग जास्त आहे व त्या मानाने लोकसंख्या वाढीचा वेग कमी आहे. आपल्या देशात जर अन्नधान्ये भरपूर असेल, तर ते गरीबांच्या वाट्याला जाते का? हा खरा प्रश्न आहे. यादृष्टीने या देशातील बेकारी कशी कमी करावी. गरिबीची धार कशी कमी व्हावी यादृष्टीने या शासनाने प्रयत्न केले पाहिजे. यासाठी शासनाने कुटुंब नियोजनाचे धोरण स्वीकारावे आणि समाजातील बेकारी व दारिद्र्य याला आळा घालावा.

दादासाहेब गायकवाड यांनी समाजातील गरीबांचे केलेले वर्णन कोणालाही अस्वस्थ करणारे होते. ते म्हणाले, आपल्या प्रांतात गरीब समाजात दारिद्र्य इतके प्रचंड प्रमाणावर वाढलेले आहे की, अनेकांवर आत्महत्या करण्याचा प्रसंग येतो. इतकेच नव्हे तर काही लोक आपल्या मुलाबाळांना दोन वेळेला पोटभर जेवणही घालू शकत नाहीत. या कल्पनेने माणसे आपल्या मुलांचा बळी देण्यास तयार होतात. या सर्व परिस्थितीवर दादासाहेब गायकवाड यांनी सुचविलेला एक मार्ग म्हणजे 'संतती नियमन' हाच आहे.

दादासाहेब गायकवाड म्हणाले की, मी काँग्रेस पक्षाला असे आवाहन करतो की त्यांनी हा ठराव मान्य करावा व मुंबई प्रांतात संतती नियमनाचे धोरण सुरू करावे. परंतु, दुर्दैवाने शेवटी मतदानाचा प्रश्न आला. त्यावेळेस डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्वतंत्र मजूर पक्षाचे सर्व सभासद एका बाजूला तर संपूर्ण विधानसभेतील सभासद दुसऱ्या बाजूला असे चित्र निर्माण झाले. संतती नियमनाला विरोध करताना प्रत्येक पक्षाची भूमिका वेगळी होती. काँग्रेस पक्षाचा संतती नियमनाला पाठींबा होता. परंतु, कृत्रिम मार्गाने संतती नियमन करण्याच्या मार्गास गांधीवादाचा प्रभाव असलेल्या काँग्रेसचा विरोध होता. त्याचप्रमाणे, हिंदू महासभेचा विरोध वेगळ्या कारणासाठी होता. ते असे म्हणत असत की, संख्या हेच सामर्थ्य आहे. असे म्हणण्यामागे त्यांची भूमिका हिटलर व मुसोलिनी यांचीच होती. याशिवाय, कम्युनिस्ट पक्षाला या धोरणाचा विरोध होता. कारण, भांडवलशाही हे दारिद्र्याचे मुख्य कारण आहे, तसा त्यांचा विचार होता. मुस्लिम लीगने विरोध केला तो मुख्यत: इस्लाम धर्माच्या भूमिकेवर. इस्लामच्या धर्मग्रंथात सतत संख्या वाढवावी, असे म्हटल्याचे एका मुस्लिम लीगच्या सभासदाने सांगितले. ख्रिश्चन सभासदांनीदेखील खिश्चन धर्माच्या भूमिकेतून विरोध केला. अशा प्रकारे वेगवेगळ्या पक्षांनी वेगवेगळी भूमिका घेतली. त्यामुळे जेव्हा मतदान झाले, तेव्हा ११ विरुद्ध ५२ अशा मतांनी हा ठराव पडला. त्याकाळी सभागृहात एकूण १७५ सभासद होते. परंतु, इतर अनेक सभासद गैरहजर असल्यामुळे सभागृहामध्ये एकूण मतदानासाठी ६३ सभासद हजर होते, असे दिसते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १९३८ साली केलेले हे भाषण आणि दादासाहेब गायकवाड यांनी या ठरावाला पाठिंबा देताना केलेले भाषण आजही अत्यंत महत्त्वाचे आहे. आज जगात इंग्लंड, अमेरिका, जर्मनी, जपान यासारख्या राष्ट्रांकडे पाहिले तर त्यांच्या लोकसंख्येच्या वाढीचा वेग शून्य टक्के आहे, असे दिसून येईल. शून्य टक्के याचा अर्थ असा की, जितकी मुले जन्माला येतात तितकीच मुले मृत्युमुखी पडतात. त्यामुळे लोकसंख्या कायम राहते. इंग्लंड-अमेरिका यांची लोकसंख्या १९६० साली जेवढी होती, तेवढीच आजही कायम आहे. त्यामुळे विकासाची सर्व फळे त्यांच्या पदरात पडतात. परंतु, भारतासारख्या देशात दरवर्षी सुमारे २ कोटीपेक्षा अधिक लोकसंख्या वाढत आहे. म्हणजेच दरवर्षी या देशात एक ऑस्ट्रेलिया किंवा एक कॅनडा राष्ट्र जन्माला येत आहेत. १९४७ साली आपल्या देशाची लोकसंख्या ३५ कोटी होती. ती आता १०० कोटीच्या पुढे गेली आहे. याचा अर्थ असा की, गेल्या ५० वर्षांत आपल्या देशात दोन नवे भारत निर्माण झाले आहेत. त्यामुळे आपला जो विकास झाला, तो या लोकसंख्येने खाऊन टाकला व राष्ट्राच्या विकासाच्या पदरात काहीच पडले नाही.

लोकसंख्या वाढीने, एक चमत्कारिक चित्र पाहावयास मिळते. लोकसंख्या वाढीचा वेग गरीब समाजात सर्वात जास्त आहे. त्यामानाने सुशिक्षित शहरी भागातील मध्यम वर्गाने कुटुंब नियोजनाचा मार्ग अवलंबून आपले कुटुंब नियोजन केलेले आहे. मोठे कारखानदार, उद्योगपती, नामवंत लोक यांचा प्रश्न वेगळा आहे. यांनीदेखील कुटुंब नियोजन केलेले आहे. आजदेखील कुटुंब नियोजनाची गरज जेथे जास्त आहे अशा गरीब समाजात हा कार्यक्रम गेलेलाच नाही. ऐतिहासिकदृष्ट्या आपण पाहिल्यास महाराष्ट्रात १९६६ काळात कुटुंब नियोजनाला वेग आला होता. पण, १९७७ साली जनता पक्ष सत्तेवर आला व या कार्यक्रमाची पिछेहाट झाली. १९७७ नंतर या कार्यक्रमाकडे कोणत्याही पक्षाचे लक्ष गेले नाही. कारण, १९७६ साली या कार्यक्रमाची अंमलबजावणी अनिष्ट मार्गाने झालेली होती. त्यामुळे १९६६ ते १९७७ या काळात उत्तर भारतात काँग्रेस पक्षाचा पराभव होण्यास कारणीभूत ठरला. पण, १९७७ नंतर या प्रश्नाकडे कोणत्याही पक्षाचे लक्ष गेलेले नाही, हे खरोखरीच देशाचे दुर्दैव आहे. आज देशासमोर लोकसंख्या वाढ, हे एक महत्त्वाचे आव्हान आहे. व हे आव्हान आपण समर्थपणे पेलावयास हवे. आजचे भा.ज.पा.चे केंद्रसरकार या धोरणाचा अवलंब करील, असे मला वाटत नाही. त्यांचा अप्रत्यक्ष मार्गाने या कार्यक्रमाला विरोधच आहे. त्याप्रमाणे, हे केंद्रसरकार सत्तेवर असेपर्यंत या कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी होईल, असे मला वाटत नाही. पण, ज्या राज्यात काँग्रेस पक्ष सत्तेवर आहे अशा राज्यात काँग्रेस पक्षाने सर्व सामर्थ्यानिशी या कार्यक्रमाचा पाठपुरावा केला पाहिजे. त्याशिवाय गरिबी, बेकारी आपण दूर करू शकणार नाही. या संदर्भात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १९३८ साली दाखविलेले द्रष्टेपण मला मोलाचे वाटते. दादासाहेब गायकवाड यांचे संपूर्ण भाषण वाचतानादेखील; ते मुंबई प्रांतातील एक उत्तम संवादपटू होते, याची आपणास खात्री पटते. कारण, त्यांचे सर्व युक्तिवाद बिनतोड होते व प्रतिपक्षावर हल्ला करताना प्रभावी शब्दाने हल्ला करीत असत. दादासाहेब गायकवाड यांच्या शताब्दीनिमित्त त्यांना माझे विनम्र अभिवादन.

# भाऊराव!

**वि. द. घाटे**

दीर्घायुष्य लाभणे हे एक प्रकारे वरदान असते, दुसऱ्या प्रकारे शाप असतो. म्हातारपणी क्रमाक्रमाने नातवंडे जवळ येतात. कुणी रांगत येते; कुणी पडत झडत चालत येते. सारे मांडीवर बसतात, केस ओढतात, आणखी काही काही करतात, कालिदासाला धुळीने मळलेल्या तोंडाचे चुंबन घेता आले आणि तो धन्य झाला. मला ते भाग्य लाभले नाही. रस्ते सिमेंटचे झाले आहेत, बंगल्याचे आवार फरसबंदी झाले आहे. कालिदासाचे वैभव मला लाभत नाही; परंतु अंग धुळीने माखले जात नाही, तरी नातवंडे, कपडे (अर्थात माझे) ओले करतात. हेही सुख काही थोडे नाही.

वरदानाप्रमाणे म्हातारपणाला शापही मिळतो. जितके वय वाढत जाते,तितकी सुहृदांची, जिवलगांची अधिकाधिक ताटातूट होत असते. वियोग तरी किती सहन करावेत? काहीजण अगदी माझ्या डोळ्यांदेखत जगाचा निरोप घेतात आणि मला त्यांचे डोळे झाकावे लागतात. बरेच माझ्यापेक्षा लहान असतात परंतु माझ्या आधी जातात आणि माझ्या जीवनात पोकळी निर्माण करतात आणि ती कालपरत्वे वाढत जाते.

जितके वय वाढते तितकी कॅज्युअल्टीची यादी वाढत जाते. या यादीत दोन ठळक नावे डोळ्यांसमोर येतात आणि चटका लावतात. भाऊराव पाटील आणि भाऊराव गायकवाड.

भाऊराव गायकवाड, भाऊराव पाटलांशी समानधर्मी होते. भाऊराव पाटलांच्याप्रमाणेच भाऊराव गायकवाडांनी स्वत:च्या स्वार्थाकडे, सुखाकडे, भाकरीकडे कधी पाहिले नाही. दलित समाज हेच त्यांचे भलेमोठे कुटुंब होते. त्या कुटुंबाला दुःखाच्या, कष्टांच्या, अज्ञानाच्या गर्तेतून वर काढण्यात पहिल्या भाऊरावाप्रमाणेच या भाऊरावाची हयात गेली. भाऊराव गायकवाडांनी ऊन पाहिले नाही, तहान पाहिली नाही. सायकल घ्यायचे आणखी दूरदूर आडवळणी गावांत, महारवाड्यात जायचे, अडचणी समजून घ्यायचे, चार गोष्टी सांगायचे, दिलासा द्यायचे, दलितसमाजाच्या अडचणी आणि तक्रारी लिहून द्यायचे. अधिकाऱ्यांच्याकडे तसेच जायचे आणि कसल्याही प्रकारे अतिशयोक्ती न करता प्रत्यक्ष जे पाहिले, ज्या अडचणी दिसल्या त्या शांतपणे अधिकाऱ्यांना सांगायचे. पहिले भाऊराव संतापी तर हे भाऊराव अत्यंत संयमी, समतोल वृत्तीचे, मृदू वाणीचे. कितीही संताप आला असला तरी तोंडातून कठोर शब्द कधी निघाले नाहीत. या बाबतीत ते न्या. रानड्यांचे चेले होते. रानडे गोखल्यांना म्हणाले होते, "शब्दात जोर नको, विचारांत जोर पाहिजे, जोमदार विचारांचाच

परिणाम चांगला होतो''.

भाऊराव गायकवाडांचा संयम असाच होता. त्यामुळे मोठे अधिकारी, मंत्री त्यांच्या शब्दाला मान देत. भाऊरावांचा ६८ साली नाशिक येथे टोलेजंग सत्कार झाला. ना. यशवंतरावजी चव्हाण, ना. वंसतरावजी नाईक आले होते. ना. वसंतराव नाईकांनी फारच मार्मिक भाषण केले. ते म्हणाले, ''भाऊराव गायकवाड भेटायला आल्यानंतर पिशवीतून कागद काढायचे, आणि जे सांगायचे, ते वाचून दाखवायचे. अतिशय मृदू भाषेत, समजेल असे परंतु थोडक्यात सांगायचे, सांगणे झाले की उठायचे व चालू लागायचे. मी म्हणत असे दादासाहेब, एवढी घाई कसली? थोडे बसा. दादा नुसते हसायचे आणि म्हणायचे, 'छे! छे! तुम्ही कामातली माणसे, तुमचा वेळ घेणे बरे नाही आणि खरे म्हणजे माझ्यामागेही बरीच कामे आहेत. लोक माझी वाट पहाताहेत. मला गेले पाहिजे. माझ्या मनात येते, जे उच्च, पदवीधर आहेत, जे स्वत: संस्कृतीचा, मोठेपणाचा आणि विद्वत्तेचा टेंमा मिरवतात अशांनी सात जन्म घेतले तरी जे जमणार नाही, ते दादासाहेबांना जमले आहे. 'मॅनर्स' म्हणजे काय हे दादासाहेबांच्याकडून शिकावेत.'' भाऊरावांचा हा संयम, हा मितभाषीपणा, हा व्यवस्थितपणा फार परिणामकारक होई. सरकारी दरबारी त्यांना मान मिळे. तसा अस्पृश्यांच्या झोपडीतही मिळे. एकदा काही वकील मंडळीनी बाबासाहेबांपाशी तक्रार केली ''हे भाऊराव आम्हाला पुढे येऊ देत नाहीत, स्वत:च पुढे होतात, मान मिळवितात, आम्ही पदवीधर असून काय उपयोग. एका सामान्य खेडवळ माणसाने आमच्यावर 'बॉसगिरी' करावी हे बरे नाही,'' बाबासाहेबांनी त्याना उत्तर दिले. ''भाऊरावासारखे खेड्यापाड्यात उपाशीतापाशी भटकण्याचे सामर्थ्य तुम्हापाशी आहे काय? जन्मभर त्याने जीवाचे रान केले आहे. तुम्ही शहरात वकिली करता, प्रतिष्ठा मिळविता आणि पुढारी म्हणून मिरविता. भाऊरावांशी स्पर्धा करू नका, उन्हातान्हातून, डोंगरदऱ्यांतून कधी पायी, कधी सायकलवर, कधी टांग्यातून, कधी मोटारीतून संबंध महाराष्ट्र त्यांनी पायाखाली घातला आहे. प्रत्येक जिल्ह्यात, प्रत्येक खेड्यात, प्रत्येक झोपड्यात भाऊराव माहित नाही असा मनुष्य सापडणे कठीण! काही ठिकाणी आंबेडकर कोण हे कदाचित माहित नसेल, परंतु भाऊरावांना सगळे गोरगरीब ओळखतात'' भाऊराव धोतर सदरा, कोट घालून हिंडायचे त्यांना गरज नव्हती. एकदा समाजवादी पक्षाच्या पुढाऱ्याशी बाबासाहेबांची बोलणी चालू होती. बाबासाहेबांनी या पुढाऱ्यांना एक प्रसंगी कळविले ''मी बैठकीला येत नाही. माझे प्रतिनिधी आणि विश्वासू सहकारी भाऊराव गायकवाड तुम्हाला भेटतील. माझे त्यांचे विचार एक आहेत, मला जे सांगायचे तेच ते सांगतील. माझा त्यांच्यावर पूर्ण विश्वास आहे.'' भाऊराव बैठकीच्या जागी वेळेवर जाऊन पोहोचले. तेच ते धुळीत मळलेले धोतर, तोच कोट. मागील खुर्चीवर बसले. समाजवादी पुढारी जमले. बाबासाहेबांच्या प्रतिनिधीची वाट पाहिली, सर्वांचे डोळे दरवाजाकडे होते, आपापसात बोलू लागले, "अहो, ते भाऊराव गायकवाड केव्हा येणार? उशीर झाला, भाऊराव मागच्या खुर्चीवरून उठले आणि शांतपणे म्हणाले, मीच भाऊराव गायकवाड.'' मंडळींना खरेच वाटेना! हा खेडवळ माणूस बाबासाहेबांचा प्रतिनिधी कसा? बाबासाहेब नखशिखांत इंग्रजी पोशाखात असतात. प्रकांड पंडित बाबासाहेबांचा हा 'विश्वासू सहकारी'? जागतिक कीर्ती मिळविणारे डॉ. आंबेडकर, निरनिराळ्या देशातील विद्यापीठांतून पदव्या

मिळविणाऱ्या डॉ. आंबेडकरांशी यांचे विचार मिळतेजुळते कसे असू शकतील? हा कुणी तरी खेडूत दिसतोय. पुढाऱ्यांचा गैरसमज लवकरच दूर झाला. भाऊरावांनी आपल्या पिशवीतून कागदपत्रे काढली, मुद्दे मांडले, प्रश्नांची उत्तरे दिली. आपली बाजू समर्पकपणे मांडली. भाऊरावांची वाणी शुद्ध, ओघपूर्ण, अस्खलित! नाशिकच्या गंगेसारखी संथ वाहणारी. भाऊरावांनी बाबासाहेबांची वकिली पार पाडली.

भाऊराव गायकवाड हे एक कित्ता घेण्यासारखे राजकारणातील पुढारी होते. निर्मल चारित्र्य, मधुर वाणी अविश्रांत मेहनत आणि निस्सीम, अमर्याद गुरुभक्ती. बाबासाहेबांचे आणि त्यांचे संबंध फार विचार करण्यासारखे होते बाबासाहेबांनी आपल्या असामान्य बुद्धिबळाने सिद्धांत मांडावेत, विचार सांगावेत, योजना आखाव्या आणि भाऊरावांनी श्रद्धेने आणि हिरीरीने सारे कृतीमध्ये आणावे. बाबासाहेब प्रकृतीने बुद्धिवादी, आपल्या प्रचंड ग्रंथालयात ज्ञानोपासना करण्यात त्यांना खरे सुख मिळत असे. भाऊराव गायकवाडांसारखा कर्तबगार शिष्य मिळाला नसता तर बाबासाहेबांचे विचार, बाबासाहेबांची स्वप्ने कदाचित त्या राजगृहातील ग्रंथालयामध्येच राहिली असती. कधी कधी बाबासाहेब विचार मांडायचे, परंतु कृतीचा प्रसंग आला म्हणजे सावधगिरीचा संदेश द्यायचे, मागेपुढे पाह्यला सांगायचे. भाऊरावांना मागेपुढे पाहणे जमत नव्हते. भाऊरावांना वांझ विचार असह्य वाटे. विचार कृतीत उतरल्याखेरीज त्यांना भाकर गोड लागत नसे. भाऊरावांच्या कृतीला मर्यादा असे. कृतीला त्यांनी कधीच बंधन घातले नाही. महाडच्या चवदार तळ्याची गोष्ट घ्या. महाडला सुरबा टिपणीसांच्या खटपटीने, भाऊरावांच्या परिश्रमाने खूप मोठा मेळावा जमला. भाषणे झाली, ठराव झाले. म्होरके बाबासाहेब होते. रात्रीच्या बैठकात भाऊराव म्हणाले. "बाबासाहेब, उद्या मिरवणूक काढायची, सत्याग्रह करावयाचा, चवदार तळ्याचे पाणी प्यायचे. जे पाणी गुरे-ढोरे पितात ते आम्ही प्यायचे नाही म्हणजे काय? मला ते सहन होत नाही सत्याग्रह केलाच पाहिजे. बाबासाहेबांनी कौतुकाने त्या तरुणाकडे पाहिले व म्हणाले "भाऊराव, घाई करू नकोस, तुझे अंत:करण मी जाणतो. तुला तळमळ वाटते, अपमान वाटतो, तो मलाही वाटतो, परंतु काही गोष्टी सबुरीने घ्याव्या लागतात. आपण स्पृश्यांशी लढा चालविला. सध्यातरी आपल्याला सरकारशी लढावयाचे नाही. एकावेळी एकच शत्रू गाठला पाहिजे. भाऊरावानी पुष्कळ हरकत घेतली. परंतु शेवटी बाबासाहेबांच्या हुकूमास मान दिला आणि सत्याग्रह तहकूब ठेवला. हा मेळावा मला वाटते, १९२७ साली झाला असावा. परंतु पुढल्या मार्च महिन्यात मंडळी पुन: रात्री जमली. परत आवेशाची भाषणे झाली. रात्री मंडळी जेवायला बसली. स्पृश्य समाज मोठ्या संख्येने चालून आला, चारी बाजूनी नाकेबंदी झाली. ताटात माती कालवली गेली, अस्पृश्यांना बेदम मार बसला. हा अत्याचार करणारे ब्राह्मणच होते असे नाही; इतर जातींनीही त्यांच्याशी सहकार्य केलं, दलितांशी झगडताना खेड्यापाड्यात ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद राहत नाही, सारे एकत्र येऊन महारवाडे जाळतात. बायाबापड्यांची अवहेलना करतात. इरावतीबाई कर्वे मला एकदा सांगत होत्या, "मी पाहणी करण्यास गावोगाव हिंडत होते. तीनचार गावे पाहिली परंतु महारवाडे मला दिसले नाहीत. एका गावी माझा मुक्काम होता; अपरात्री भीत-भीत काही महार मंडळी मजकडे आली, आपली हकिकत सांगितली, मी पाहिलेल्या गावांतील महारवाडे जाळले होते." अजूनही खेड्यांत

विहिरीवर महारांना पाणी मिळत नाही, आठ-आठ दिवस त्यांची आंघोळ होत नाही, स्पृश्यांच्या घरात प्रवेश मिळत नाही, न्हावी, धोबी त्यांची कामे करीत नाहीत. आमचा समाज इतका बथ्थड आहे की, कान पकडून जबरदस्ती केल्याखेरीज तो कधीच बदलायचा नाही! महाडला रात्री जी मारहाण झाली, तिच्यामुळे बाबासाहेबांनी सत्याग्रहाची संमती दिली. मिरवणूक निघाली, आघाडीला भाऊराव, सुरबा टिपणीस होते. लाठ्या खायला भाऊराव नेहमीच आघाडीवर असत. पुढारी व्हायचे असेल तर त्यानेच पहिली लाठी खाल्ली पाहिजे, असा भाऊरावांचा संकल्प असे, आणि तसेच ते वागले. भाऊराव दलितांचे पुढारी होते. परंतु दुसऱ्या समाजाशी त्यांनी कधीच वैर केले नाही. स्पृश्य जातीच्या पुढाऱ्याबरोबर त्यांचे मैत्रीचे आणि प्रेमाचे संबंध असत. या संबंधामुळेच स्थानिक संस्थांकडून भाऊरावांना कितीतरी कामे करून घेता आली. काळाराम-सत्याग्रह चालू करून बाबासाहेब लंडनला राऊंड-टेबल कॉन्फरन्सला गेले. भाऊरावांनी ५॥ वर्षे सत्याग्रह चालू ठेवला. जे जे घडले ते बाबासाहेबांना कळविले. मारहाण झाली; तिचे फोटो लंडनला पाठविले. जे घडले त्याचे वर्तमान कळविले. बाबासाहेबांनी लंडनच्या वर्तमानपत्रात सत्याग्रहाची हकीकत आणि फोटो प्रसिद्ध केले. आणि कॉन्फरन्समध्ये ठासून सांगितले, "म. गांधी स्वत:ला अस्पृश्य समाजाचे पुढारी समजतात. पण त्यांचा दावा मला मंजूर नाही. भारतात काय घडत आहे? अस्पृश्यांवर कसे आणि किती अन्याय घडत आहेत, ते मी चव्हाठ्यावर आणले आहेत ते समजून घ्या."या सत्याग्रहाच्या अग्निदिव्यातून होरपळलेल्या मनाने पुढे बाबांनी संकल्प केला. "हिंदूधर्मात जन्मलो असलो तरी हिंदू म्हणून मरणार नाही" आणि बाबासाहेबांनी लक्षावधी अनुयायांसह ती प्रतिज्ञा पुढे नागपूरला पुरी केली.

मृत्यूच्या पूर्वी भाऊराव उपचारासाठी पुण्यास आले होते. चालवत नव्हते, काळीज बिघडलं होतं. व्हील चेअरमधून हिंडताना परंतु आधिव्याधिकडे न पाहता मिळालेल्या मित्रांबरोबर आणि अनुयायांबरोबर पुढचे बेत करीत होते, संकल्प सोडीत होते. जुना इतिहास सांगून नवा इतिहास घडवित होते, आणि असे करता करता भाऊराव गायकवाड शांतपणे निर्वाणाप्रत गेले!

# डॉ. आंबेडकरांचे निष्ठावान सहकारी

**यदुनाथ थत्ते**

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी १९३५ साली येवले येथे जाहीर घोषणा केली की 'मी हिंदू म्हणून जन्माला आलो असलो तरी हिंदू म्हणून मरणार नाही!' त्यांच्या या घोषणेचे देशभर पडसाद उमटले! त्या काळात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे दोन निष्ठावान अनुयायी नाशिक जिल्ह्यात होते. एक होते दादासाहेब गायकवाड आणि दुसरे होते अमृतराव रणखांबे.

### आपटे गुरुजींना आव्हान समजले

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी येवल्यात धर्मांतराची घोषणा केली त्याचे इंगित येवल्यातील राष्ट्रीय शाळेचे मुख्याध्यापक, विनय मंदिराचे संस्थापक आणि येवल्याचे गांधीवादी काँग्रेस कार्यकर्ते आपटे गुरुजींना समजले! दलित ख्रिश्चन वा मुसलमान झाला तर येवल्याच्या सार्वजनिक हौदावर पाणी भरण्याला अडथळा आणण्याची शामत कोणाही सवर्णाला होत नव्हती, पण स्वत:ला हिंदू समाजाचे अंग मानणाऱ्या अस्पृश्यांना पाणी भरू देण्याची सवर्णांची तयारी नव्हती!

### वस्तुस्थितीचे भान

येवल्याच्या नगरपालिकेत काँग्रेस पक्षाला बहुमत मिळाल्यानंतर आपटे गुरुजींच्या आग्रहामुळे नगरपालिकेने ठराव केला की हौदावरचा स्पृश्यास्पृश्य भेद नष्ट करायचा. त्या प्रमाणे सर्व हौदांवर पाट्या लागल्या की येथे स्पृश्यास्पृश्य भेद मानला जात नाही! शाळेत जाताना दिसायचे की, त्या पाट्यांखाली बसूनच दलित-हरिजन स्त्रिया सवर्णांना विनवणी करताहेत, "भाऊ वाढ रे पाणी, माय वाढ ग पाणी!" कोणाच्या हृदयाला पाझर फुटला तर त्यांना पाणी मिळायचे, नाहीतर तासन्‌तास त्यांना विनवण्या करीत खोळंबावे लागायचे!

### आश्चर्य व विषाद

नगरपालिकेने ठराव केला, पाट्या लावल्या तरी परिस्थितीत फरक पडला नाही याचे आपटे गुरुजींना आश्चर्यही वाटले आणि विषादही वाटला! गावातल्या दलितांना व हरिजनांना सवर्णांचा भरवसा वाटत नव्हता. आपण कायद्याप्रमाणे पाणी भरले तर सवर्ण मारहाण करतील, बहिष्कार घालतील अशी त्यांना भीती वाटत असावी. आपटे गुरुजी बुचकळ्यात

पडले. काय करावे ते त्यांना सुचेना. मग त्यांनी दादासाहेब गायकवाड आणि अमृतराव रणखांबे या नाशिक जिल्ह्यातील डॉ. आंबेडकरांच्या दोघा निष्ठावान अनुयायांना पाचारण करून त्यांच्या हातांनी हौदातून पाणी काढण्याचा कार्यक्रम ठरवला. ते आले. त्यांनी हौदातून पोहऱ्याने पाणी काढले. आपटे गुरुजी ते पाणी प्यायले. आम्ही सेवादलातील मुले व राष्ट्रीय शाळेचे माजी विद्यार्थी, आपटे गुरुजींच्या तालमीत तयार झालेले. आम्ही दादासाहेब गायकवाडांनी हौदातून काढलेले पाणी जाहीरपणे प्यायलो! दादासाहेबांच्या मनाला भयाचा कुठे स्पर्शही झालेला नव्हता!

**आशा वाटू लागली**

त्यानंतर हौद बाटवले अशी समजूत सनातनी मंडळींनी करून घेतली व हौदावर बहिष्कार घातला! पण गोड्या पाण्यावाचून चालणार कसे? मग गोमूत्र आणि गोमय शिंपडून हौद शुद्ध करण्यात आले आणि पुन्हा पहिली परिस्थिती कायम झाली! आपटे गुरुजी ह्या सर्व प्रकाराने काहीसे हताश झाले. पण आम्ही सेवादलातल्या मुलांनी व राष्ट्रीय शाळेच्या माजी विद्यार्थ्यांनी दादासाहेबांच्या हातचे पाणी प्यायल्याने त्यांना आशाही वाटू लागली की नवी पिढी अस्पृश्यतेला थारा देणार नाही. माणसाकडे माणूस म्हणून पाहील.

**संतांची शिकवण**

आपटे गुरुजी व विनय मंदिरातले सहकारी गावात दर आठवड्याला भिक्षाफेरी काढत. या कार्यक्रमानंतर त्यांना मिळणारी भिक्षा काहींनी बंद केली! पण आपटे गुरुजी डगमगले नाहीत. गावात काही ठिकाणी सभा झाल्या. संतांची वचने लोकांपुढे सांगण्यात आली. 'ऐसे कैसे रे सोवळे, शिवजा होतसे ओवळे!' 'ऊस डोंगा परी, रस नोहे डोंगा, कारे भुललासी वरलिया सोंगा?' असे संतांनी समाजाला विचारले होते.

**नवे पंचशील**

दादासाहेब गायकवाडांना त्या वेळी मी पाहिले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे नाशिक जिल्ह्यातले निष्ठावान व निर्भय सहकारी म्हणून. नाशिकच्या काळाराम मंदिर-प्रवेशाच्या सत्याग्रहाचेही त्यांनी नेतृत्व केले. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या अनुयायांना तीन गोष्टी सांगितल्या होत्या. 'शिका, संघटित व्हा आणि चळवळ करा.' (एज्युकेट, ऑर्गनाइझ अण्ड ॲजिटेट). येवल्याच्या कार्यक्रमामुळे आपटे गुरुजींसारख्या निष्ठावान गांधी विचाराच्या कार्यकर्त्यांची दादासाहेबांना ओळख पटली. डॉ. आंबेडकरांच्या तीन मुद्द्यांना आणखी दोन मुद्द्यांची जोड मिळाली. शिका, संघटित व्हा, चळवळ करा, बदल घडवून आणा (रिफॉर्म) आणि एकात्मता साधा (इंटेग्रिटी) असे दलित मुक्तीचे एक नवे पंचशील तयार झाले.

**एकवीस वर्षे वाट पाहिली**

धर्मांतराची १९३५ साली डॉ. आंबेडकरांनी येवल्यात घोषणा केली. त्या धक्क्याचा अपेक्षित परिणाम व्हावा म्हणून एकवीस वर्षे त्यांनी वाट पाहिली. सर्व धर्मांचा अभ्यास केला

आणि १९४६ साली त्यांनी बुद्ध धर्माची दीक्षा घेतली! ज्या कर्मविपाकाच्या आधारे सामाजिक विषमतेचा बचाव केला जात होता. त्यातून स्वत:ची, आपल्या अनुयायांची त्यांनी सुटका करून घेतली.

### संघटनाचतुर

दादासाहेब गायकवाड ज्या गाडीने संसदेच्या अधिवेशनासाठी दिल्लीला जात होते. त्याच गाडीने मीही एकदा प्रवास करीत होतो. गाडी थांबे त्या प्रत्येक स्टेशनवर त्यांना भेटण्यासाठी दलित कार्यकर्ते आलेले दिसत होते. दादासाहेब त्यांच्याशी तेवढ्या वेळात बोलत होते. त्यांचे प्रबोधन करीत होते. डॉ. आंबेडकरांना असे निष्ठावान सहकारी व अनुयायी मिळाले. त्यांनी राजकारणात भाग घेतला. डॉ. आंबेडकर म्हणत असत की, राजकारण म्हणजे संभाव्यतांचा खेळ. (गेम ऑफ पॉसिबल्स). तो खेळ दादासाहेब गायकवाड नेकीने खेळले. शांताबाई दाणींच्यासारखे सहकारी कार्यकर्ते त्यांनी मिळवले आणि नाशिकसारख्या एका सनातनी वृत्तीच्या गावात सामाजिक समतेची ज्योत त्यांनी तेवत ठेवली. गांधी विचाराच्या मंडळींचाही विश्वास त्यांनी संपादन केला.

### खरीखुरी शक्ती

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यासारखे विभूतिमत्व आणि विवेकी नेतृत्व हे अपवादभूतच असते. पण दादासाहेब गायकवाडांसारखे निष्ठावान व विधायक कर्तृत्व असलेले अनुयायी ही त्यांची खरीखुरी शक्ती असते.

# दादासाहेबांच्या शिक्षणविषयक कामगिरीविषयी

**केशव मेश्राम**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि कर्मवीर भाऊराव - म्हणजेच दादासाहेब कृष्णराव गायकवाड- ह्या दोनच व्यक्ती महाराष्ट्रात आणि भारतभर, दलितोद्धारक नेते म्हणून विख्यात आहेत. त्यांच्या सामाजिक कामगिरीमुळेच, बाबासाहेब दादासाहेब हा द्वंद्वसमास, सिद्ध आणि सार्थ झाला आहे.

बाबासाहेबांना, सुभेदार रामजी जसे ग्रंथवाचनासाठी प्रोत्साहन देत, तसेच दादासाहेबांच्या बाबतीत किसनराव जागरूक असत. "भाऊ! तू फार फार शीक. मोठी कीर्ती मिळव आणि आपल्या कुळाचं नाव जगात गाजव!" असे भावड्याला, त्यांचे वडील किसन महार, सततच सांगत असत. नाशिकच्या उत्तरेला बारा किलोमीटर अंतरावरच्या 'बाणगंगा' ह्या छोट्या नदीच्या काठी, वसलेल्या 'आंबे' ह्या गावी, दादासाहेब जन्मले आणि शिकले. चिमाजी अप्पांसोबत वसईचा किल्ला लढवणारे राजेबहाद्दर नारो शंकर याच गावचे. पुढे दादासाहेब नाशिकला हायस्कूलला आले. तेथे त्यांचे 'भावड्या' हे नाव, तालीममास्तर पाठक यांनी ऐकले व वर्गशिक्षकांच्या सल्लामसलतीने बदलून; नव्याने, भाऊराव कृष्णराव गायकवाड, असे नोंदले. शाळा राजेबहाद्दरांच्या वाड्यातच भरायची. येथे बाबासाहेबांचेही आडनाव बदलल्याची आणि शिक्षकांनीच नवनामकरण केल्याचे स्वाभाविकपणे स्मरण होते.

दलित विद्यार्थ्यांना शिक्षणाबाबत शाळेत काय काय सहन करावे लागे, हे सगळ्यांनाच ज्ञात झाले आहे. घालून पाडून बोलणे, दुस्वास, तिरस्कार आणि हिडीसफिडीस ह्या अनुभवातून, दादासाहेबही गेले होते. पण शिक्षण हीच पुढे सरकण्याची आणि सर्व बदलण्याची किल्ली आहे, ही जाणीव त्यांना बालवयापासूनच झाली होती.

शिक्षण हे वाचन, मनन, चिंतन, सातत्य आणि जिद्द ह्या पाच पायऱ्यांतून प्रगत होत जाते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा 'शिका, संघटित व्हा आणि संघर्ष करा' हा सर्वविख्यात संदेश, म. फुले यांच्या सार्वजनिक सत्यधर्म आणि सत्यशोधक समाजाची कामगिरी, छत्रपती शाहू महाराजांचे क्रियाशील प्रोत्साहक राजकारण आणि महर्षी विठ्ठल रामजी शिंदे व म. गांधींचे भारून टाकणारे कार्य ह्यामुळे कालखंडच गतिशील बनला होता.

इंग्रज सरकारच्या मर्यादित पण तरीही शिक्षणविषयक उदार व समावेशक दृष्टिकोनामुळे आरंभीच्या पिढीतील सर्वच कार्यकर्त्यांना, जाणकारांना आणि केवळ पोटार्थी नसणाऱ्या समंजस पालकांना शिक्षणाचे महत्त्वही कळले होते आणि त्या मूल्यातून घडणारे, मानवी

उन्नयनही ज्ञात झाले होते.

दादासाहेबांच्या शिक्षणासंबंधी विचारांचा परामर्ष घेण्याआधी ब्रिटिशांच्या समावेशक धोरणांमुळे मागासवर्गीयांत झालेल्या जागृतीचा विचारही समजून घेणे आवश्यक आहे. कारण भाऊरावांच्या पित्यापर्यंत हे लोण पोचले होते. याचाच अर्थ हा जाळ आधी चांगलाच फुरफुरत असला पाहिजे हे स्पष्ट आहे.

माणसांच्या सर्व जटिल प्रश्नांची मुळं त्यांच्या अज्ञानात असतात. भगवान गौतम बुद्धांनी तर ज्ञान म्हणजेच प्रकाश, असे म्हटले आहे. शोषणमुक्तीची शाश्वत पायवाट म्हणजे शिक्षण. दीनदलितांचे दैन्य संपविण्याचे एकमेव साधन म्हणजे शिक्षण. शिक्षणाने माणूस घडतो. शीलनिर्मितीची वाट सुकर होते आणि चारित्र्याचीही महती ध्यानात येते. पण शिक्षण उदासपणाने, नाईलाजाने घेणे करंटेपणाचे ठरते. ते अत्यंत डोळसपणे आत्मसात करणे आणि अटीतटीच्या प्रसंगी जीवनात चातुर्यपूर्ण तारतम्याने उपयोजिण्याचे तंत्रही आत्मसात करावे लागते.

गोपाळबाबा वलंगकर हे सजग कार्यकर्ते पहिल्या पिढीचे प्रतिनिधी ठरतात. ४ मार्च १८९५ ला दापोली मुक्कामी कोकण रत्नागिरी परिसरातल्या 'नीच लोकांची' एक मोठी परिषद त्यांनी भरविली होती. त्या परिसरातील महार, मांग, चांभारांची ही अभूतपूर्व सभा होती.

पुण्यालाही त्यांनी अशीच सभा भरवून त्यात भावपूर्ण भाषण केले होते. त्यावेळी त्यांनी केलेल्या ठरावात, 'सरकारने मागासवर्गीयांसाठी शाळा सुरू कराव्यात, धर्मशाळा काढाव्यात, त्यांना व्यापार करण्यास प्रोत्साहन व साह्य करावे आणि सरकारी नोकरीत प्रवेश द्यावा.' अशा वस्तुनिष्ठ व कालोचित मागण्या केल्या होत्या.

२४ नोव्हेंबर १९०३ ला शिवराम जानबाजी कांबळे यांनी पुणे जिल्ह्यातील सासवड विभागातील एकावन्न गावांच्या महारांची सभा बोलविली होती. आपल्या 'सोमवंशीय मित्र' ह्या नियतकालिकातून शिक्षणविषयक आणि सर्वांगीण जागृतीचा संदेश ते तळमळीने आपल्या बांधवांना देत होते.

मध्यप्रांत-विदर्भात तर कमालीची शिक्षणविषयक आस्था आढळते. किसन फागूजी बनसोड, त्याकाळी शिक्षण घेऊन कंपोझिंगचे काम करणारी त्यांची पत्नी तुळसाबाई किसन बनसोड यांनी स्वतःचा शिळाछापाचा छापखाना टाकला होता. १९०७ साली चोखामेळा कला शाळा, वसतीगृहे स्थापन केली होती.

गणेश अक्काजी गवई यांनीही अशीच कामे सुरू करून रेटली होती. गोंदिया येथे १९०९ साली कालिचरण नंदागवळी यांनी स्वतःचे रुपये तीन हजार खर्च करून अस्पृश्य मुलींसाठी त्यावेळी शाळा काढली होती. विदर्भ अकोल्याचे जानूजी खंडारेही बोर्डिंग चालवत होते, त्यावेळच्या दशरथ लक्ष्मण पाटील यांनीही १९१३ मध्ये शिक्षणाच्या बाबतीत भरीव कार्य केले होते.

त्यावेळी भरवलेल्या महार सुधारक चळवळीत व त्यांच्या सभेत सादर केलेल्या ठरावातही अग्रक्रम अस्पृश्यांच्या शिक्षणाला दिला आहे. पोटजातींमध्ये विवाह होण्याची गरज प्रतिपादन केली आहे. खुळचट चालीरीतींचा त्याग करण्याचे आवाहनही केलेले आहे. ह्या १९१३च्या

परिषदेची परिणतीच पुढे भारतमंत्री माँट्येग्यू यांना निवेदने सादर करण्यात झाली.

अन्य काही व्यक्ती धार्मिक क्षेत्रात काही काम करीत होत्या. रामटेकचे संत विठोबा मनू पंडे यांनी नागपूरच्या रघूजीराजे भोसले यांच्याकडून १९०७ साली अंबाळा तलावाकाठी अस्पृश्यांच्या पूजासोयीसाठी स्वतंत्र शिवालय बांधायला देणगी घेतली होती.

शिक्षणाचा विचार करता दादासाहेब गायकवाडांचे शिक्षण दोनदा प्लेगच्या चिमटीत अडकले. दहाव्या वर्षी ते चौथी पास झाले होते. पुढे इंग्रजी चौथीत म्हणजे आठवीत आले. १९१४ ला प्लेग आणि महायुद्ध जोरात होते. शिक्षण थबकले. शेतीची सर्वच कामे भाऊराव शिकून तरबेज झाले. १९१८ ला पुन्हा प्लेगने कहर केला.

झालेल्या शिक्षणावर भाऊरावांनी 'एक्साईज' खात्यात काही काळ नोकरी केली. पुढे 'पोस्ट आणि टेलिग्राफ खात्यात ते रूजू झाले. पण बगदादला बदली झाल्याने कृष्णरावांनी नकार दिला. त्यात वयाच्या नवव्या वर्षी लग्नही झालेले होतेच.

१९२० साली नाशिक येथे सुरु झालेल्या शाहू छत्रपती बोर्डिंगवर अधीक्षक म्हणून तेव्हाचे संचालक के. बी. जाधव यांनी त्यांची नेमणूक केली. पगार वीस रुपये मुक्रर केला गेला होता.

विद्यार्थ्यांच्या मानसिकतेशी आणि त्यांच्या विश्वासी भाऊरावांचा प्रत्यक्ष संबंध आला होता. सत्यशोधक चळवळीचे लोण आणि बाबासाहेबांच्या मूकनायक बहिष्कृत भारताचा आणि अनुभवातून उभ्या राहणाऱ्या चळवळीचा प्रभाव छोट्या मोठ्या गोष्टीत प्रतीत होत होता.

सक्तीचे मोफत शिक्षण, शिक्षणासाठी शिष्यवृत्ती, वसतीगृहे बांधण्याचे ठराव, सरकारी नोकऱ्यांत प्रवेश, राजकीय हक्काची मागणी ह्यांचा धोषाच लावला गेला होता. विठ्ठल रामजी शिंदे, शिवराम जानबा कांबळे, चंदावरकर, मुंबई विधीमंडळ सदस्य रावसाहेब सीताराम केशव बोले यांचा ४ ऑगस्ट १९२३ चा ठराव खूपच गाजला होता. बोर्डिंग बांधणे, उभारणे हे काम सार्वजनिक काम म्हणून मान्य झाले होते.

शिक्षण हे सर्व घटक प्राप्तीचे माध्यम असले तरी संध्याकाळच्या चूल पेटण्याची ज्यांच्या घरात वानवा आहे, अशा कुटुंबातील मुलांना ते साध्य होणे दुरापास्त होते. मुलगा एकदा बोर्डिंगात गेला की, त्याची राहण्याशिकण्याची व्यवस्था होणार. त्यांच्या पुढच्या जीवनाची पायाभरणी होणार आणि घरातले एक खाते तोंड व त्याची जबाबदारी कमी होणार असे समीकरण अशिक्षित पण अनुभवी आईबापांना समजत होते. त्यामुळे त्या काळात मागासवर्गीयांसाठी खूप छात्रालये निघाली होती. इतकेच नव्हे, तर पुढे औरंगाबादेस मिलिंद महाविद्यालय आणि त्यांचे छात्रालय असल्याकारणाने विदर्भ मराठवाड्यातील कित्येक मान्यवरांना शिक्षण घेणे शक्य झाले.

म. गांधीजींच्या श्रमप्रतिष्ठेच्या चळवळीचाही दादासाहेबांवर प्रभाव पडलेला होता. अधीक्षक असताना स्वतःची सगळी कामे स्वतः करणे, खोली नीट व स्वच्छ लावणे, शेणाने सारवून निगा राखणे ही कामे तर दादासाहेब करीतच पण आणखीही दोन अलिखित नियम ते निष्ठेने व निग्रहाने पाळायचे. बोर्डिंगातील सर्व मुलांची जेवणे झाल्याशिवाय ते स्वतः कधीच जेवायला बसत नसत. सरकारवाड्याच्या सार्वजनिक वाचनालयात जाऊन मार्क्स,

लेनिन, एंगल्, गांधी, रूसो, व्हाल्टेअर, एडमंड बर्क, जेस्फरसन, थॉमसन पेन आणि अन्य ग्रंथांचे वाचन करण्याची सवय त्यांनी लावून घेतली होती. पोरांचे जेवण झालेले असे. त्याचे ताट वाढून झाकून ठेवलेले असे. त्यांच्या निवासी कार्यालयाला बाहेरून कुलूप त्यावेळी असे, पण आतल्या दाराने, तेथे प्रवेशही करता येत असे. सार्वजनिक कार्यात व चारचौघात वावरणाने, 'आत एक, बाहेर एक' असे वर्तन ठेवू नये अशी त्यांची धारणा होती.

अस्पृश्यता निर्मूलन आणि शिक्षणाकडे व विद्यार्थ्यांकडे लक्ष हे ध्येय दादासाहेबांनी त्या काळी ठेवले होते. पण हीच त्यांची दृष्टी त्यांच्या पुढल्या अर्धशतकाच्या समग्र समाजकार्यातही त्यांनी कसोशीने टिकविलेली पाहावयास सापडते.

राजर्षी शाहू छात्रावासातच त्यांच्यातील समाजसेवक, कार्यकर्ता व राजकारणी घडत गेला. सावरकरांची सशर्त सुटका ब्रिटिशांनी केली होती. त्यांनी रत्नागिरीला अस्पृश्यता निवारणाचे व पतित पावन मंदिराचे कार्य सुरू केले होते. म. गांधीजीच्या खिलाफत स्वराज्य चळवळीचे अपयश स्पष्ट झाल्याने त्यांनीही 'हरिजन' आणि हरिजनोद्धारावर लक्ष केंद्रित केले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मुंबईमध्ये २० जुलै १९२४ ला बहिष्कृत हितकारिणी सभेची स्थापना केली होती. परंपरा न सोडणारे भावनाप्रधान पण सोयीचे राजकारण करणारे गांधीजी एकीकडे; तर प्रखर बुद्धिवाद, सडेतोड तर्कपद्धती आणि दंभस्फोट करणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर एकीकडे, असा लढा त्यावेळी उभा राहिलेला स्पष्टपणे दिसत होता. दलितोद्धार करणारे आणि सर्व हिंदू समाजाचे प्रतिनिधीत्व करणारे एकमेव आपणच; अशी आपली प्रतिमा निर्माण करणाऱ्या महात्माजींना डॉ. आंबेडकरांनी शह दिला होता. गोलमेज परिषद - पुणे करारापर्यंत ह्या दोघांतील हे शब्दयुद्ध आणि कृतीयुद्ध चालूच होते. सर्व थरांतील दलित बाबासाहेबांच्या नेतृत्वाभोवती खेचले जात होते. तत्कालीन लाभांसाठी, पदांसाठी आणि डॉ. आंबेडकरांना विरोध करण्याच्या ईर्ष्येने काही नेते 'काँग्रेसवासी'ही होत होते, म. गांधीजींच्या वधानंतर आणि स्वातंत्र्यप्राप्ती व घटनानिर्मिती आणि निवडणुकांनंतर ही मतलबी प्रक्रिया फारच तीव्र झाली होती. दादासाहेब गायकवाड आपल्या नेत्यापासून व राजकीय गुरूपासून कधीही दूर गेले नाहीत. बापूसाहेब राजभोज, आर. डी. भंडारे, बाळासाहेब तिरपुडे, वगैरे मंडळी आणि जगजीवनरामसारखे नेते दादासाहेबांनी जवळून पाहिलेत. पण 'एकदा ज्याला देव मानले व श्रद्धा दिली ती कायमची' हे त्यांचे ब्रीद होते.

पुढेही बाबासाहेबांच्या चितेला साक्ष ठेवून त्यांनी शपथ घेतली होती की, 'माझ्या जिवात जीव असेपर्यंत बाबासाहेबांचे कार्य पुढे नेण्याचा प्रयत्न करीन.'

बाबासाहेब आणि दादासाहेब यांनी फार मोठ्या प्रमाणात अनेक क्षेत्रात कार्य केले आहे. महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह, काळाराम मंदिर चळवळ, स्वतंत्र मजूर पक्ष, शे. का. फेडरेशन, समता सैनिक दल, मजुराचे, श्रमिकाचे, वेठबिगारांचे, खोतीचे, भूमिहीनांचे वतनदारांचे कितीतरी लढे आहेत. पण दादासाहेबांनी बाबासाहेबांचे शिक्षणविषयक संदेश फारच कसोशीने व निग्रहाने अमलात आणलेत.

शिकणे ही सातत्यपूर्ण अशी अखंड, अविरत प्रक्रिया असते. कोणाहीकडून तयारी

ठेवली तर शिकता येते. एखाद्या भजनी बुवापासून, तमासगीर, जलसाकार, मेळेवाले, विद्यार्थी, कार्यकर्ते, विविध पक्षांचे - विरोधी मतांचे काही नेते यांच्याकडूनही आपल्याला जे आणि जितके हवे आहे. ते प्राप्त करण्यात त्यांच्याकडून नवे काही शिकण्यात दादासाहेब तत्पर असत.

बाबासाहेबांनी शिक्षणाबद्दल एक मूलभूत सूत्र विशद केले होते. 'बहिष्कृत लोकांनी प्राथमिक शिक्षणाकडे दुर्लक्ष करू नये तसेच उच्च शिक्षणाकडे लक्ष पुरवावे.' एकदा शिक्षणाची अक्षयवल्ली हाताशी आली तर तिची प्रभाविता चढतीवाढतीच असावी, असे त्यांचे म्हणणे होते.

मुलींच्या व स्त्रियांच्या शिक्षणाबद्दल बाबासाहेब आणि दादासाहेब गायकवाडही अतिशय दक्ष असत. ते आग्रहाने म्हणायचे. 'अस्पृश्यांच्या कुटुंबांनी प्रगतीपथावर वाटचाल करायची असेल तर त्यांच्या घरच्या गृहिणी, माता पण सुशिक्षित हव्यात. स्त्रिया जर अडाणी, अज्ञानी असतील तर तो समाज कधीही उन्मत होणार नाही.' ही आशयसूत्रे दादासाहेबांना पटली होती. आपल्या धकाधकीच्या, भारतभरच्या भटकंतीच्या धबडग्यातही दादासाहेब मुलींचे शिक्षण अग्रक्रमाचे मानत.

नाशिक येथे जून १९४४ ला रमाबाई आंबेडकर विद्यार्थिनी वसतिगृहाची स्थापना करण्यात दादासाहेबांनी हिरीरीने भाग घेऊन प्रत्यक्षात आणले. पुढे त्याचा पसारा आणि विद्यार्थिनीसंख्या इतकी वाढली की, १९६२ मध्ये नाशिकच्या नेहरू उद्यानाजवळच्या नव्या इमारतीत नेण्याचेही काम त्यांनी महत्वाने पूर्ण केले.

शिक्षणावर घाला पडण्याचा प्रसंग आला तर दादासाहेब वाघासारखे धावून जात. मुळातच दलित विद्यार्थ्यांना अन्य शाळाचालक, अनेकानेक कारणे दाखवून प्रवेशच देत नाहीत. आता तर खाजगी संस्थामध्ये, शाळामहाविद्यालयामध्ये, शासनाचे परिपूर्ण अनुदान घेऊनही, अल्पसंख्याक स्वतंत्र संस्थांच्या नावाखाली, ही दंडेली वाढतेच आहे.

त्यामुळे सरकारी संस्था आणि त्यांची बदलती धोरणे यांचा दादासाहेब सततच कानोसा घेत असत. १८ जानेवारी १९३९ मध्ये नाशिक येथील मुलांचे सरकारी हायस्कूल बंद करण्याचा प्रस्ताव होता. दादासाहेबांनी त्यावेळी तीव्र लढा उभारून त्यास अटकाव केला.

मनमाड येथे गरीब मुलांसाठी त्यांनी अनेक छात्रालये सुरू केलीत. मुलांच्या राहण्याची, खाण्यापिण्याची आणि अभ्यासाची योग्य सोय व्हावी ह्याची ते काळजी घेत. मनमाडची 'अनाथ विद्यार्थी आश्रम' ही संस्था दादासाहेबांच्या प्रयत्नांचे प्रतीक म्हणाता येईल.

स्कूल बोर्डाचे चेअरमन म्हणून काम करतानाचे कितीतरी अजब व दाहक अनुभव दादासाहेबांच्या गाठीशी होते. शिवाशिवीचा विटाळ पाळणारे अनेक संस्थाचालक त्यांनी अनुभवले होते. अशा शाळा त्यांनी बंद केल्या आणि सगळ्यांचे एकत्रीकरण करून त्यांना नव्या नियमावलीने उचित कामे करण्यास आणि सुसंस्कृतपणाचे वर्तन करण्यास भाग पाडले.

दादासाहेबांचा कामाचा दांडगा उरक आणि धडाका जबरदस्त होता, पैशानोटांची लाच देऊन त्यांचे तोंड बंद करण्याचे, त्यांना गुंडाळून, विकत घेऊन मिंधे करण्याचेही अनेकानेक प्रयत्न झाले. पण ऐन पंचविशीत ज्याने बाबासाहेबांची सभा उधळू पाहणाऱ्या त्यांच्या

छत्रपती शाहू बोर्डिंगचे संचालक संभाजी रोकडे आणि जाधव मंडळींना अफरातफरीचा, पैसे खाल्ल्याचा आरोप-आणि पोलिसात सोपविण्याचा धाक घातला होता, त्यांचे दात त्यांच्याच घशात घालून नामोहरम केले होते. त्यांच्यावरील १५० रु. चे देणे काढणाराना रु.२०/- प्रमाणे आपण वर्षभराचा पगार घेतलाच नाही. चालकांनी कधी दिलाच नाही. तो वळता करून आपलेच ९० रु. येणे बाकी आहे असे सांगून, आरोप मागे घ्यायला भाग पाडून राजीनामा दिला होता.

सार्वजनिक कार्यकर्त्यांवर अनेक खोटेनाटे आरोप होत असतातच. बाबासाहेबांचा उजवा हात असलेल्या दादासाहेबांवरील त्यांचा विश्वास अनेकांचा पोटशूळ उठवायचा. पुनाजी लळिंगकर, आर. आर. भोळे, जी. एम. जाधव उर्फ मडकेबुवा ह्यांच्या उपयोगाने दादासाहेबांनाही बरेवाईट ऐकावे लागले.

शिक्षण हे जनताजनार्दनाशी संवाद संपर्काचे साधन आहे, असे दादासाहेब समजत. विटेकरबाबा नावाचे एक कथेकरी रामकृष्ण अन्य देवदेवता यांच्याबद्दल इतक्या वेगळ्या तऱ्हेने बोलत की पटले, आवडले नाही तरी ऐकतच राहावेसे वाटे. त्यांचे ऐकण्यात दादासाहेबांना आनंद वाटे.

आंबेडकरी चळवळ आंबेडकरी जलसाकारांनी वाहती आणि धगधगती ठेवली. जलसाकार जागल्यांचे, जनजागरणाचे काम करतात. जलसा कालावंतांना; रंजनापलीकडच्या लोकभावना व लोकशिक्षणाची जाणीव दादा करून देत. नाशिकचे पाटील आणि पिंपळगावचे गणपत मोरे यांच्याशी त्यांचा संपर्क असे.

आपल्या ग्रामीण जनतेवर, तिच्या मनाच्या मोठेपणावर दादासाहेबांचा प्रचंड विश्वास होता. सामान्याशी अगदी साध्या गावरान भाषेत खुमासदार पद्धतीने संवाद साधणारे ते असामान्य नेते होते. सगळ्यांबद्दल त्यांना आत्मीयता असे.

कूळकायदा, खोती, कुटुंब नियोजन बिल, झोपडपट्ट्या, नदीकाठच्या पूरग्रस्त वसाहती, खोटी मापे घेणारे व्यापारी, तलाठी, पटवारी, कुटुंब नियोजन बिल, यांच्यापासून तो पुनर्वसन आणि अनेक कमिशन्स व योजनांवर खासदार म्हणून दादासाहेबांनी समरसून, सर्वस्व ओतून काम केले आहे. अपयशातूनही चळवळ करण्यासाठी आत्मविश्वास गोळा करणारे अनोखे असे ते कार्यकर्ते होते. कुटुंब नियोजनाबद्दल तर ते म्हणायचे - "ग्रामीण जनता निरक्षर असली तरी खरे हित कशात आहे. हे तिला चांगले समजते." नसबंदी शस्त्रक्रियेबद्दल अशी धारणा व सामान्यजनांचे मन वाचणारा हा विरळा नेता होता.

विद्यार्थ्यांचे उज्ज्वल भविष्य आणि सर्वंकष कल्याणाचा वसा दादासाहेब गायकवाड यांनी घेतला होता. जे फक्त ग्रांथिक अभ्यासाकडेच लक्ष देतात, प्रकृतीची हेळसांड करतात, अशा विद्यार्थ्यांची त्यांना अधिक काळजी वाटे. त्यांनी आपल्या भाषणात प्रकटपणाने, विद्यार्थ्यांनी असे कधीही करू नये, असे बजावून ठेवले आहे. त्यांच्याच शब्दात "काही विद्यार्थ्यांना शिक्षणाची इतकी आस लागली आहे की, ते शारीरिक प्रगतीकडे बिलकूल लक्ष देत नाही. तेव्हा अभ्यासाप्रमाणेच स्वतःच्या प्रकृतीचे सुद्धा त्यांनी अध्ययन केले पाहिजे." (बहिष्कृत विद्यार्थी संमेलन अध्यक्षपदावरून १५ मे १९३७ ला केलेले भाषण. वृत्तान्त जनता २५.५.१९३७.)

**दादासाहेब गायकवाड हे लोकनेते होते. नंतरच्या स्वयंमन्य संधिसाधूंनी त्यांचा 'धोतऱ्या' म्हणून उपहासही केला. पण लोकाभिमुखतेची सदैव जाग हे दादासाहेबांच्या नेतृत्त्वाचे मूलगामी वैशिष्ट्य होय. जेथे जेथे व जेव्हा जेव्हा दीनदुबळ्यांचे प्रश्न उपस्थित होतात, मग ते व्यक्तिगत असो की सार्वजनिक बाबतीत असोत, तेथे दादासाहेब बंदुकीच्या गोळीसारखे तुटून पडतात.'' (लोकांचा माणूस दा. ता. रूपवते. धर्मज्योती - दा. गा. गौरव विशेषांक - पृ. ४०, १५ ऑक्टो. १९६८)**

दादासाहेब हे बौद्ध समाजातले पहिले 'पद्मश्री' होत. त्यांचे आयुष्य ही समर्पणाची गाथाच असल्याने २६ जाने. १९६८ मध्ये त्यांना 'पद्मश्री' चा किताब बहाल केला होता. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, दादासाहेब वेळोवेळी खूप पत्रे लिहिली आहेत. त्यांचा विश्वास, घरोबा आणि आस्था ह्या गोष्टीला दादासाहेब सर्वस्वी पात्र होते, हीच त्यांच्या कार्यकुशल व्यक्तित्त्वाची सर्वात मोठी गोष्ट आहे, ह्यात शंकाच नाही.

त्यांच्यानंतरच्या बहुसंख्य कार्यकर्त्यांनी त्यांच्या कामाला मन:पूर्वक दाद दिली आहे. पेरूमल कमिटीवरील त्यांचे कार्य, पायाला भिंगरी लावून अख्खा भारत त्यांनी पिंजून काढला होता; हे कार्य त्यामुळे अविस्मरणीय असेच आहे. त्यांचे वक्तृत्व विलक्षण होते. बोलीतला गोडवा, प्रापंचिक दृष्टांतांची लज्जत, वाक्प्रचार, म्हणी आणि गावरान उच्चारणातला ठसका, उपरोध आणि बोचरेपणाने खिळवून ठेवी. म्हणूनच ''कर्मवीरांनी आपल्या ओजस्वी वक्तृत्वाने सारा भारत अन्यायाच्या प्रतिकारासाठी लढण्याकरिता खडबडून जागा केला.'' (भारतीय भूमिहीनांचे त्राते कर्मवीर दादासाहेब गायकवाड वा. कों. गाणार. दा. गायकवाड स्मरणिका, डॉ. आंबेडकर महाविद्यालय, दीक्षाभूमी नागपूर प्रकाशित १५ ऑक्टो. १९७२ पृ. ५९)

त्यांच्या अनेक पैलूंमध्ये शिक्षणविषयक विचारांचे आणि कार्याचे निराळेपण जाणवून त्यांच्या द्रष्टेपणाचे अप्रूप वाटते. ''मुली शिकल्या तर त्यांच्या कुटुंबाचे कल्याण होईल ही दूरदृष्टी यामागे दिसून आली. शैक्षणिक क्षेत्र, सामाजिक क्षेत्र व त्यातही दलितांचा सर्वार्थाने उद्धार हे त्यांनी आपले जीवनध्येय मानले म्हणून संसदेमधली त्यांची व्याख्याने अत्यंत व्यासंगी व अर्थपूर्ण असत.'' (चौफेर अन् चतुरस्त्र दादासाहेब गायकवाड - भावना भार्गवे. त्रिकालयुग १५ ऑक्टोबर १९९३ वर्ष १२/अंक १० संपादक रमेश जाधव - नाशिक)

संस्कृतीच्या अंगोपांगापैकी शिक्षण ही अत्यंत मौलिक अशी बाब आहे. तसे 'आंबे' या खेडेगावी आणि शंभर वर्षापूर्वीच्या नाशकात, दादासाहेबांनी मूळाक्षरे उपेक्षेच्या ओट्यावर बसूनच गिरवली होती. काही मुले कशी मजेत जगतात हेही कळतेपणी ते पाहत होते. त्यातलेच एक ज्येष्ठ विद्यार्थी श्रीपाद अमृत डांगे होत.

त्यामुळे, विद्यार्थी कल्याणासाठी दादासाहेब विकलांग अवस्थेतही आमरण चौकन्नेच होते. १५ नोव्हें. १९७१ ला पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधीना भेटण्यासाठी त्यांना दिल्लीला नेले गेले होते. तेव्हा त्यांनी अन्य खासदारांकडून निवेदन वाचले. उठून उभ्या राहात त्यांनी दादासाहेबांची त्यांच्या प्रकृतीची आस्थेने विचारपूस केली आणि म्हणाल्या, ''शासन ने बौद्ध विद्यार्थिओंको सहूलियते देने का निर्णय किया है।''

''अशा प्रकारे मृत्यूची छाया त्यांच्यावर पडली असतानादेखील त्याची पर्वा न करता

आपले जीवनध्येय गाठण्याकरीता आपले संपूर्ण आयुष्य वेचले.'' (कर्मवीर पद्मश्री दादासाहेब गायकवाड खासदार ना. ह. कुंभारे. दादासाहेब गायकवाड स्मरणिका १५ ऑक्टोबर १९७२ पृष्ठ ४७ संपादक : प्रा. मधुकर काशिनाथ डोंगरे - नागपूर)

दलितांच्या अस्मितेचा, समानतेचा आणि मूल्यशोधक माणुसकीचा हा लढा, एकविसाव्या शतकातही चालूच राहणार आहे. इथली दोगली विचारप्रणाली आणि विश्वासघातकी आचरणवृत्तीची मानसिकता बदलत नाही तोपर्यंत हे अटळ आहे. पण डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि दादासाहेब गायकवाड ह्या राजकीय नेत्यांचे आणि उपेक्षितांच्या त्रात्यांचे शब्ददिवे; वाटा उजळतील हा विश्वासही राहणार आहे.

# जातिनिर्मूलनाच्या चळवळी आणि दादासाहेब गायकवाड

**उत्तम कांबळे**

वर्णव्यवस्थेवर आणि जातींवर उभ्या राहिलेल्या भारतात जातिनिर्मूलनासाठी लढण्याची एक मोठी परंपरा आहे. चार्वाक, बुद्ध, महात्मा फुले, कबीर, तुकाराम, डॉ. बाबासाहेब आंबेडकर आदी अनेक महापुरुषांनी आणि संतांनीही जातीविरुद्ध बंड पुकारले. राजर्षी शाहूमहाराजांसारख्या पुरोगामी राजांनी या बंडाला आपापल्या परीने प्रेरणा दिली. महात्मा फुले ते आंबेडकर या कालखंडात जातिनिर्मूलनाच्या लढाईला विलक्षण धार आलेली दिसते. महात्मा फुले हे बाबासाहेबांना गुरुस्थानी होते. फुल्यांच्या क्रांतिकारी विचारांची परंपरा बाबासाहेबांनी तेजस्वीपणे चालवली. दरम्यानच्या काळात राजर्षी शाहूमहाराजांनी दलितांसाठी म्हणून ठोस निर्णय घेतले. महारांची वतने रद्द करणे; त्यांच्याकडील जमिनी त्यांच्याकडेच कायम ठेवणे, त्यांच्यासाठी मोफत शिक्षण देण्याचा कायदा करणे, शिक्षण सक्तीचे करणे, आंतरजातीय विवाहाला प्रोत्साहन देण्यासाठी कायदा करणे, गंगाराम कांबळे या महार जातीतील व्यक्तीस हॉटेल सुरू करून देणे, गुन्हेगारी जमातीची हजेरी बंद करणे, त्यांच्यासाठी स्वतंत्र वसाहती स्थापन करणे असे दलितोद्धारासाठी अनेक कायदे केले. त्यांच्या कायद्याचे कार्यक्षेत्र करवीर संस्थानापुरते मर्यादित होते. पण या क्रांतिकारी निर्णयाचा इतरत्र सुरू असलेल्या जातिनिर्मूलनाच्या लढायांना बळ मिळत होते. फुल्यांची अनेक स्वप्ने शाहूराजांनी वास्तवात आणली, तर फुले आणि शाहूराजांच्या अनेक स्वप्नांना बाबासाहेबांनी मूर्त स्वरूप दिले. भारतीय राज्यघटनेत दलितांना नागरिक म्हणून प्रतिष्ठेचे स्थान दिले. 'एक मत समान पत' हे तत्त्व अंगिकारून जातिव्यवस्थेवर मोठा आघात केला. महाराष्ट्रातील जातिनिर्मूलनाच्या लढायांचा विचार करताना या तिन्ही महापुरुषांचे वैचारिक आणि क्रांतिकारक नातेसंबंधही समजावून घेतले पाहिजेत. कोल्हापूर जिल्ह्यातील माणगाव या ठिकाणी राजर्षी शाहूमहाराजांच्या उपस्थितीत जी एक ऐतिहासिक परिषद झाली तीत संमत केलेला एक ठराव असा आहे : 'शाहू छत्रपतींनी आपल्या राज्यात बहिष्कृतांना समान हक्क देऊन त्यांचा उद्धार करण्याचे सत्कृत्य आरंभल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करून त्यांचा प्रत्येक वाढदिवस प्रत्येक बहिष्कृत व्यक्तीने सणाप्रमाणे साजरा करावा.'[१] या ठरावावरूनही बाबासाहेबांनी शाहूराजांच्या दलितोद्धाराच्या कार्याला किती महत्त्व दिले होते हे लक्षात येईल. परिषदेत मांडण्यात आलेल्या या ठरावाला

एकूण ठरावांमध्ये दोन नंबरचे स्थान देण्यात आले आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनातील बहुतेक सगळा भाग जातिव्यवस्थेविरुद्ध लढण्यात खर्च झाला आहे. जात नावाच्या संस्थेची ओळख झाल्यापासून ते आपल्या शेवटच्या श्वासापर्यंत जातीविरुद्ध लढत राहिले. अनेक वेळा जातीने त्यांना जखमी केले, त्यांचा अवमान केला, पण ते डगमगले नाहीत. जातींबरोबरच जातीचे समर्थन करणाऱ्या तत्कालीन मोठ्या पुढाऱ्यांबरोबरही त्यांनी दोन हात केले. जातीविरुद्धच्या चळवळीत बाबासाहेबांना अनेक विश्वासू व समर्पित भावनेचे कार्यकर्ते लाभले. बाबासाहेबांचे ते शिष्य झाले. चळवळीत त्यांच्या खांद्याला खांदा लावून ते लढले. परिवर्तनाच्या लढाईची बाबासाहेबांनी आखणी करावी, तिची दिशा ठरवावी आणि कार्यकर्त्यांनी मोठ्या हिरीरीने ही लढाई सर्वत्र पोहोचवावी असे घडत आले आहे. कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे बाबासाहेबांच्या विश्वासू सहकाऱ्याचे, शिष्याचे आणि कार्यकर्त्याचे नाव. नाशिकमध्ये शाहू बोर्डिंगच्या सुपरिटेंडेंट या पदावर असताना दादासाहेब गायकवाड आणि बाबासाहेबांची भेट झाली आणि पुढे या भेटीचे एका अतूट अशा गुरू-शिष्याच्या नात्यात रूपांतर झाले. दादासाहेब हे बाबासाहेबांसाठी आपल्या तळहातावर प्राण घेऊन उभे असलेले दिसतात. बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली झालेल्या प्रत्येक आंदोलनात ते महत्त्वाची भूमिका पार पाडतात हेही आपल्याला पाहावयास मिळते. बाबासाहेबांनी निर्माण केलेले शिष्य 'जी हुजूर' म्हणणारे किंवा मौनी नव्हते, तर प्रज्ञावंत होते. गुरूने शिष्याचा अंगठा घेण्याच्या परंपरेला छेद देणारे हे नाते होते. बाबासाहेब अनेक महत्त्वाच्या जबाबदाऱ्या दादासाहेबांवर सोपवत आणि दादासाहेब आपले सर्व बळ एकवटून त्या पार पाडीत. राजकीय, सामाजिक जीवनातील अनेक महत्त्वाच्या निर्णयाविषयी बाबासाहेबांनी दादासाहेबांशी चर्चा केल्याचे आढळते. दोघांमधील नाते अतूट विश्वासावर, प्रेमावर उभे होते. दादासाहेबांवर बाबासाहेबांचा किती विश्वास होता हे नाशिक जिल्ह्यातील येवले येथे बाबासाहेबांनी केलेल्या भाषणावरून लक्षात येते. दादासाहेबांचा गौरव करताना बाबासाहेब म्हणाले, ''तुम्ही माझा नेहमी जयजयकार करता; माझे गोडवे गाता; माझ्या कर्तबगारीची तारीफ करता; मलाच तुमचा नेता समजता. पण मी प्रत्यक्ष असे काहीच कार्य करत नाही. मी माझी नोकरी सांभाळून जमेल तेवढेच सामाजिक आणि सार्वजनिक कार्य करतो. म्हणजे तुम्हाला फक्त 'विचार' देतो. विचार कोणीही देईल. शास्त्र सांगणे तसे फार अवघड कार्य नसते. पण ते आचरणात उतरवणे, शास्त्राला व्यवहाराची जोड देणे हेच कार्य प्रत्यक्ष कार्य असते व ते करणे बिकट असते. ते करताना कितीतरी संकटांना तोंड द्यावे लागते. कायिक, वाचिक, मानसिक अत्याचार सहन करावे लागतात. मानहानी एवढी होते की, त्याची शब्दांत किंवा संख्येत गणतीच करता येत नाही. काळाराम सत्याग्रहाच्या वेळी हा माझा भाऊराव गायकवाड या प्रत्येक कसोटीवर शंभर नंबरी सोन्यासारखा उतरला आहे. हे सोने अतिशय शुद्ध आहे. सर्व प्रगती हेच स्वतःच्या जीवनाचे ध्येय मानले आहे. त्याला अन्य जीवन नाही. त्याचा वडिलोपार्जित धंदा शेती आहे. पण हा वर्ष, दोन वर्षांत एकही दिवस त्याच्या गावाला जाऊन मुक्काम करत नाही. असा एक खऱ्याखुऱ्या तळमळीचा कार्यकर्ता स्वतःच्या कर्तृत्वाने मुंबई कायदे मंडळावर निवडून आला. यामुळे मला तर शब्दांच्या पलीकडे आनंद व अभिमान वाटतो.[२] बाबासाहेबांनी ज्या दिवशी (१४ एप्रिल १९३७) हे

भाषण केले त्या दिवशी त्यांचा ४५वा वाढदिवस होता. स्वतःच्या वाढदिवशी आपल्या शिष्याबद्दल भरभरून बोलणारा तो नेता आणि त्याचा शिष्य दोघेही धन्य म्हणावे लागतील. थोडेसे विषयांतर करून ही माहिती देण्याचे कारण एवढेच की, या गुरू-शिष्याचे नाते नेमके समजावून घेणे महत्त्वाचे आहे. ते केल्यास दादासाहेबांच्या कर्तृत्वाकडे नीट पाहता येते.

दादासाहेबांचा जन्म १५ ऑक्टोबर १९०२चा. नाशिक जिल्ह्यातील आंबे (ता. दिंडोरी) हे त्यांचे जन्मस्थान. आंबे गावाला तशी फार मोठी आणि वेगळी ओळख नाही. बाणगंगेच्या कुशीत बसलेले आणि नारोशंकर राजेबहाद्दर यांची ओळख सांगणारे गाव. इतर गावांप्रमाणे याही गावातील माणसे गाववाड्यात म्हणजे जाती-जातींच्या उतरंडीत कोंडली गेलेली. जात हीच त्यांची ओळख. दादासाहेबांच्या घराला देवधर्माचा व अध्यात्माचा मोठा वारसा, पण तरीही मंदिरात प्रवेश करण्यास त्यांना परवानगी नव्हती. चोखा महाराप्रमाणे आपल्याला ठरवून दिलेल्या पायरीवरूनच देवाचे दर्शन घ्यायचे. देवळातल्या देवाचे जवळ जाऊन दर्शन घेण्यास बंदी, सवर्णांच्या विहिरी शिवण्याची बंदी, शाळेत सवर्णांच्या मुलाशेजारी बसण्याची बंदी, दुकानात पेसे देऊनही फेकलेल्या वस्तूच पदरात झेलण्याची प्रथा आदी सर्वकाही दादासाहेब अनुभवत होते. माणसाच्या सर्वांगाला चिकटलेली आणि अष्टसुंडीप्रमाणे दलितांचे रक्त हजारो वर्षांपासून पिणारी जात दादासाहेबांच्या आडनावातही चिकटली. प्रत्येकाच्या नावातूनच त्याची जात दिसावी अशी येथील व्यवस्था होती. कुणाचे नाव काय असावे हे जातीनेच म्हणजे येथील व्यवस्थेने ठरविले आहे. ब्राह्मणाचे नाव मंगलवाचक, क्षत्रियाचे नाव बलवाचक, वैश्याचे नाव धनसंयुक्त व शूद्रांचे निंद्य असावे.[३] असे मनुस्मृतीत म्हटले आहे. शाळेत दादासाहेबांचे भावड्या किसन महार असे नाव लावले होते. त्यांच्या आडनावावरून त्यांची जात कोणती हे वेगळ्या शब्दांत सांगण्याची आवश्यकता नव्हती. पुढे ते नाशिकला आल्यानंतर त्यांचे नाव बदलून पाठक मास्तरांनी ते भाऊराव कृष्णराव गायकवाड असे केले. जन्मापासूनच त्यांच्या आडनावाला चिकटलेली जात काहीशी दूर झाली, पण समाजातील जात थोडीच संपली होती?

जातीचे अनेक छोटे-मोठे चटके दादासाहेबांना बसत होते. साऱ्या समाजाला ते बसत होते. बालवयात त्यांनी याविषयी फारसे प्रश्न विचारले नसतीलही कदाचित; पण शाहू बोर्डिंगचे सुपरिटेंडेंट म्हणून त्यांची नियुक्ती झाल्यानंतर ते पुस्तकांच्याही जवळ गेले. सत्यशोधक चळवळीचे तसेच विठ्ठल रामजी शिंदे यांच्या चळवळीचे पडसाद त्यांना ऐकू येऊ लागले. शिवराम जानबा कांबळे यांचे कार्य आणि त्यांचे 'सोमवंशीय मित्र' हे मासिकही निघते, हेही त्यांच्या कानावर येऊ लागले. विधिमंडळात (कौन्सिलात) अस्पृश्यांबद्दल सुरू असलेली छोटी-मोठी चर्चाही त्यांच्या कानावर येत होती. त्यातूनही दादासाहेबांच्या जाणिवा जागृत होण्यास मदत होत होती. स्वतःच्या जीवनात त्यांना अस्पृश्यतेचे दाहक चटके बसतच होते. त्यांचे स्वतःचे गुऱ्हाळ होते आणि त्यातील गुळावर समस्त व्यापाऱ्यांनी टाकलेल्या बहिष्कारामुळे तर दादासाहेब अधिक बंडखोर बनले. त्यांच्या गुऱ्हाळावर सवर्ण मजूर काम करत असत. अस्पृश्य मजूर ठेवल्यास गूळ बाटेल म्हणून ही व्यवस्था होती. निदान आपण आपल्या स्वतःच्या मालकीच्या गुऱ्हाळावर तरी बंड करावे म्हणून त्यांनी अस्पृश्य मजूर लावून गूळ तयार केला. पण गूळ खरेदी करण्यासाठी कोणीच ग्राहक

येईनात. पंधरा दिवस गूळ पडून राहिला, पण ग्राहक काही फिरकेना. दरवर्षी आंबे गावाची वाट तुडवत येणारे ग्राहक कोठे गेले कळेना. शेवटी दादासाहेबांनी नाशिकच्या बाजारात गूळ आणला, पण तेथेही गूळ विकला गेला नाही. नाशिकमधून दादासाहेबांनी घोटी या नाशिक-मुंबई मार्गावरील इगतपुरीजवळील बाजारपेठेत गूळ नेला. तेथेही नाशिकप्रमाणेच अनुभव आला. ग्राहक काही आलेच नाहीत. गूळ तर चांगला होता, पण ग्राहक मात्र फिरकत नव्हते. गूळ; एका शूद्राने म्हणजे महाराने बनवला होता. गूळ विटाळलेला होता, भ्रष्ट झालेला होता म्हणून तो कोणी खरेदी करायचा नाही असेच व्यापाऱ्यांनी ठरवले होते. दादासाहेबांची जात जणू गुळातील कणाकणाला चिकटली असल्यासारखे वातावरण व्यापाऱ्यांनी तयार केले. साऱ्या कुटुंबाने रात्रं-दिवस कष्ट करून तयार केलेला गूळ आता कोठे घेऊन जायचा असा प्रश्न होता. जातीचा फटका किती जोरदार असतो आणि तो गुळापर्यंत कसा पोहोचतो हे दादासाहेबांना समजले होते. शूद्रांच्या ऊसाला सवर्णांनी हात लावला तर त्यातून तयार होणारा गूळ बाटत नाही, पण शूद्रांनी स्वत:च्या ऊसाला हात लावून गूळ तयार केला तर मात्र तो बाटतो, असा हा जातिव्यवस्थेचा अजब सिद्धान्त होता. दादासाहेबांनी घोटी ते नाशिक या परतीच्या प्रवासात सारा गूळ शूद्रांना वाटून टाकला, पण ते करताना स्वत:चे गुऱ्हाळ स्वत:च चालवायचे हा त्यांचा निर्धार मात्र कायम होता. गुऱ्हाळ प्रकरणाने दादासाहेबांना जातिव्यवस्थेची काटेरी रूपे दाखविली. जातिव्यवस्था किती गच्च असते हेही शिकवले. जातिव्यवस्थेची ही बंदिस्त चौकट मोडण्यासाठी त्यांना लढायचे होते. जातीच्या चौकटीत एक जात दुसऱ्या जातीला नीच मानत असते. प्रत्येक जातीच्या डोक्यावर वरच्या कुणाचा तरी पाय असतो आणि तिचा पाय खालच्या कोणाच्यातरी डोक्यावर असतो. शूद्रांच्या डोक्यावर सर्वांचेच पाय. आपला पाय ज्याच्या डोक्यावर ती जात शूद्र आणि आपल्या डोक्यावर जिचा पाय असतो ती जात मोठी, असाच सिद्धांत. वरची जात जसा हा सिद्धांत पाळते तसाच खालची जातही तो पाळत असते. नाशिकमध्ये असेच झाले. दादासाहेब एकदा आपले भंगी समाजातील एक मित्र रामभाऊ पाला मारू यांच्याकडे भजनासासाठी गेले. तेथे त्यांनी चहा घेतला. मसाला दूधही घेतले. महार समाजातील लोकांना ही गोष्ट सहन झाली नाही. दादासाहेबांनी इतके हलके कृत्य करायला नको होते अशी या समाजातील पंचांची आणि म्होरक्या मंडळींची धारणा झाली. दादासाहेबांनी काहीतरी धर्मबाह्य कृत्य केले आहे या भावनेने त्यांच्याकडे ते पाहू लागले. काहीजण त्यांना धमक्या देऊ लागले. काहीजण असे करणे बरे नव्हे, असे प्रेमाने सांगू लागले. दादासाहेबांवर चिडलेले मेहेतर म्हणजे त्या काळात जातीचे पुढारपण करणारी मोठी असामी होती. दादासाहेबांना धडा शिकवण्यासाठी ती संधीची वाट पाहत होती. दादासाहेबांनी भंग्याच्या हातचे दूध पिऊन जणू घोर अपराध केला आहे, असा प्रचार त्यांच्या जातीत सुरू झाला. नाशिकपासून सुमारे दहा किलोमीटरवर नाशिक-दिंडोरी मार्गावरील तळेगावात, अर्जुन भडदिवे नावाच्या माणसाकडे दादासाहेब श्राद्धाचे (तेराव्याचे) जेवण घेण्याकरिता गेले होते. पूर्वी श्राद्धाचे जेवण सुरू करण्यापूर्वी ज्ञातिबांधवांची सभा व्हायची. सभा सुरू झाली. सभेला मेहेतरही हजर होते. दादासाहेबांनी एका भंगी बांधवाकडून दूध घेतल्याबद्दल त्यांना जातीबाहेर काढण्याचा आणि त्यांच्याशी रोटी-बेटी व्यवहार बंद करण्याचा निर्णय जवळपास एकतर्फीच या सभेत घेण्यात

आला. सभेत दादासाहेबही बोलायला उभे राहिले आणि आपल्या बांधवाच्या डोळ्यांवरील जातीची झापडे दूर होतील असे तडाखेबाज भाषण त्यांनी केले. जातिव्यवस्थेचे सारे तोटे त्यांनी सांगितले. 'आपण बलुतेदारीच्या नावाखाली आपला स्वाभिमान कसा गमावून बसलो आहोत; मृत जनावरांचे मांस आपण गिधाडाप्रमाणे खातो; आपल्याला समाजात कमी लेखले जाते आणि दुसऱ्याला कमी लेखण्यात शहाणपणा आहे काय? जाती संपाव्यात असेच मला वाटते. त्यासाठीही मी प्रयत्न करणार आहे. कोणी कुणाला अस्पृश्य मानू नये आणि तुम्हीही कोणाला अस्पृश्य मानू नये. जाती संपवण्याचा मार्ग मी स्वीकारला आहे. साक्षात मृत्यूच्या रूपाने यम जरी माझ्यासमोर आला तरी मी माझा मार्ग बदलणार नाही. जाती मोडल्याच पाहिजेत म्हणून मी दूध प्यालो आहे. एकीकडे जग पुढे जात आहे आणि तुम्ही मात्र स्वत:ची आणि तीही उपेक्षित असलेली जात गोंजारत बसला आहात. दुसऱ्या जातीची उपेक्षा आणि द्वेष करत आहात. मला वाळीत टाकण्याची भाषा तुम्ही करत आहात. ठीक आहे. मी माझा निर्णय बदलणार नाही. तुम्ही जेवून घ्या. मी निघालो' असे म्हणत दादासाहेब निघालेही. श्राद्धाचे जेवण देणाऱ्या यजमानाला खूप वाईट वाटले. दादासाहेबांनी सांगितलेले या यजमानाला म्हणजे भडदिवेंना पटले होते. तावातावाने ते मेहेतऱ्यांना म्हणाले, "जेवण माझे आहे. दादासाहेब जेवणारच. तुम्ही हवे तर थांबा. अन्यथा चालते व्हा." मेहेतऱ्यांची बोबडी वळली आणि आपली चूकही त्यांना कळली. त्यांनी पुन्हा कधी बहिष्काराचे अस्त्र उगारले नाही.

जातिनिर्मूलनाची भाषा सोपी असली तरी कृती खूप अवघड असते. कृतीसाठी किंमत चुकवावी लागते. मान-अपमान सहन करावे लागतात. विशेष म्हणजे या कृतीचा प्रारंभ स्वत:पासूनच व्हावा लागतो. तो तसा झाला नाही तर आपल्या बोलण्याला पत, विश्वासार्हता आणि जिव्हाळा प्राप्त होत नाही. बोलण्याला नैतिक आणि कृतीचे बळ असावे लागते. सुधारण्यासाठी पडेल ती किंमत मोजण्याची तयारी असावी लागते. दादासाहेबांकडे ती होती. भेदाभेद संपला पाहिजे ही त्यांची मनापासूनची इच्छा. जात टिकवून ठेवण्याची नव्हे, तर फेकून देण्याचीच असते हे दादासाहेबांना पटले होते. प्रश्न कृतीचा होता आणि ज्ञातिबांधवांना न आवडणारी कृती त्यांनी केली. त्यांच्या डोक्यावर बसलेले जातीचे भूत उतरवण्याचाही प्रामाणिकपणे प्रयत्न केला. दादासाहेब ज्या काळात ही गोष्ट करत होते तेव्हा ते कोणी फार मोठे नव्हते. भाऊसाहेबांचे रूपांतर दादासाहेबांमध्ये अद्याप व्हायचे होते. केवळ इच्छाशक्तीच्या जोरावर त्यांनी ही छोटी लढाई केली. आपल्या प्रभावी आणि गावरान वाणीने त्यांनी मेहेतरांमध्ये परिवर्तन करण्याचा प्रयत्न केला. महार आणि भंगी यांच्यातील भिंत हलविण्याचाही प्रयत्न केला. एका मोठ्या युद्धाचा हा छोटा प्रारंभ होता. जेव्हा त्यांनी ही छोटी लढाई केली तेव्हा त्यांचे गुरू डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याशी त्यांची भेट झाली नव्हती. भोवताली असलेल्या परिस्थितीत बदल झाला पाहिजे आणि बदलाचा प्रारंभ स्वत:पासून केला पाहिजे ही एक प्रबळ इच्छा मात्र या कृतीमागे होती. पुढे बाबासाहेब आणि त्यांची भेट झाली. बाबासाहेबांनी जातीचे विश्लेषण केले. शूद्रांचा इतिहास मांडला. जाती तयार करणाऱ्यांचे कुटिल हेतू जगासमोर मांडले. गुलामाला जागे होण्याची हाक दिली. एका मोठ्या युद्धाला प्रारंभ केला आणि या युद्धात दादासाहेब झाले बाबासाहेबांचे सरदार.

दादासाहेबांना जातिनिर्मूलनाच्या लढाईचा मोठा प्रयोग पाहायला आणि करायला मिळाला तो इतिहासात प्रसिद्ध झालेल्या महाड येथील चवदार तळ्याच्या सत्याग्रहात. या सत्याग्रहात दादासाहेबांचा सक्रिय सहभाग होता. १९२३ साली तेव्हाच्या विधिमंडळात रा. ब. बोले यांनी एक ठराव मंजूर करून घेतला होता. या ठरावानुसार महाड नगरपालिकेच्या चवदार तळ्यात पाणी भरण्याचा हक्क अस्पृश्यांना मिळणार होता. या हक्काची अंमलबजावणी करण्याचा आणि या देशातील स्वातंत्र्य, समता व बंधुतेला साद घालण्याचा हा प्रयत्न होता. स्पृश्य आणि अस्पृश्य यांच्यामध्ये असलेली विषमता दूर करण्याचा प्रयत्न कायद्याने केला होता; पण प्रत्यक्षात पाण्यास स्पर्श करता येईल की नाही हे आता पाहायचे होते. या निमित्ताने संपूर्ण अस्पृश्य समाजात स्वाभिमानाची ज्योत पेटवण्याचा प्रयत्नही होता. आपण माणसे आहोत, देशाचे नागरिक आहोत. तळ्यातील पाण्याला स्पर्श करण्याचा आपल्यालाही अधिकार आहे हेही या निमित्ताने सांगायचे होते. पाण्याच्या एका एका थेंबास स्पर्श करण्यासाठी आसुसलेले आणि आपण माणसे आहोत हे सिद्ध करण्यास आतूर झालेले हजारो लोक सत्याग्रहासाठी महाडमध्ये आले. बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली लढला जाणारा हा पहिलाच मोठा लढा होता. सत्याग्रहात शेकडो लोकांनी भाग घ्यावा यासाठी बाबासाहेबांच्या अन्य अनुयायांबरोबरच दादासाहेबांनीही गावोगाव जाऊन वातावरण तापवले होते. गावोगावचे अनेक महार सत्याग्रहासाठी आले होते. महाडमध्ये सत्याग्रहींची जी मिरवणूक निघाली ती सात-आठ मैल लांब होती अशी वर्णने केली गेली आहेत. तळे झाकून जाईल इतका प्रचंड जनसागर जमला होता. प्रत्येकाच्या मनात क्रांतीचे स्फुरण आले होते.

तळ्याला स्पर्श करण्यासाठी अस्पृश्य आले होते हे खरे, पण महाडमधील काही सनातन्यांनी मात्र अस्पृश्यांना पाण्याला स्पर्श करता येऊ नये यासाठी न्यायालयाकडून मनाई हुकूम आणला होता. पोलीस अधिकारी हवालदिल झाले होते. एकीकडे तळ्यातील पाण्याला क्रांतीचा स्पर्श देण्यासाठी हजर असलेला जनसागर, दुसरीकडे कोर्टाच्या निर्णयाला हत्याराचे स्वरूप देऊ पाहणारे सनातनी असे चित्र होते. अशा वेळी सत्याग्रह केल्यास हिंदू समाज आणि ब्रिटिश सरकार दोघेही अस्पृश्यांच्या विरोधात जातील आणि लढा अधिक गुंतागुंतीचा होईल, शिवाय शांततेला गालबोट लागण्याचा धोकाही आहे असे बाबासाहेबांना पोलीसखाते सांगत होते.

परिषदेनंतर तळ्याला स्पर्श करण्याचा कार्यक्रम होणार होता. परिषदेत बोलताना बाबासाहेब म्हणाले, ''तळ्यात प्रवेश करण्यास कोर्टाची मनाई असल्याने सत्याग्रहाच्या मार्गाने तेथे जाणे योग्य होणार नाही. सत्याग्रहाचा कार्यक्रम आपण एकमताने स्थगित करावा.''

बाबासाहेबांनी जनसागराला सत्याग्रह स्थगित करण्याचे आवाहन तर केलेच, शिवाय आपण स्वत: जो प्रस्ताव मांडला त्या संबंधी कोणाला काही बोलावयाचे असल्यास बोलावे, असे आवाहनही केले. बाबासाहेब स्वत: लोकशाहीचे खंदे पुरस्कर्ते होते. त्यांच्या विचारात, वर्तनात आणि प्रत्यक्ष कृतीतही लोकशाही होती. खरे तर सत्याग्रह स्थगित झाला, असा एकतर्फी निर्णयही ते घेऊ शकले असते. लोकांनी हा निर्णयही मान्य केला असता, कारण बाबासाहेब त्यांचे सर्वेसर्वा होते. त्यांचीच हाक ऐकून हा जनसागर जमला होता. पण बाबासाहेबांनी हुकुमशाही पद्धतीने काही केले नाही. त्यांनी उदात्त लोकशाहीचा अवलंब

केला. लोकांना आपापली मते व्यक्त करण्यास त्यांनी आवर्जून सांगितले.

बाबासाहेबांच्या भाषणानंतर दादासाहेब बोलायला उठले. प्रचंड गर्दीसमोर कदाचित त्यांचे हे पहिलेच भाषण असावे. दादासाहेब म्हणाले, "मित्रांनो, आपण राज्यभरातून तीन-चार दिवसांच्या ज्या भाकऱ्या घेऊन जमा झालो आहोत ते **सत्याग्रह करण्यासाठी,** परत जाण्यासाठी नव्हे. आम्ही परत जाऊन तेथे **लोकांना** काय सांगणार? कोर्टाचा मनाई हुकूम आला म्हणून आम्ही तळ्यावर जाऊ शकलो नाही, तर ते नामुष्कीचे होईल. नुसते हात हलवत **परत** जाणे पुरुषार्थाला शोभून दिसणार नाही. खूप दिवसांनी एखाद्या बाईला मूल होत आहे आणि दुर्दैवाने मूल जर आडवे आले तर मग कापून काढण्याशिवाय दुसरा इलाजच नसतो. स्पृश्य हिंदूंना कायद्याच्या रूपाने मदत करणाऱ्या या इंग्रज सरकारला आता कापून टाकायची वेळ आली आहे. तेव्हा माझ्या मते, मित्रांनो सत्याग्रह कोणत्याही परिस्थितीत झालाच पाहिजे."[४] (जाड ठसा लेखकाचा)

दादासाहेबांचे प्रभावी भाषण ऐकून परिषदेचा नूर बदलला. बाबासाहेबांनी शेवटी सत्याग्रह करावा की नको, हा प्रस्ताव मतास टाकण्याचे ठरवले. बाबासाहेबांच्या बाजूने म्हणजे सत्याग्रह करू नये या बाजूने; नऊ ते दहा जण आणि प्रस्तावाच्या विरुद्ध बाजूला म्हणजे सत्याग्रह करावा या बाजूला भली मोठी माणसांची रांग उभी राहिली. सत्याग्रह करू नये अशी बारा व करावा अशी आठ भाषणे परिषदेत झाली होती. प्रत्यक्षात सत्याग्रह करावा असे लेखी देणाऱ्यांची संख्या ३,८८४ इतकी होती.[५]

बाबासाहेबांनी लोकशाहीद्वारे व्यक्त झालेला कौल मोठ्या दिलाने मान्य केला. ठरावाची अंमलबजावणी दुसऱ्या दिवशी करण्याचे ठरले. लोकांनी शांतता व संयम पाळून सत्याग्रह करावा, असे आवाहन बाबासाहेबांनी केले. २० मार्च १९२७ हा दिवस उजाडला. सत्याग्रहींनी चवदार तळ्याच्या दिशेने शांततामय मार्गाने मिरवणूक काढली. बाबासाहेब आपल्या असंख्य लढाऊ अनुयायांसह चवदार तळ्याच्या काठावर उभे राहिले. इतिहासाने कूस बदलली. चवदार तळ्याच्या थेंबाथेंबावर एक नवा इतिहास कोरला गेला. मानवमुक्तीचा इतिहास कोरला गेला. सत्याग्रह म्हणजे जातिनिर्मूलनाच्या लढाईचा एक मोठा एल्गार होता. त्यात हजारो सत्याग्रहींचा हुंकार होता. एका क्रांतिकारी घटनेचा जन्म झाला. बाबासाहेबांनी आणि त्यांच्या कार्यकर्त्यांनी चवदार तळ्यात हात बुडवून ओंजळभर पाणी घेतले. खरे तर चवदार तळ्यातील पाण्यात वेगळे असे काही नव्हते, पण पाण्याला केलेला स्पर्श आणि तो क्षण समतेच्या मोठ्या लढाईची नांदी होती. एका दीर्घ युद्धाचा प्रारंभबिंदू होता तो. पाण्याच्या निमित्ताने समतेचे तेज उपस्थित जनसागराच्या चेहऱ्यावर तर जनसागराच्या चेहऱ्यावरील तेज पाण्याला लाभले. भारताच्याच नव्हे, तर जगाच्या इतिहासात अशी घटना यापूर्वी कधी घडलेली नव्हती. पाण्यात हात बुडवण्यासाठी सत्याग्रह करण्याची वेळ कुणावर आली नव्हती. भारतात मात्र भेदाभेदांवर उभ्या राहिलेल्या समाजव्यवस्थेने आणि ही व्यवस्था ज्यावर उभी आहे, त्या धर्माने ही वेळ आणली होती. जातिव्यवस्थेने संख्येने अधिक असलेल्या माणसांचे, माणूसपणच नाकारले होते. हिरावून घेतलेली आणि धर्माच्या सनातनी विचारांच्या पोलादी पंजात अडकलेली माणुसकी मिळवण्याचा हा संग्राम होता. या संग्रामानंतर सनातन्यांनी अफवा उठवल्या. स्पृश्यांनी वीरेश्वराचे मंदिर भ्रष्ट केल्याचा प्रचार केला.

सवर्णांची माथी भडकली. त्यांनी हिंसाचार केला. अस्पृश्यांना मारहाण केली.

जाती आणि तिने बनलेल्या व्यवस्थेला सुरुंग लावण्याचा प्रयत्न म्हणून चवदार तळ्याची इतिहासात नोंद झाली. या नोंदीमध्ये दादासाहेबांचे नावही ठळक आहे.

चवदार तळ्याचा सत्याग्रह म्हणजे एक मोठी लढाईच होती. या लढाईने अस्पृश्यांना बळ आल्यास आश्चर्य करण्याचे कारण नाही. या सत्याग्रहाचे पडसाद महाराष्ट्रात ठिकठिकाणी उमटू लागले. सार्वजनिक पाणवठे, विहिरी आदी ठिकाणी इतरांप्रमाणे पाणी भरण्याचा अस्पृश्यांना हक्क आहे ही भावना आणि त्यासाठी लढण्याची जिद्दही जागी होऊ लागली. चवदार तळ्याने अस्पृश्यांना लढण्याची प्रेरणा दिली होती. बाबासाहेबांचे निष्ठावंत नेते म्हणून नावारूपास येत असलेले दादासाहेब जिल्हा लोकल बोर्डावर गेले. या बोर्डात काम करताना जातिव्यवस्थेला धक्का देण्याची संधीही त्यांना मिळणार होती. कायद्याचा आधार घेऊन समतेचा विचार आणखी दृढ करण्यासाठी बळ मिळणार होते. लोकल बोर्डाचे सदस्य म्हणून मिळणारे अधिकार जातिनिर्मूलनासाठी वापरता येणार होते. दादासाहेबांनी प्रत्यक्षात तसे केलेही. ज्या गावात सार्वजनिक विहिरी आहेत त्या महारांना (अस्पृश्यांना) खुल्या कराव्यात आणि त्या खुल्या आहेत असा बोर्ड तेथे लावण्यात यावा, असा ठरावच दादासाहेबांच्या पुढाकाराने नाशिक जिल्हा लोकल बोर्डात मंजूर करण्यात आला. नाशिकपासून वीस किलोमीटरवर नाशिक-पेठ रोडवर असलेल्या उमराळे या गावातही सरकारी म्हणजे सार्वजनिक विहीर होती. या विहिरीवरही असाच बोर्ड लावण्यात आला. उमराळे गाव तसे पुढारलेले. गावात सर्व विभागांची कार्यालये होती. लोकही बऱ्यापैकी शिकलेले होते. शिवाय याच गावचे पुंजा पाटील हेही जिल्हा लोकल बोर्डाचे सदस्य होते. या गावात महारांचीही एक विहीर होती पण उन्हाळ्यात ती तळ गाठायची. खडखडीत व्हायची. महारांना पाण्याचा प्रश्न मोठ्या प्रमाणात भेडसावयाचा. पाण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी महारांसमोर दोनच मार्ग होते. एक, उन्हाच्या रखरखाटात पायपीट करत वाघाड तलाव व कोलवण नदीत जाऊन पाणी भरायचे. पण ही दोन्ही ठिकाणे चार-पाच किलोमीटरवर होती. पाणी वाहून आणताना बाया-बापड्यांची हाडे मोडायची. पाणी चटकन आणता येत नसे. एवढ्या लांबून डोक्याखांद्यावरून पाणी वाहून आणणे आणि उन्हाचे चटके सहन करणे खूपच कठीण होते. दुसरा मार्ग होता तो गावातील सार्वजनिक विहिरीवरून पाणी भरून घेण्याचा. विहिरीत पाणी भरपूर पण ते थेट भरता येत नसे. विहिरीशेजारी काही अंतरावर घागरी, पातेली, हंडे घेऊन थांबायचे. पाणी भरण्यासाठी येणाऱ्या सवर्णांना 'दादा पाणी वाढा, मावशी पाणी वाढा, ताई पाणी वाढा' अशा विनंत्या घशाला कोरड पडेपर्यंत कराव्या लागत. विनंत्या ऐकून सवर्णांच्या काळजाला पाझर फुटला तर ते एखादी घागर महारांच्या घागरीत वरूनच ओतायचे. अन्यथा 'पाणी पाणी' करत कितीतरी वेळ थांबून राहावे लागत असे. विशेष म्हणजे सरकारी विहीर सर्वांना खुली आहे असा बोर्ड कायद्यानुसार विहिरीजवळ होता. प्रत्यक्षात विहिरीला स्पर्श करण्याची परवानगी मात्र महारांना नव्हती. कायदा आणि प्रत्यक्ष त्याचा लाभ यात किती तरी अंतर होते. कायद्याने विहीर खुली होती, पण परंपरेनुसार ती महारांपासून दूर होती. जातिव्यवस्थेने कायदा फक्त बोर्डावरच ठेवला होता. त्याला बोर्डापासून बाजूला म्हणजे महारांपर्यंत येऊ दिले नव्हते. कायदा; आंधळा, पांगळा,

मुका, बहिरा होऊन बोर्डातच बंदिस्त झाला होता. त्याला चालते-बोलते करण्याची गरज होती. उमराळेच्या काही महारांनी दादासाहेबांच्या कानावर ही गोष्ट घातली. विहिरीवर पाणी भरण्यासाठी केलेले स्थानिक पातळीवरील प्रयत्न अयशस्वी झाल्याचेही त्यांनी दादासाहेबांना सांगितले. पुंजा पाटील यांनी लोकल बोर्डात सदस्य म्हणूनही विहिरी खुल्या करण्याच्या ठरावाला विरोध केला होता. उमराळे गावातील सवर्णांचे पुढारी म्हणूनही गावातील विहीर खुली करण्यास त्यांचा विरोध होता. आता सत्याग्रह करण्याशिवाय पर्यायच नव्हता. दादासाहेब हे आपले सहकारी नानाजी चंद्रमोरे, टी. बी. काळे, शंकर लोखंडे आदींसह १८ मे १९२९ रोजी उमराळ्यात सत्याग्रहासाठी आले. त्यांच्याबरोबर नाशिक सिक्युरिटी प्रेस व दलितांच्या स्काऊट पथकातील पाचशे कार्यकर्तेही होते. पोलीस बंदोबस्त होता. उमराळे येथील महारवाड्यासमोर चंद्रमोरे यांच्या अध्यक्षतेखाली सत्याग्रहींची सभा झाली. त्यानंतर पाणी भरण्यासाठी सर्व सत्याग्रही विहिरीकडे निघाले. ते लाठ्याकाठ्यांचा खेळ खेळत होते. मोठ्या स्वाभिमानाने विहिरीकडे जाणारे सत्याग्रही आता विहीर बाटवणार अशी सवर्णांची खात्री झाली. तेही हत्यारे घेऊन गोळा होऊ लागले. आता काहीतरी विपरीत घडणार असे वातावरण निर्माण झाले. चकमक झाली तर आग साऱ्या गावात पसरेल याची खात्री पुंजा पाटील यांना झाली. त्यांनी हे सारे प्रकरण धीराने घेण्याचे आणि सत्याग्रहींना विरोध न करण्याचे ठरविले. रात्री दहा वाजता दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली सर्व सत्याग्रही विहिरीभोवती गोळा झाले. दादासाहेबांनी स्वतः विहिरीतून पाणी काढले. त्यांच्यासह सर्व सत्याग्रही मोठ्या आनंदाने पाणी प्यायले. एक लढाई जिंकल्याचा आनंद सर्व सत्याग्रहींच्या चेहऱ्यावर होता. जयघोष देत सर्वजण पाणी प्यायले. आता आपल्याला या विहिरीतून कायम मुक्तपणे पाणी घेता येईल अशी स्वप्ने बाळगून सर्वजण आपापल्या घरी परतले. सकाळी उठून पाणी भरण्यासाठी महार मंडळी विहिरीवर गेली तेव्हा वेगळेच दृश्य होते. विहीर घाणीने भरली होती. तिच्यातील पाण्याला दुर्गंधी सुटली होती. पाणी पिण्यासाठी योग्य राहिले नव्हते. आदल्या दिवशी सत्याग्रहींना लाभलेला आनंद जातिव्यवस्थेने दुसऱ्या दिवशी टिकू दिला नव्हता. विहिरीत घाण टाकल्यामुळे खरे तर सवर्णांचीही गैरसोय होणार होती, पण महारांना पाणी मिळणार नव्हते, याविषयीचा आसुरी आनंदही त्यांना मिळाला असावा.

उमराळे येथील प्रकाराने दादासाहेब खचले नव्हते, उलट नाशिक जिल्ह्यात जेथे जेथे सार्वजनिक विहिरी आहेत तेथे तेथे त्या अस्पृश्यांना खुल्या व्हाव्यात यासाठी त्यांचे प्रयत्न सुरूच राहिले. मुळेगाव (ता. नाशिक), सोनगाव (ता. चांदवड) येथील सार्वजनिक विहिरी सत्याग्रह करून अस्पृश्यांसाठी खुल्या करण्यात आल्या. विहिरीतील पाण्यासाठी सत्याग्रह ही गोष्ट तशी इतरांच्या दृष्टीने छोटी वाटत होती, पण अस्पृश्यांमध्ये लढाईचे बीज पेरण्यासाठी खूप मोठी होती. गावागावांत असे लढण्याचे बीज पेरले जाऊ लागले आणि लढण्याचा इतिहास असलेली जमात पुन्हा एकदा इतिहासाच्या वळणावर लढण्यास सिद्ध होऊ लागली. ही लढाई थांबवून चालणार नव्हती. अधिक व्यापक करायची होती. माणूस म्हणून आवश्यक असणारे हक्क येथील समाज आणि धर्मव्यवस्था देणार की नाही हे पाहायचे होते. त्यासाठी वेगवेगळ्या क्षेत्रांना चाचपायचे होते. तळे, विहिरी, पाणवठे आणि शाळा या एक भाग होत्या. आता चळवळ अन्य क्षेत्रात न्यायची होती आणि व्यवस्थेला

प्रश्न विचारायचे होते. असाच एक प्रश्न येथील धर्मव्यवस्थेला म्हणजे एका अर्थाने देवालाच विचारावा असे दादासाहेबांना वाटू लागले. नाशिकमधील काळारामाचे दर्शन घेण्याचा म्हणजे मंदिरात प्रवेश करण्याचा हक्क अस्पृश्यांना मिळावा यासाठी सत्याग्रह करण्याचा विचार दादासाहेब, पतितपावन दास, टी. बी. काळे, अमृतराव रणखांबे, सावळाराम दाणी, नानाजी चंद्रमोरे आदींच्या मनात घोळू लागला. मुंबईत जाऊन त्यांनी बाबासाहेबांची भेट घेतली आणि आता तळ्याबरोबरच मंदिरात जाऊन धडक मारण्याची आवश्यकता व्यक्त केली. १९२७ साली चवदार तळ्याचा सत्याग्रह आणि त्या निमित्ताने झालेली मारामारी अद्याप न्यायालयातील खटल्याच्या निमित्ताने कायम होती. चवदार तळे शुद्ध करून घेण्याचा प्रयत्नही महाडमधील सवर्णांनी केला होता. महाडचे प्रकरण न्यायालयात आपल्या बाजूने लागावे व त्यानंतर नव्या आंदोलनाचा निर्णय घ्यावा असे बाबासाहेबांना वाटत होते आणि ते रास्तही होते. बाबासाहेब चवदार तळ्याची लढाई न्यायालयातही लढत होते. आपले ज्ञान पणास लावत होते. न्यायालयात महाडविषयी काय निर्णय लागतो ते पाहण्यात वेळ अधिक खर्च होईल आणि दरम्यान सत्याग्रहाच्या लढाईची धार कमी होईल म्हणून सत्याग्रहासाठी नवा विषय तातडीने घ्यावा असे दादासाहेबांना वाटत होते. जातिनिर्मूलनाच्या लढाईसाठी एक नवा विषय म्हणून काळाराम मंदिर सत्याग्रहाचा विषय घ्यावा असा त्यांचा आग्रह होता. तुम्ही आमचे नेतृत्व करा, आम्हाला मार्गदर्शन करा असेही दादासाहेबांनी बाबासाहेबांना सांगितले. शेवटी बाबासाहेब तयार झाले आणि या समाजातील जातींचा अंत होणार की नाही, अस्पृश्यांना माणूस म्हणून मान्यता मिळणार की नाही यासाठी आणखी एक लढाई काळाराम मंदिर प्रवेशाच्या निमित्ताने सुरू झाली. या लढाईत अस्पृश्यांबरोबर काही स्पृश्यही सहभागी झाले. चवदार तळ्याच्या सत्याग्रहातही काही स्पृश्य सहभागी झाले होते. मनुस्मृतीचे दहनही त्यांच्या हस्ते झाले होते. मंदिर प्रवेशाच्या सत्याग्रहातही त्यांचा सहभाग लाभला होता. २ मार्च १९३० रोजी बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली मंदिर प्रवेशासाठीचा सत्याग्रह सुरू झाला. तो चवदार तळ्याच्या सत्याग्रहापेक्षा विराट होता. पंधरा हजारांहून अधिक लोक त्यात सहभागी झाले होते. या विराट जनसमुदायाला राम दर्शन देईल असे वाटले होते, पण जनसमुदायाचा भ्रमनिरास झाला. मंदिराच्या चारही दरवाजांना आणि मुख्य मंदिराला कुलपे घालण्यात आली होती. मंदिरात अस्पृश्य घुसू नयेत यासाठी प्रचंड बंदोबस्त ठेवण्यात आला होता. पहिल्या दिवशी अस्पृश्यांनाच नव्हे, तर स्पृश्यांनाही रामाचे दर्शन घडले नाही. मंदिराच्या चारही दरवाजांसमोर सत्याग्रह सुरू झाला. या सत्याग्रहात पुरुषांबरोबर महिलांचाही मोठ्या प्रमाणात सहभाग होता. पुरुषांच्या खांद्याला खांदा भिडवत त्याही सत्याग्रहात उतरल्या होत्या. माणुसकीचे हक्क मागण्यासाठी रस्त्यावर उतरल्या होत्या. गंगुबाई पगारे, यमुनाबाई जाधव, देऊबाई लोखंडे, फुंदाबाई जाधव, ठकुबाई साळवे, राधाबाई जाधव, सरुबाई भालेराव, द्रौपदाबाई उबाळे, कोंडाबाई मोरे, सोनुबाई शिंदे, चिमाबाई कृष्णाजी, साळुबाई भालेराव, पवळाबाई काळे, सावळाबाई काळे, सावळाबाई कदम, चिमाबाई काळे, कृष्णाबाई डांगळे, कान्हुबाई मोरे, रंगाबाई जाधव, विठाबाई गायकवाड, सरुबाई गायकवाड, अहिल्याबाई कर्डक, सकुबाई जाधव, लक्ष्मीबाई पगारे, बकुबाई गायकवाड, साळुबाई रोकडे, सायजाबाई लोखंडे, रेऊबाई गोतारणे, सायजाबाई

भालेराव, सुंदराबाई मोरे, देऊबाई महादू, शिऊबाई मोरे आदी कितीतरी महिला नुसत्याच सहभागी झाल्या नव्हत्या, तर आघाडीवर होत्या. सत्याग्रहासाठी चारही दरवाजांसमोर ज्या चार तुकड्या बसल्या होत्या त्यात या महिलांचा समावेश होता. सत्याग्रहींसाठी अन्न शिजविण्याचे कामही त्या रात्रंदिवस करत होत्या. सत्याग्रह एखाद-दुसरा दिवस चालेल असे वाटत होते. प्रत्यक्षात तो चालला जवळपास पाच वर्षे. पण या महिला डगमगल्या नाहीत. निर्धारापासून दूर गेल्या नाहीत. जातिनिर्मूलनाच्या लढाईत पुरुषाबरोबर महिलेची भूमिकाही अतिशय महत्त्वाची असते. तिच्या सहभागाशिवाय या लढाया यशस्वी होत नाहीत. चवदार तळ्यानंतर मोठ्या संख्येने त्या मंदिर सत्याग्रहात सहभागी झाल्या होत्या. याबाबतचे श्रेयही बाबासाहेबांच्या विचाराला आणि या विचारानुसार आचरण करणाऱ्या दादासाहेबांना द्यावे लागेल. सत्याग्रह दीर्घकाळ चालला पण त्याने येथील समाज अक्षरशः ढवळून काढला. जगभर तो चर्चेचा विषय बनला. सत्याग्रहाचे यशात रूपांतर झाले नसले तरी त्याने येथील सनातनी समाजाचे विकृत स्वरूप जगाला दाखवले. या सत्याग्रहाला गो. ह. देशपांडे यांच्यासारखे सवर्ण नेते, कुसुमाग्रज यांच्यासारखा कवी, यांनी पाठिंबा दिला. डॉ. मुंजे, बॅ. सावरकर यांनाही बोलते केले. सत्याग्रह यशस्वी की अयशस्वी अशा गणिती भाषेत त्यांचे मूल्यमापन करून चालणार नाही. व्यवस्थेला जोरदार धक्के देणारा हात एक प्रयत्न होता आणि त्यात यश आले एवढे मात्र निश्चित. अस्पृश्यांमध्ये जागृती आणि लढण्याची जिद्द वाढण्यास या सत्याग्रहाची मदत झाली. जाती केवळ माणसावरच नव्हे तर देवाधर्मावरही सत्ता गाजवून माणसाला किती क्षुद्र बनवतात हेही पुन्हा एकदा पाहायला मिळाले. मंदिर प्रवेश सत्याग्रह यशस्वी झाला नाही, पण त्या निमित्ताने सनातन धर्म आणि सनातन कल्पनांची मात्र जोरदार चिकित्सा सुरू झाली. आपण गुलामाप्रमाणे आहोत, आपण जातीच्या चौकटीत घुसमटत आहोत याची जाणीवही अस्पृश्यांना व्हायला लागली. मोठ्या आणि दीर्घ पल्ल्याच्या लढाईसाठी चांगल्या जाणिवांची माणसे आवश्यक असतात. प्रबळ जाणिवा त्यांना लढण्यासाठी अधिक प्रेरणा आणि अधिक बळ देत असतात. या दृष्टीने सत्याग्रहानंतरही रामाचे दर्शन झाले नसले तरी प्रत्यक्षात अस्पृश्यांमधील लढाऊ वृत्तीचे आणि जिद्दीचे दर्शन मात्र पुन्हा एकदा झाले; हेही या सत्याग्रहाचे यश म्हणावे लागेल. याचबरोबर प्रस्थापित चौकटीत आपल्याला न्याय मिळणार नाही ही भावनाही वाढीस लागली. याचा परिणाम म्हणजे जाती संपवण्याच्या, सनातन धर्माला नकार देण्याच्या विचाराला धार येऊ लागली.

काळाराम मंदिर प्रवेशासाठी सत्याग्रह चालू असतानाच येवला तालुक्यातील मुखेड येथे 'पांडव प्रताप' या ग्रंथाची मिरवणूक काढण्यावरून २३ सप्टेंबर १९३१ च्या सुमारास हिंसक घटना घडली. मुखेड गावातील महारांनी 'पांडव प्रताप' या ग्रंथाचे पारायण झाल्यानंतर ग्रंथाची मिरवणूक मोठ्या श्रद्धेने काढण्याचे ठरविले. दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली मिरवणूक निघाली; पण अस्पृश्यांनी 'पांडव प्रताप' ग्रंथाची मिरवणूक अशा प्रकारे भर गावातून काढणे स्पृश्यांच्या सनातनी मनाला काही पटले नाही. त्यांनी अस्पृश्यांच्या मिरवणुकीचा मार्ग रोखला. मिरवणूक जागच्या जागी चार-पाच तास थांबली. रात्री या मिरवणुकीवर हल्ला केला. दादासाहेब गायकवाड व त्यांच्या सहकाऱ्यांना मार बसला.

अनेक जण जखमी झाले. मिरवणूक उधळली गेली. विशेष म्हणजे, हल्लेखोर 'महात्मा गांधी की जय' म्हणजे एका अहिंसेच्या पुजाऱ्याचे आणि भारतमातेचे नाव घेऊन हिंसाचार करत होते. दंगल करण्यासाठी कोण कशाची प्रेरणा घेईल हे सांगता येत नाही हेच खरे. अस्पृश्यांना मारहाण करण्यासाठी देवाधर्मापासून ते भारतमातेपर्यंत आणि जातींपासून ते विटाळाच्या कल्पनेपर्यंत काहीही आणि केव्हाही उपयोगी पडते. स्पृश्यांनी या साऱ्या गोष्टींचा वापर नाशिकमध्ये आणि मुखेडमध्ये केला हे स्पष्ट होते. मुखेडच्या घटनेचा वृत्तान्त भारताबरोबर परदेशी वृत्तपत्रांमध्येही प्रसिद्ध झाला. त्या वेळी लंडनमध्ये गोलमेज परिषद सुरू होती. बाबासाहेबांनी वृत्तपत्राच्या प्रती परिषदेच्या सर्व सदस्यांना वाटल्या आणि भारतात जातीच्या, धर्माच्या व देवाच्या नावाखाली माणुसकीचे कसे मुडदे पाडले जात आहेत हे सर्वांना सांगितले.

एखाद्या बंदिस्त चौकटीत माणूस फार काळ तग धरून राहू शकत नाही. अस्पृश्यांच्या बाबतीतही तसेच घडत होते. पाण्याला स्पर्श केल्यानंतर, देवाच्या दर्शनाचा आग्रह धरल्यानंतर, ग्रंथाची मिरवणूक काढल्यानंतर, न्याय्य हक्क मागितल्यानंतर जर येथील धर्माच्या नावाने माणूस माणसावर हल्ला करत असेल तर तो धर्म सोडलेलाच बरा अशीही भावना वाढीस लागली. १३ ऑक्टोबर १९३५ रोजी येवल्यात (जि. नाशिक) जी परिषद झाली तीत "दुर्दैवाने मी अस्पृश्य जातीत जन्माला आलो हा काही माझा अपराध नाही. परंतु मरताना मात्र मी हिंदू म्हणून मरणार नाही" अशी गगनभेदी आणि क्रांतिकारी घोषणा बाबासाहेबांनी केली.[६] येवले परिषदेत जे ठराव झाले त्यावर दादासाहेबांनी भाषण केले आहे. "हिंदू लोक खेड्यापाड्यांतून त्यांचा (अस्पृश्यांचा) अमानुष छळ करतात, जुलूम करतात, मारहाण करतात. इज्जत लुटतात. देवदर्शनाकरता सत्याग्रह करणे पाप समजतात. अशा परिस्थितीत हिंदू धर्म आपला कसा समजावा? हिंदू धर्मासाठी अस्पृश्यांनी त्यांची गुलामगिरी काय म्हणून करावी? म्हणून तर आमची आता अशी खात्री झाली आहे की, हिंदू धर्म हा अस्पृश्यांचा नसून तो परकीयांचा—हिंदूंचा आहे. अस्पृश्यांचा मूळ धर्म निसर्गसिद्ध व निर्मळ असून त्या धर्मात स्वाभिमान, स्वातंत्र्य, समता, बंधुक्षेत्र व पुरुषार्थ वसत असून तो मर्दाचा धर्म आहे. बाबासाहेबांनी धर्मांतराचा निर्णय घेतलेलाच आहे. या त्यांच्या निर्णयाला पाठिंबा देऊन माझे भाषण संपवतो."[७]

दादासाहेबांनी येवला परिषदेत केलेले हे भाषण तडफदार तर होतेच, शिवाय जातीच्या मुळावरच घाव घालणारे होते. सारे स्त्री-पुरुष ही निसर्गाचीच लेकरे आहेत या महात्मा फुल्यांच्या विचाराकडे जाणारे, निसर्ग धर्म (Nature Religion) या कल्पनेकडेही वळणारे होते. दादासाहेबांनी बाबासाहेबांची क्रांतिकारी घोषणा जनमानसात नेण्याचा प्रयत्न सुरू केला. त्यांच्या अनेक सभा-संमेलनात एकत्रितपणे वेगवेगळ्या देवांच्या मूर्ती, जुने धार्मिक ग्रंथ फेकण्याचा कार्यक्रम सुरू झाला. या देशातील देव, धर्म, आणि ग्रंथ अस्पृश्यांच्या उद्धारासाठी कधीच पुढे येत नसतील, तर ते हवेतच कशाला ही भावनाही त्यामागे होती.

केवळ सवर्णांच्याच जाती संपवून चालणार नाहीत, तर त्या अस्पृश्यांमधीलही संपवल्या पाहिजेत असा दादासाहेबांचा ठाम आग्रह होता. एकूण जातच वाईट असेल तर ती टिकवण्याचे, गोंजारण्याचे काही कारण नाही असे त्यांचे मत होते. १ जानेवारी १९३८

रोजी सोलापुरात एक मातंग परिषद झाली. या परिषदेत त्यांनी अस्पृश्यांमधील वेगवेगळ्या जातींमध्येही रोटी-बेटी व्यवहार होण्याची गरज असल्याचे सांगितले. अस्पृश्यांधील अस्पृश्यता प्रथम आपण नष्ट केली पाहिजे, असेही ते आवर्जून म्हणाले. पंढरपूर येथील अस्पृश्यांच्या परिषदेतही त्यांनी अशीच भूमिका ठामपणे मांडली होती. देवळाली कॅम्प येथे (९ जुलै १९३९) मातंग परिषद घेऊन त्यांच्या विकासाच्या आड येणारी मरीआई दूर करण्याचा प्रयत्न केला. दादासाहेबांनी स्वत: पुढाकार घेऊन भंगी समाजातील मुलगा व महार समाजातील मुलगी यांचे लग्न लावले. पुढे त्यांना सर्व प्रकारची मदत केली.

जाती संपवण्यासाठी केवळ देवाधर्माच्या पातळीवरच आंदोलन करून चालणार नाही, तर अस्पृश्य स्वावलंबी बनावेत आणि सनातनी चौकटीपासून दूर राहावेत यासाठी बाबासाहेबांनी फार पूर्वी विचार मांडला होता. महारवतन रद्द झाल्यानंतर महारांनी पडीक जमिनीवर शेती करावी; वतन म्हणून मिळणाऱ्या जमिनी त्यांच्या नावावर करून घ्याव्यात; प्रसंगी सामुदायिक शेती करावी असे कितीतरी पर्याय त्यांनी मांडले होते. त्या दिशेने त्यांनी कार्यही सुरू केले होते. बाबासाहेबांच्या महानिर्वाणानंतर दादासाहेबांनी या विषयाला पुन्हा एकदा खंबीरपणे हात घातला. सरकारजवळील पडीक जमिनी भूमिहीनांना मिळाव्यात, यासाठी मराठवाड्यात त्यांनी सत्याग्रह सुरू केला. येथे भूमिहीन म्हणजे कोण? एका विशिष्ट जातीचे नव्हे, तर समाजांनी अस्पृश्य आणि मागास ठरविलेल्या सर्व जातींतील भूमिहीन होते हे लक्षात ठेवायला हवे. कारण या लढ्यास फार मोठा अर्थ आहे. भूमिहीनांच्या सत्याग्रहामुळे सारा मराठवाडा खडबडून जागा झाला. सारे तुरुंग भरले. दादासाहेबांना अटक झाली. सत्याग्रहात बाया-बापड्यांबरोबर सर्व जातींतील भूमिहीन सामील झाले होते. अस्पृश्यांचे आणि भूमिहीनांचे प्रश्न सोडवायचे असतील तर आता राष्ट्रीय पातळीवरील मोठ्या आंदोलनाशिवाय पर्याय नाही हेही कळून चुकले. महाराष्ट्रातील सत्याग्रह तसा प्रभावी ठरल्याने मोठ्या आंदोलनासाठी त्यांना बळही मिळाले होते. ६ डिसेंबर १९६४ रोजी देशव्यापी सत्याग्रहाला सुरुवात झाली. देशात पडून असलेली कोट्यवधी एकर जमीन कसण्यासाठी अस्पृश्यांना दिल्यास ते स्वावलंबी होतील. जातीच्या नावाने होणारी त्यांची पिळणूकही कमी होईल असे दादासाहेबांचे म्हणणे होते. राज्याराज्यांतील लोक सत्याग्रहात सहभागी झाले होते. महाराष्ट्रात अटक झालेल्या साडेतीन लाख आंदोलकांना ठेवण्यासाठी तुरुंग मिळेनात. शाळा, मंदिरे आदी ठिकाणी त्यांना ठेवण्यात आले. महिला, कधी नव्हे एवढ्या मोठ्या प्रमाणात आंदोलनात सहभागी झाल्या होत्या. अमरावतीत पाच हजार महिलांनी निदर्शने केली. तुरुंगातील कैद्यांसाठी वर्षभरासाठी असणारे धान्य महिनाभरात संपून गेले. गृहमंत्री बाळासाहेब देसाई यांना पुरवणी मागणी सादर करून कैद्यांच्या व्यवस्थेसाठी एकवीस लाख रुपये जादा मंजूर करून घ्यावे लागले. शेकडो लोकांना शिक्षा झाली, पण आंदोलन काही शमत नव्हते. या आंदोलनाला समविचारी अशा अनेक पक्षांचा पाठिंबा मिळाला होता. समान प्रश्नांवर एकत्रित आंदोलन करण्याची किमया दादासाहेबांनी साधली होती. परिवर्तनाच्या चळवळीत एक उत्तम उदाहरण म्हणूनही या आंदोलनाकडे पाहावे लागेल. जातिनिर्मूलनासाठी एक व्यापक, ठोस आणि प्रभावी प्रयत्न म्हणूनही त्याकडे पाहावे लागेल. आंदोलनाच्या निमित्ताने मांडल्या गेलेल्या ज्या मागण्या होत्या, त्याही समाजातील सर्व सर्वहारांचा व्यापक विचार

करणाऱ्या होत्या. त्यांच्या मूलभूत प्रश्नांना हात घालणाऱ्या होत्या. जात-वर्ग अशा दोन्ही अंगांनी माणसांचा विचार करणाऱ्या होत्या. बाबासाहेबांनंतर साऱ्या देशाचे लक्ष वेधून घेणारे आणि डाव्या व पुरोगामी संघटनांच्या मदतीने केलेले हे पहिलेच भव्य आंदोलन होते.

राज्यसभेत आंदोलकांच्या मागण्यांवर झालेल्या चर्चेत (१८ ऑगस्ट १९६७) दादासाहेबांनी आपली भूमिका प्रभावीपणे मांडली. त्यांनी मांडलेल्या दहा मागण्या पुढीलप्रमाणे होत्या.

१. संसदेत बाबासाहेबांचे तैलचित्र लावावे.
२. कसणाऱ्यांना जमीन द्यावी.
३. भूमिहीनांना पडीक जमीन द्यावी.
४. महागाईला आळा घालावा. अन्नधान्याचे पुरेसे वाटप व्हावे.
५. झोपडपट्टीत राहणाऱ्यांची आर्थिक स्थिती सुधारावी.
६. किमान वेतन कायदा १९४८ लाच अस्तित्वात यावा.
७. नवबौद्धांना सवलती मिळाव्यात.
८. दलितांवरील अत्याचार थांबवावेत.
९. अस्पृश्यता निवारण कायद्यानुसार अस्पृश्यांना पुरेसे संरक्षण द्यावे.
१०. अनुसूचित जाती व जमातींना नोकऱ्यांत राखीव जागा ठेवण्याचे काम १९५० पर्यंत पूर्ण करावे.[८]

या सर्व मागण्यांचा बारीक विचार केल्यास समाजातील सर्वच उपेक्षितांकडे पाहण्याची दादासाहेबांची दृष्टी किती व्यापक होती हे लक्षात येते. समाजातील कोणत्याही उपेक्षितांचा त्यांनी विसर पडू दिला नव्हता. सर्वच गरिबांचा एक समग्र विचार आंदोलनामागे होता, शिवाय जातिनिर्मूलनाबरोबर वर्गअंताचे स्वप्नही त्यामागे होते. जातीच्या सापळ्यात न अडकता त्यांनी व्यापक असे आंदोलन केले. दादासाहेबांनंतर या दहा मागण्यांमधील काही मागण्या मान्य झाल्या, काही अर्धवट मान्य झाल्या आणि काही अद्याप मान्य व्हायच्या आहेत. जातीचा अंत करण्यासाठी वेगवेगळी आयुधे वापरावी लागतात. दादासाहेबांनी बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली काम करताना अशी आयुधे वापरली. पुढे बाबासाहेबांनंतर त्यांचाच विचार घेऊन आणखी काही आयुधे वापरली. आजन्म ते लढत राहिले. जाती संपवण्यासाठी आणि माणसाला प्रतिष्ठा देण्यासाठी, बाबासाहेबांबरोबर त्यांनी घेतलेली धम्मदीक्षा म्हणजे जातिनिर्मूलनाच्या चळवळीचा कळस होता.

### संदर्भ


१. राजर्षी शाहू : जीवन व कार्य, संपादक : डॉ. जयसिंगराव पवार, पृ. ९७.
२. दादासाहेब गायकवाड : जीवन व कार्य, लेखक - ॲड. हरिभाऊ पगारे, पृ. १७०.
३. श्री मनुस्मृति : वेदशास्त्रसंपन्न विष्णुशास्त्री बापट, पृ. २०.
४. दादासाहेब गायकवाड : जीवन व कार्य, पृ. ७५.
५. दादासाहेब गायकवाड : जीवन व कार्य, प्रस्तावना, डॉ. रावसाहेब कसबे, पृ. १८.
६. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, धनंजय कीर, पृ. २६३.
७. दादासाहेब गायकवाड : जीवन व कार्य, ॲड. हरिभाऊ पगारे, पृ. १६०.
८. पद्मश्री दादासाहेब गायकवाड, भावना भार्गवे, पृ. २३३.

# दादासाहेब गायकवाड आणि महिला उद्‌गाराचा विचार

**प्रा. इंदिरा आठवले**

दादासाहेब गायकवाड म्हणजे बाबासाहेब आंबेडकरांचा उजवा हात, खरा भीमसैनिक, कुठल्याही आमिषांना बळी न पडणारा, सच्चा प्रामाणिक शिष्य असेच त्यांच्या कामाचा पसारा, वेग पाहून म्हणावे लागते. १९२६ साली शाहू बोर्डिंगमध्ये अधीक्षक असताना ते बाबासाहेबांच्या संपर्कात आले. महाडच्या चवदार तळ्याच्या संग्रामात प्रथम सहभागी झाले तेव्हापासून मृत्यूपर्यंत बाबासाहेबांचे विचार प्रत्यक्ष कार्यरत करण्याचे काम त्यांनी निष्ठेने केले. आंबेडकरी चळवळीतील पहिल्या टप्प्यावर मंदिर प्रवेश, पिण्याच्या पाण्यासाठी सार्वजनिक विहिरी खुल्या करणे. दुसऱ्या टप्प्यावर शिक्षण, आर्थिक लढे उभारणे. तिसऱ्या टप्प्यावर राजकीय हक्कांसाठी संघर्ष आणि सामाजिक समतेच्या लढाईचे अंतिम पर्व. धर्मांतराच्या घोषणेनंतर प्रत्यक्ष १४ ऑक्टोबर १९५६ रोजी धम्मदीक्षा, असे या मानवमुक्तीच्या संग्रामाचे स्वरूप आहे. जीवनाच्या सर्व अंगांना स्पर्श करून अस्पृश्यांना माणूस म्हणून जगण्याचे नैसर्गिक हक्क देणे; त्यांना स्वाभिमान बहाल करून मानसिक गुलामगिरीतून बाहेर काढणे आणि माणूसपण टिकविणे असे या लढाईचे वर्णन करावे लागेल. या समग्र लढाईमध्ये बाबासाहेबांबरोबर सतत कार्यरत असणारे सेनानी/कार्यकर्ते; दादासाहेब होते. दादासाहेबांचे चरित्र वाचताना त्यांच्या व्यापक कामाच्या झंझावाती वेगाचे दडपण येते. एक सच्चा कार्यकर्ता वातावरण किती तापवू शकतो; लढाईला किती दिशांनी विकसित करू शकतो हे पाहून माणूस स्तंभित होतो. वामनदादांनी लिहिलेले हे गाणे दादासाहेबांच्या भूमिहीनांच्या सत्याग्रहाचे समर्पक वर्णन करणारे आहे.

*धरती के मजदूर हमारे*
*जाग उठे हैं सारे*
*नये नये नारे लगा के*
*आजादी की आग जगाके*
*धरती से धनवान भगाके*
*एक नया दल देंगे - नया बल देंगे*

दादासाहेबांचे जीवन आणि कार्य कार्यकर्त्यांना बळ देते.

काळाराम मंदिर प्रवेश, मुखेडचा सत्याग्रह, येवल्यातील धर्मांतराची घोषणा, सार्वजनिक विहिरी खुल्या करणे, स्वतंत्र मतदारसंघ सत्याग्रह, भूमिहीनांचा सत्याग्रह, धम्मदीक्षा, शिक्षण, राजकीय मोर्चे बांधणी इत्यादी चळवळींमध्ये दादासाहेब कार्यकर्ता, नेता होते. या जनआंदोलनात स्त्री-पुरुष, वृद्ध-तरुण, मुले, शेतमजूर आदिवासी या सर्वांचा सहभाग होता. महिलांचा सहभाग तर मोठ्या प्रमाणावर होता. केवळ सहभागच नव्हता तर शांताबाई दाणी, सीताबाई, गीताबाई गायकवाड, सत्यभामाबाई सुधाकर मोरे (भुसावळ), रूपाताई साळवे, कचराबाई जगताप (इगतपुरी) असे छोटे-मोठे नेतृत्वही उभे राहिले. खरे तर ह्या स्त्रियांना शिक्षणाची परंपरा नव्हती. रूढी-परंपरांमध्ये त्या अडकलेल्या होत्या. टोळधाड येऊ नये किंवा पाऊस यावा म्हणून व्रत, उपास करणाऱ्या होत्या. पण चळवळीत आल्यानंतर

*खंडोबाला दिली सोडचिठ्ठी*
*बाबासाहेब आंबेडकरांसाठी*

काळारामाला उद्देशून त्या म्हणतात :

*जाय तू दरवाजा उघडू नको*
*जाय तुझ्यावाचून*
*काय वाकडं होणार नाय*

अशी विद्रोहाची भाषा बोलू लागल्या. माणसाच्या प्रयत्नावर विश्वास ठेवण्याची; ईश्वर नाकारण्याची भाषा करू लागल्या. हे सामर्थ्य दादासाहेबांच्या चळवळीच्या सहभागातूनच त्यांच्या ठिकाणी आले. बाबासाहेबांवर असलेल्या विश्वासातूनच आले. हे कसे घडले? याचा शोध घेणे म्हणजे वरील आंदोलनात स्त्रियांच्या सहभागाचा इतिहास लिहिणे तर आहेच; शिवाय त्यांना लढाऊ बनविण्यासाठी दादासाहेबांनी केलेल्या प्रयत्नांचे मूल्यमापन करणे होय. येथे महिलांच्या सहभागाचा आढावा घेतला आहे.

**काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह**

हे आंदोलन १९३० ते १९३५ या कालखंडात दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली झाले. या आंदोलनाला महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहाची पार्श्वभूमी आहे. महाडच्या परिषदेत महिलांची स्वतंत्र परिषद घेण्यात आली. स्त्रियांनी जातिव्यवस्थेतून आलेली मानसिक गुलामगिरी टाकून द्यावी. जातीने दिलेले पोशाख, दागिने घालू नये. स्वच्छता पाळावी आणि मुलामुलींच्या शिक्षणाला महत्त्व द्यावे. शिक्षणाशिवाय परिवर्तन होणार नाही. परिषदेतील पुरुषांना, कार्यकर्त्यांना उद्देशून ते म्हणाले की आपल्यावरील अत्याचाराची, तो हाणून पाडण्यासाठी योजिलेल्या कार्यक्रमाची माहिती महिलांना करून द्यावी आणि चळवळीत त्यांना सहभागी करून घ्यावे हे बाबासाहेबांचे भाषण दादासाहेबांनी हृदयात कोरून ठेवले. त्याप्रमाणे कार्य केले. आपल्या दोन्ही पत्नींना या लढाईत सामील केले. 'चलो काळाराम मंदिर' ही घोषणा २ मार्च १९३० साली दिली. सनातन्यांनी मंदिर प्रवेशास निकराचा विरोध केला. मंदिराची दारे बंद ठेवली. सत्याग्रही चारही दरवाजांवर ठिय्या देऊन बसले. कलेक्टरांनी १४४ कलम लावल्यामुळे तीन-तीनच्या संख्येने गस्त सुरू करण्यात आली. सत्याग्रहींची छावणी सुरुवातीला येसकरवाड्यात होती, पण हळूहळू नाशिक शहरातीलच नव्हे तर दुगाव, पाथर्डी येथील महारांच्या वसाहतींना

छावण्यांचे स्वरूप प्राप्त झाले. या चळवळीत स्त्रिया सत्याग्रहींना जेवू घालत. स्वत: सत्याग्रह करीत. गस्त घालीत. मिरवणुकीत गस्त घालणाऱ्या सत्याग्रहींना मंदिरापर्यंत घेऊन जात. १५ एप्रिल १९३२ रोजी ४१ सत्याग्रहींना धुळ्यातील तुरुंगात नेण्यात आले. १६ एप्रिलला सीताबाई, गीताबाई यांच्याबरोबर १० महिला होत्या. सीताबाईंच्या नेतृत्वाखाली रंभाबाई, येसाबाई, सावळाबाई इत्यादींची नावे समजली. ५ महिलांची तुकडी दोन दारांवर पहारा देत होती. या सत्याग्रहाचे शाहिरांनी पोवाड्यातून वर्णन केले आहे.

*सीताबाईच्या नेतृत्वाखाली*
*कडाडली वीज मंदिरावरी*
*सीतामाईची तुटली नथ*
*भिंत फोडुन गेली कळसावरी*

महिलांमध्ये प्रसिद्ध असलेल्या ओव्यांमधून तत्कालीन सामाजिक भान आणि परिस्थितीच्या संघर्षाची तीव्रता, ताणतणाव, गांभीर्य आणि महिलांमधील उत्साह, सनातन्यांवर हल्ला करण्याचे त्यांचे धैर्य व्यक्त होते.

*आयांनो, बायांनो, दूध घ्या ग तांब्या तांब्या*
*आला आंबेडकर, मोटर घेऊन उभा रणखांब्या*
*आयांनो, बायांनो, दूध घ्या ग वाटी वाटी*
*बाबासाहेबासंग, भाऊराव सांगे गोठी*
*रामकुंडावरी, सोडली दाळ*
*आला आंबेडकर, ब्राह्मणांची केली राळ*

अशा रीतीने हे स्त्रीमन अभिव्यक्त होत होते. पुरुषांच्या बरोबरीने अजाणतेपणी हा सहभाग नव्हता, हेच यातून दिसते. उलट एकूण परिस्थिती समजून उमजून आंदोलनातील ही भागीदारी होती.

सत्याग्रहींच्या मिरवणुकीचे वर्णन करताना सत्याग्रहींना साधू, संत, वारकरी म्हटले आहे. निवडणुकीत स्त्रियांचे स्थान कुठे असायचे; तर ते या वीरांच्या मागेच.

*साधूसंत मागे वारकरी*
*झुंड स्त्रियांची त्याचे माघारी*
*पुढे वडनेरचे प्रसिद्ध वाजंत्री*
*त्यांनी फुंकली तुतारी*
*जागा होईना सत्याग्रहींना*
*आघाडी गंगेच्या पुलावर*
*पिछाडी देवळाली नाक्यावर*

मोठ्या संख्येने आंबेडकरी जनता या लढ्यात ओढली जात होती. स्त्रिया मिरवणुकीतसुद्धा मागे नसायच्या; तर वीरांच्या बरोबरीनेच त्या असायच्या. शाहू नावाच्या मुलीने पुजाऱ्याच्या तोंडात भडकावली होती. भूदेव म्हणून ज्यांचा दरारा होता, त्यांच्या पाप-पुण्याच्या कल्पनांना बळी न पडता एवढी हिंमत तिने बाबासाहेबांच्या लढाईत दाखविली होती. जिला अबला म्हटले जाते त्या हातांमध्ये असे बळ आले होते. ही सत्याग्रही महिला आंबेडकरी तत्त्वज्ञान

सभापीठावर जाऊन बोलू शकत नव्हती; पण ती कृतीतून निर्भयपणे साथ देत होती.

या लढ्याच्या दरम्यान मंदिराचे दार उघडले नाही. संघर्षाची तीव्रता वाढत होती. तशात येवल्याच्या परिषदेत बाबासाहेबांनी धर्मांतरांची क्रांतिकारी घोषणा केली. महिलांना त्याची अपरिहार्यता मनोमन पटली. आता तिचा देव मंदिरात राहिला नव्हता तर तिच्यासाठी माणूसपणाच्या हक्कासाठी मोर्चात होता.

*ना ऽऽ ही अस्पृश्यता बधायची*
*झाल्यावरी धर्मांतर आमुचे*
*त्यावीण हो सुख नाही ॥१॥*
*सुमार्ग दावी दीनबंधू तो*
*त्यातच अवघे हित आपुले*
*सकळ मिळोनी करू चला धर्मांतर.*

अशी तयारी स्त्रियांनी धर्मांतरासाठी दर्शविली. शांताबाई दाणी या शिकलेल्या मुलीचा विकास भाषणांच्या निमित्ताने या आंदोलनापासूनच होत होता. पण खरी योद्धा सीताबाईच होती. समर्थपणे, निर्भयपणे महिलांना घेऊन साथ देत होत्या. पाणी पिण्यासाठी विहिरी खुल्या करणे इत्यादी कामे सुरूच होती.

## मनमाडची महिला परिषद

१२ फेब्रुवारी १९३८ रोजी बाबासाहेबांनी सटाणा आणि मनमाड येथे शेतकरी व कामगारांची आणि महिलांची परिषद घेतली. मनमाड येथील ही परिषद संपूर्ण आंबेडकरी चळवळीला वेगळं वळण देणारी तसेच लढा अधिक तीव्र आणि व्यापक बनविणारी होती. मंदिर प्रवेशाच्या लढाईबरोबरच आता आर्थिक समतेचे तसेच सत्तेसाठी राजकीय लढे गरजेचे आहेत, असे सूत्र या परिषदांमधून दिसून येते. किमान वेतन देण्यात यावे; जमीनदारी नष्ट करावी; अल्पभूधारकांना कालव्याच्या पाण्याचे दर निम्मे करावे. मजुरांनी आपले कार्यकर्ते विधीमंडळावर निवडून द्यावेत, इत्यादी ठराव या परिषदांमधून घेण्यात आले. रेल्वे कामगारांना उद्देशून बाबासाहेबांनी जे भाषण केले, त्यात स्वतंत्र कामगार संघटना असाव्यात असे सांगून ब्राह्मणशाही व भांडवलशाही हे आपले शत्रू आहेत. आपल्या कामगार संघटनेचे स्वरूप या दोन्हीही शत्रूंना नष्ट करणारे असावे. अनेक दृष्टींनी ही परिषद महत्त्वाची ठरली. दुपारी याच मंडपात महिलांची परिषद घेण्यात आली.

आर. आर. भोळे यांच्या आईच्या अध्यक्षतेखाली ही परिषद घेण्यात आली. मुलींच्या शिक्षणावर भर देण्याचे ठरविले. त्यातूनच रमाबाई वसतिगृहाची निर्मिती झाली आणि गीताबाईंना (जीजींना) अधीक्षक नेमण्यात आले.

## नागपूरची महिला परिषद (जुलै १९४२)

दलित समाजाने लोकशाहीच्या बाजूने लोकशाही मूल्ये व संस्कृती जतन करण्यासाठी झगडले पाहिजे. लोकशाही नष्ट झाली तर आपल्या भविष्याचे वाटोळे होईल. शिक्षण घ्या, चळवळ करा, संघटन करा, स्त्रियांच्या स्वतंत्र संघटना असाव्या. ही लढाई स्वातंत्र्यासाठी

आहे. स्त्रियांना आपल्या कर्तव्याची महती समजली तर त्या कार्य करतील. स्त्रियांनी नवऱ्याशी दासी म्हणून नव्हे तर मित्रत्वाच्या बरोबरीच्या नात्याने वागावे. पुरुषांनीही स्त्रियांना सन्मानाची, समतेची वागणूक द्यावी हा उपदेश बाबासाहेबांनी या परिषदेत केला आणि दादासाहेबांनी तो अंत:करणात साठविला. त्याप्रमाणे गीताबाई व सीताबाईंना सोबतच ठेवले. मुलींसाठी सुरक्षित ठिकाण उपलब्ध केल्यास शिक्षणाचे प्रमाण वाढेल. अन्यथा लांबच्या शाळेत मुलींना त्यांचे आईवडील पाठवत नाहीत असे दादासाहेबांना वाटत होते. गीताबाईंच्या मदतीने आपल्या घरातूनच नव्या विचारांचा प्रारंभ केला. गीताबाईंना घेऊन ते 'गर्व्हनर ॲट होम' मेजवानीसाठी गेले. मेजवानीसाठी महिलांना नेणे हे त्या काळाच्या मानाने फारच पुढचे पाऊल होते.

गीताबाई गायकवाड १९३८ साली स्कूल बोर्डाच्या निवडणुकीस उभ्या राहिल्या व बिनविरोध निवडून आल्या. २४ मे १९३८ च्या त्रैवार्षिक निवडणुकीत बहुसंख्य मतांनी निवडून आल्या. त्यांच्या प्रतिस्पर्धी नाशिक रोडच्या सौ. इंदिराबाई देशमुख होत्या. अशा रीतीने स्त्रियांच्या राजकीय सहभागासाठी दादासाहेबांनी वातावरण तयार केले. १९४६ साली सार्वत्रिक निवडणुका झाल्या. शे.का.फे.ने आपले उमेदवार उभे केले. त्यात दादासाहेबांनी शांताबाई दाणी यांना निफाडमधून आणि डॉ. मिस लोंढे यांना नांदगावामधून उभे केले. या दोघी व दादासाहेब स्वत:ही पराभूत झाले. पण संघर्ष केला. माणूसपणाचा हक्क बजावला. पुणे कराराच्या अटी काँग्रेसने पाळल्या नाहीत. गांधीजींच्या हयातीतच राखीव जागांवर निवडून गेलेले सर्व प्रतिनिधी शे.का.फे.चे नव्हते. या निवडणुकांनी एक चित्र स्पष्ट केले की, अस्पृश्यांचे खरे प्रतिनिधी राखीव जागांवर निवडून जाऊ शकत नाहीत. आतापर्यंतच्या उत्साहवर्धक मानवी हक्काच्या लढाईला हा अनुभव निराशाजनक व कटू होता. ब्रिटिशांशी झालेल्या अस्पृश्यांच्या वाटाघाटीतून विकासासाठी जे काही हातात लाभले होते, तेही गमावण्याची भीती निर्माण झाली. म्हणून बाबासाहेबांनी पुन्हा शे.का.फे.ला स्वतंत्र मतदारसंघ हवा, यासाठी मोठ्या प्रमाणावर सत्याग्रह सुरू केला. असेंब्लीवर निवडून आलेले प्रतिनिधी आमचे नाहीत असा दावा शे.का.फे.ने केला. या सत्याग्रहाचे वैशिष्ट्य म्हणजे दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली लाभलेला महिलांचा मोठा सहभाग. शांताबाई दाणी, सीताबाई, गीताबाई यांनी आपल्या नेतृत्वाखाली १३ ते १४ महिला मंडळे पुणे येथे निदर्शनासाठी नेली होती. इंदूबाई निकम, कर्डुले इत्यादी नावे घेतली जातात. पुणे येथे असेंब्लीचे पावसाळी अधिवेशन भरत असायचे. मुंबई प्रांताचे मुख्यमंत्री खेर या सत्याग्रहाबद्दल म्हणतात, "हा सत्याग्रह कशाच्या विरुद्ध आहे समजत नाही. आंबेडकरी मंडळी निवडणुकीत पराभूत झाली म्हणून वैफल्यग्रस्त आहे." प्रांतिक नेते स. का. पाटील २७ जुलै रोजी बाबासाहेबांना भेटले. सत्याग्रह मागे घेण्यात आला. या सत्याग्रहात काँग्रेसला काही प्रश्न विचारण्यात आले. १. अस्पृश्यांचे स्वराज्यात स्थान कोणते? २. अल्पसंख्याकांचे संरक्षण करण्यात काँग्रेस अयशस्वी का? ३. ब्रिटिश सरकारच्या राज्यात जे राजकीय हक्क मिळाले ते हिरावून घेतले जातील का? ४. खरे प्रतिनिधी (अस्पृश्यांचे) का निवडून आले नाहीत? ५. पुणे कराराचे वचन व इतर वचने का मोडलीत? ६. अस्पृश्यता गेली नाही हे गांधीजीही मान्य करतात मग स्वतंत्र मतदारसंघाची मागणी का मान्य करीत नाहीत? ७. युरोपियन,

अँग्लो इंडियन, ख्रिश्चन आदींचा धर्म एकच असताना त्यांना स्वतंत्र मतदारसंघ कसे दिले?
८. हिंदू आणि शीख यांच्यात रोटी-बेटी व्यवहार होतो; तरीही शिखांना, मुस्लिमांना अल्पसंख्याक स्वतंत्र मतदारसंघ दिले आहेत.

हे प्रश्न आजच्या राजकीय वास्तवाबद्दलही बरंच काही बोलतात. या प्रश्नांची जाणीव भाऊरावांनी स्त्रियांना करून दिली. त्यांना फक्त बरोबर घेतले नाही; तर गांधीजींचा विचार आणि बाबासाहेबांचा विचार यातील तफावत त्यांच्या लक्षात आणून दिली. म्हणूनच २० दिवस महिला तुरुंगात राहिल्या. ह्या महिला मंडळाच्या सर्व अध्यक्षांची, सभासदांची नावे समजू शकली नाहीत. महिलांच्या राजकीय जाणिवांच्या या अभूतपूर्व सत्याग्रहातील ह्या वीरांगनांपैकी फक्त शांताबाई, रूपाताई हयात आहेत. महिलांचे राजकीय प्रशिक्षण करण्याचे काम भाऊरावांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी प्रभावी रीतीने केले.

**भूमिहीनांचा सत्याग्रह :** कसेल त्याची जमीन, पडीक जमिनी भूमीहिनांना मिळाल्या पाहिजे, अन्नधान्याचे पुरेसे वाटप, किमान वेतन महार वतने नष्ट व्हावी इत्यादी प्रमुख मागण्यांसाठी बाबासाहेबांच्या महापरिनिर्वाणानंतर रिपब्लिकन पक्षाच्या बॅनरखाली, दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली झालेला हा सत्याग्रह. या सत्याग्रहाने दादासाहेबांना केवळ महारांचे नव्हे तर समग्र शेतमजूर, भूमिहीन दलितांचे, स्त्रियांचे नेते बनविले. त्यांच्या वाढत्या लोकप्रियतेचा दबाव अनेक राजकीय नेत्यांवर आला होता. या सत्याग्रहात महिलांचा सहभाग मोठ्या प्रमाणावर होता. सीताबाई, गीताबाई आणि शांताबाई दाणी इत्यादींनी महिलांचे नेतृत्व केले. सत्याग्रहींसाठी तुरुंग छोटे पडले. या सत्याग्रहात सखुबाई साळवे, रुक्मिणी धनाजी दाणी, लक्ष्मीबाई केशवराव दाणी, इंदूबाई सुरेश दाणी, राणी आई पगारे, सावळाबाई सहभागी होत्या. या संघर्षात

*धनी चार वाट्याचा मी निम्मा वतनदार*
*जरी का आली लगन सराई*
*खरकट्याशी सीमा नाही*
*घरी चूल पेटत नाही*
*एक महिना मधे*

सरकारने या मागण्यांकडे पुरेसे लक्ष न दिल्यामुळे सत्याग्रह ६ डिसेंबरला पुन्हा सुरू करण्याचे ठरले. दिल्लीतील मोर्चात सीताबाईंनी वस्त्यामध्ये फिरून प्रचार केला आणि १२५ महिलांचा गट मोर्चात सहभागी झाला. मोडक्यातोडक्या हिंदीतून त्या भाषण करीत. या मोर्चात बी. पी. मोर्य यांच्या पत्नी तसेच ईश्वरीबाई या एन. शिवराजच्या पत्नीही सहभागी झाल्या होत्या. हा सत्याग्रह आगीच्या वेगाने पसरत होता. दिल्ली, कुरुक्षेत्र, जालंदर येथेही सीताबाई महिलांसमोर भाषण करत. दिल्लीवरून नाशिकला येताना वाटेत भुसावळ येथे मोर्चा आयोजित केला. तिथे नगरसेविका सत्यभामाबाई सुधाकर मोरे व सीताबाई ह्यांच्या नेतृत्वाखाली महिला सहभागी झाल्या. ५-६ दिवसांचा तुरुंगवास भोगावा लागला. १४ जून १९४८ रोजी शांताबाई दाणी मुंबई प्रांताच्या फेडरेशनच्या सेक्रेटरी झाल्या. गावोगावी जागृती सभा घेण्याचे काम त्या करीत होत्या. प्रचारपत्रक तयार करणे, पत्रव्यवहार, तक्रार अर्ज लिहिणे हे काम त्या करायच्या. शांताबाई पक्षाच्या केवळ महाराष्ट्रातील महिला

परिषदांसाठीच नव्हे तर पक्षाच्या राजकोट, कर्नाटक इथेही दादासाहेबांबरोबर जात असत. राजकीय विकासासाठी वातावरण, सर्व प्रकारच्या संधी त्यांनी उपलब्ध करून दिल्या. १९६७ साली विधानपरिषदेवर आमदार म्हणून दाणी यांची नियुक्ती झाली.

दादासाहेबांनी स्त्री-स्वातंत्र्याच्या संदर्भात केवळ भाषणे दिली नाहीत तर प्रत्यक्ष कृती केली. डॉ. दाणी आणि दादासाहेब या गुरू-शिष्याच्या जोडीने केलेल्या एकत्रित कामातून हे प्रयत्न व्यक्त होतात. शांताबाईंनी अविवाहित राहून समाजसेवा केली हे त्यांचे मोठेपण परंतु त्यांना विकासाच्या सर्व वाटांवर संधी प्राप्त करून देणारे गुरू दादासाहेब होते. शांताबाईंच्या राजकीय, शैक्षणिक वाढीसाठी त्यांनी मशागत केली. वातावरण तयार केले.

दादासाहेबांच्या आणखी एक शिष्या म्हणजे रूपाताई साळवे. रमाबाई आंबेडकर वसतिगृहात १९५५ साली त्या शिकायला आल्या. नंतर अधीक्षक म्हणून काम केले आणि दादांची व जीजींची सेवा केली. आज त्या स्वतंत्रपणे मुलींचे वसतिगृह चालवित आहेत. अविवाहित असलेल्या रूपाताई शैक्षणिक क्षेत्रात काम करीत आहेत. वसतिगृहात शिकलेल्या अनेक मुली आज मंत्रालयात अधिकारी तसेच शिक्षिका म्हणून कार्यरत आहेत. ह्या सर्व मुलींच्या शिक्षणासाठी दादासाहेबांनी संधी प्राप्त करून दिली. दादासाहेबांच्या स्त्री-स्वातंत्र्यावर काहीजण भरपूर बोलतात पण प्रत्यक्ष आपल्या पत्नीला मात्र स्वातंत्र्य समतेचा वाराही लागायला नको अशी खबरदारी घेतात. आंबेडकरी चळवळीत हे प्रमाण कमी आहे. कारण ही स्त्री मुळात बाबासाहेबांनी प्रबुद्ध बनविलेली आहे. ती सभा-मोर्चांना नेहमीच अग्रक्रम देते, उपस्थित असते. सीताबाई व गीताबाई या दादासाहेबांच्या दोन्ही पत्नींना त्यांनी चळवळीत आणि एकूण लढ्यात भाग घेण्यासाठी प्रोत्साहन दिले. म्हणूनच गीताबाई (राजकारणात) स्कूल कमिटीवर निवडून गेल्या आणि मुलींच्या वसतिगृहाची संपूर्ण जबाबदारी समर्थपणे पेलू शकल्या.

दादासाहेबांच्या म्हणजेच बाबासाहेबांनी सुरू केलेल्या या लढ्यात स्त्रियांचा सहभाग मोठ्या प्रमाणावर होता. आंबेडकरी चळवळींना शक्ती आणि गती; त्यांच्या सहभागामुळे प्राप्त झाली. ह्या सर्व स्त्रियांना रमाईचा, सावित्रीचा आणि यशोधरेचा वारसा लाभला आहे. आजही, रमाबाई नगर, घाटकोपर येथे - चाळीत घडलेली दंगल असो की इतर जातीयवादी दंगली असो, स्त्रिया निषेधात्मक कारवाई करण्यासाठी न घाबरता पुढेच असतात. कारण बाबांना साथ करणाऱ्या रमाईचा, ज्योतीच्या सावित्रीचा वारसा त्यांना लाभलेला आहे आणि बाबासाहेबांसारखा नेताही लाभला. ज्याने हिंदू कोड बिल लिहून तमाम स्त्री-जातीला या देशाचे नागरिक बनविले आणि मालमत्तेत वारसाहक्क देऊन तिला भौतिक पाया प्राप्त करून दिला. यामुळे तिला स्वत:ची अस्मिता, ओळख प्राप्त झाली. दादासाहेबांनी त्यांचे शिष्य म्हणून स्त्रियांना भागीदारी करून देण्याची, माणूस म्हणून वागविण्याची हीच परंपरा पुढे चालू ठेवली.

# समाजक्रांतीचे प्रणेते दादासाहेब गायकवाड

ॲड. विठ्ठलराव हांडे

कर्मवीर दादासाहेबांचा जन्म नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यातील आंबे दिंडोरी या खेडेगावी झाला. वडिलांचे नाव कृष्णराव (किसनराव) गायकवाड. कृष्णरावांच्या पहिल्या पत्नीचे नाव पवळाबाई. त्यांना चार मुली व भाऊराव हा मुलगा. गायकवाड घराणे मागासलेल्या जातीतील असूनही गावात मोठे वजनदार घराणे मानले जाई. आंबे गावातील त्यांचा मोठा वाडा अजूनही जीर्ण अवस्थेत उभा आहे. घरात कुटुंबातील व नोकरचाकर मिळून साठ-सत्तर माणसे होती. भाऊरावांचे आजोबा महिपतराव निष्णात गवंडी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांनी हाताखालच्या मजुरांच्या साहाय्याने नाशिक येथील जिल्हा कोर्ट व कलेक्टर कचेरीच्या दगडी इमारतींचे सुंदर बांधकाम केले आहे. कृष्णरावांना गावात खूप मोठा मान होता. त्यांचा शब्द अखेरचा मानला जाई. ते धार्मिक वृत्तीचे होते. परमेश्वरावर अखंड श्रद्धा व भक्ती होती. वणीची सप्तशृंगी देवी हे त्यांचे कुलदैवत. कुटुंबप्रमुख कृष्णराव शेतीची कामे करीत. पण त्यापेक्षाही महत्त्वाचे काम म्हणजे गावकऱ्यांच्या तक्रारींचे न्यायनिवाडे चावडीत बसून करणे हे होय. ते गावचे प्रमुख होते. तसेच ते एक सधन शेतकरीही होते. कृष्णराव आपला मुलगा भाऊ यास सतत म्हणत, "भाऊ, तू फार फार शीक; मोठी कीर्ती मिळव आणि आमच्या कुळाचे नाव जगात गाजव."

**नवससायासाने मुलगा झाला**

पवळाबाईंनी सप्तशृंगी देवीला पुत्र होण्यासाठी नवस केला. पुत्रप्राप्तीसाठी कृष्णरावही 'शिवलीलामृता'चे पारायण करीत होते. बाणगंगेच्या काठी असलेल्या शिवमंदिरातील शंकराच्या पिंडीस रोज सकाळी स्नान घालीत असत व प्रार्थना करीत, "ॐ शंभो, अस्पृश्यतेचा कलंक घालविण्यासाठी धाव घे. माझ्या अपंग, अज्ञानी, विपन्नावस्थेत पिचत पडलेल्या बांधवांना तारण्यासाठी तू धाव घे." त्यालाच प्रतिसाद म्हणून की काय १५ ऑक्टोबर १९०२ रोजी पुत्ररत्न भाऊराव जन्मास आले. आंबे येथील शाळेत त्यांचे नाव वडिलांनी नोंदविले— 'भावड्या किसन महार.' हे नाव जन्मभर तसेच राहिले असते. पण ते नाशिकला हायस्कूलमध्ये शिकण्यासाठी आले. तालीम मास्तर पाठक यांनी नाव विचारले आणि भाऊरावांनी वरीलप्रमाणेच नाव सांगितले. वर्गशिक्षक पाठक यांनी नाव बदलून भाऊंच्या नावाची नोंद 'भाऊराव कृष्णराव गायकवाड' अशी केली. भाऊराव बुद्धीने तरतरीत व

बांध्याने पिळदार होते. व्यायामाची पहिल्यापासूनच आवड असल्याने शरीर भरदार व भारदस्त होते. गोंडस बांध्यामुळे त्यांची इतरांवर पटकन छाप पडत असे. मोठेपणी सार्वजनिक काम करताना दुटांगी धोतर, डोक्यावर काळी टोपी व अंगात शर्ट आणि कोट असा पेहेराव असे. कोर्ट-कचेरीत जनतेच्या कामासाठी जाताना दुचाकी सायकल ते वापरीत असत.

**प्रतिकूल परिस्थितीतून वाटचाल**

अस्पृश्यतेच्या अन्यायाची जाणीव भाऊरावांना त्यांच्या बालवयातच झाली. शाळेत इतर मुलांपासून दूर बसावे लागले. मास्तरांना जवळून स्पर्श करता येत नव्हता. मुलांशी खेळ खेळता येत नव्हते. वाढत्या वयाबरोबर या दुष्ट रूढीची जाणीव वाढीस लागली. आपण इतर मुलांसारखे असताना असा भेदाभेद का? यातूनच जबर चीड निर्माण होत गेली. या साऱ्या विटंबनेचे मूळ म्हणजे आपणास लोक अस्पृश्य लेखतात हे बाल भाऊरावांना समजू लागले. देवाधर्माबद्दल त्यांना तिरस्कार वाटू लागला. भाऊरावांच्या मनात रुजलेली तिरस्काराची भावना दिवसेंदिवस वाढत गेली.

१९१४ साल म्हणजे पहिल्या महायुद्धाचे वर्ष. त्या वर्षी प्लेगचे महायुद्ध नाशिकला सुरू झाले. प्लेगने हाहाकार माजवला. भाऊराव त्या वर्षी इंग्रजी चौथीत होते. शाळा बंद पडली. लोक नाशिक सोडून रानावनात राहावयास गेले. काही परगावी राहावयास गेले. भाऊरावही आपल्या आंबे गावी गेले. प्लेग बरा झाला पण कृष्णरावांनी आपला एकुलता एक मुलगा भाऊराव यांना लगेच शाळेत न पाठविता परीक्षेच्या वेळेस नाशिकला पाठविले. परिणामी भाऊराव चौथीच्या परीक्षेत नापास झाले. १९१८ साली पुन्हा प्लेगची साथ सुरू झाली. भाऊराव पुन्हा गावाकडे रवाना झाले. पुन्हा शाळा. सहावी इयत्ता पास झाल्यावर मॅट्रिकचे वर्ष उजाडले. प्लेग नाशिकची पाठ सोडीना. त्याही वर्षी पुन्हा नाशिक शहरात प्लेगने भयंकर थैमान मांडले. सारे गाव बाहेर पडले. त्यामुळे भाऊराव आंब्याला आले ते कायमचेच. शिक्षणाला कायमचा रामराम ठोकणे भाग पडले. नंतर नोकरी मिळाली पण बदली झाल्यामुळे राजीनामा दिला व दोन वर्षे आंब्यालाच काढली. त्यानंतर भाऊरावांची शाहू छत्रपती वसतिगृहात अधीक्षक म्हणून वसतिगृहाचे संचालक के. बी. जाधव यांनी नेमणूक केली. या संधीचा अधिकाधिक उपयोग अस्पृश्यतेच्या निर्मूलनासाठी करावयाचा असे आपले ध्येय व धोरण ठरवून टाकले. १९१७ नंतर दोन-तीन वर्षांत अस्पृश्यांच्या चळवळीचे क्षेत्र वाढत गेले. "आम्हाला सामाजिक हक्क द्या व माणसाप्रमाणे वागवा" अशी पहिल्यांदा चळवळ सुरू झाली. त्यानंतर "आमच्यावर धार्मिक, सामाजिक व आर्थिक गुलामगिरी लादलेली आहे ती नष्ट करा" अशी चळवळ सुरू झाली. चळवळीने मागण्यांचा पुढचा टप्पा गाठला. "आम्हाला सक्तीचे व मोफत शिक्षण द्या, राजकीय हक्क द्या व सरकारी नोकऱ्यांत प्रवेश द्या" अशा मागणीने जोर धरला. चळवळीत विठ्ठल रामजी शिंदे व चंदावरकर यांचे प्राबल्य काही काळ चालू होते. अस्पृश्यांच्या चळवळीत शिवराम जानबा कांबळे काम करीत होतेच. 'सोमवंशीय मित्र' या नावाने एक मासिक ते पुण्याहून प्रसिद्ध करीत होते. भारतातील पहिली अस्पृश्यांची परिषद बोलविण्याचा मान या कर्तृत्ववान नेत्याकडे जातो. पुढे चळवळीची व्याप्ती अधिकच वाढली.

याच काळात सत्यशोधक चळवळीने चांगलाच जोर धरला होता. या चळवळीने जलशांद्वारे खेड्यापाड्यांतील माणसांची नाडी अचूक ओळखली होती. १९२७ ते १९३५ या कालखंडात अस्पृश्यांच्या ज्या अनेक चळवळी झाल्या, लढे उभारले गेले. त्यात दलित जलसाकारांनी नवचैतन्य आणले. याच वेळेस मुंबईच्या विधिमंडळाची पावले अस्पृश्यांच्या सुधारणेच्या मार्गाने धीम्या गतीने पडू लागली. विधिमंडळातील अस्पृश्यांचे पहिले प्रतिनिधी ज्ञानदेव ध्रुवनाथ घोलप. त्यांनी अस्पृश्यांची गाऱ्हाणी सरकारवर प्रश्नांचा भडीमार करून मांडली. रावबहादूर सीताराम केशव बोले यांनी ४ ऑगस्ट १९२३ रोजी विधिमंडळात ठराव मांडला. "अस्पृश्यांना सार्वजनिक पाणवठे, धर्मशाळा, विद्यालये, न्यायालये या सार्वजनिक ठिकाणी मुक्तद्वार असावे." ते म्हणाले, "अस्पृश्यता हा आपल्या मायभूमीच्या पवित्र नावाला लागलेला मोठा कलंक आहे. देशाच्या विकासाच्या दृष्टीने आपण अस्पृश्यांना समानतेची वागणूक दिली तरच देशाचे कल्याण होईल." पुढे समाजसेवकांची एक फळीच त्या कालखंडात उभी राहिली.

भारत हा महामानवांना जन्म देणारा देश आहे. असाच एक महामानव भारतात जन्माला आला. त्याचे नाव डॉ. भीमराव आंबेडकर. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या नेतृत्वाखाली २० जुलै १९२४ रोजी मुंबईत बहिष्कृत हितकारिणी सभा स्थापन झाली. दलितांना आशेचा एक नवा किरण क्षितिजावर दिसू लागला. त्यांच्या आशा-आकांक्षा पल्लवीत झाल्या. मरगळलेल्या मनात नवी उभारी दिसू लागली.

**पहिलाच संघर्ष**

शाहू छत्रपती वसतिगृहाचे दादासाहेब अधीक्षक झाल्यावर त्यांचे मित्र व मेघवाल समाजाचे कार्यकर्ते रामभाऊ पाला मारू यांनी लक्ष्मीनारायण मंदिरात भजनासाठी दादासाहेब व मुलांना बोलाविले. त्या कार्यक्रमात रामभाऊंनी दादासाहेबांना मसाल्याच्या दुधाचा ग्लास भरून दिला. दादासाहेबांनी मोठ्या आदराने त्याचे प्राशन केले. रामभाऊंच्या हातचे दूध भाऊरावांनी घेतले, ही बातमी गावात पसरली. सनातनी महार रागावले. भाऊरावांचे सासरे रखमाजी दाणी भाऊरावांना वसतिगृहात येऊन भेटले व म्हणाले, "तुम्ही केलेली गोष्ट धर्मबाह्य आहे, तुम्ही धर्माविरुद्ध वागलात. तुम्ही चूकही कबूल करावयास तयार नाही व त्याचा तुम्हाला पश्चात्तापही होत नाही. या चुकीचा परिणाम तुम्हाला व आम्हाला सर्वांना भोगावा लागणार आहे." भाऊरावांना या बोलण्याचा ना खेद ना खंत. या दुष्ट रूढी मोडल्या पाहिजेत म्हणून ते खेड्यापाड्यांत जाऊन सभा घेऊ लागले. आपल्या जातबांधवांना सांगू लागले, "आपण मृत जनावरांचे मांस खाणे सोडले पाहिजे. गावात उष्टे अन्न भीक म्हणून मागण्याचे सोडले पाहिजे. आपली महार वतने नष्ट झाली पाहिजेत, त्याशिवाय तुम्ही या दास्यातून मुक्त होणार नाहीत." यावर खुद्द भाऊरावांचे चुलते म्हणाले, "हा कालचा पोरगा आला काय आणि आमच्या वंशपरंपरा हक्कांवर गदा आणतो म्हणजे काय?" त्याचे हे म्हणणे आम्हाला बिलकूल मान्य नाही." सुधारणांना घरातूनच विरोध सुरू झाला. गुलामीत वाढलेल्या समाजाची मनं अशा सुधारणा स्वीकारायला तयार नव्हती. परंतु भाऊरावांनी कुठल्याही गोष्टीची पर्वा न करता आपले काम चालूच ठेवले. त्यांना माघार ही

गोष्ट माहीतच नव्हती. ते बेडर होते, निश्चयी होते. विचारांवर ठाम होते. सभेतून ते सांगत, "यमराज जरी माझ्यासमोर येऊन उभा राहिला तरी मी स्वीकारलेल्या मार्गापासून अगदी केसभरदेखील ढळणार नाही. माझ्या बांधवांनो, तुम्हाला कोणी अस्पृश्य मानू नये, तुमचा विटाळ कोणी पाळू नये, तुमची स्थिति सुधारावी; तुम्हाला समाजात मानाचे स्थान प्राप्त व्हावे हीच माझी अपेक्षा आहे."

वँसतिगृहात भाऊरावांनी विद्यार्थ्यांमध्ये वाचनाची आवड निर्माण केली. विद्यार्थ्यांच्या वक्तृत्व स्पर्धेत भाऊराव हिरीरीने भाग घेत. त्यामुळे विद्यार्थी बहुश्रुत झाले होते. त्यांच्या व्यक्तित्वाचा विकास होत होता. आपण ज्या उपेक्षित समाजात जन्मलो, त्या समाजाचा आत्मोद्धार करण्याचे कार्य आपल्यावर आहे. ही जाणीव हळू हळू भाऊरावांनी विद्यार्थिवर्गात निर्माण केली. समाजपरिवर्तनासाठी ध्येयवादी माणसे वेडी होतात. भाऊराव त्यांच्यातीलच एक होते. निफाड तालुक्यातील महारवावी गावातील इंडियन पीनल कोडच्या ३०२ कलमाखाली खुनाची केस होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर त्या केसमध्ये वकील म्हणून मुंबईहून भुसावळ पॅसेंजरने पहाटेच नाशिकरोड रेल्वे स्टेशनवर उतरले व थेट शाहू वसतिगृहात पहाटेच भाऊरावांकडे आले. भाऊरावांची ही पहिलीच भेट. यापूर्वी त्यांनी आंबेडकरांना प्रत्यक्ष पाहिले नव्हते. त्यांचा फोटो पाहिला होता. वर्तमानपत्रातून त्यांच्यासंबंधी वाचले होते. त्यांनी चटकन त्यांचे पाय धरले. त्यांना साष्टांग नमस्कार घातला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर भाऊरावांना गुरूंच्या स्वरूपात भेटले. ही भेट त्यांच्या जीवनात क्रांतिकारक ठरली. त्यांच्या जीवनाला नवी दिशा मिळाली. हा शिष्य आपल्या निष्ठेने, कर्तृत्वाने मानमान्यता पावला आणि दलित जनतेचा एक आधारस्तंभ झाला. गुरू-शिष्याच्या या जोडीने शेवटपर्यंत खांद्याला खांदा लावून सामाजिक लढे दिले.

दादासाहेबांचे लग्न त्यांच्या नवव्या वर्षी रखमाजी दाणी यांची मुलगी सीताबाई हिच्याशी झाले. दादासाहेब २६ वर्षांचे आणि सीताबाई २४ वर्षांच्या झाल्या होत्या, पण दुर्दैवाने त्यांना मूलबाळ झाले नाही. सीताबाईच्या अत्याग्रहामुळे दादासाहेबांस दुसरे लग्न करणे भाग पडले. सीताबाईची धाकटी बहीण गीताबाई हिचा दादासाहेबांच्या जीवनात दुसऱ्या लग्नाने प्रवेश झाला.

दादासाहेब वसतिगृहाचे काम करीत असताना त्यांच्या वाचनात दोन महत्त्वाच्या घटना आल्या. त्रावणकोर संस्थानातील व्हायकोम या गावी ज्या रस्त्यावर ब्राह्मणांची घरे होती, तो रस्ता अस्पृश्य बांधवांस खुला व्हावा म्हणून मद्रासमधील ब्राह्मणेतर चळवळीचे पुढारी रामस्वामी नायकन् यांनी सत्याग्रह सुरू केला होता. आचार्य विनोबा भावे व कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनी त्यात भाग घेतला. ब्राह्मो समाजाचे सेक्रेटरी, पूर्वाश्रमीचे अस्पृश्य यांनीही भाग घेतला होता. देशभर चळवळीस प्रसिद्धी मिळाली. दडपण वाढले. शेवटी स्पृश्य हिंदूंनी माघार घेतली, त्यामुळे प्रश्न मिटला. दुसरी घटना तितकीच बोलकी. मुरूकेसन नावाच्या एका अस्पृश्याने मद्रासमधील एका मंदिरात बंदी मोडून प्रवेश केला. मंदिर प्रवेशापायी मुरूकेसनला न्यायालयाने शासन केले. देवदर्शनासाठी मिळालेली शिक्षा पाहून दगडाच्या मूर्तीत देव नसतो हे समजण्यास त्याला वेळ लागला नसेल. (वि. रा. शिंदे). याँ दोन्ही घटनांचा दादासाहेबांच्या मनावर जबरदस्त परिणाम झाला.

**महाडचा संग्राम**

महाडच्या चवदार तळ्याचा लढा म्हणजे माणुसकीचा लढा, समतेसाठी संघर्ष, अन्यायाविरुद्ध संगर. १९२७ सालच्या सामाजिक क्रांतीची सिंहगर्जना. रा. ब. बोले यांनी १९२३ साली विधिमंडळात संमंत करून घेतलेला ठराव. या ठरावान्वये महाडच्या नगरपालिकेने आपल्या अधिकाराखाली असलेले चवदार तळे महाडमधील अस्पृश्यांना खुले झाल्याचे जाहीर केले. तळे खुले झाले तरीही त्या तळ्यातून अस्पृश्यांनी पाणी नेले नव्हते. आपण तळ्यातील पाण्याला शिवलो तर स्पृश्य हिंदू आपणास झोडपून काढतील, गावात जीवन जगणे अशक्य होईल, ही भीती अस्पृश्यांना वाटत होती. त्यासाठी प्रत्यक्ष कृती करणे आवश्यक आहे म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड व त्यांच्या सहकाऱ्यांनी दिनांक १९ व २० मार्च १९२७ रोजी महाड येथे 'कुलाबा जिल्हा बहिष्कृत परिषद' भरविण्याचे ठरविले. दादासाहेबांनी ही परिषद यशस्वी करण्यासाठी जीवाचे रान केले. खेड्यापाड्यांत हिंडू लागले, प्रचार करू लागले. तनमनधनाने झटू लागले. स्वभाव जिद्दी व साहसाची, समाजसेवेच्या कसोटीस उतरण्याची हीच वेळ. त्यांनी महाड येथे सत्याग्रहात पहिला सत्याग्रही म्हणून आपले नाव नोंदविले. परिषदेत मोठी दंगल होणार, हत्यारांचा मोठा व्यापार होणार असे अफवांचे पीक दहशत निर्माण करण्यासाठी पसरविण्यात आले. अस्पृश्यांनी मोठ्या संख्येने येऊ नये हा त्यामागील स्पृश हिंदूंचा उद्देश. पण झाले उलटेच. अस्पृश समाजाच्या बायका-मुलांचे, तरुणांचे, म्हाताऱ्यांचे लोंढेच्या लोंढे सर्व बाजूंनी महाडकडे जाणाऱ्या रस्त्यास लागले. तेथे पोहोचल्यावर दादासाहेब व त्यांच्याबरोबर आलेल्या पुढारी मंडळींस कळाले की, कातकऱ्याकरवी बाबासाहेबांचा खून तेथील स्पृश हिंदू करणार आहेत. ब्रिटिश अधिकाऱ्यास या बातमीचा सुगावा लागला म्हणून परिषदेच्या मंडपापर्यंत पायी मिरवणुकीने न जाण्याची विनंती अधिकाऱ्यांनी बाबासाहेबांना केली होती. त्यांना मोटारीतून मंडपापर्यंत नेण्यात आले. मिरवणुकीचे नियोजन दादासाहेबांकडे होते. सात-आठ मैल लांबीची मिरवणूक. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दुर्दम्य आशावाद अन् उत्साह होता. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण, दादासाहेबांनी आपल्या अंतःकरणात कायमचे कोरून ठेवले. या भाषणामुळे त्यांच्या जीवनास वेगळीच कलाटणी मिळाली. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या भाषणात लष्कर प्रवेशातील महारांच्या बंदीवर कडाडून हल्ला चढविला. ते म्हणाले, "माझे असे मत आहे की, आम्ही नेहमीच सरकारला अनुकूल असतो. म्हणूनच सरकार नेहमी आमची उपेक्षा करते. लष्कर भरतीवरील बंदी उठविण्याचा आटोकाट प्रयत्न करा. अस्पृश्यांच्या मनावर जुन्या, खुळचट, अनिष्ट विचारांचा जो गंज चढला आहे, तो धुऊन निघाला पाहिजे. आचार, विचार आणि उच्चार यांची शुद्धी जोपर्यंत होत नाही तोपर्यंत अस्पृश्य समाजात जागृती व प्रगतीचे बीज कधीही रुजणार नाही. सरकारी नोकरीत आपला प्रवेश आपण करून घेतला पाहिजे. बहिष्कृत लोकांनी प्राथमिक शिक्षणाकडे दुर्लक्ष करू नये. मृत जनावरांचे मांस वर्ज्य करण्याची प्रतिज्ञा करा. स्वावलंबन शिकावे, स्वाभिमान धरावा, स्वत्वाची जाणीव ठेवावी तरच आपला उद्धार होईल. महारांनी वतनाचा लोभ सोडून द्यावा. शेती करावी आणि जंगलातल्या जमिनी मिळवाव्यात." बाबासाहेबांच्या भाषणाने अस्पृश्यांचा महासागर उचंबळून आला.

महाडमधील काही सनातन्यांनी कोर्टाकडून मनाई हुकूम मिळविला होता. हा मनाई हुकूम कोर्टात जाऊन उठवावा असा विचार बाबासाहेबांनी मांडला व तळ्यात प्रवेश करण्याचा विचार स्थगित करण्यात यावा अशी सूचना होती. दादासाहेब ताडकन उठले व अध्यक्षांकडे बोलण्याची परवानगी मागितली.

"माझ्या बांधवांनो, आताच डॉ. बाबासाहेबांचे भाषण आपण ऐकले आहे. मी तर कालपासून त्यांचे विचार जीवाचे कान करून ऐकत आलो आहे. कालच्या त्यांच्या भाषणातील आवेश, आवेग आणि आजच्या त्यांच्या भाषणाला मिळालेली कलाटणी यातील फरक माझ्या अल्पमतीला समजत नाही. ते म्हणतात, 'स्पृश्य हिंदूंनी तळ्यावर प्रवेश करण्याबद्दल कोर्टाकडून मनाई हुकूम मिळवला आहे.' ठीक आहे. तेव्हा हा लढा आता सरकार आणि आपल्यात होणार आहे, असा त्यांच्या भाषणाचा रोख आहे. म्हणून हा सत्याग्रह आपण स्थगित करावा, अशी त्यांची इच्छा आहे. मला हे पसंत नाही. मित्रांनो, आपली ही चळवळ कशासाठी आहे? मानवी हक्क प्रस्थापित करण्यासाठी आपण सारे स्वखर्चाने येथे आलो आहोत. तीन-चार चार-चार दिवसांच्या भाकरी बांधून, घरदार, शेती, रोजचा उद्योग तसाच मागे ठेवून येथे आपण जमलो आहोत ते असे परत जाण्यासाठी नव्हे. आम्ही परत गेल्यावर तेथे काय सांगणार? कोर्टाचा मनाई हुकूम आला म्हणून आम्ही तळ्यावर जाऊ शकलो नाही! ते तर अत्यंत नामुष्कीचे होईल. पहिल्यांदाच एवढ्या मोठ्या संख्येने महाराष्ट्रातून आपण सारे एकत्र जमलो आहोत. तेव्हा नुसते हात हलवून परत जाणे पुरुषार्थाला शोभून दिसणार नाही. खूप दिवसांनी एखाद्या बाईला मूल होत आहे पण दुर्दैवाने ते मूल जर आडवे आले तर मग कापून काढण्याशिवाय दुसरा इलाजच नसतो. तसेच स्पृश्य हिंदूंना कायद्याच्या दृष्टीने मदत करणाऱ्या या इंग्रज सरकारला आता कापून टाकण्याची वेळ आली आहे. तेव्हा बांधवांनो, माझ्या मते हा सत्याग्रह कोणत्याही परिस्थितीत झालाच पाहिजे."

बाबासाहेब नि:पक्षपाती बुद्धीने म्हणाले, "सत्याग्रह करावा वा सत्याग्रह करू नये अशी सूचना मतास टाका." दोन वेगळी टेबले ठेवण्यात आली. सत्याग्रहींमध्ये अमाप उत्साह होता. 'मरू पण सरकारला आडवे कापू' हा विचार त्यांच्या मनात खोलवर रुजला होता. बाबासाहेबांच्या बाजूने १०-१२ माणसे. बाकी सारा समुदाय सत्याग्रहाच्या निर्धाराने दुसऱ्या बाजूस उभा राहिला. बाबासाहेबांनी दादासाहेबांच्या खांद्यावर थोपटले. ते म्हणाले, "गायकवाड झाले ते चांगले झाले. आपला हा सत्याग्रह अत्यंत शांततेने पार पाडावयास पाहिजे. फक्त तळ्यावर प्रवेश करावयाचा, पाणी प्यायचे आणि परतायचे." दुसऱ्या दिवशी चार-चारच्या तुकड्या अगदी शिस्तबद्ध रीतीने तळ्याच्या दिशेने निघाल्या. तळ्याच्या काठावर बाबासाहेब उभे राहिले, त्यांनी ओंजळीत पाणी घेतले. सर्वांनी त्यांचे अनुकरण केले. अस्पृश्यांनी आपला मानवी हक्क बजाविला. मोर्चा शांतपणे मंडपाकडे परतला. नंतर परिषद समाप्त झाली. जनसमुदाय सामानाची आवराआवर करीत होता, इतक्यात माथी भडकलेल्या स्पृश्य हिंदूंच्या टोळक्याने हातात लाठ्याकाठ्या घेऊन मंडपाच्या दिशेने चाल केली. मंडपात अन्न शिजत होते. त्या अन्नात गुंडांनी माती कालविली. स्त्रिया व मुलांवर लाठीचे प्रहार केले. बऱ्याच सत्याग्रहींना रक्तबंबाळ केले. बाबासाहेब व दादासाहेब त्वरित मंडपात आले. स्त्री-पुरुष घायाळ होऊन कण्हत होते. पोलिसांच्या मदतीने नंतर सर्व शांत झाले. लोक गेले पण

बाबासाहेब, दादासाहेब आणि त्यांचे अन्य सहकारी मागे राहून त्यांनी पुरावा गोळा केला. कोर्टात खटले भरले. ७-८ गुंडांना प्रत्येकी चार महिन्यांची सश्रम कारावासाची शिक्षा झाली. पुन्हा २५, २६ व २७ डिसेंबर १९२७ रोजी महाडला सत्याग्रही परिषद संपन्न झाली. बाबासाहेबांच्या भाषणानंतर चार ठराव संमत करण्यात आले. तिसऱ्या दिवशी परिषदेचे कामकाज संपल्याचे जाहीर करण्यात आले.

**कामाचा व्याप वाढला**

महाडची दुसरी सत्याग्रह परिषद २५ डिसेंबर १९२७ रोजी संपल्यावर दादासाहेबांचे कामाचे क्षेत्र विस्तारले. शाहू वसतिगृहाचे अधीक्षक म्हणून वेळेअभावी काम करणे कठीण झाले. कार्यकारिणीतील सदस्य चितेगावच्या परिषदेने बिथरले. दादासाहेबांचे भाषण त्यांच्या वर्मी लागले. त्या पदाचे त्यागपत्र देणे भाग पडले. त्याच वर्षी त्यांची नाशिक जिल्हा लोकल बोर्डावर नियुक्ती झाली. कामाचा व्याप वाढला. बाबासाहेबांनी महार वतने नष्ट करण्यासाठी जनमत तयार करण्याची कामगिरी दादासाहेबांवर सोपविली. वतनाच्या गुलामगिरीतून अस्पृश्यता मुक्त केल्याशिवाय त्यांचा स्वाभिमान जागा होणार नाही, ते निर्भय होणार नाहीत, चळवळीत आत्मविश्वासाने उतरणार नाहीत याची त्यांना जाणीव होती. दादासाहेबांनी प्रचाराचा धुमधडाका सुरू केला. खेडोपाडी दलितांची, अस्पृश्यांची, मानवी हक्कांची जी पायमल्ली होते ती काही अंशी थांबविणे लोकल बोर्डाच्या माध्यमातून शक्य झाले. जिल्हा लोकल बोर्डात गेल्यावर दादासाहेबांनी पहिला महत्त्वाचा ठराव करून घेतला की, 'ज्या गावांत सार्वजनिक विहिरी आहेत त्या महारांना खुल्या केल्या गेल्या पाहिजेत.' ठराव संमत झाला. दिंडोरी तालुक्यातील उमराळे, नाशिक तालुक्यातील मुळेगाव, चांदवड तालुक्यातील सोनगाव येथील विहिरी दादासाहेबांनी सत्याग्रह करून अस्पृश्यांना पाणी पिण्यासाठी खुल्या करून दिल्या. दुगाव व मोहाडी येथील शाळेत अस्पृश्य मुलांना कसे दूर बसविले जाते याची माहिती जिल्हा लोकल बोर्ड अधिकाऱ्यांना दिली. होणारा अन्याय दूर करण्यासाठी ते रात्रंदिवस झटत होते.

**काळाराम मंदिराचा अभूतपूर्व सत्याग्रह**

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली कर्मवीर दादासाहेब यांनी काळाराम मंदिर प्रवेशाची घोषणा केली. हा धर्मसंग्रामच होता. हा सत्याग्रह अन्यायाविरुद्धच्या न्यायासाठी, मानवतेच्या हक्कासाठी होता. विषमतेविरुद्ध बंड होते. तो गुलामगिरीतून मुक्त होण्याचा संगर होता. २ मार्च १९३० रोजी धर्मयुद्ध भडकले. महाराष्ट्रातील अस्पृश्यांमध्ये आत्मविश्वासाचे बळ एकवटले. चैतन्याची ज्वाला उफाळली. अखिल भारतातील दलित ताठ मानेने अन्यायाचा बीमोड करण्यासाठी दंड थोपटून उभे राहिले. सत्याग्रह समितीची स्थापना करण्यात आली. अध्यक्ष केशव नारायण देव तथा पतितपावन दास, उपाध्यक्ष पांडुरंग शिवाजी सबनीस, सेक्रेटरी भाऊराव कृष्णराव गायकवाड व इतर २७ जण मिळून समिती गठीत करण्यात आली. मंदिराचे पुजारी गणेश रामचंद्र यांना दादासाहेब यांनी मंदिर प्रवेशाची नोटीस दिली. विरोध केल्यास सत्याग्रह करू म्हणून कळविले. पुजाऱ्यांनी पाच महिन्यांनी 'कोहिनूर'

वृत्तपत्रात उत्तर दिले. मंदिर प्रवेशास प्रतिकार करण्यात येईल असा आशय उत्तरात होता. २ मार्च १९३० रोजी सत्याग्रह करण्याचा निर्णय घेण्यात आला. १ मार्च रोजी बाबासाहेब मुंबईहून नाशिकला आले. सत्याग्रहासाठी १५ हजार सत्याग्रही नाशिकला येऊन दाखल झाले. २ मार्चला रामनवमी होती. हजारो भाविक रामदर्शनासाठी नाशिकला आले होते. ठीक दहा वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड व समितीचे पदाधिकारी सभामंडपात आले. १५ हजार सत्याग्रहींनी घोषणांचा जल्लोष केला. सभेची सुरुवात दादासाहेबांच्या भाषणाने झाली. ते म्हणाले, "अस्पृश्यांच्या गुलामगिरीचा एक काळ होता. अस्पृश्य लोक गुलामगिरीचे जीवन जगत होते. आज खेडेगावात आपल्याला दोन वर्ग दिसतात. गावकुसाच्या आत राहणारा एक वर्ग आणि गावकुसाबाहेर राहणारा दुसरा वर्ग. गावकुसात राहणारा एक स्वतंत्र वर्ग—जीवनाचा सारा उपभोग घेणारा हा वर्ग तर गावकुसाबाहेर सुतकी चेहरे असणारा, सर्वार्थाने मृतवत् जीवन जगणारा, माणुसकीला पारखा झालेला हा दुसरा वर्ग. गावाच्या वेशीच्या आत राहणाऱ्यांनी मात्र पिढ्यान्‌पिढ्या शेकडो वर्षांपासून परंपरागत अधिकार, हक्क भोगावेत आणि अस्पृश्य वर्गाने मात्र गुलामाप्रमाणे दैनंदिन जीवन जगावे. गुणांवरून माणसाचे श्रेष्ठत्व मानले जात नाही तर जन्मावरून, जातीवरून हे श्रेष्ठत्व ठरविले जाते. वरिष्ठ जातीत जन्मास आलेला माणूस हा कायमस्वरूपी श्रेष्ठ आणि कनिष्ठ जातीत जन्माला आलेला कायमस्वरूपी हीन समजला जातो. अशा जातिभेदांची तटबंदी वा भिंती या धर्मशास्त्रांनी उभ्या केल्या आहेत. त्यात अस्पृश्य वर्ग एका अंधारकोठडीत कोंडल्याप्रमाणे डांबला गेला आहे. एक जात दुसरीपासून कायमची दूर ठेवली जात आहे. त्यामुळे जातीजातींत बंधुभाव, प्रेम, सहानुभूती कधीच निर्माण होऊ शकली नाही.

आपल्या लोकांचे दैनंदिन जीवन पशुवत आहे, —कुत्र्यामांजरांसारखे! आपली नुसती सावली सवर्णांच्या अंगावर पडली तरी त्यांना विटाळ होतो. सार्वजनिक पाणवठा, विहिरी, तलाव या ठिकाणी आपला स्पर्श चालत नाही. वाण्याच्या दुकानाच्या फळीला शिवले तरी विटाळ होतो. न्हाव्याने केस कापणे, परटाने आपले कपडे धुणे दूरच! दुरूनच हॉटेलातील चहा प्यावा लागतो. देवाचे दर्शन घ्यावयाचे म्हणजे मंदिराच्या पायरीवर डोके ठेवून तेथील माती फक्त कपाळाला लावून घेता येते. सार्वजनिक रस्त्यावरून आपल्याला लग्नाची मिरवणूक काढता येत नाही. असा हा रूढींचा पगडा.

"यातून आपल्याला वाट काढावयाची आहे. अंधारातून प्रकाशाकडे आपल्याला जावयाचे आहे. उच्च-नीच जाती पद्धतींवर आधारलेली ही समाजरचना आपल्याला नष्ट करावयाची आहे आणि त्या ठिकाणी समतेवर आधारलेली एकजिनसी; समानता, बंधुता, स्वतंत्रता या तत्त्वांना मानणारी समाजरचना करावयाची आहे. रूढींच्या, परंपरांच्या अंधाऱ्या साम्राज्यात घोर निद्रेत पडलेल्या आपल्या समाजाला जागृत करण्याच्या दृष्टीने हा मंदिर प्रवेशाचा सत्याग्रह आयोजित केला आहे."

प्रचंड समुदाय नंतर मिरवणुकीने काळाराम मंदिराकडे वाटचाल करू लागला. सत्याग्रहींचे चेहरे खुलले होते. त्यांच्या अंगात रक्त सळसळत होते. आज रामदर्शनाचा लाभ होणार या भावनेने त्यांचे देहभान हरपले होते. चार-चार माणसांच्या रांगा, दोन मैल लांबीची मिरवणूक. माणुसकीच्या दर्शनासाठी निघालेली अपूर्व अशी मिरवणूक. मिरवणुकीच्या आघाडीवर होते

डॉ. बाबासाहेब व दादासाहेब आणि त्यांचे सहकारी. मोर्चा अतिशय शिस्तबद्ध होता. मोर्चेकऱ्यांच्या मनात आनंदाबरोबरच निश्चय होता. मोर्चाने राममंदिराच्या चारही दरवाजांस वेढा घातला. कलेक्टर, डीएसपी, जिल्हा न्यायाधीश आपल्या दलांसह तेथे सज्ज होते. दरवाजांना कुलपे ठोकली होती. दरवाजे बंद असल्यामुळे मिरवणूक दक्षिण दरवाजाने गोदावरी घाटावर गेली. तेथे शेट तेरसी यांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. सभेत डॉ. बाबासाहेब व दादासाहेब आणि इतर वक्त्यांची भाषणे झाली. ३ मार्चपासून मंदिराच्या दरवाज्यात धरणे धरणाऱ्या सत्याग्रहींच्या नावाची नोंदणी करण्यात आली व नंतर मोठ्या महारवाड्यातील सभा संपन्न झाली.

३ मार्च रोजी दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली मोठ्या महारवाड्यापासून निघून राममंदिरापर्यंत गेली. ३५ स्त्रिया व १०० पुरुषांनी मंदिरासमोर धरणे धरले. संध्याकाळी आठ वाजेपर्यंत धरणे धरण्याचा कार्यक्रम चालू होता. नंतर सत्याग्रही रामकुंडावर गेले. मोठ्या महारवाड्यात १४ हजार सत्याग्रहींना जेवण दिले. ४ मार्चपासून २०० सत्याग्रहींचा कँप पंचवटीतच होता. दरवाजे बंद असल्यामुळे स्पृश्य हिंदू; पुजाऱ्यांच्या घराच्या मार्गाने देवळात रामदर्शनासाठी जात. सत्याग्रह ज्या उद्देशासाठी होता तो या मार्गाने विफल होता म्हणून दादासाहेबांनी १९ मार्च १९३० रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांस पत्र लिहिले. बाबासाहेबांनी गव्हर्नरास पत्र लिहिले. ९ एप्रिल रोजी स्पृश्य व अस्पृश्य यांच्यात दंगल उसळली. काळाराम मंदिराच्या भागात १४४ कलम कलेक्टरांनी जारी केले. ते कलम जारी असेपर्यंत सत्याग्रह स्थगित करावा लागला. ९ एप्रिलला सत्याग्रही स्त्रियांना मारहाण करण्यात आली. सत्याग्रह सुरू झालेल्या दिवसापासून स्पृश्यांनी अस्पृश्यांवर बहिष्कार टाकला होता. अनेक गावात महारांना बेदम मारहाण झाली. काळाराम मंदिराचा सत्याग्रह म्हणजे चातुर्वर्ण्याविरुद्ध धार्मिक बंड होते. बाबासाहेब गोलमेज परिषदेला लंडनला गेले तरीही काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह चालूच ठेवला पाहिजे असे अनेक नेत्यांचे मत पडले. बाबासाहेबांचे लंडनहून पत्र आले. त्यांनी सत्याग्रह चालू ठेवण्यास संमती दिली. ३१ मार्चला सत्याग्रहाच्या दुसऱ्या पर्वास सुरुवात झाली. पुन्हा १४४ कलम जारी करण्यात आले. मुखेडचे दंगल प्रकरण उपस्थित झाले. तेथेही अस्पृश्य सत्याग्रहींना फार मारझोड करण्यात आली. दादासाहेबांचे डोके फोडण्यात आले. २३ सप्टेंबर १९३१ रोजी मराठ्यांनी अस्पृश्यांची उधळलेली मिरवणूक ३१ ऑक्टोबर १९३१ रोजी काढण्यात आली. बाबासाहेबांनी दादासाहेबांना लिहिलेल्या पत्रात, नाशिकला ५ नोव्हेंबर रोजी सत्याग्रह सुरू करावा असे कळविले. दादासाहेबांनी ५ नोव्हेंबरला सत्याग्रह सुरू केला. सत्याग्रही पायी, मोटारी, लॉऱ्या मिळेल त्या वाहनाने आले. मिरवणूक काढण्यात आली. मंदिराचे चारही दरवाजे बंद करण्यात आले, त्यामुळे मिरवणूक महारवाड्यात परतली. दुसऱ्या दिवशी ५०० स्वयंसेवकांनी सत्याग्रहासाठी नावे नोंदविली. आठ सत्याग्रहींना अटक केली. तिसऱ्या दिवशी ४१ सत्याग्रहींना पकडले. मंदिराचे सर्व दरवाजे बंद असल्यामुळे फिरता सत्याग्रह चालूच ठेवण्यात आला होता. सत्याग्रहाची व्याप्ती काळाराम मंदिरापुरती मर्यादित न ठेवता त्याची व्याप्ती रामकुंड, लक्ष्मणकुंड, धनुष्यकुंडपर्यंत वाढविण्यात आली. १३ डिसेंबर १९३१ रोजी रामकुंडावर २००० सत्याग्रहींनी भाग घेतला. अशा प्रकारे अनेक दिवस सत्याग्रह

चालूच राहिला. २ मार्च १९३२ रोजी दादासाहेबांचे वडील कृष्णराव निवर्तले. यामुळे बंद पडलेला सत्याग्रह रामनवमीला करण्याचे ठरले होते. १५ एप्रिलला २० सत्याग्रहींना अटक करण्यात आली. दादासाहेब व त्यांच्या सहकाऱ्यांना अटक झाली. त्यांना धुळ्याच्या जेलमध्ये ठेवण्यात आले. दादासाहेबांना दोन महिन्यांची शिक्षा ठोठावण्यात आली. त्यांच्या दोन्ही पत्नींना व इतर दहा स्त्रियांना एक-एक महिन्यांची शिक्षा झाली. बाबासाहेबांनी १३ नोव्हेंबर १९३५ रोजी येवल्याला धर्मांतर करण्याचा निर्णय जाहीर केला. काळाराम मंदिराच्या प्रवेशाची सहा वर्षं चाललेली चळवळ मागे घेतली. राजकीय व सामाजिक परिस्थितीचा आढावा घेण्यासाठी बाबासाहेबांनी दादासाहेबांच्या सल्ल्याने येवला परिषद बोलाविली. १३ ऑक्टोबर १९३५ रोजी परिषद यशस्वी करण्यासाठी दादासाहेबांनी सर्वस्व पणाला लावले. परिषद यशस्वी झाली. १० हजार लोक परिषदेला हजर होते. तेथे दादासाहेबांनी मांडलेला ठराव पुढीलप्रमाणे :

"अस्पृश्य मानले गेलेले वर्ग व स्पृश्य मानले गेलेले वर्ग यांमध्ये समता व संघटन घडून आणण्याच्या हेतूने, तितके सामर्थ्य नसतानाही माणसांची व द्रव्याची अपरिमित हानी सोसून मुंबई इलाख्यातील अस्पृश्य वर्गांनी महाड येथे चवदार तळ्यावर व नाशिक येथे काळाराम मंदिरावर सत्याग्रह केला. काळाराम मंदिराचा सत्याग्रह तर गेली सहा वर्षं सतत चालविला गेला. परंतु स्पृश्य मानलेल्या हिंदूंचे किंचितही मतपरिवर्तन झाल्याचे दिसत नाही. इतकेच नव्हे तर स्पृश्य व अस्पृश्य या उभयतांतील होऊ घातलेल्या संघटनेला व तद्जन्य उत्पन्न होणाऱ्या हिंदू समाजाच्या सामर्थ्याला ते कवडीचीही किंमत देत नाहीत, असे त्यांनी आपल्या वर्तनाने सिद्ध केले आहे, म्हणून अस्पृश्य वर्गाची ही परिषद असा ठराव करीत आहे की, "हिंदूंची मनधरणी करण्याच्या प्रयत्नांचा काही उपयोग होत नसल्याने त्याबाबतीत अस्पृश्य वर्गाने आपले सामर्थ्य आता विनाकारण खर्च करू नये व सत्याग्रहाची मोहीम यापुढे बंद करावी आणि स्पृश्य मानलेल्या वर्गापासून आपला समाज स्वतंत्र करावा व हिंदुस्थानातील अन्य समाजामध्ये आपल्या समाजाला मानाचे व समतेचे स्थान मिळण्याकरिता अस्पृश्य वर्गाने एकनिष्ठेने प्रयत्न करावा, असे या परिषदेचे मत आहे."

या ठरावावर भाषण करताना दादासाहेब गायकवाड म्हणाले, "द्वेषाला सत्ताबलाचे साधन मिळाल्याने हिंदूंनी अस्पृश्यांच्या गळ्याला हिंदू धर्मसेवेचे लोढणे बांधले आणि जुलुमांची परमावधी करून अस्पृश्यांना सेवावृत्तीत विलीन केले. त्यामुळे कालांतराने हिंदू धर्म हा आपलाच धर्म आहे, असे अस्पृश्यांना वाटू लागले आणि ते हिंदू धर्माचे एकनिष्ठ सेवक बनले. हिंदू धर्म, हिंदू शास्त्र, हिंदू समाज, हिंदू मंदिर, हिंदू देव-देवता आपलीच समजून त्याच्या रक्षणाकरिता हिंदुस्थानातून प्रत्येक शहरात अस्पृश्य लोक हिंदूंच्या बाजूने मुसलमानांशी लढले. हिंदू धर्म आपला समजून आपले प्राणही खर्ची घातले; तरीही त्यांना हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक क्षेत्रात स्थान दिले गेले नाही. उलट हिंदू लोक खेड्यापाड्यांतून त्यांचा अमानुष छळ करतात, जुलूम करतात, मारहाण करतात, घरादाराची राखरांगोळी करतात, स्त्रियांची बेअब्रू करतात, इज्जत लुटतात. ते दर्शविण्याकरता सत्याग्रह करणे घोर पाप समजतात. अशा परिस्थितीत हिंदू धर्म हा आपला कसा समजावा? हिंदू धर्मासाठी अस्पृश्यांनी त्यांची गुलामगिरी काय म्हणून करावी? म्हणून आमची तर आता अशी खात्री

झाली आहे की, हिंदू धर्म हा अस्पृश्यांचा नसून तो परकीयांचा—हिंदूंचा आहे व अस्पृश्यांचा मूळ धर्म निसर्गसिद्ध व निर्मळ असून त्या धर्मात स्वाभिमान, स्वातंत्र्य, समता, बंधुप्रेम व पुरुषार्थ वसत असून तो मर्दांचा धर्म आहे. बाबासाहेबांनी धर्मांतराचा निर्णय घेतलाच आहे त्या त्यांच्या निर्णयाला पांठिबा देऊन मी माझे भाषण संपवितो.''

## परावलंबित्व नष्ट करण्यासाठी भूमिहीनांचा लढा

दादासाहेबांच्या मूलभूत विचारांचे व प्रत्यक्ष कृतींचे खरे प्रतिबिंब त्यांनी सुरू केलेल्या १९५९ ते १९६५ काळातील भूमिहीनांच्या सत्याग्रही चळवळी, भूमिहीनांचे परावलंबित्व नष्ट झाल्याशिवाय त्यांना स्वाभिमानी जीवन जगताच येणार नाही. दादासाहेबांनी मराठवाड्यात भूमिहीनांना जमिनी मिळाव्यात म्हणून सत्याग्रहाचे रणशिंग फुंकले, त्यासाठी चळवळ करून नेतेमंडळी अनेक महिने तुरुंगात गेली. दादासाहेबांनी तर मराठवाड्यातील केलेल्या सत्याग्रहाची व्याप्ती जनजागरण मोहिमेने राष्ट्रीय पातळीपर्यंत नेली. धुळे, साक्री, नंदुरबार, नाशिक सबंध मराठवाडा पेटून उठला. दादासाहेबांना वॉरंट काढून औरंगाबाद येथे ठेवले. चार महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली. १९६४-६५च्या भूमिहीनांच्या सत्याग्रहात तीन लाख चाळीस हजार सत्याग्रहींनी भाग घेतला व तुरुंगवास भोगला. संघर्ष हाच दादासाहेबांच्या जीवनाचा अविभाज्य भाग बनला. थोर शिक्षणतज्ज्ञ वि. द. घाटे यांनी मार्मिकपणे बाबासाहेब-दादासाहेब या जोडगोळीचे वर्णन मोजक्या शब्दांत केले आहे. ''बाबासाहेब प्रकृतीने बुद्धिवादी. आपल्या प्रचंड ग्रंथालयात ज्ञानोपासना करण्यात त्यांना खरे सुख मिळत असे. भाऊरावांसारखा कर्तबगार शिष्य त्यांना लाभला नसता तर डॉ. बाबासाहेबांचे विचार, त्यांची स्वप्ने कदाचित त्या राजगृहातील, त्या ग्रंथालयातच राहिली असती. डॉ. बाबासाहेबांनी, दादासाहेबांनी संघटनेचा गुण नेमका हेरून त्यांचा फायदा जमातीसाठी करून घेतला. त्यातून त्यांची दूरदृष्टी व मनाचा दिलदारपणा दिसून येतो. सामाजिक, धार्मिक, आर्थिक, शैक्षणिक व राजकीय आघाडीवरील प्रत्येक ऐतिहासिक कार्याच्या प्रसंगी बाबासाहेबांनी दादासाहेब गायकवाड यांना पाचारण केले. त्यांचा सल्ला विचारला, काही प्रश्नांवर त्यांचे मतही घेतले. गुरूशिष्याचे केवढे अतूट नाते. त्याप्रमाणे बाबासाहेबांनी ''माझ्यापाठीमागे आपण या सर्व समाजकार्याची जबाबदारी अंगावर घेण्यास तयार असले पाहिजे'' असे दादासाहेबांना सुचविले.''

## दादासाहेबांचे इतर क्षेत्रांतील कार्य

दादासाहेबांनी इतर क्षेत्रांतही खूप कामे केली. मनमाडला वसतिगृह सुरू केले. त्याचे उद्घाटन बाबासाहेबांच्या हस्ते करण्यात आले. नाशिकला १९४४ साली रमाबाई आंबेडकरांच्या नावाने मुलींचे वसतिगृह बाबासाहेबांच्या शुभहस्ते सुरू करण्यात आले. ते नाशिक जिल्हा स्कूल बोर्डाचे चेअरमन होते. अस्पृश्यता निवारण्यासाठी त्या पदाचा त्यांनी चांगलाच उपयोग करून घेतला. दादासाहेब आमदार होते, खासदार होते. पक्षाचे पदाधिकारी होते. त्यांनी राजकीय क्षेत्रातल्या कामासही सामाजिक क्षेत्राबरोबर वाहून घेतले होते. ४० वर्षे अखंड समाजसेवा केल्याबद्दल दादासाहेबांना सरकारने अखेर 'पद्मश्री' हा किताब दिला. आयुष्याचा क्षणनक्षण दलितांसाठी खर्च करणारे दादासाहेब आता थकले होते. पददलितांना

मानवी हक्क संपादन करून देण्यासाठी त्यांनी आत्मयज्ञ केला होता. त्यांची इच्छाशक्ती प्रचंड होती. पण रक्तदाब व मधुमेहाने मात केली. अर्धांगवायूच्या आजाराने त्यांचे शरीर विकलांग झाले. दादासाहेबांना हृदयविकाराचा दुसरा झटका आल्यामुळे त्यांना विलिंग्डन हॉस्पिटलमध्ये दाखल केले. तेथे ते मृत्यूशी २७ दिवस झुंज देत होते. शेवटी २९ डिसेंबर १९७१ रोजी दादासाहेबांनी या जगाचा निरोप घेतला. दादासाहेबांच्या मृत्यूने पददलित व उपेक्षितांना न्याय मिळवून देण्यासाठी झगडणारा योद्धा हरपला. कवी कुसुमाग्रजांनी वाहिलेली आदरांजली दादासाहेबांच्या जीवनाचे सार सांगून जाते :

*अंध तिमिर उजळण्यास*
*दीपज्योत जाहलास*
*जाळीत निज जीवन तू*
*हात दुर्बळा दिलास*
*दलितांच्या मुक्तीचा*
*आशा पंथ उजळला ॥१॥*

*न्याय नीतीचे निशाण*
*धारण केलेस करी*
*समरांगणी द्वेषाचे*
*साहत आघात उरी*
*तोडल्यास दास्यांच्या*
*शापरूप शृंखला ॥२॥*

*श्रमिकांचा शीण भार*
*वाहिलास काळजात*
*नेत्र तुझे पाणावले*
*व्यथितांच्या आसवात*
*तू घनापरि जनास*
*जीवनार्थ अर्पिला ॥३॥*

लोकसभेच्या व इतर निवडणुकींत, चळवळींत व सामाजिक कार्यात मी दादासाहेब गायकवाडांबरोबर काम केलेले आहे. अत्यंत निर्मळ स्वभावाचे, सहकाऱ्यांना जीवाभावाने वागविणारे मनमिळावू पुढारी त्यांची ख्याती होती. या सर्व गोष्टींचा मला अनेकदा प्रत्यक्ष अनुभव आलेला आहे.

दौऱ्यावर असताना घरून बाजरीच्या भाकरीचे पेंडके, एखादी कोरडी भाजी, मिरच्यांचा ठेचा व कांदा बरोबर घेऊनच दादासाहेब बाहेर पडत. रस्त्यावर जेथे कोठे पाणी व सावली दिसेल तेथे बसून सहकाऱ्यांच्या समवेत जेवण करीत. या रुचकर जेवणाच्या वेळी चळवळीतील आपले अनुभव सहकाऱ्यांना कथन करणे, गप्पा मारणे हा त्यांचा स्थायीभाव होता.

त्यांच्या जीवनकार्याबद्दल कितीही लिहिले तरी ते कमीच पडेल.

# भूमिहीनांचे आंदोलन

## गोविंद पानसरे

देशातील दलितांचे आजवरचे सर्वश्रेष्ठ मार्गदर्शक नेतृत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे आहे. हे इतके निर्विवाद ऐतिहासिक सत्य आहे की, ते आज गृहीत धरण्यात येत आहे. त्यांच्या निधनानंतर मात्र दलितांचे जवळ जवळ सर्व नेते हे एकमेकांस खलपुरुष, धोकेबाज, फुटीर, स्वार्थी, कावेबाज, महत्त्वाकांक्षी, विकाऊ, नादुरुस्त इत्यादी शेलक्या शिव्या देत आले आहेत. तरीसुद्धा सर्वजण आपणच आंबेडकरांचे खरे शिष्य आणि खरे वारसदार आहोत असे सांगत असतात. असा दावा करणारे बहुतेक सर्वजण स्वत:स डॉ. आंबेडकरानंतरचा आंबेडकर मीच, असे समजत असतात.

तथापी, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या निधनांतरचा दलितांचा सर्वात मोठा नेता कोण असा प्रश्न उपस्थित करून, अभिनिवेश बाजूस ठेवून वास्तवाचा विचार केला तर एकच नाव पुढे येते आणि ते म्हणजे कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचे.

डॉ. आंबेडकर यांच्या हयातीत सुद्धा दादासाहेब गायकवाडांचा समावेश दलित नेतृत्वात रास्तपणे होत होताच. खुद्द बाबासाहेबांचा त्यांच्याशी झालेला पत्रव्यवहार, त्यांच्यावर सोपविलेली आणि त्यांनी समर्थपणे पार पाडलेली चळवळीची कामे, यांचे यथायोग्य मूल्यमापन केले तर हे सत्य स्पष्ट दिसते.

हे सत्य डॉ. आंबेडकरांच्या दादासाहेब गायकवाड यांना लिहिलेल्या १४ मे १९५२ च्या पत्रात ठळकपणे दिसते. मृत्यूपूर्वी ४ वर्षे अगोदर लिहिलेल्या या पत्रात बाबासाहेबांनी लिहिले आहे,... ''माझ्या प्रकृतीची काळजी करण्यापेक्षा आता माझ्यावरील साऱ्या जबाबदाऱ्या तुम्ही स्वत: स्वीकारण्याची मनाची तयारी लवकर केली पाहिजे. कारण मी काही फार दिवस जगणार नाही, याबद्दल माझी खात्री होऊन चुकली आहे...''

### गुरू आणि शिष्य

कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे बाबासाहेबांचे अनुयायी आणि शिष्य होते. पण ते स्वत:ही विचार करीत. स्वत:ची मते बनवीत. ते 'होयबा' नव्हते. बाबासाहेब आणि दादासाहेब या गुरु-शिष्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण नात्याचे मूल्यमापन प्रा. रावसाहेब कसबे यांनी यथायोग्य असेच केले आहे. ते असे :

...''पाश्चात्यांकडे गुरू-शिष्य परंपरा अधिक मोकळी आणि विचारविकासाच्या दृष्टीने

पोषक अशी होती. आपल्याकडे गुरू हा शिष्याच्या श्रद्धेचा विषय होता. त्याला प्रश्न विचारणे ही अंधश्रद्धा मानली जात होती. यातूनच 'संशयात्मा विनश्यती' सारखे विचार प्रतिष्ठित झाले. गुरूचा अनादर न करताही गुरूवर प्रश्नांची सरबत्ती करणारे शिष्य गुरूला लाभणे, हे दृश्यच या क्षेत्रातील एक विलोभनीय दृश्य आहे. सॉक्रेटिस-प्लेटो, प्लेटो-अरिस्टॉटल किंवा हेगेल-मार्क्स या गुरू शिष्यांच्या जोड्या समकालीन भारतात जन्माला आल्या असत्या, तर भारतीय विचारांना कुंठितावस्था प्राप्त झाली नसती. बाबासाहेब आणि दादासाहेब या गुरू-शिष्यांचे नाते या पाश्चात्त्य गुरू-शिष्यांच्या नात्याइतकेच मला विलोभनीय वाटते. बाबासाहेब उच्च विद्याविभूषित तर दादासाहेबांचे शिक्षण बेताचेच. बाबासाहेब राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा विचार करून दलित चळवळीचे डावपेच ठरवू पाहणारे एक महान नेते, तर दादासाहेबांना व्यवहारातील तातडीच्या प्रश्नांच्या तीव्रतेचे प्रतिबिंब दलित चळवळीत अविलंब उमटावे अशी दुर्दम्य इच्छा. त्यामुळेच गुरूच्या ठिकाणी श्रद्धा ठेवूनही मतभेद नोंदविण्याचे सामर्थ्य दादासाहेबांना प्राप्त झालेले होते. भारतीय राजकारणात तेच नेते आपल्या कर्तृत्वाचा ठसा आपल्या कालखंडावर उमटवून गेले; जे नित्य चिकित्सक शिष्यांच्या वर्तुळात वावरले आहेत. हितसंबंधी 'होयबा' अनुयायी आपल्या नेत्याला नेहमीच फसवीत असतात आणि अहंकार सुखावण्याच्या मोबदल्यात अहंकारी नेते अशा 'होयबां'कडून आपला राजकीय मृत्यू पत्करताना दिसतात. हा अहंकाराचा विजय असतो आणि अहंकारी माणसे सामान्यांच्या चळवळीला सम्यक् नेतृत्व देऊ शकत नाहीत. बाबासाहेब अशा चिकित्सक शिष्यांच्या गर्दीत कार्यरत होते. म्हणूनच ते युगपुरुष ठरले.''

## भूमिहीनांचे आंदोलन आणि कर्मवीर दादासाहेब

प्रत्येक नेत्याच्या आयुष्यात त्याला अनेक चळवळीत भागीदारी करावी लागते. असे असले तरी अशा अनेक प्रश्नांवरच्या विविध चळवळींपैकी कोणत्या तरी एका वैशिष्ट्यपूर्ण आंदोलनाशी या नेत्याचे नाव अभिन्नपणे जोडले जाते. ते एक ऐतिहासिक मूल्यमापन असते.

कर्मवीर दादासाहेबांचे नाते याच रीतीने भूमिहीनांच्या जमिनीसाठी केलेल्या देशव्यापी अशा सत्याग्रह आंदोलनाशी जोडले गेले आहे आणि हे रास्तच आहे.

वास्तविक पाहता डॉ. आंबेडकरांच्या जीवनात त्यांनी जी जी आंदोलने केली, त्यात कर्मवीर दादासाहेबांचा सतत सिंहाचा वाटा राहिला आहे. तथापी त्या आंदोलनाच्या वेळी डॉ. आंबेडकरांचे महावृक्षाच्या व्याप्तीचे उत्तुंग असे नेतृत्व होते. त्यामुळे इतर कुणाच्या नावाशी ती आंदोलने जोडली जाण्याचा प्रश्नच नव्हता.

आंबेडकरांच्या, १९५६ साली झालेल्या निधनानंतर दलित नेतृत्वाखाली आजवर झालेल्या सर्व आंदोलनात सर्वात व्यापक आणि सर्वात मोठे असे आंदोलन भूमिहीनांचे आंदोलन झाले. आणि त्याचे नेतृत्व निर्विवादपणे कर्मवीरांनी केले होते. या आंदोलनात प्रामुख्याने आणि मोठ्या प्रमाणात दलित भूमिहीन सहभागी झाला होता हे खरे आहे. तथापी, या देशव्यापी आंदोलनात दलितेतर भूमिहीनसुद्धा सहभागी झाले होते; हे या आंदोलनाचे आणखी एक वैशिष्ट्य होते.

### इतर आंदोलनांच्या नेतृत्वातील सहभाग

डॉ. आंबेडकरांच्या हयातीत त्यांच्या नेतृत्वाखाली जी महत्त्वाची आंदोलने झाली, त्यात महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह, महाडच्या दोन परिषदा, काळाराम मंदिरप्रवेशाचा उणीपुरी ६ वर्षे चाललेला सत्याग्रह आणि हिंदू धर्म सोडून बौद्ध धर्म स्वीकारण्याचे महाप्रचंड आंदोलन यांचा समावेश आहे.

या आंदोलनातील; कर्मवीर दादासाहेब यांच्या वैशिष्ट्यपूर्ण सहभागाचा विचार केला म्हणजे त्यांचे मोठेपण अधिकच स्पष्ट होते. १९२७ला महाडला अस्पृश्यांची परिषद झाली. तेव्हा चवदार तळ्यातून पाणी पिण्याच्या हक्काचाच प्रश्न न्यायप्रविष्ट होता. सवर्ण हिंदू आणि ब्रिटिश राज्यकर्ते या दोघांविरुद्ध एकाचवेळी संघर्ष करू नये असा विचार पुढे आला. या आंदोलनाचा मित्रपक्ष असलेल्या ब्राह्मणेतर पक्षाचे मतसुद्धा न्यायालयाचा निर्णय लागेपर्यंत थांबावे असे होते. म्हणून खुद्द बाबासाहेबांनीच सत्याग्रह तहकुबीचा ठराव मांडला. या ठरावाला परिषदेतील बहुसंख्य उपस्थितांचा विरोध होता. वाटेल तो परिणाम भोगण्याची त्यांची तयारी होती. तशा निवेदनावर ३८८४ लोकांनी सह्या केल्या आणि सह्या करण्यासाठी आणखी प्रचंड रांग लागली.

ठरावाच्या विरोधी कर्मवीर दादासाहेब गायकवाडांनी भाषण केले. आणि त्याला परिषदेने मोठ्या बहुसंख्येने पाठिंबा दिला. समाजाच्या भावना शब्दबद्ध करून समाजाला कृतीप्रवण करण्याचे कार्य समाजात सातत्याने कार्यरत असणारा कार्यकर्ताच करीत असतो. दादासाहेबांनी ते केले.

महाडच्या या अभूतपूर्व संग्रामात अनंतराव चित्रे, नानासाहेब टिपणीस, गंगाधर नीळकंठ, बापूसाहेब सहस्त्रबुद्धे, कॉम्रेड रामचंद्र बाबाजी मोरे, सी. ना. शिवतरकर, बापूसाहेब राजभोज यांनी आणि इतर अनेकांनी सहभागी होऊन संघटन केले होते. तथापी आपल्या भावना शब्दबद्ध करून समाजाचे संघटन करून त्यांना संघर्षास प्रवृत्त करणारा नेता, म्हणून कर्मवीरांची ख्याती या घटनेनंतर अस्पृश्य समाजात पसरली.

महाडच्या दुसऱ्या परिषदेत मनुस्मृती दहनाचा ठराव बापूसाहेब सहस्त्रबुद्धे यांनी मांडला होता. आणि प्रत्यक्ष दहन त्यांच्या आणि स्पृश्य साधूंच्या हस्ते झाले होते.

### काळाराम मंदिर सत्याग्रह

मार्च १९३० पासून सुरू झालेला नाशिकचा काळाराम मंदिर सत्याग्रह तर दादासाहेब गायकवाडांच्या नेतत्वाखालीच झाला. ३० जणांच्या सत्याग्रह समितीचे सेक्रेटरी भाऊराव होते. हा सत्याग्रह सुमारे ६ वर्षे चालला.

भारताच्या आंदोलनाच्या इतिहासातील हा एक अपूर्व सत्याग्रह होता. रावसाहेब कसबे यांनी म्हटल्याप्रमाणे, "ही, आपल्या कार्यकर्त्यांची आणि अनुयायांची एका अर्थाने बाबासाहेबांनी अग्निपरीक्षाच घेतलेली दिसते. कोणत्याही चळवळीतील नेत्याला आपल्या चळवळीच्या सामर्थ्याचे आणि तिच्या मर्यादांचे सतत भान असावे लागते, व हे भान आपल्या कार्यकर्त्यांना आणि अनुयायांनाही करून घ्यावे लागेल. प्रत्येक महान आंदोलनातील नेते या गोष्टी करीतच असतात. दादासाहेबांनी हा लढा उणीपुरी सहा वर्षे लढविला. या लढ्यानेच त्यांच्या

कर्तृत्वाची शौर्यगाथा इतिहासात नोंदवून ठेवलेली आहे. या अभूतपूर्व लढ्यासंबंधी डॉ. आंबेडकरांनी ३ मार्च १९३४ रोजी पत्र लिहिले, त्यात ते म्हणतात, "मी मुद्दामच पाच वर्षांपूर्वी सत्याग्रहाला संमती दिली होती. त्यामुळे अस्पृश्यांना हिंदू धर्माची वास्तव कल्पना येईल, असे वाटले होते. आणि हिंदू धर्मात आपले स्थान काय दर्जाचे आहे, हेही त्यांना कळेल, त्या दृष्टीने माझा हेतू साध्य झालेला आहे. आता मला मंदिर प्रवेश चळवळीची मुळीच आवश्यकता वाटत नाही..."

**दलित आंदोलनातील पुढचे पाऊल**

चवदार तळ्याचे आंदोलन, काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह या महत्त्वाच्या दलित आंदोलनांत कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांची भूमिका महत्त्वाची राहिली आहे. याखेरीज डॉ. आंबेडकरांच्या हयातीत आणि नंतरही झालेल्या सर्व आंदोलनात त्यांनी अतिशय महत्त्वाची भागीदारी व नेतृत्व केले आहे.

तथापी सुरुवातीस म्हटल्याप्रमाणे कोणत्या एका आंदोलनामुळे कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचे नाव अद्वितीय ठरत असेल तर ते भूमिहीनांचे आंदोलन आहे.

या आंदोलनातील प्रश्न आजही तेवढाच प्रस्तुत आणि महत्त्वाचा प्रश्न आहे. यामुळेही या आंदोलनाचे खास महत्त्व आहे.

कुत्र्यामांजरांना आणि ढोर-डुकरांनासुद्धा जे पाणी पिण्याचा हक्क होता, तो चवदार तळ्याचे पाणी पिण्याचा हक्क याला प्रतिकात्मक महत्त्व होते. त्या हक्काने दलितांच्या भौतिक जीवनात फरक पडत नव्हता. काळाराम मंदिरात प्रवेशाचा हक्क मिळविणे हासुद्धा असाच प्रतिकात्मक हक्क होता. या असल्या हक्कांच्या उपयुक्ततेबरोबरच त्यांच्या मर्यादाही डॉ. आंबेडकर, भाऊराव गायकवाड इ. सर्व नेत्यांना माहीत होत्या. तसे त्यांनी त्यावेळी आणि नंतरही वेळोवेळी स्पष्टपणे म्हटलेही आहे.

भूमिहीनांना जमीन मिळण्याचा प्रश्न मात्र या प्रश्नांपेक्षा वेगळा होता. ते एक पुढचे पाऊल होते. त्याचे महत्व वेगळे होते व आहे. या आंदोलनाचे तुलनात्मक महत्व रावसाहेब कसबे यांनी अचूकपणे सांगितले आहे. नाशिकचे ॲड. हरिभाऊ पगारे यांनी दादासाहेब गायकवाड यांचे लिहिलेले चरित्र १९८७ साली प्रसिद्ध झाले आहे. त्यांच्या प्रस्तावनेत ते म्हणतात, "आज उत्तर भारतातील आणि विशेषत: बिहारमधील ज्या घटनांच्या वार्तांनी मन अस्वस्थ होते, त्याचे मूळ या जमिनीच्या प्रश्नात आहे याचे भान; दादासाहेबांना तीस वर्षापूर्वीच आलेले होते आणि त्यांनी त्या दृष्टीने प्रत्यक्ष चळवळही केलेली होती, याचे भान अद्याप आपल्याला येत नाही. माझ्या दृष्टीने दादासाहेबांनी या काळात दिलेला भूमिहीन शेतमजुरांचा लढा ही महाड आणि नाशिक सत्याग्रहाची पुढची पायरी होती. माझ्या दृष्टीने दादासाहेबांनी या काळात दिलेला भूमिहीन शेतमजुरांचा लढा ही महाड आणि नाशिक सत्याग्रहाची पुढची पायरी होती. तो दलित चळवळीचा नैसर्गिक विकासक्रम होता. दलित चळवळीतील ते एक क्रांतिपर्व होते. ज्यातून स्वाभिमान शब्दात नव्हे तर प्रत्यक्षात मिळण्याची हमी होती आणि भूमिहीनातील जातीच्या बंधनांना प्रत्यक्ष चळवळीच्या क्रांतिकारी मशालीने अग्नी देण्याचे आश्वासन होते. याकडे दुर्लक्ष होता कामा नये."

**भूमिहीन शेतमजुरांचा देशव्यापी सत्याग्रह**

भारतातील भूमिहीन शेतमजुरांत दलितांचे प्रमाण खूप मोठे आहे. या वस्तुस्थितीच्या आधारासाठी आकडेवारीची गरज नाही. हे सर्व भूमिहीन, भारताच्या ग्रामिण भागात राहतात आणि त्यांच्यात निरक्षरांचे प्रमाण सरासरीपेक्षा जास्त आहे.

या वास्तवामुळे जमिनीच्या फेरवाटपाचा प्रश्न हा दलित भूमिहीनांच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाचा प्रश्न आहे. नोकऱ्या मिळून दलितांचा उपजीविकेचा प्रश्न सुटू शकेल एवढ्या नोकऱ्यांची उपलब्धता पूर्वीही नव्हती आणि आजही नाही. आता तर राज्यकर्त्यांनी जी अर्थव्यवस्था स्वीकारली आहे, त्यामुळे असलेल्याच नोकऱ्या कमी होत आहेत; आणखी होणार आहेत. कारखाने बंद पडत आहेत. खाजगीकरण वाढत आहे. आधुनिकीकरण वाढत आहे. १०० कामगारांचे काम १० कामगार करू शकतील असे आधुनिकीकरण आले आहे, येत आहे. ''जॉबलेस ग्रोथ'' विना रोजगार विकास हे घोषवाक्य बनत आहे. ज्यांना रोजगार मिळणार नाही, त्यांच्या विकासाचा प्रश्न कुणी उपस्थितसुद्धा करीत नाही. मग त्या प्रश्नाच्या सोडवणुकीची बाब फारच दूर राहिली. दलित - ग्रामीण - भूमिहीन - अल्पशिक्षीत यांचा व्यापार व्यवसायाशी फारसा संबंध कधीच नव्हता. आता तर परदेशी व्यापार-व्यावसायीक देशात येत आहेत. त्यामुळे तो मार्गही भूमिहीनांना उपलब्ध नाही. औद्योगिकीकरणामुळे ग्रामीण व्यावसायिक, कारू-नारू, बारा बलुतेदार कधीच त्यांचे व्यवसाय गमावून बसले आहेत.

या नव्या अर्थ व्यवस्थेच्या वातावरणात भूमिहीनांना जमिन मिळण्याचा प्रश्न अधिकच महत्त्वाचा बनत आहे.

परंतु दलित आंदोलने जमिनीच्या फेर वाटपाचा, नोकऱ्यांच्या उपलब्धतेचा, घटत्या रोजगाराचा प्रश्न न मांडता आणि त्यासाठी संघर्ष न करता प्रतिकारात्मक, भावनात्मक प्रश्नात अडकून बसली आहेत. दलितांतील उच्चशिक्षीत, नोकरदार, बुद्धिजीवी हे त्यांचे स्वत:चेच प्रश्न मांडित आहेत. वेतनाचा आणि त्यात वाढ मिळविण्याचा प्रश्न, बढतीचा प्रश्न, बदलीचा प्रश्न हेच प्रश्न ते मांडीत आहेत. त्यांचे प्रश्न आहेत, ते बरोबर आहेत. त्यासाठी त्यांचे संघर्षही योग्यच आहेत. तथापी मुद्दा तो नाही.

प्रचंड बहुसंख्येच्या रोजगारहीन, भूमिहीन दलितांच्या प्रश्नांना वाचा कोण फोडणार? असा प्रश्न आहे.

**कर्मवीरांची दूरदृष्टी - जमिनीसाठी संघर्ष**

भूमिहीनांना जमिनी मिळाल्या पाहिजेत या मागणीसाठी कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली झालेला अखिल भारतीय संग्राम हा त्यांच्या दूरदृष्टीचा पुरावा आहे. शहरी, सुशिक्षित, उच्च विद्याविभूषीत दलित नेतृत्व आणि दादासासाहेब गायकवाड यांच्या दृष्टीकोनातील अंतर जे कुणी दुर्लक्षित करतील; त्यांना दादासाहेब तर नीट समजणार नाहीतच, परंतु बदलत्या वास्तवातील दलितांचे खरे प्रश्नही समजणार नाहीत.

डॉ. आंबेडकरांना आपला समाज हा खेडोपाडी असलेला अक्षरहीन, भूमिहीन समाज आहे याचे भान होते. उच्चविद्याविभूषीत असूनही दूर डोंगर कपारीतल्या दलितांच्या दु:खाची जाणीव आणि बोचणी त्यांना होती.

मृत्युपूर्वी ४ वर्षे, १९५२ साली डॉ. आंबेडकरांनी कर्मवीर गायकवाडांना एक पत्र लिहिले. या पत्रात ते म्हणतात, "माझ्याशिवाय कुणालाही आपल्या लोकांची स्थिती किती हलाखीची आहे हे माहित नाही..." या विधानातील 'कुणालाही' ही शब्दयोजना केवळ इतर राजकीय पक्षांच्या नेतृत्वाबाबत योजलेली आहे. असा मर्यादित अर्थ लावणे चूक आहे. द्रलित नेतृत्वात झिरपत येत असलेले 'ब्राह्मण्य', डॉ. आंबेडकरांना माहित होते व बोचत होते. त्यांनी वेळोवेळी आणि ठिकठिकाणी त्याचा उल्लेख केलेला आहे.

दादासाहेब गायकवाड, त्यांच्या इतर समकालीन दलित नेत्यांच्या तुलनेत कमी शिकलेले होते. विद्वान समजत असलेल्या नेत्यांपेक्षा वेगळे होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना स्वत:च्या मृत्यूची चाहूल १९५२ सालीच लागली असावी असे वाटते. त्यांनी तसे स्पष्टपणे १९५२ साली कर्मवीर गायकवाडांना पत्र पाठवून कळविले होते आणि आपल्या मागे कर्मवीरांनी "..... साऱ्या जबाबदाऱ्या स्वत: स्वीकाराव्यात" असे सांगितले होते.

आपल्या मागे दलित समाजाचे नेतृत्व कोण करू शकेल आणि कुणी करावे हे जे मत डॉ. आंबेडकरांनी स्पष्टपणे नोंदवले आहे, यात त्यांच्या 'माणूस पारखी' चाणाक्षपणाची खूण स्पष्ट दिसते. आणि दादासाहेबांचे श्रेष्ठत्व दिसते.

डॉ. आंबेडकर आणि कर्मवीर गायकवाड यांच्या एकमेकास पूरक कार्यविभागणीबाबत आणि वेगळेपणाबाबत श्री. वि. द. घाटे यांनी म्हणून ठेवले आहे की, "... बाबासाहेब प्रखर बुद्धिवादी, आपल्या प्रचंड ग्रंथालयात ज्ञानेपासना करण्यात त्यांना खरे सुख मिळत असे. भाऊरावांसारखा कर्तबगार शिष्य त्यांना मिळाला नसता तर डॉ. बाबासाहेबांचे विचार, त्यांची स्वप्ने कदाचित त्या राजगृहातील ग्रंथालयातच राहिली असती..."

लक्षावधींचा समाज जेव्हा एखादा विचार स्वीकारतो तेव्हा तो विचार हीच एक प्रचंड भौतिक शक्ती बनते आणि ही शक्ती समाजात बदल घडवून आणते. एरवी ग्रंथातील किंवा कुणाच्या तरी डोक्यातील विचार वांझोटे असतात. डॉ. आंबेडकरांचा विचार लक्षावधींनी स्वीकारला. लक्षावधींच्या; विशेषत: अल्पशिक्षीत ग्रामीण दलितांच्या या विचार-स्वीकाराला कारणीभूत ठरलेल्या व्यक्तीत खुद्द डॉ. आंबेडकरांखालोखाल कर्मवीर गायकवाड यांचे योगदान निश्चितच अनन्यसाधारण आहे.

## जमिनीसाठी संघर्ष-व्याप्ती

भूमिहीनांचा संघर्ष हा भारतातील दलित चळवळीचा सर्वात महत्त्वाचा प्रश्न आहे, हे त्या आंदोलनातील व्याप्तीने सिद्ध केले. सिद्धांतांची, धोरणांची आणि विचारांची खरी कसोटी ही प्रत्यक्ष व्यवहारात दिसते.

भूमिहीनांना जमीनी मिळाव्यात या मागणीसाठी सुरू झालेला सत्याग्रह मराठवाड्यात सुरू झाला आणि ते स्वाभाविक होते. कर्मवीर गायकवाडांचे नेतृत्व अखिल भारतीय होते हे खरे असले, तरी त्यांचे कार्यक्षेत्र मुख्यत: महाराष्ट्र होते, आणि या महाराष्ट्राच्या विविध प्रादेशिक विभागांपैकी मराठवाड्यात जमीनदारी सर्वात अधिक होती. भूमिहीनांची संख्या आणि प्रमाणसुद्धा मराठवाड्यात अधिक आहे. या वस्तुस्थितीमुळे भूमिहीनांचा सत्याग्रह मराठवाड्यात सुरू होणे स्वाभाविक होते. मराठवाड्यांतील दलित नेतृत्वास याचे भान होते.

हे भान महाराष्ट्रातील आणि देशातील दलित नेतृत्वास आणून देण्याचे कार्य, या नेतृत्वाने केले होते. अशा नेतृत्वात श्री. बी. एस. मोरे हे एक होते. त्यांनी हा प्रश्न बाबासाहेबांच्या हयातीतच त्यांच्या व इतरांसमोर मांडला होता. बाबासाहेबांनासुद्धा या प्रश्नाचे महत्त्व समजले होते. त्यांनी या प्रश्नावर आंदोलन केले पाहिजे अशी मते व्यक्त केली होती.

भूमिहीनांचे हे आंदोलन मराठवाड्यात सुरू होणे जसे स्वाभाविक होते. तसेच या संघर्षाचे नेतृत्व कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी करणेही स्वाभाविकच होते. ग्रामीण भागातील दलितांच्या खऱ्या प्रश्नांची जाणीव त्यांनाच होती. दलित आंदोलनातील टाय, पँटधारी उच्चविद्याविभूषीत नेत्यांनी आणि त्यातही मुख्यत: बी. सी. कांबळे यांनी, त्यांची 'धोतऱ्या' म्हणून टिंगल टवाळी केली होती. परंतु ग्रामीण दलितांना आणि सुज्ञ शहरी दलितांनासुद्धा हा 'धोतऱ्या'च डॉ. आंबेडकरानंतर आपला नेता आहे, याचे भान होते.

सरकारजवळील पडीक जमीन भूमिहीनांना कसण्यास मिळावी या मागणीसाठी १९५८-५९ साली हा सत्याग्रह मराठवाड्यात सुरू झाला. महाराष्ट्राच्या इतर भागातही हे आंदोलन सुरू झाले. नाशिक व धुळे जिल्ह्यात त्याचा जोर अधिक होता. आंदोलनाच्या तयारीसाठी कर्मवीर गायकवाडांसोबत क्रांतीसिंह कॉम्रेड नाना पाटील यांनी महाराष्ट्रात ठिकठिकाणी सभा घेतल्या होत्या. कर्मवीर गायकवाड आणि मराठवाड्याचे पक्षाचे अध्यक्ष श्री. बी. एस. मोरे यांना या आंदोलनात ४/४ महिन्यांची शिक्षा झाली आणि त्यांना औरंगाबाद येथील तुरुंगात ठेवण्यात आले. औरंगाबाद येथील जेलमध्ये एकावेळी ३००० सत्याग्रही होते. तो जेल अपुरा पडू लागला म्हणून मग पैठण जेलमध्ये ठेवण्यात येऊ लागले.

या सत्याग्रहात पुरुषांबरोबर महिलाही सहभागी होत्या. तान्ह्या मुलांसह अनेक स्त्रिया तुरुंगात गेल्या. रिपब्लिकन पक्ष कार्यकर्त्यांबरोबर कम्युनिस्टही या सत्याग्रह आंदोलनांत सहभागी होते. मनमाडच्या कम्युनिस्ट कार्यकर्त्या कॉम्रेड कुसुमताई माधवराव गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली मनमाडच्या ७०/८० महिलांना २० दिवसाची तुरुंगवासाची शिक्षाही झाली होती. कम्युनिस्ट पक्षाच्या राष्ट्रीय कौन्सिलचे आजचे सदस्य कॉ. मनोहर टाकसाळ, कॉ. एकनाथ नलावडे, सिल्लोडचे कॉ. करिमोद्दिन, देवगाव रंगारीचे कॉ. तुळशीराम पाटील इ. अनेक कम्युनिस्टांनी या आंदोलनात भाग घेतला होता. प्रसिद्ध कम्युनिस्ट नेते कॉम्रेड चंद्रगुप्त चौधरी या आंदोलनाचे एक प्रमुख संघटक नेते होते. या सत्याग्रहात सहभागी होणाऱ्यांत ज्याप्रमाणे दलित होते तसेच भूमिहीन सवर्णही खांद्याला खांदा लावून लढले व लढतील. आरक्षणाच्या प्रश्नांवरील आंदोलनात दलित सवर्ण जूट घडवून आणणे आवश्यक व योग्य असले तरी जिकीरीचे आहे. भूमिहीनांना जमीन मिळविण्याच्या आंदोलनात ते सुलभ आणि स्वाभाविकही आहे.

## देशव्यापी आंदोलन

महाराष्ट्रात सुरू झालेले भूमिहीनांचे आंदोलन नंतर देशव्यापी करण्यात आले. कर्मवीर गायकवाड, एन. शिवराज, बॅ. खोब्रागडे इ. नेत्यांनी देशभर दौरे करून प्रथम जागृती केली. महाराष्ट्र, गुजराथ, मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, बिहार, बंगाल, तामीळनाडू, आंध्र कर्नाटक या राज्यात दौरे झाले.

२१ ऑक्टोबर १९६४ रोजी पार्लमेंटवर मोर्चा निघाला. त्यात देशभरातून १ लाख भूमिहीन सहभागी झाले होते. या प्रचंड मोर्चाचे नेतृत्व कर्मवीर गायकवाड यांनी केले. नेतृत्व करणारांत तेव्हाचे रिपब्लिकन पक्षाचे अध्यक्ष एन. शिवराज होते. बर. खोब्रागडे होते, खासदार कट्टी होते. या मोर्चाने आपल्या १० मागण्या पंतप्रधान लालबहादूर शास्त्री यांना सादर केल्या. भूमिहीनांना जमिनी मिळाव्यात, किमान वेतन कायदा लागू करावा, पार्लमेंटमध्ये डॉ. आंबेडकरांचे तैलचित्र लावावे, नवबौद्धांना शैक्षणिक सवलती मिळाव्यात इत्यादी मागण्या त्यात होत्या. पंतप्रधान लालबहादूर शास्त्री यांनी सर्व मागण्यांबाबत विचार करण्याचे स्पष्ट आश्वासन दिले. तरीसुद्धा पंतप्रधानांचे आश्वासन प्रत्यक्षात येण्याची शक्यता नाही, हे समजून ६ डिसें. १९६४ रोजी प्रत्यक्ष सत्याग्रह सुरु करणार असे घोषित करण्यात आले.

१ ऑक्टो. १९६४ रोजी पक्षाध्यक्ष एन. शिवराज यांचे निधन झाले. तरीही ६ डिसेंबरचे देशव्यापी सत्याग्रह आंदोलन करण्याचे ठरले. आणि तसे ते सुरू झाले.

भूमिहीनांच्या या आंदोलनाची व्याप्ती खूपच मोठी होती. दोन महिन्यात देशभरातील ३ लाख ४० हजार भूमिहीनांनी तुरुंगवास पत्करला. त्यात पुरुषांबरोबर स्त्रिया होत्या. तरुणांबरोबर म्हातारे होते. दलितांबरोबर सवर्ण होते. हा सत्याग्रह निर्धारपूर्वक, तरीही शांततेत पार पडला.

कर्मवीर दादासाहेब गायकवाडांचे घरी पत्रकार श्री. हरिभाऊ पगारे यांनी एक आठवण नोंदली आहे.

"...या प्रचंड सत्याग्रहींची संख्या ऐकून लालाबहादूर शास्त्री दादासाहेबांना म्हणाले होते, "अरे यार, आप छुपे रुस्तम निकले। हम समझें, दस बीस हजार आदमी जेलमे जायेंगे। आपने तो कमाल कर दी।"

भूमिहीनांची जमिनीची भूक किती व्याप्तीची आहे, याचे भान फार थोड्यांना होते. आजही ते फार थोड्यांना आहे.

भूमिहीनांची जमिनीसाठी आंदोलने या आंदोलनाअगोदर आणि नंतरही झाली आहेत. या प्रत्येक आंदोलनाचे आपापले महत्त्व आहे. अजूनही या मागणीतील आंदोलनाची क्षमता प्रचंड आहे. सरकारी पडीक जमीन. जंगलातील लागवडीलायक वृक्षहीन जमीन, गायरानाच्या जमिनी आणि त्याच बरोबर जमीनदारांनी आणि ग्रामीण धनिकांनी कमाल मर्यादासबंधी फायदे असूनही अनेक गैरप्रकार करुन दाबून ठेवलेल्या जमिनी, याच कायद्यांप्रमाणे जादा किंवा वरकड ठरलेली, परंतु अजूनही भूमिहीनांना न दिलेली जमीन अशा जमिनींची बेरीज खूप मोठी आहे. या जमिनी कसून देशाच्या संपत्तीत भर घालू शकणारे आणि स्वत:चे जीवनमान उंचावू शकणारे लक्षावधी भूमीहीन आहेत. या प्रश्नांची व्याप्ती व उपयुक्तता प्रचंड आहे.

परंतु दलित चळवळीच नव्हे तर जवळ जवळ सर्वच पुरोगामी व डाव्या चळवळींनी या प्रश्नाकडे लक्ष दिलेले नाही. अपवाद आहेत. नाही असे नाही, परंतु अपवादच आहेत.

सर्वच पुरोगामी डाव्या चळवळींच्या व संघटनांच्या नेतृत्वातील शहरी नेत्यांचे वर्चस्वाचा तो परिणाम असावा.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड, क्रांतीसिंह नाना पाटील, गोदूताई परूळेकर यांच्यासारख्या ग्रामीण, गरीबांसाठी संघर्ष करु शकणाऱ्या नेतृत्वाची आम्ही गरज आहे.

**दादासाहेब गायकवाड - दलित चळवळ आणि कम्युनिस्ट**

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांची इतर काही दलित नेत्यांनी 'धोतऱ्या' म्हणून जशी टिंगल टवाळी केली होती, तशीच त्यांच्यावर आणखी एक टीका होती. 'गायकवाड हे कम्युनिस्टांच्या हातातले बाहुले आहे.' 'सत्याग्रहांचे तंत्र हे कम्युनिस्टांचे तंत्र आहे.' इत्यादी ही टीका पुन्हा त्यांना 'धोतऱ्या' म्हणून हिणवणाऱ्या श्री. बी. सी. कांबळे यांचीच मुख्यत: होती. हेटाळणीची रीत याही टीकेबाबत अवलंबविली गेली होती. दादासाहेबांना उद्देशून 'नार म्हातारपणी फसली, लालजीच्या नादी लागली' असे म्हटले गेले.

वास्तविक पाहता, दलित चळवळ आणि कम्युनिस्ट चळवळ यांचे संबंध बंधुभावाचे असायला हवेत. दोन्ही चळवळी ज्या समाज विभागांच्या हितसंबंधासाठी आंदोलने करतात ते समाजविभाग एकच आहेत. अग्रक्रमासंबंधीच्या व्यूहरचनेबाबत मतभिन्नता अर्थातच आहेत. आर्थिक विषमतेविरुद्धची आंदोलने आणि सामाजिकविषमते विरुद्धची आंदोलने यात अग्रक्रम काय असावा, दोन्ही आंदोलनांचे परस्पर सबंध कसे असावेत, ही आंदोलने कोणत्या मार्गांनी चालवावीत, घटनात्मक किंवा कायदेशीर मार्गाची आंदोलने आणि त्या बाहेरील आंदोलने यांचा ताळमेळ कसा घालावा, हिंसा आणि अहिंसा यांचा प्रश्न बुद्धाचा मार्ग आणि कार्ल मार्क्स यांचा मार्ग असे मतभिन्नतेचे मुद्दे आहेतच. परंतु ज्यांच्या हितसंबधांसाठी ही दोन्ही आंदोलने आहेत ते समाजविभाग एक आहेत. या दोन्ही आंदोलनाच्या हितसबंधात विरोधातर मुळीच नाही. ही दोन्ही आंदोलने इतिहासात अनेकदा एकत्र आलीही आहेत. डॉ. आंबेडकराच्या काळात ती जशी आली आहेत तशी त्यानंतरच्या काळातही एकत्र आली आहेत.

**आंबेडकर - कम्युनिस्ट, कार्ल मार्क्स - बुद्ध**

आंबेडकर व कम्युनिस्ट, तसेच कार्ल मार्क्स आणि गौतम बुद्ध हा म्हणजे खूपच मोठा, स्वतंत्र आणि बऱ्याच काळजीपूर्वक हाताळण्याचा विषय आहे. ते करणे इथे शक्य नाही.

तथापी डॉ. आंबेडकर आणि कम्युनिस्ट यांच्या विचारसरणी या एकमेकाच्या पूर्णपणे विरुद्ध आहेत. त्यांच्यात समान असे काहीच नाही. अशी मांडणी काही मंडळी सतत करीत असतात. तसेच डॉ. आंबेडकर, त्यांचे पक्ष, त्यांचे अनुयायी आणि कम्युनिस्ट यांनी सतत एकमेकांच्या विरुद्ध असाच व्यवहार केला आहे. तसाच तो करीत राहिला पाहिजे असेही काही मंडळी मांडतात.

अशी मांडणी करणाऱ्यांत संकुचित पंथवादी आणि हितसंबंधी मंडळीचा भरणा मोठा आहे. तसेच तपशीलात न जाणाऱ्या आणि स्थळ-काळ सापेक्षतेने विचार न करणाऱ्या उथळ मंडळींचाही समावेश आहे.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्यावर कम्युनिस्ट धार्जिणेपणाचा आरोप वारंवार करण्यात आलेला आहे, म्हणून काही नोंदी आवश्यक ठरतात.

'बुद्ध की मार्क्स' असा डॉ. आंबेडकरांचा एक निबंध प्रसिद्ध आहे. अभ्यासकांनी तो मुळातूनच वाचावा. इथे या दोन थोर महापुरुषांच्या विचारसरणीतील डॉ. आंबेडकरांनी स्वत: नोंदविलेली साम्य स्थळे फक्त नोंदविली आहेत.

१) 'तत्त्वज्ञानाचे कार्य, जगाच्या उत्पतीच्या कारणांचे खुलासे देण्यात व्यर्थ वेळ खर्च करण्याचे नाही' तर जगाची पुनर्रचना करण्याचे आहे;

२) समाजात दोन वर्ग असतात. या दोन वर्गाचे हितसंबंध एकमेकांच्या विरुद्ध असतात. आणि त्यांचा एकमेकांशी संघर्ष असतो.

तसेच 'सर्व दु:खाचे कारण ही वर्ग विभागणी आहे.'

या मुद्यासंबंधीचे एकमत स्पष्ट करण्यासाठी डॉ. आंबेडकर यांनी बुद्धाच्या "अष्टांग" मार्गाचा उल्लेख केला आहे. बुद्धाने 'दु:ख' असा शब्द वापरला. कार्ल मार्क्स ने 'शोषण' असा शब्द वापरला. डॉ. आंबेडकर म्हणतात'.... दु:खाचे ठिकाणी शोषण असा शब्द वापरला की बुद्ध मार्क्स पासून दूर नाही..."

३) 'खाजगी मालमत्तेमुळे समाजातला एक वर्ग सामर्थ्यवान -शक्तीमान बनतो आणि शोषणामुळे दुसरा वर्ग दु:खी बनतो.'

एकमताच्या मुद्यावर डॉ. आंबेडकरांनी तथागत गौतमबुद्ध आणि त्यांचा सत्‌शिष्य आनंद यांच्यामधील संवादच सदर निबंधात देऊन एकमत स्पष्ट केले आहे.

४) 'चांगल्या समाज व्यवस्थेकरिता खाजगी मालमत्ता नष्ट करुन दु:ख दूर केले पाहिजे.'

एकमताच्या या मुद्द्याबाबत कोणत्याच पुराव्याची गरज नाही. भिवखू संघाचे नियम या बाबतीत जास्त कडक आहेत, अशी नोंद डॉ. आंबेडकरांनी केली आहे.

अर्थात गौतम बुद्धाचे तत्त्वज्ञान आणि कार्लमार्क्स यांचे तत्त्वज्ञान या दोन्ही तत्त्वज्ञानाचा अभ्यास केलेल्या महापंडित राहुल सांस्कृत्यायन यांच्यासारख्या तत्त्वचिंतकाने यापेक्षा वेगळ्या शब्दात आणि काही वेगळी अशी आपली मते नोंदवून ठेवलेली आहेत. परंतु या ठिकाणी तो व्यापक प्रश्न नाही. एकमताचे मुद्दे सांगताना डॉ. आंबेडकरांनी खाजगी संपत्ती (प्रायव्हेट प्रॉपर्टी) अशी शब्द योजना केली आहे. कार्ल मार्क्सची शब्द योजना 'उत्पादन साधनांनी खाजगी मालकी' (प्रायव्हेट ओनरशीप ऑफ मीन्स ऑफ प्रॉडक्शन) अशी आहे.

याच निबंधात 'कार्ल मार्क्स' आणि बुद्ध यांच्या विचारातील फरकही नोंदण्यात आला आहे. तो मुख्यत: मार्गासंबंधी आहे. मार्क्सने 'हिंसेचा' मार्ग सांगितला आहे तर गौतम बुद्धाने 'अहिंसेचा' मार्ग सांगितला आहे अशी त्या नोंदीची ढोबळ मांडणी करता येईल. अर्थात हिंसा-अहिंसा यासबंधी याच निबंधात त्यांनी खालील नोंदीही केल्या आहेत.

'कदाचित गौतम बुद्धाने 'साध्याच्या' आधारे 'साधनाचे' समर्थन मान्य केले असते. दुसरा मार्गच उरला नसेल तर संपत्तीच्या मालकांविरुद्ध बळाचा वापर, हे योग्यच साधन आहे असे गौतम बुद्ध म्हणाले असते...'

डॉ. आंबेडकारांनी 'बहिष्कृत भारत'च्या २७ सप्टेंबर १९२९च्या अंकात 'आधी कळस, मग पाया' या शीर्षकाचा एक लेख लिहिला आहे. त्यात त्यांनी कम्युनिस्ट विचारसरणी आणि भारतीय कम्युनिस्टांचा व्यवहार असा फरक करूनही काही मते व्यक्त केली आहेत.

अभ्यासकांनी हा लेखही मुळातूनच वाचावा. त्यातील काही वाक्ये अशी...

"जातीभेद व अस्पृश्यता ही कम्युनिझमच्या मूळतत्त्वांना अगदी सोडून आहे. लेनिन हिंदुस्थानात जन्मला असता तर प्रथम त्याने जातीभेद व अस्पृश्यता यांना साफ गाडून टाकले असते व तसे केल्याखेरीज क्रांतीची कल्पना त्याने मनातही आणली नसती..."

कम्युनिझमचे तत्वज्ञान हे जातीभेदाविरुद्ध आहे याची स्पष्ट नोंद डॉ. आंबेडकरांनी केली आहे. तत्त्वज्ञानाची भूमिका तर त्यांनी स्पष्टपणे नोंदविली आहे.

भारतीय कम्युनिस्टांच्या या बाबतीतल्या व्यवहारासंबंधी त्यांची टीकाही त्यांनी नोंदविली आहे.

'... रशियाप्रमाणे हिंदूस्थनात सोविएत राज्य व्यवस्था चालू झाली म्हणजे आपोआप जातिभेद नाहीसा होईल, यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणे परिणाम होऊन सामाजिक विषमता आपोआप अदृष्य होईल असे हिंदी कम्युनिस्टांनी वाटते काय?...'

डॉ. आंबेडकरांचे हे विधान प्रश्नार्थक आहे. तथापी त्याचा सूर हिंदी कम्युनिस्टांना तसे वाटत आहे, असा दिसतो.

१९२५साली स्थापना झालेल्या कम्युनिस्ट पक्षाच्या या बाबतीतील मतासंबंधी उण्यापुऱ्या ४ वर्षांतील, डॉ. आंबेडकरांचे हे लिखाण आहे. १९२९ पूर्वीच्या कम्युनिस्टांच्या कोणत्याही लिखाणात किंवा ठरावात असा सूर निघावा असे असल्याचे माझ्या तरी वाचनात नाही. तथापी ते गौण आहे.

क्रांतीनंतर 'सामाजिक समता' आपोआप निर्माण होईल असा माझा समज नाही. कुणी कम्युनिस्ट विचारवंतांनी असा समज लिहून ठेवण्याचे माझ्या वाचनात नाही. कुठल्याही ठरावात अशी नोंद मला आढळत नाही. असा 'आपोआपवाद' किंवा 'आपसूकवाद' जे कुणी कम्युनिस्ट मांडत असतील, त्यांनी त्यांचा मार्क्सवाद पुन्हा वाचावा.

'पाया आणि इमला' या उपमेने व्यक्त झालेली आर्थिक समता आणि सामाजिक समता किंवा 'आर्थिक पाया' आणि 'सामाजिक इमला' या संबंधीचे कार्ल मार्क्स व फ्रेडरीक एंगल्स यांचे लिखाण पुन्हा वाचावे. मूळ सिद्धांतात असा 'आपसूकवाद' बिलकूल नाही.

याच लेखात डॉ. आंबेडकरांनी एक सूचक विधान केले आहे ते असे'... 'थोडक्यात सांगावयाचे म्हणजे या देशातील कामगारांना व शेतकऱ्यांना कम्युनिस्टांची तत्त्वे आज तरी (१९२९ साली) रुचणे व पचणे शक्य नाही. कम्युनिस्टांचा आदर्श समाज अस्तित्वात यायला बहुजन समाजाची जी मनोभूमिका तयार झाली पाहिजे, ती मुळीच तयार झालेली नाही..."

ही मनोभूमिका १९२९ साली तयार झालेली नव्हती हे बरोबरच आहे. आजही वेगळ्या कारणांसाठी हे विधान करता येईल.

मुख्य मुद्दा आंबेडकरांचे विचार आणि कम्युनिस्ट विचारसरणी यात; याबातीतही विरोध नाही हा आहे.

१९२९च्या या नोंदीबरोबरच या बाबतीत आणखी एक नोंद आवश्यक आहे. ती डॉ. आंबेडकरांच्या निधनापूर्वी ४ वर्षे अगोदरची १९५२ सालची आहे. हरिभाऊ पगारे यांनी ती नोंद कर्मवीर गायकवाडांच्या चरित्रात केली आहे. १९५२ सालच्या निवडणुकानंतर काहीशा

निराशेच्या वातावरणात त्यांनी कर्मवीर गायकवाडांना एक पत्र लिहिले आहे. त्या पत्रात ते लिहितात. '... मला फेडरेशन मधून बाहेर पडावेसे वाटते, एवढेच नव्हे तर राजकारणातून आता पूर्णत: निवृत्त व्हावेसे वाटते. ते एवढे सोपे नाही, हे मला माहित आहे. तरीही **माझे राजकीय तत्त्वज्ञान** आपल्या लोकांचे अगदी त्वरित कल्याण साधू शकेल असे मला वाटत नाही. माझ्याशिवाय कुणालाही आपल्या लोकांना किती हलाखीची स्थिती आहे हे माहित नाही. तेव्हा त्यांचे कल्याण साधण्यासाठी त्यांनी तरी आणखी किती दिवस वाट पहावी? **कम्युनिस्ट पार्टीत जावे, असे माझे मत होत चालले आहे.** (जाड ठसा माझा.)

त्यातून कमीत कमी अर्थ काढायचा तर हे नक्कीच म्हणता येते की, डॉ. आंबेडकर तेव्हा स्वत:च्या 'राजकीय तत्वज्ञाना' खालोखाल 'कम्युनिस्ट' तत्त्वज्ञान मानत होते. विरोधी तर नक्कीच नव्हते.

१९५२ सालच्या निवडणुकांत मुंबई शहरातून डॉ. आंबेडकर राखीव जागेवर लोकसभेसाठी उभे होते. संयुक्त मतदार संघ होता. त्याच्या अगोदरच्या युद्ध विरोधी मुंबईच्या संपात डॉ. आंबेडकर आणि कम्युनिस्ट यांनी एकत्र काम केले होते. डॉ. आंबेडकरांनी कम्युनिस्ट पक्षाशी युती करून निवडणुका लढवाव्यात असे कम्युनिस्ट पक्षाने आवाहन केले होते. प्रयत्न केले होते. तथापी रिपब्लीकन पक्षाने तेव्हांच्या प्रजा समाजवादी पक्षांशी युती करून शीतयुद्ध लढविले. डॉ. आंबेडकर आणि प्र.सो.पा. एकत्रपणे कॉ. डांगे यांच्या विरुद्ध लढत होते. अशा स्थितीत कॉ. डांगे यांनी आंबेडकरांना पाडले असा जो आरोप घेतला जातो, तो रास्त नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मार्क्सवादी नव्हते किंवा कर्मवीर दादासाहेब गायकवाड कम्युनिस्ट नव्हते ते स्पष्टच आहे. बुद्ध आणि मार्क्स यांची तत्त्वज्ञाने किंवा विचारसरणी एक नव्हती, हेही स्पष्टच आहे. तथापी मुद्दा तो नाही. डॉ. आंबेडकर मार्क्सवादाच्या 'विरोधी' होते की कसे आणि आंबेडकरांची विचारसरणी आणि मार्क्सवाद यात काही साम्य होते की नाही हा मुद्दा आहे. या साम्याच्या आधारे आंबेडकरांचे अनुयायी आणि मार्क्सवादी विचारांचे अनुयायी यांचे अनेक सामाजिक / राजकिय व्यवहार एकत्र होऊ शकतात की नाही, हा मुद्दा आहे. सर्वच राजकीय / सामाजिक व्यवहार एकत्र होऊ शकणार नाहीत, हेही स्पष्ट आहे. संकुचित पंथवादी विचार न करता मार्क्सच्या अनुयायांनी आणि आंबेडकर व बुद्धाच्या अनुयायांनी आपल्या देशातील राजकीय/सामाजिक व्यवहार एकत्र करण्याची गरज सतत होती. आज ती जास्तच आहे. अर्थात असे प्रयत्न दोन्ही बाजूंनी व्हायला हवेत.

### एकत्र व्यवहार

इतिहास आणि चालू काळातही दलित चळवळ आणि कम्यनिस्ट पक्षाचे एक नेते कॉम्रेड आर.बी.मोरे सहभागी होते. १९३८ साली मुंबईच्या गिरणी कामगारांचा संप लढवण्यात कम्युनिस्टांबरोबर डॉ. आंबेडकरांचाही सहभाग होता.

१९५७ते १९६० या काळात महाराष्ट्रात संयुक्त महाराष्ट्र समितीचे जे अपूर्व आंदोलन झाले, त्यात रिपब्लीकन पक्ष आणि कम्युनिस्ट पक्ष सहभागी होते. १९५७ च्या निवडणुका त्यांनी एकत्र लढवल्या आणि या निवडणुकीत महाराष्ट्रात रिपब्लीकन पक्षाचे जितके खासदार

व आमदार निवडून आले तितके त्यापूर्वी आणि नंतरसुद्धा केव्हाही निवडून आले नाहीत. १९५७ च्या निवडणुकांत रिपब्लीकन पक्षाचे ९ खासदार निवडून आले. संसदेत रिपब्लीकन पक्षाच्या खासदारांचे नेतृत्व कर्मवीर दादासाहेब गायकवाडांकडे होते. त्यांची लोकसभेतील कारकीर्दही लक्षणीय होती.

१९५८-५९ साली महाराष्ट्रात सुरु झालेल्या आणि नंतर देशभर पसरलेल्या भूमिहीनांच्या आंदोलनातील आंबेडकर-अनुयायी आणि मार्क्सचे अनुयायी यांचे सहकार्य व सहभाग याचा उल्लेख वर आला आहे.

आजच्या काळातील प्रस्तुतता लक्षात घेता या सहकाऱ्याचे आणि सहभागाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. रिपब्लीकन पक्षाचे आणि मार्क्सच्या अनुयायांचे अनेक तुकडे होऊन ही दोन्ही आंदोलने आज पूर्वीइतकीसुध्दा परिणामकारक राहिलेली नाहीत हे वास्तव आहे. समान प्रश्नांवर,समान भूमिकांवर राजकीय/सामाजिक व्यवहार एकजुटीने करुन एकेका विभागाच्या आणि दोन्ही विभागांच्या जुटीला चालना मिळू शकते. याचा विचार व्हायला हवा.

आज देशात मार्क्सच्या आणि आंबेडकरांच्या विचारास पूर्णपणे विरोधी असलेल्या आणि विषमतेवर आधारलेल्या धर्माचा आश्रय घेऊन व वापर करून प्रतिगाम्यांनी सत्ता बळकावली आहे. गुजराथ राज्यात शासनसत्ता बळकावलेल्या फॅसीस्ट प्रवृत्तीच्या राष्ट्रीय स्वयंसेवक संघाने, सत्तेच्या सहाय्याने अल्पसंख्याकांचे हत्याकांड घडविले आणि एक दहशत निर्माण केली. ही हुकूमशाही प्रवृत्ती केवळ भारताच्या धर्म निरपेक्षतेलाच नव्हे, तर लोकशाहीला सुद्धा धोका निर्माण करीत आहे.

धर्मनिरपेक्षतेचे रक्षण, लोकशाही रक्षण, सामाजिक व आर्थिक विषमता वाढविण्याऱ्या धोरणांना विरोध, नव्या आर्थिक धोरणांना विरोध या मुद्द्यांवर आज व्यापक जुटीची आंदोलने उभी राहू शकतात.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड आज हयात असते तर त्यांनी या मुद्द्यावर संघर्ष संघटित करण्यात पुढाकार घेतला असता. अशा संघर्षात ते सहभागी झाले असते.

दलित चळवळीने आरक्षण आणि त्यातून उद्‌भविलेले प्रश्न यातच गुंतून न राहता ग्रामीण गरीबांच्या प्रश्नांवर आंदोलने संघटित केली पाहिजेत. मार्क्सच्या अनुयायांनी सुद्धा शहरी कामगार कर्मचाऱ्यांचे संघर्ष यातच गुंतून न राहता ग्रामीण गरीबांच्या प्रश्नावर आंदोलने संघटीत केली पाहिजेत.

व्यापक एकजूट, एक व्यापक जाणीव आणि एक व्यापक संघर्ष ही काळाची गरज आहे.

# दीपस्तंभासारखे मार्गदर्शक ठरतील दादासाहेब!

## भूदास शूद्रातिशूद्रांची इतिहासाने केलेली परवड
## भूदास मुक्तीचा आंबेडकरी क्रांतिकारक कार्यक्रम

**यादवराव कांबळे-तासगावकर**

अलबर्ट पिके नावाचा विचारवंत म्हणतो, ''आपण जे कांही स्वत:साठी करतो ते आपल्याबरोबरच नष्ट होऊन जाते. तथापि आपण जे इतरांच्यासाठी आणि जगासाठी करतो ते मात्र कायम राहते व ते अमर असते.'' कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या जीवनाचा आपण जेव्हा नि:पक्षपातीपणे मूल्यवेध घेतो तेव्हा आपणास निश्चितपणे असे जाणवते की, कर्मवीर दादासाहेब गायकवाड आयुष्यभर आंबेडकरी चळवळच जगले. ते स्वत:साठी जगलेच नाहीत, जगले ते केवळ इतरांच्यासाठी. म्हणजेच आंबेडकरी चळवळीसाठी. सबब, वरील उक्तीप्रमाणे कर्मवीरांच्या कार्याचा इतिहास-आंबेडकरी चळवळीच्या इतिहाससोबत कायम राहणार आहे. ह्या देशातील आंबेडकरी चळवळ स्वातंत्र्य, समता व बंधुत्व ह्या तत्त्वत्रयीसाठी सातत्याने अर्धशतकभर संघर्ष करीत होती. आंबेडकरी चळवळीला ह्या देशांत ज्याप्रमाणे सामाजिक समता अभिप्रेत होती, त्याचप्रमाणे आर्थिक समतासुद्धा अभिप्रेत होती. आंबेडकरी चळवळीने सामाजिक समतेच्या कार्यक्रमास अग्रक्रम दिला हे वास्तव आहे. कारण आंबेडकरी चळवळीची अशी धारणा होती की, ''सर्व प्रकारच्या क्रांत्यांच्या अगोदर सामाजिक क्रांती होणे आवश्यक आहे.''[१] तथापि, आर्थिक कार्यक्रमाकडे मात्र आंबेडकरी चळवळीने केव्हाच दुर्लक्ष केलेले नाही. आंबेडकरी चळवळीने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या हयातीत भूमिहीन शेतमजुरांच्या समस्येवर १९५४ मध्ये मराठवाड्यात आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या महापरिनिर्वाणानंतर कर्मवीर दादासाहेब गायकवाडाच्या नेतृत्वाखाली, ६ डिसेंबर १९६४ मध्ये देशस्तरावर सत्याग्रह केले आहेत. कारण ह्या देशाच्या इतिहासाचे सम्यक् ज्ञान डोळ्यांसमोर ठेवूनच, आंबेडकरी चळवळीने ह्या देशांत सामाजिक समतेचा आणि आर्थिक समतेचा इतिहास निर्माण केला आहे. 'जमीन'-त्यामध्ये विशेषत: शेतजमीन - हा एक संवेदनाक्षम विषय केवळ जमिनीसाठीच नाही, तर जमिनीच्या बांधांच्या मालकीसाठी सुद्धा खून आणि माऱ्यामाऱ्या होतात. तेव्हा, जमिनीच्या मालकीच्या मुद्द्यावर आंबेडकरी चळवळीचा, विशेषत: कर्मवीर दादासाहेब गायकवाडांनी केलेल्या भूमिहीनांच्या सत्याग्रहाचा मागोवा घ्यावा लागेल.

**'जमीन'ही मालमत्ता**

'जमीन' पाण्याप्रमाणेच निसर्गाची एक मालमत्ता. ह्या दोन्ही मालमत्ता खरं तर सार्वजनिक मालकीच्या. आदिमानवाला शेतीचा शोध केव्हा लागला याचा निश्चित कालखण्ड सांगणे शक्य नाही. तथापि, इतके मात्र निश्चितपणे सांगता येईल की, जमीन हे उत्पादनाचे, अन्नधान्य उत्पन्न करणारे व त्यातून अतिरिक्त संपत्ती देणारे एक साधन आहे; हे जेव्हा आदिमानवाच्या लक्षात आले, तेव्हापासून 'बळी तो कान पिळी' ह्या न्यायाने जमिनींची मालकी प्रस्थापित होऊ लागली. मानवजातीच्या उत्क्रांतीत प्रथमत: टोळी प्रमुख व त्यानंतर राजा, ह्या क्रमाने जमिनीची मालकी प्रस्थापित झाली. भारत हा एक खण्डप्राय देश. ह्या देशाच्या इतिहासाने अनेक नागमोडी वळणे घेतलेली. प्रत्येक प्रांतातील, प्रदेशातील भौगोलिक व राजकीय व्यवस्था मूलत: भिन्न स्वरूपाची. तात्पर्य, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी त्यांच्या, 'स्टेट्स अँड मायनॉरिटीज' ह्या ग्रंथात जमिनीच्या राष्ट्रीयीकरणाची मागणी का केली व बाबासाहेबांच्या महापरिनिर्वाणानंतर कर्मवीर दादासाहेब गायकवाडांनी सन १९६४ मध्ये भूमिहीनांचा सत्याग्रह कशासाठी केला, ह्या प्रश्नांची उत्तरे जर शोधायची असतील तर ह्या देशातील शूद्रातिशूद्रांना, **ह्या देशाच्या अगदी प्राचीन इतिहासापासून ते थेट एकोणिसाव्या शतकापर्यंत, जमिनींच्या मालकीपासून वंचित केल्याचा, भूदास व गुलाम म्हणून राबवून घेतल्याचा वस्तुनिष्ठ इतिहास तपासावा लागेल.**

**प्राचीन इतिहास : शूद्रातिशूद्र भूमिहीन**

श्रुतिकाळाच्या प्रारंभी अर्थव्यवस्था प्राथमिक स्वरुपाची असणे स्वाभाविक होते. ते (आर्य) शेतीव्यवसायाशी सुपरिचित होते आणि जेथे ते कांही काळपर्यंत स्थायी होऊन वस्ती करीत. तेथे धान्याचे उत्पादन करण्यात येई, यात शंका नाही. ऋग्वेदात आढळणाऱ्या कृषी, क्षेत्र, कीनाश (शेती करणारा), खनित्र, फाल, शीर (नांगर), त्सुरु (नांगराचा दांडा), लङ्ग्ल, सीता, दात्र (कोयता), लवन (कापणी), तितऊ (धान्य साफ करण्याची चाळणी) उर्वरा (नांगरलेली जमीन) इत्यादी शब्दांवरून हे स्पष्ट आहे. त्याशिवाय, ऋग्वेदात कालव्यांचाही निर्देश आहे. (ऋग्वेद,३,४,५,३,१०,४३,७) दासप्रभृती येथील मूळच्या रहिवाशांना जिंकल्यानंतर आर्य लोक जमिनींचे मालक झाले. त्यावेळेस तिचे त्यांच्यांत वाटप झाले असावे. हे वाटप गणप्रमुखाच्या म्हणजे राजाच्या आदेशानुसार होई असे म्हणता येईल. जमिनीची मालकी आर्यांची असली तरी शेतीची, अंगमेहनतीची कामे येथील मूळचे रहिवासीच करीत, असे दिसते. ब्राह्मण ग्रंथामध्ये वैश्य आणि शूद्र ह्यांना 'खाद्य' असे म्हटले असून, इतर दोन वर्णांना 'खाणारे' असे म्हटले आहे. यापैकी शूद्र हा प्राधान्येकरून श्रमिकाचाच वर्ग असल्यामुळे उत्पन्न झालेली संपत्ती मुख्यत्वे वैश्याच्याच हाती असावी. स्मृतिकाळी अर्थव्यवस्थेत पुष्कळच बदल घडून आला होता, वसलेल्या गावात राहणारी शंभर ते पाचशे, मुख्यत: शूद्र असलेली कुटुंबे शेतीव्यवसायासाठीच तेथे नेण्यात यावयाची असत. त्यांना बी, पशू, द्रव्य आदिंचे सहाय्य देऊन काही काळ त्यांच्यापासून संपूर्ण उत्पन्नाची अपेक्षा करू नये, असे म्हटले आहे. शेतीच्या व्यवसायाला असे प्रोत्साहन देण्याचे धोरण, शेतीच्या उत्पादनाला प्राप्त झालेल्या असाधारण महत्त्वाचे निदर्शन मानता येईल. नवीन

वसाहतीचा प्रदेश राज्याच्या मालकीचा असे. तेथील जमीन लागवडीखाली यावी या उद्देशाने लोक तेथे वसवले जात. पण त्यांना ते कसत असलेल्या जमिनीची मालकी प्राप्त होत नसे. त्यांना फक्त कुळाचा दर्जा प्राप्त होई. राज्यातील सर्व जमिनींची मालकी राज्याची म्हणजे सरकारची असे आणि जमिनीच्या बाबतीत खाजगीमालकी अस्तित्वात नव्हती. ह्या मताचा मुख्य आभार मनुस्मृतीतील एक वचन. त्यांत मनुने असे म्हटले आहे की, जमिनीत पुरलेले प्राचीन काळचे निधी आणि जमिनीतून काढलेले सर्व प्रकारचे धातू ह्यांचा अर्धा भाग राजाने घ्यावा, कारण राजा हा भूमीचा अधिपती आहे. मात्र मनुस्मृतीत दुसरीकडे पुष्कळ ठिकाणी जमिनीची खाजगी मालकी गृहीत धरलेली आहे. शेतीसंबंधी पुष्कळ माहिती कौटिलीय अर्थशास्त्रात दिली आहे. सरकारी शेतीवर काम करणाऱ्यांमध्ये दासू कर्मकर आणि दंडप्रतिकर्तृ म्हणजे दंड भरण्यास असमर्थ असल्यामुळे अंगमेहनतीच्या रूपाने तो वसूल करून देणारे ह्यांचा निर्देश आहे.

ह्या ग्रंथात (अर्थशास्त्र) असे म्हटले आहे की, ज्या जमिनीतील शेती सीताध्यक्षाला स्वत:च्या देखरेखेखाली करून घेणे शक्य नसेल, ती जमीन खंडाने द्यावी. हे दोन प्रकारे करता येण्यासारखे आहे. जे स्वत:चे बी, बैल, अवजारे वगैरे वापरतील अशा कुळांना उत्पन्नाचा अर्धा हिस्सा द्यावयाचा आणि जे केवळ आपल्या अंगमेहनतीने शेती करतील त्यांना उत्पन्नाचा चौथा हिस्सा किंवा पाचवा हिस्सा द्यावयाचा. ह्याच पद्धतीचा अवलंब खाजगी जमीनमालकही करीत असावेत असे समजण्यास हरकत नसावी. जमिनी खंडाने देण्याची प्रथा प्राचीन काळापासून चालत आलेली आहे, हे उघड आहे.[२] समाजामध्ये संख्येने अल्प असलेल्या श्रीमंत आणि धनाढ्य लोकांमध्येच, त्यांच्याकडे असलेल्या मोठ्या जमिनींच्या पट्ट्यावर कामगारांमार्फत मशागत होत असे किंवा शेतीच्या कामावर गुलामाना ठेवत असत. अथर्ववेदात आपणास असा संदर्भ मिळतो की, शेतीच्या मशागतीच्या कामासाठी दासींना आणि गुलाम मुलींना लावले जात असे. काळाच्या ओघात भूमिहीन शेतमजुराचा वर्ग निर्माण होत राहिला आणि संपूर्ण समाज चार अतूट विभागांत (वर्ण) भंग पावला. शेतीचा व्यवसाय वैश्य वर्णाकडे सोपविण्यात आला होता. ही वस्तुस्थिती बऱ्याच संहिता आणि धर्मशास्त्रावरून स्पष्ट होते. उदा. संख संहितेत असे म्हटल्याचे आढळते की, शेती व पशुपालनाचा व्यवसाय हा वैश्यांचा खास व्यवसाय ठरविल्याची नोंद आहे. गौतमाच्या धर्मसूत्राप्रमाणे वैश्यांना शेती, व्यापार, पशुपालन व कर्ज देणे अशाप्रकारचे व्यवसाय करण्याचे अधिकार दिले होते. हरित संहितेत असेच म्हटलेले आहे की, वैश्यांनी व्यापार, पशूपालन व शेती अशाप्रकारचेच व्यवसाय करावेत. यामुळे वैश्य वर्णातील लोक गर्भश्रीमंत होतील आणि म्हणूनच त्यांनी भूमिहीन शेतमजूरांना कामावर ठेवणे प्रथा म्हणून ओघानेच येते. आणि हे वैश्य वर्णातील लोक शेतीच्या मशागतीसाठी नेहमीच शूद्र (कारण त्यांना काहीच धारण करण्याचा अधिकार नव्हता आणि त्यांच्याकडे काही असेलच तर त्याचा उपयोग द्विजासाठी (ब्राह्मणासाठी होता) व गुलाम यांना कामास लावत होते.[३]

## एकोणिसाव्या शतकातील शूद्रभूमिहीन - दक्षिण भारत

प्राचीन भारतात भूमिहीन शेतमजुरांची जी अवस्था होती त्यामध्ये मध्ययुगात कोणतीच

सुधारणा झाली नाही. किंबहुना, मध्ययुगात सामंतशाहीचा उदय झाला आणि शूद्रातिशूद्रांच्या म्हणजेच भूमिहीन शेतमजुरांच्या जीवनात एक प्रकारची भीषणताच निर्माण झाल्याचा इतिहास आहे. विस्तारभयास्तव हा इतिहास निवेदन करणे शक्य होणार नाही. तथापि, एकोणिसाव्या शतकातील भूमिहीन शेतमजुरांच्या-प्रत्यक्षात गुलामांच्या-भीषणतेचा ऊपापोह केल्यानंतर मध्ययुगातील त्यांची अवस्था, वेगळी सांगण्याची गरज राहणार नाही. दक्षिण भारतातील एकोणिसाव्या शतकातील भूमिहीन शेतमजुरांच्या दयनीय अवस्थेचा इतिहास खालीलप्रमाणे मांडता येईल. ''मलबारमध्ये शेतमजूराला केवळ उत्पादनाचे एक साधन म्हणूनच वागणूक दिली जात होती. तामीळनाडूत सुद्धा शेतमजूरांचे अधिकार फारच मर्यादित करण्यात आले होते. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस मद्रासमध्ये शेतमजूरांच्या पुष्कळशा संस्थात्मक पद्धती अस्तित्वात होत्या. त्यामध्ये अगदी गुलामगिरीपासून ते मोफत कामावर जुंपलेल्या मजुरांच्या पद्धती होत्या. अशाप्रकारे सन १८०१ मध्ये बुचनन (तत्कालीन प्रशासक: मलबार) यांनी असे नमूद करून ठेवले आहे की, 'दक्षिण मलबार मधील शेतीची मुख्यत: सर्व कामे गुलामांच्या कडून किंवा चुरमार यांच्याकडून करून घेतली जात होती. हे गुलाम त्यांच्या देवरूसांची किंवा उमरावांची संपूर्णपणे खाजगी मालमत्ता असल्यासारखेच होते. ह्या शेतमजूर गुलामांना येथील उमराव, त्यांच्या पसंतीप्रमाणे कोणत्याही कामास जुंपत असत. ह्या शेतमजूरांचा कोणत्याही विशिष्ट जमिनीशी संबंध नसे. परंतु उमरावाला ज्याप्रमाणे उचित वाटेल, त्याप्रमाणे जमिनदारांच्या शेतीवर काम करणाऱ्या शेतमजूरांची विक्री किंवा अदलाबदल केली जात असे. केवळ पती-पत्नी, जोडप्यांची विक्री होत असे. तथापि, मुलांना त्यांच्या आई-वडिलांपासून व भावांना त्यांच्या बहिणींपासून वेगळे केले जात होते. मलबारमध्ये जेवढ्या कर्मठपणाने जातीव्यवस्थेचे पालन केले जात होते, तेवढ्याच कर्मठपणे दक्षिण कॅनरामध्ये पालन होत होते. एकंदरीत तिथे (दक्षिण कॅनरा) शेतमजूर फार कमी प्रमाणात स्वतंत्र होते. परंतु खरे तर ते स्वतंत्र असण्यापासून फारच दूर अंतरावर होते. 'गुलाम' ही संज्ञा त्यांच्यासाठी अचूकपणे उपयोगात आणली जात होती आणि तेथील प्रशासक सर्वसाधारण प्रथेप्रमाणे, त्यांच्यासाठी भूदास ह्या शब्दाला अगदीच समांतर असलेले, धेड (या शब्दाचा उच्चार तेव्हा धेर्द, धैर्द अशा वेगवेगळ्या पद्धतीने केला जात असे) हे जातीचे नाव वापरात होते. दक्षिण भारतातील शेतमजूरांच्या गुलामगिरीचे वैशिष्ट्य असे की, येथील शेतमजूरांची गुलामगिरी इथल्या जातीव्यवस्थेशी अतूटपणे बांधली गेली होती. पुष्कळशा पद्धतीच्या दासावस्था अशा वंशपरंपरागत होत्या आणि हे भूदास व गुलाम सर्वसाधारणपणे कनिष्ठ जातीचे होते. एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीस पन्नइयल ह्या जातीचे शेतमजूर तामीळ प्रदेशात गुलामगिरीचेच जीवन व्यतीत करीत होते, हे आता स्पष्ट झाले आहे. आता उपलब्ध झालेल्या पुष्कळशा पुराव्यावरून हे स्पष्ट झाले आहे की, पन्नइयलांची तत्कालीन तामिळ प्रदेशातील नऊ जिल्ह्यांत विक्री आणि गहाणवट केली जात होती. उदा. सन १८१९ मध्ये तिन्नवेली भागात पुरुष मजुरांची विक्री प्रत्येकी रु. ३२ पर्यंत, दक्षिण आरकोटमध्ये गुलाम कुटुंबाची रु. ३५ पासून रु. १७५ पर्यंत, कोइमतूरमध्ये चांगल्या शेतमजूराची जास्तीतजास्त किंमत रु. ५० पर्यंत लावली जात होती.

तथापि, आंध्र प्रदेशात जातींच्या बंधनांची तीव्रता, मलबार आणि तामीळ प्रदेशाच्या

तुलनेत, थोडीफार कमी होती. आंध्र प्रदेशातील बहिष्कृत जाती', आजच्या विसाव्या शतकात, मलबार आणि दक्षिण कॅनरा ह्या प्रदेशातील बहिष्कृत जातींपेक्षा सामाजिकदृष्ट्या चांगल्या परिस्थितीत आहेत. आंध्रातील ह्या बहिष्कृत जातीना जरी अस्पृश्य म्हणून मानले जात होते, तरी मलबारमध्ये त्यांच्या सावलीचा जसा विटाळ व्हायचा तसा विटाळ आंध्रांत मानला जात नव्हता. तथापि, आंध्रमध्ये आणि तेसूद्धा सन १९५२ मध्ये बहिष्कृत जातींवर बंधने होती. उदा. खेड्यातील प्रमुख रस्त्यावरून, चांगले कपडेलत्ते परिधान करून, चालण्यास अस्पृश्यांना प्रतिबंध होता. तसेच, जात आणि व्यवसाय यांचे तिथे अतूट संबंध होते आणि ते अशा अर्थाने की, तेथील शेतमजुरांची भरती खालच्या जातींच्या लोकांमधूनच केली जात होती. आणि तीसुद्धा विशेषत: माला व मडिगा ह्या अस्पृश्य जातीतूनच होत होती. आणि आज सुद्धा येथील शेतमजूरातील बहुतेक शेतमजूर माला व मडिगा ह्याच जातीतील आहेत.''[४]

### एकोणिसाव्या शतकातील शूद्रभूमिहीन - उत्तर भारत

अठराव्या शतकाच्या शेवटी उत्तर बिहार व उत्तर बंगाल विशेषत: आसामच्या बाजूला, तसेच उत्तरेकडील सर्वच प्रदेशांत पुष्कळसे पुरुष व स्त्री, घरगुती कामांबरोबरच इतर सर्व कामे करणारे गुलाम अस्तित्वात होते. ज्या शेतकरी कुळांना शेतीच्या महसुलाचा भरणा करता येत नसे, अशा शेतकऱ्यांच्या बायकामुलांना त्या प्रदेशाचे शासक ताब्यात घेऊन, त्यांना गुलाम करून, लिलावात विकत असत. ह्या मॅनरिक्युच्या विधानाचा आपण यापूर्वीच संदर्भ पाहिला आहे. (ट्रॅव्हल्स ऑफ सेबस्टीयन मॅनरिक्यु, व्हॉल्युम-१, पान ५३) हॅमिल्टन्‌ने स्वत:च नमूद केले आहे कीं, तत्ता प्रांतातील थकबाकीदारांना कोर्टात खेचण्याऐवजी त्यांच्या कुटुंबांची विक्री करण्याचे अधिकार त्याला स्वत:लाच प्रदान करण्यात आले होते. (ईस्ट इंडिया व्हॉल्युम-१, पान १२१) पुरुष गुलामांना गोलाम किंवा काफर असे संबोधले जात होते आणि महिला गुलामांना लौंडी असे संबोधले जात होते. संपूर्ण बिहार आणि बंगालमध्ये गुलामांची नेमणूक केवळ घरकामासाठीच नव्हे, तर शेतमजूर म्हणून सुद्धा केली जात होती. ज्या मालकांच्याकडे जमीनजुमला किंवा खंडाची जमीन असे, त्यांच्या जमिनीवर हे भूदास राबत होते व त्यांच्या (भूदासांच्या) उदरनिर्वाहासाठी त्यांना थोडेफार धान्य व जाडेभरडे कपडे दिले जात होते. हे गुलाम-भूदास धनुका-चांभार व रावरी अशांसारख्या बहिष्कृत जातींचे होते. ते स्वत:च्या मुलांना सुद्धा विकत असत. पुरविया, गया, शहाबाद, भागलपूर आणि अन्य काही जिल्ह्यांत गुलामांची विक्री होत असे. बुचनन असे नमूद करतो की, आसामी लोक पुष्कळशा गुलामांची विक्री करत होते आणि काही बिहारी लोक सुद्धा हाच व्यवसाय करीत असत. (मार्टीन, ईस्टर्न इंडिया, व्हॉल्युम-३- पान ४९६) एका पाहणीत असे आढळून आले आहे की, सन १८१२ मध्ये सिलहेट येथील एकंदर लोकसंख्येमध्ये एकषष्ठांश लोकसंख्या गुलामांची होती. कामरूप प्रदेश ब्रिटिशांच्या अमलाखाली आल्यानंतर तेथील १२००० गुलामांना मुक्त करण्यांत आले होते. (मार्टीन ईस्टर्न इंडिया, व्हॉल्युम तीन, पान २८९) एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत कृषी क्षेत्रातील भूदास व्यवस्था भारतात, विशेषत: पंजाब, दखखन, पूर्वेकडील उत्तरप्रदेश, उत्तर बिहार, उत्तर बंगाल, आसाम, ओरिसा, मध्यभारत,

मध्य प्रदेश, भारताच्या समुद्रकिनारपट्टीवरील दक्षिण-पश्चिम व दक्षिण-पूर्व प्रदेशांत अस्तित्वात होती. बुचनन गुलामांच्या किंमती खालीलप्रमाणे नमूद करतो :

| | |
|---|---|
| प्रौढ गुलाम | : रु. १५ ते रु. २० |
| १६ वर्षांचा मुलगा | : रु. १२ ते रु. २० |
| ८ ते १० वर्षापर्यंतची मुलगी | : रु. ५ ते रु. १५[५] |

**महात्मा गांधी - शेतजमीन प्रश्न**

ह्या देशातील भूदास-शूद्रांच्या गुलामगिरीचा इतिहास केवळ काही परिच्छेदांत, तसे करणे शक्य नसताना सुद्धा, विषयाच्या परिपूर्ण आणि सखोल आकलनासाठी वरील परिच्छेदांत मांडण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या विषयाच्या अनुषंगाने ह्या देशाचे राष्ट्रपिता महात्मा गांधी यांची कशा पद्धतीची विचारसरणी होती याचा मागोवा घेणे देखील गरजेचे वाटते.

लुईस फिचर ह्या अमेरिकन पत्रकाराने ३ जून १९४२ ते ९ जून १९४२, ह्या एका आठवड्याच्या कालावधीत, सेवाग्राम (वर्धा) येथे मुक्काम करून, तत्कालीन राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या विषयावर, महात्मा गांधीच्या मुलाखती घेतलेल्या होत्या. ह्या मुलाखती (अ वीक विथ गांधी) 'गांधीबरोबर एक आठवडा' ह्या शीर्षकाच्या पुस्तकात, अमेरिकेत १९४३ मध्ये व भारतात १९४४ मध्ये, प्रसिद्ध झालेल्या आहेत. ह्या दोघांमध्ये शेतकरी व शेतजमीन ह्या विषयावर झालेली प्रश्नोत्तरे खालीलप्रमाणे आहेत:-

**६ जून १९४२**

खेड्यातील सावकार शेतकऱ्यांची पिळवणूक करतात. ही पिळवणूक नष्ट करण्यासाठी आपल्या कांही श्रीमंत मित्रांच्या मदतीने, व्यापारी तत्त्वांवर एकादी 'जमीन बँक' काढून अल्पशा व्याजदराने शेतकऱ्यांना कर्ज देता येणार नाही काय?

**ते अशक्य आहे. शासनाने ह्या विषयावर कायदा केल्याशिवाय हे होणे शक्य नाही.**

कां नाही?

शेतकरी कर्जाची परतफेड करणार नाहीत. पण एक बाब निश्चित आहे. स्वतःचे जीवन सावकाराकडे गहाण ठेवण्याऐवजी अशा बँकातून तीन टक्के दराने घेतलेली कर्जे परत करणे सुलभ होईल, याची शेतकऱ्यांना जाणीव होणार नाही काय?

कर्ज देणे ही एक प्राचीन संस्था आहे आणि ती ग्रामीण भागांत खोलवर रुजलेली आहे. म्हणून ज्याचा आपण पुरस्कार करीत आहोत, त्याची अंमलबजावणी आम्हास स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी करणे शक्य नाही.

स्वतंत्र भारतात ह्यासंबंधी काय अपेक्षित आहे, शेतकऱ्यांच्या दयनीय अवस्थेमध्ये सुधारणा करण्यासंबंधी आपणाकडे कोणता कार्यक्रम आहे?

शेतकरी जमिनीचा ताबा घेतील. त्यांनी जमिनीचा ताबा घ्यावा असे आपण त्यांना सांगणार नाही, तरी सुद्धा ते घेतील.

जमीन मालकांना नुकसान भरपाई दिली जाईल काय?

नाही. आर्थिक दृष्ट्या ते अशक्य आहे. (यावर गांधी स्मितहास्य करतात) आमच्या लक्षाधीश मित्राबद्दल आम्हास जी कृतज्ञता आहे ती अशा गोष्टी सांगण्यापासून आम्हास परावृत्त करणार नाही.

**८ जून १९४२**

खरोखरच आपली सध्याची जी कायदेभंगाची चळवळ आहे, त्याबाबत आपले नेमके काय म्हणणे आहे? भविष्यात ती नेमका कोणता आकार घेईल?

खेड्यात शेतकरी कर भरण्यास नकार देतील. शासनाची बंदी मोडून ते मीठ तयार करतील. ही केवढी किरकोळ गोष्ट वाटते. मीठाच्या करातून ब्रिटिश सरकारला किती अल्प उत्पन्न मिळते. परंतु कर भरण्यास नकार देण्याच्या प्रवृत्तीतून शेतकऱ्यांना आपणामध्ये एखादी स्वतंत्र कृती करण्याचे धैर्य असल्याची प्रचीती येईल. यापुढील त्यांची कृती जमीन बळकावण्याची असेल.

*हिसेंच्या आश्रयाने?*

*तिथे हिंसा असेल, पण त्यानंतर पुन्हा जमीनदार लोक सहकार्य करतील.*

*याबाबत आपण आशावादी आहात काय?*

*ते कदाचित पळून जाऊन सहकार्य करतील*[६]

महात्मा गांधीच्या उक्त विचारांचे तात्पर्य : अ) स्वातंत्र्यानंतर शेतजमिनीसंबंधी कायदे होतील. ब) जमीनदारांना नुकसान भरपाई देणे शक्य होणार नाही. क) जमीनदार कुळांना सहकार्य करतील व ड) जमीन कसणारा जमिनीचा मालक होईल. उक्त प्रश्नोत्तरांमध्ये शेतमजूरांचा किंवा भूमिहीन शेतमजूरांचा मुद्दा उपस्थित झालेला नाही. परंतु एक गोष्ट मात्र स्पष्ट होते आणि ती म्हणजे 'कसेल त्याची जमीन ह्या तत्वाशी महात्मा गांधी सहमत होते. तथापि, डॉ. बाबासाहेब आंबेडकर किंवा कर्मवीर दादासाहेब गायकवाड केवळ कसणाऱ्यापर्यंत किंवा कुळापर्यंत थांबले नाहीत, तर त्यापुढे जाऊन त्यांनी असा प्रश्न केला की, कसणाऱ्यांची जमीन तर नसणाऱ्याचे काय? आणि म्हणूनच आंबेडकरी चळवळ म्हणजेच गायकवाडांसारख्या त्यांच्या अनेक निष्ठावान अनुयायांची चळवळ, जमिनीच्या प्रश्नासंबंधी कशी सर्वंकष भूमिका मांडते, याचा विचार करावा लागेल.

## जमिनीच्या प्रश्नावर आंबेडकरी चळवळ

महाडच्या चवदार तळ्यावरील दोन सत्याग्रह, हा क्रांतीकारक आंबेडकरी चळवळीचा आरंभबिंदू आहे. ह्या दोन्ही सत्याग्रहांत कर्मवीर दादासाहेब गायकवाड, नाशिकच्या कार्यकर्त्यासह सक्रीय होते. पहिला सत्याग्रह १९-२० मार्च १९२७ रोजी झाला. दिनांक १९ मार्चच्या अध्यक्षीय भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले, "दुसरा धंदा मी जो आपणास सुचविला आहे. तो शेती होय. हा धंदा सुचविण्यात माझा हेतू असा आहे की, आपल्या अस्पृश्य वर्गांनी आर्थिक दृष्ट्या स्वतंत्ररीतीने जीवित घालविण्याची व्यवस्था करावी. शेती विकत घेणे हे अस्पृश्य लोकांना कदाचित कठीण जाईल. पण जंगल खात्याच्या कितीतरी

पडीक जमिनी आहेत. त्यांना जर एखाद्या अस्पृश्य वर्गाच्या माणसाने मागणी केली तर त्याला त्या मिळण्यासारख्या आहेत.[७] डॉ. बाबासाहेब आंबेडकर सन १९३० मध्ये स्टार्ट समितीचे सदस्य होते. ह्या समितीच्या प्रतीवृत्तात अस्पृश्यांच्या व आदिवासींच्या सर्वांगीण उन्नतीसाठी ज्या शिफारशी करण्यात आल्या होत्या त्यात एक शिफारस अशी होती की "राने तोडून मिळालेली जमीन व वैराण पडीक जमिनी दलित वर्गीयांना द्याव्यात. सक्कर धरण योजनेचा उपयोग त्यांच्या सुधारणेकरिता केला जावा.[८] ठाणे जिल्ह्यातील कसारा ह्या ठिकाणी भरलेल्या एका परिषदेमध्ये भाषण करताना डॉ. आंबेडकरांनी इतर अनेक महत्त्वाच्या विषयांबरोबरच अस्पृश्यांच्या जमीन मालकीसंबंधातील मुद्दा मांडताना सांगितले, "महारांना जमिनी नाहीत, याचे कारण त्या इतर लोकांनी घेतल्या म्हणून, अस्पृश्यांना नोकऱ्या नाहीत याचे कारण इतर लोकांनी त्या लुबाडल्या म्हणून. दैवावर भरवसा ठेवून वागू नका. जे काम करावयाचे असेल ते आपल्या मनगटाच्या जोरावर करा."[९] डॉ. आंबेडकर सन १९३५ मध्ये धर्मांतराच्या प्रश्नावर गंभीरपणे गुंतले होते, तरी त्यांची इतर क्षेत्रातील कामे चालूच राहिली होती. कुलाबा जिल्ह्यातील 'चरी' ह्या गांवी शेतकऱ्यांची एक परिषद त्यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी तेथील गरीब शेतकऱ्यांच्या मनावर असे ठसविले की, जमीनदारांच्या सुखात त्यांच्या दु:खांची मुळे होती. म्हणून त्यांनी शेतकऱ्यांवर लादलेल्या गुलामगिरी विरुद्ध चळवळ उभारली पाहिजे.[१०] डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या १९३५ मधील येवल्याच्या धर्मांतराच्या घोषणेने सारा देश हादरला. ह्या धर्मांतराच्या घोषणेत इतकी प्रचंड ऊर्जा होती की, म्हैसूरच्या महाराजाने दसरा उत्सवात अस्पृश्यांना सहभागी करून घेण्याचे फर्मान काढले व त्यापाठोपाठ ज्या प्रदेशांत अस्पृश्यता अत्यंत कठोरपणे पाळली जात होती, त्या त्रावणकोर संस्थानाने त्यांच्या ताब्यात असलेली १६०० देवळे एका जाहीरनाम्यान्वये अस्पृश्य वर्गास खुली केली. ह्या घटनेचा परिणाम पंडित जवाहरलाल यांच्या मनावरही झाला.

ह्या घटनेमुळे (पंडित नेहरू) घटकाभर भारावून गेले. त्रावणकोरच्या जाहीरनाम्याविषयी बोलताना त्यांनी असे विचार व्यक्त केले की, "अस्पृश्यांचा प्रश्न हा मूळातच भूमिहीन वर्गाचा आर्थिक प्रश्न आहे. ह्या जाहीरनाम्यामुळे जे नवीन वातावरण निर्माण झालेले आहे ते लोकांच्या मनावर दूरवर परिणाम घडवून आणील. त्यामुळे अस्पृश्यांचा आर्थिक प्रश्न सोडविण्यास साहाय्य होईल असे मला वाटते."[११] सप्टेंबर १९३७च्या प्रारंभी मसूर येथे भरलेल्या परिषदेत डॉ. आंबेडकरांनी तत्कालीन काँग्रेसवर कडाडून हल्ला चढविला होता. त्या परिषदेत डॉ. आंबेडकर म्हणाले, "जोपर्यंत उत्पादनाची साधने थोड्या व्यक्ती आपल्या स्वार्थासाठी राबवित आहेत, तोपर्यंत सामान्य माणसाला उत्कर्षाची आशा नाही. कोकणातील खोती नष्ट करण्यासाठी त्यांनी मुंबई विधान मंडळासमोर १७ सप्टें. १९३७ रोजी एक विधेयक मांडले. शेतजमीन कसणाऱ्या कुळांची गुलामगिरी नष्ट करण्याच्या हेतूने प्रांतिक मंडळाच्या ह्या नवीन मनूत, आंबेडकर हे अशा तऱ्हेचे विधेयक मांडणारे विधानमंडळाचे पहिलेच सदस्य होते.

आंबेडकरांनी महार वतनाचे उच्चाटन करण्यासाठी ह्यावेळी एक विधेयक मांडले. त्याच्यासाठी ते १९२७ सालापासून चळवळ करीत राहिले होते.[१२] डॉ. बाबासाहेब आंबेडकर

३ डिसें. १९३७ ला पंढरपूरला भरलेल्या परिषदेपुढे भाषण करताना म्हणाले, "आपल्यापुढे तीन प्रश्न आहेत. पहिला असा की, आपणास हिंदू समाजात कधी समान दर्जा प्राप्त होईल काय? राष्ट्रीय उत्पन्नाचा योग्य भाग मिळेल की कसे, हा दुसरा प्रश्न. तिसरा प्रश्न असा की, आपण चालविलेल्या स्वाभिमान रक्षक आणि स्वावलंबन चळवळीचे पुढे काय होणार? जे धनिक आपल्याला पिळतात त्या धनिकांच्या विरुद्ध एक आघाडी स्थापण्याची फारच आवश्यकता आहे. दलित वर्गाचे आर्थिक स्वातंत्र्य संपादन करण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. तिसऱ्या प्रश्नाचे उत्तर असे की, दलितांच्या स्वावलंबन नि स्वाभिमान रक्षक चळवळीमुळे त्यांचा झाला तर फायदाच होणार आहे; तोटा तर नाहीच नाही, ही गोष्ट त्यांनी ध्यानात ठेवावी. मरणाची भीती मात्र त्यांनी टाकून दिली म्हणजे झाले."[१३] आपल्या सहकाऱ्याशी विचारविनिमय करून त्यांनी (डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी) १९३६ ऑगस्टमध्ये 'स्वतंत्र मजूर पक्ष' नावाचा एक स्वतंत्र नवीन राजकीय पक्ष स्थापन केला. त्या पक्षाचा कार्यक्रम विस्तृतपणे मांडणारा एक जाहीरनामा त्यांनी प्रसिद्ध केला. त्यांत भूमिहीन, गरीब कुळे, शेतकरी नि कामगार ह्यांच्या निकडीच्या गरजा नि गाऱ्हाणी मांडली होती. ह्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या विद्यमाने जाने. १९३८ मध्ये, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी विधीमंडळावर, शेतकऱ्यांच्या, शेतमजुरांच्या व भूमिहीन शेतमजुरांच्या दुःखाला वाचा फोडण्यासाठी, एका विशाल आणि सर्वसमावेशक मोर्चाचे आयोजन केले. ह्या मोर्चाला प्रचंड प्रतिसाद होता. शामराव परुळेकर, सी. चिं. जोशी, दत्तोपंत राऊत, इंदुलाल याज्ञिक आणि अ. वि. चित्रे ह्यांचे एक शिष्टमंडळ आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली मुख्यमंत्र्यांना भेटले. शिष्टमंडळाने मुख्यमंत्र्यांपुढे जी पहिली मागणी ठेवली, ती शेतावर काम करणाऱ्या मजुरांचे किमान वेतन ठरविण्याविषयीची. महसूल करात ज्याप्रमाणे सूट देण्यात आली होती, त्याचप्रमाणे थकलेल्या भाड्याच्या पैशांत सूट द्यावी. दुसरी मागणी अशी होती की, मालकांना भरपाई दिल्याशिवाय किंवा देऊन इनामदारी व खोती ह्या पद्धती नष्ट करण्याबाबत ताबडतोब कायदा करावा. सामाजिकदृष्ट्या जुलमी व आर्थिक दृष्ट्या कुचकामी ठरलेली जमीनदारी संपुष्टात आणलीच पाहिजे. लहान शेतकऱ्यांना कालव्याच्या पाण्याचे दर निम्मे करावेत, ही होती तिसरी मागणी.[१४]

**शेतजमिनीच्या राष्ट्रीयीकरणाची मागणी**

वरील विवेचनामुळे हे पुरेशा प्रमाणात सुस्पष्ट होईल की, आंबेडकरी चळवळीने सातत्याने ११ वर्षे, भूमिहीन शेतमजूर, शेतमजूर व शेतकरी (कुळे) यांच्या आर्थिक उत्थापनासंबंधी अग्रक्रमाने विचारांची मांडणी, वेळप्रसंगी आंदोलने व मोर्चे इत्यादी मार्गांचा अवलंब केलेला आहे. ज्या कालखंडात उक्त डाव्या विचारसरणीची डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मांडणी केली होती; तो कालखंड एकतर पारतंत्र्याचा होता आणि दुसरे म्हणजे तत्कालीन मुंबई प्रांताच्या विधिमंडळाचे अधिकारसुद्धा मर्यादित होते. त्यामुळे आंबेडकरी चळवळीच्या प्रयत्नांना तत्कालीन शेतीविषयक प्रश्नांच्या सोडवणूकीत फारमोठे यश मिळाले असे म्हणता येत नाही. तथापि, सन १९२७ ते १९३७ ह्या एका दशकाच्या कालावधीत शेतीविषयक प्रश्नावर व ह्या उद्योगात गुंतलेल्या मानवसमुहांच्या समस्यांवर सर्वांगपरिपूर्ण व क्रांतिकारक विचारांची आंबेडकरी चळवळीनेच सर्वप्रथम मांडणी केली आहे. पहिल्या

महायुद्धानंतर भारतीय स्वातंत्र्याचे आंदोलन महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली गतीमान होत राहिले. मर्यादित स्वातंत्र्य व मर्यादित लोकशाही व्यवस्था भारतीय लोकांना देण्यासंबंधी, गोलमेज परिषदा होत राहिल्या. ह्या गोलमेज परिषदांत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, ह्या देशातील अस्पृश्यवर्गांच्या समस्यांची कैफियत अत्यंत तडफदारपणे, शास्त्रशुद्ध पद्धतीने व विद्वत्ताप्रचुर पद्धतीने जगाच्या व्यासपीठावर मांडली, त्याला खरोखरच तोड नव्हती. त्याचबरोबर तत्कालीन मुंबई विधानमंडळातील त्यांची कामगिरी खरोखरच गौरवपूर्ण आणि अविस्मरणीय होती. यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे नेतृत्व केव्हाच राष्ट्रीय स्तरावर विराजमान झाले होते. याच दरम्यान विविध प्रकारच्या चळवळी चालू होत्या व त्या चळवळींचे वैचारिक स्तरावर समर्थन करणारे, डॉ. आंबेडकरांचे विद्वताप्रचूर ग्रंथसुद्धा समांतरपणे प्रसिद्ध होत होते. अर्थातच दुसऱ्या महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात दिल्ली हे आंबेडकरी चळवळीचे केंद्र झाले. कारण राष्ट्रीय स्तरावर देशाच्या भावी स्वातंत्र्यासंबंधी अनेक ऐतिहासिक घडामोडी जन्म घेत होत्या. स्वतंत्र भारताच्या संविधानात कोणकोणत्या तरतुदी असाव्यात याचादेखील तत्कालीन बुद्धिवंतांमध्ये ऊहापोह चालू होता. अशावेळी, शेतजमिनीच्या विषम-विभागणी संबंधाचे वास्तव, किमान आंबेडकरी चळवळीला तरी दृष्टीआड करता येणे शक्य नव्हते. म्हणूनच भविष्याची योग्य प्रकारे चाहूल घेऊन, घटना समितीला सादर करण्यासाठी त्यांनी ज्ञापन तयार केले. हे ज्ञापनच पुढे १४-१५ मार्च १९४७ मध्ये, 'राज्ये नि अल्पसंख्याक' (स्टेट्स् अ‍ॅन्ड मायनॉरिटीज) ह्या नावाने प्रसिद्ध करण्यात आले. घटना समितीला सादर करावयाच्या ह्या ज्ञापनात, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी शेतीसंबंधाने असे प्रस्तावित केले की, "शेतकीचा उद्योग हा सरकारी व्हायला हवा. जमीन सरकारच्या मालकीची होईल आणि ती ग्रामस्थांना जातपातनिरपेक्ष बुद्धीने भाडेपट्ट्याने दिली जाईल. असे घडले म्हणजे कोणी जमीनदार नाही, कोणी कूळ नाही, कोणी भूमिहीन नाही असे होईल."[१५] हा विचार खरोखरच त्यावेळी केवढा क्रांतीकारक होता. ह्या देशातील तत्कालीन जमीनदारांना आव्हान होते. ह्या मागणी पाठीमागचा मथितार्थ इतकाच होता आणि आहे कीं, जातीधर्माचा भेदभाव न करता सर्व शेतजमिनींची समान पद्धतीने फेरवाटणी करण्यात यावी. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की, ज्यांच्याकडे अतिरिक्त शेतजमिनी आहेत, त्या काढून घेऊन भूमिहीन शेतमजूरांना किंवा अल्पभूधारकांना दिल्या जाव्यात. हा विचार तसा बोलून दाखविण्यास सोपा वाटतो. परंतु जमीनदार वर्गाचे हितसंबंध दुखवण्याचे धैर्य तेव्हा आणि आज तरी कोणी दाखवू शकेल काय? अशाप्रकारचे धैर्य दाखविण्याचे काम सत्ताधाऱ्याचे आहे. ही अत्यंत संवेदनाक्षम समस्या आहे. ह्या अनुषंगाने असे नमूद करता येईल कीं, चीन क्रांतीमध्ये ज्यांनी माओच्या खांद्याला-खांदा लावून क्रांतीत उडी घेतली; अशांच्यापैकी कांहीच्या जमिनी जेव्हा माओने तेथील कम्यून्ससाठी संपादित केल्या, तेव्हा क्रांतीचे हे अग्रदूत माओच्या विरोधात जाऊ लागले. तत्कालीन तथाकथित डाव्यांनी सुद्धा 'जमिनीच्या राष्ट्रीयीकरणाची' मागणी त्यावेळी किंवा त्यानंतरसुद्धा केल्याचे निदर्शनास आलेले नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकर घटना समितीच्या प्रारुप कमिटीचे अध्यक्ष होते आणि तरीसुद्धा जमिनीच्या राष्ट्रीयीकरणाचा प्रस्ताव भारतीय संविधानात समाविष्ट होऊ शकला नाही. याची कारणमीमांसा ह्या लेखात करता येणार नाही. एक मात्र खरे कीं,

जमिनीच्या राष्ट्रीयीकरणाच्या मागणीला, काही प्रमाणात, जर कोणी थोडाफार उजाळा देण्याचे काम केले असेल; तर ते कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या डिसें. १९६४ मधील भूमिहीनांच्या सत्याग्रहाने!

**अश्रूना जागलेला लोकनेता**

जमीन हा विषय भारतीय संविधानातील राज्यसूचीत आहे. भारतीय संविधानातील राज्यसूचीतील कलम १८ मध्ये अशी तरतूद आहे की, "भूमी, म्हणजे भूमीतील किंवा तिच्यावरील अधिकार, जमीन मालक व कूळ ह्याचे संबंध धरून भूधृती आणि खंडाची वसुली, शेतजमिनीचे हस्तांतरण व अन्याक्रमण जमीन सुधारणा व कृषीविषयक कर्जे, वसाहतीकरण[१६] ह्या तरतूदीमुळे जमीन, शेतजमीन, जमीनदारी, कुळ जमीनीची वहिवाट व तुद्नुषंगीक सर्व विषय आता राज्य शासनाच्या अखत्यारीत आहेत. स्वातंत्र्याच्या पंचावन वर्षात कोणती सुधारणा झालीय ह्या देशातील भूमिहीन शेतमजूरांच्या भौतिक जीवनात? कर्मवीर दादासाहेब गायकवाडांनी जेव्हा; म्हणजे ६ डिसें. १९६४ पासून सत्याग्रहास प्रारंभ केला, तेव्हा तरी त्यांना सत्याग्रहाची निकड का भासली? आज शासकीय आकडेवारीच हे सांगते की, ह्या शंभर कोटीच्या लोकसंख्येच्या देशात वीस कोटी लोक असे आहेत कीं, त्यांना दोन वेळेचे साधे जेवणसुद्धा मिळत नाही. आणि तीस कोटी लोक दारिद्र्य रेषेखालचे जीवन जगताहेत. म्हणून तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या हयातीतच मराठवाड्यात १९५३ मध्ये भूमिहीन शेतमजूरांचा मोठ्या स्वरुपात सत्याग्रह झालेला होता. ह्या सत्याग्रहाचा तपशील देताना कीर असे म्हणतात की, "मराठवाड्यातील भूमिहीन दलित वर्गाने, दलित फेडरेशनच्या विद्यमाने भूमीसाठी सत्याग्रह सुरू केला होता. आंबेडकरांनी तो सत्याग्रह मागे घेतला. सरकारने अनुकूलता दर्शविली म्हणून हा निर्णय त्यांनी घेतला. सुमारे सतराशे सत्याग्रहींना अटक झाली. अकराशेंना विनाअट सोडण्यात आले."[१७] सन १९५३-५४च्या दरम्यान डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मनामध्ये प्रचंड स्वरूपाची घालमेल चालू होती. केंद्रात कायदेमंत्री पदावर असताना सुद्धा तत्कालीन नेहरुंच्या काँग्रेसवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर घणाघाती प्रहार करीत होते. सन १९५२ मध्ये कायदेमंत्री पदाचा राजीनामा दिल्यानंतर तर ही घणाघाती टीका अधिकच धारदार होत गेली. डॉ. बाबासाहेब आंबेडकर भूमिहीन शेतमजुरांचा प्रश्न सातत्याने मांडत आले. परंतु काँग्रेसने प्रतिसाद दिला नाही. ६ सप्टें. १९५४ रोजी वर्गीकृत जाती आणि वर्गीकृत अन्य जाती आयुक्त यांच्या प्रतिवृत्तावर भाषण (राज्यसभेत) करताना आंबेडकरांनी अस्पृश्यांच्या बाबतीतल्या सरकारी धोरणावर आणि हिंदूच्या वृत्तीवर खरमरीत टीका केली. सर्व पडीक जमिनी मध्यवर्ती सरकारच्या कक्षेत आणण्यासाठी घटनेत दुरुस्ती करावी अशी त्यांनी सूचना केली. मिठावर पुन्हा कर बसवावा आणि गांधी निधी उभारून तो पैसा दलित वर्गाच्या उन्नतीसाठी उपयोगात आणावा. पडीक जमिनीवर दलित पुनर्वसाहत करण्यासाठी त्या निधीचा व्यय करावा. मध्यवर्ती सरकारने जमिनीची किमान मर्यादा ठरवून आणि जास्त जमीन असेल तर ती घेऊन किंवा दलित वर्गाला जमीन विकत घ्यायला पैसे पुरवून ही गोष्ट करावी.[१८] शेतजमिनींच्या संदर्भात बाबासाहेबांनी जे जे प्रस्ताव मांडले त्याला तत्कालीन सत्ताधारी काँग्रेसने प्रतिसाद दिला

नाही. ह्या जाणीवपूर्वक केलेल्या उदासीनतेचे एक उदाहरण म्हणून महार वतन नष्ट करण्याच्या प्रश्नाचा आपणास ऊहापोह करता येईल. महार जातीवर गुलामगिरी लादणारी ही जुलमी पद्धत नष्ट करण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर सन १९२७ पासून झटत होते. तथापि, इनाम वर्ग - ६ अ चे हे महार वतन नष्ट करण्याचा कायदा (मुंबई कनिष्ठ गाव वतने नष्ट करणे-कायदा १९५८) सन १९५८ मध्ये केला. म्हणजेच बाबासाहेबांनी विधेयक मांडल्यापासून जवळपास तीन तपानंतर व स्वातंत्र्य मिळाल्यापासून जवळपास एका तपानंतर महार वतन नष्ट करण्याचा कायदा झाला. तथापि, छत्रपती शाहूनी मात्र ९ ऑगस्ट १९२१ मध्येच खास आदेशान्वये तत्कालीन त्यांच्या संस्थानातील महार वतन जमीनी रयताव्यात समाविष्ट केल्या होत्या. उक्त १९५८च्या ह्या कायद्यात अनेक त्रुटी आहेत. गाव, तालुका आणि जिल्हा स्तरावर ह्या कायद्याची अंमलबजावणी नीट झाली नाही. गावातील धनदांडग्यांनी ह्या जमिनी बळकावल्या आहेत. ह्या कायद्याच्या अंमलबजावणीचा आढावा शासनाने तर घेतला नाहीच; परंतु कोणी पुढाऱ्यानीसुद्धा तशी मागणी केली नाही. म्हणजे खोती नष्ट करणे व कुळकायदा करणे ह्या बाबी स्वातंत्र्यानंतर सत्वर म्हणजे सन १९४९ मध्ये होऊ शकल्या. महार वतनाच्या कायद्याच्या अंमलबजावणीची समस्या मात्र सन २००२ पर्यंत कायम आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात व स्वातंत्र्योत्तर काळात हे असेच घडणार याची, भविष्याच्या खोल गर्भात जाऊन विचार करणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना पूर्ण जाणीव होती. म्हणून तर सन १९५३ मध्ये सिद्धार्थ महाविद्यालयातील दलित फेडरेशनच्या बैठकीत बाबासाहेब कार्यकर्त्यांना म्हणाले होते, "मी माझ्या शहरातील बांधवासाठी काही तरी केले आहे. पण खेड्यातील बांधवांसाठी काहीच करू शकलो नाही. बाबासाहेब ह्या वेळी अक्षरश: रडले होते. बाबासाहेबांच्या ह्या अश्रूना जागणारा, कर्मवीर दादासाहेब गायकवाड, हा एकच लोकनेता होऊन गेला.

**मातीशी इमान ठेवणारा नेता**

दादासाहेब खरं तर हाडाचा शेतकरी माणूस! घरची शेती होती. त्यामुळे वेळप्रसंगी शेतात राबणे आलेच. शेतात राबणाऱ्या भूमिहीन शेतमजुरांच्या समस्यांची तर दादासाहेबांना सखोल जाण! दादासाहेबांचा पोषाख, भाषा आणि राहणी ह्या सर्व बाबी शेतकऱ्यांसारख्याच साध्या होत्या. क्रांतीसिंह नाना पाटील, कर्मवीर भाऊराव पाटील व कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या भाषा, पोषाखातील साधेपणाच गोरगरीबांना भावत होता. त्यांच्यांत जिव्हाळा, सद्‌भावना व आदर निर्माण करीत होता. दादासाहेबांचे वाचन-लेखन काही अफाट नव्हते पण दीनदलितांच्या चेहऱ्यावरची वेदना टिपण्याची बौद्धिक कुवत मात्र त्यांच्यामध्ये उपजतच होती आणि त्या वेदनेच्या पाझरातूनच, दलितांच्या, भूमिहीन शेतमजुरांच्या, डिसेंबर १९६४ मधील सत्याग्रहाने जन्म घेतला. स्वातंत्र्याच्या पहिल्या दोन दशकांत ह्या देशांत 'हरित क्रांतीने' बराच जोर धरला. पंडित नेहरुंनी शेतीक्षेत्रातील ज्ञानविज्ञानाला केंद्र सरकारच्या स्तरावरून चालना दिली. सर्व देशभरात लहान, मध्यम व मोठ्या धरणांनी पाणी अडविण्याचा प्रयत्न झाला. त्याच्यावर बागायती शेती बहरात आली. शेतीक्षेत्रासाठी शासनाने व खाजगी भांडवलदारांनी वित्त पुरवठ्याची व्यवस्था केली. भारताच्या ग्रामीण भागात सर्वच

राज्यांमध्ये शेतीला रोजगार निर्मिती करणाऱ्या उद्योगाचा दर्जा प्राप्त झाला. पण ह्या सर्व प्रगतीच्या पोटामध्ये भूमिहीन शेतमजूरांची संख्या ग्रामीण स्तरावर वाढत चालली होती. भारतातील ग्रामीण भागात सगळीकडे ह्या भूमिहीन शेतमजूरांची लोकसंख्या साधारणत: २० ते २५ टक्क्यापर्यंत तेव्हा (१९६४) आणि आजसुद्धा आहे. एकंदर लोकसंख्येच्या साधारणत: चौथा हिस्सा असलेला हा भूमिहीन शेतमजूरांचा वर्ग, शेती उद्योगात दुर्लक्षित आणि भरडला जात होता. भूमिहीन शेतमजूराच्या किमान वेतनाचा कायदा नव्हता आणि तद्नंतर जरी ती अस्तित्वात आला, तरी ग्रामीण भागाच्या स्तरावर त्याच्या काटेकोर अंमलबजावणीवर लक्ष ठेवणारी यंत्रणा, स्वातंत्र्याच्या दुसऱ्या दशकातच काय, पण आजदेखील अस्तित्वात नाही. आणि म्हणूनच स्वातंत्र्याच्या दुसऱ्या दशकाच्या मध्यास दादासाहेबानी भूमिहीन शेतमजुरांच्या वेदनेस वाचा फोडली. दादासाहेबांनी देशस्तरावर भूमिहीनांच्या सत्याग्रहास प्रारंभ केला तेव्हा, म्हणजेच १९६४ च्या दरम्यान, महाराष्ट्रात एकंदर शेतकऱ्यांच्या संख्येत, १९६१ मध्ये शेतमजूरांची लोकसंख्या ३४.०४ टक्के होती तर १९७१ मध्ये ही लोकसंख्या ४५.२० टक्के झाली होती.[११] आणि म्हणूनच नोव्हें. १९३७ मध्ये, ज्या कर्मवीरांची डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मुक्तकंठाने प्रशंसा केली, त्याच कर्मवीराने भूदास मुक्तीचे एक अभूतपूर्व असे आंदोलन उभे केले. कारण तत्कालीन परिस्थितीत हे आंदोलन अनिवार्य व अटळ होते.

**आंबेडकरी विचारांचा वर्गलढा**

ग्रामीण स्तरावर शेतीउद्योगाच्या क्षेत्रात, तत्कालीन भूमिहीन शेतमजूरांचे जे शोषण होत होते, त्या विरोधात स्वतंत्र भारतात पहिल्यांदाच ६ डिसें. १९६४ रोजी, भारतीय रिपब्लिकन पक्षाच्या वतीने रणशिंग फुंकले गेले होते. हा खरं तर वर्गलढा होता किंवा कसे ह्याची कारणमीमांसा नि:पक्षपातीपणे व पूर्वग्रहरहित दृष्टीने लोकांच्या समोर मांडली पाहिजे. ह्या सत्याग्रहाच्या ज्या काही बातम्या तत्कालीन वृत्तपत्रांत म्हणजे प्रबुद्ध भारतात व टाइम्स ऑफ इंडियात प्रसिद्ध झालेल्या आहेत, त्याची सत्यान्वेषी चिकित्सा केली असता असे दिसून येते की, ह्या भूमिहीनांच्या सत्याग्रहांत जातीधर्माच्या भिंती मोडून पडलेल्या होत्या. हा सत्याग्रह एका विस्तृत पायावर उभा होता. ह्या आंदोलनात साडेतीन लाखांच्या जवळपास सत्याग्रही सहभागी झाले होते. ही वास्तविकता तर आहेच, याशिवाय ह्या सत्याग्रहामध्ये एकप्रकारची दाहकता म्हणजे 'करेंगे या मरेंगे' ह्या मंत्राने लोकभावना भारलेली होती. ह्या वास्तव परिस्थितीमुळे कर्मवीर दादासाहेब गायकवाडांचे नेतृत्वगुण आपोआपच प्रगट होतात. आणि त्यामुळेच राज्यशासन व केंद्र शासन ह्यांना अस्वस्थ करणारा असा हा अभूतपूर्व सत्याग्रह होता. ह्या सत्याग्रहाच्या वेळेस (१९६४) दिवंगत वसंतराव नाईक व बाळासाहेब देसाई हे अनुक्रमे मुख्यमंत्री व गृहमंत्री होते. डिसेंबर महिना म्हणजे नागपूर अधिवेशनाचा कालावधी. सत्याग्रहाची वेळ निवडण्यात सुद्धा दादासाहेबांनी समयसूचकता दाखविली होती. दिवंगत बाळासाहेब देसाईनी नागपूर मुक्कामी वृत्तपत्रांना मुलाखत देताना सांगितले, "रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडियाचा सत्याग्रह अनावश्यक आहे व त्याबाबत खेद प्रगट केला. तसेच हा सत्याग्रह देशपातळीवर चालू असल्याचे त्यांनी सांगितले. हा सत्याग्रह अनावश्यक का

आहे, याचे स्पष्टीकरण देत असताना खालील मागण्या महाराष्ट्र शासनाने पूर्वीच मान्य केल्या असल्याचे सांगितले. अनुसूचीत जातीच्या लोकांना पडीक जमिनीचे, जंगल जमिनीचे वाटपात अग्रक्रम दिला आहे. नागपूरच्या पवित्र दीक्षाभूमीची जमीन, डॉ. आंबेडकर स्मारक समितीला दिली आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना अभिप्रेत होते, त्याप्रमाणे महारवतन जमिनी रिग्रँट करण्यात आल्या आहेत. डॉ. आंबेडकरांच्या जन्मदिवसाची सुट्टी घोषित केली आहे. याशिवाय, अनुसूचीत जातींची दुर्बलता नष्ट करण्यासाठी दुसऱ्या काही उपाययोजना सुद्धा महाराष्ट्र शासनाने केलेल्या आहेत. देसाई पुढे सांगतात, सत्याग्रहाच्या नांवाखाली रिपब्लिकन पक्षाचे अनुयायी दंगेधोपे करीत आहेत. अमरावती जिल्ह्यातील असेगांव ह्या ठिकाणी दीडशे लोकांनी पोलीस चौकीत घुसून फर्निचरची मोडतोड केली, दप्तराची खोली उघडण्याचा प्रयत्न केला व कामावर असलेल्या उपनिरिक्षकाला व पोलीसाला मारहाण केली. बुलढाण्यामध्ये एके ठिकाणी रु. ४,०००/- किमतीच्या गवताला आग लावली व झाडे रस्त्यावर टाकून रस्ता रोको केल्याचे प्रकारसुद्धा केले. ह्या तथाकथित सत्याग्रहींनी रेल्वे स्टेशनांत प्रवेश करून फर्निचरची मोडतोड केली. रेकॉर्ड बाहेर फेकून दिले व विनातिकिट प्रवास केला. अमरावती जिल्ह्यातील एके ठिकाणी सत्याग्रही उपविभागीय दंडाधिकाऱ्याच्या कार्यालयात घुसले व तेथील दप्तर हाताळण्याचा प्रयत्न केला. गेल्या चार दिवसात १२,८०० सत्याग्रहींनी स्वत:ला अटक करून घेतली आहे व यापैकी ११००० विदर्भ विभागातील आहेत.'' देसाईनी शेवटी असे सांगितले की, ''ज्या सत्याग्रहींनी शांततापूर्ण मार्गाने सत्याग्रह केला आहे, अशांना अटक करून साडून देण्यात आले आहे व ज्यांनी दंगेधोपे केले आहेत त्यांच्यावर खटले भरले जाणार आहेत. (टाइम्स ऑफ इंडिया - दिनांक १० डिसें. १९६४) ह्या बातमीच्या बाजूलाच त्याच दिवशी उक्त पत्रात सत्याग्रहासंबंधीची मुंबईची बातमी खालीलप्रमाणे आहे. ''मुंबईत १५० लोकांना अटक! रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडियाच्या १५० सदस्यांना, यामध्ये बहुतेक स्त्रिया व मुलांचा समावेश, सचिवालयात प्रवेश करण्यास पोलीस बंदीहुकूम असताना, प्रवेश करण्याचा प्रयत्न केल्याबद्दल गुरुवारी अटक करण्यात आली. तुकाराम ओव्हळ नावाच्या, एका वार्डाच्या उपाध्यक्षांनी सत्याग्रहाचे नेतृत्व केले. त्या अगोदर आर. जी. खरात व एन्. एम्. कांबळे अनुक्रमे नगरसेवक व कृती समितीचे अध्यक्ष यांनी कूपरेज जवळ निदर्शकांना मार्गदर्शन केले.

दिवंगत बाळासाहेब देसाईंच्या उपरोक्त मुलाखतीला, दिवंगत राजाभाऊ खोब्रागडे, (जनरल सेक्रेटरी, ऑल इंडिया, आर. पी. आय. नागपूर) यांनी पत्रकारांना निवेदन केलेले उत्तर - इतर कांही मागण्यांबरोबरच भूमिहीनांना पडीक जमिनी देण्याबाबतच्या प्रमुख मागणीसाठी, देशभरातून तीन लाख स्वयंसेवक सत्याग्रह करणार आहेत.'' यापुढे खोब्रागडे यांनी वार्ताहराना असे सांगितले की, ''सर्व देशभरातून आतापर्यंत तीस हजार स्वयंसेवकांनी विविध राज्यांमध्ये सत्याग्रह केलेला असून त्यापैकी पंचवीस हजार सत्याग्रही महाराष्ट्रातील आहेत व ह्या पंचवीस हजारातील, पक्षाचे शक्तीकेंद्र असलेल्या, विदर्भातील एकवीस हजार आहेत.'' गृहमंत्र्यानी केलेल्या आरोपाचे निराकरण करताना खोब्रागडे म्हणाले, ''त्यांची सत्याग्रहाची चळवळ शांततापूर्ण व अहिंसक मार्गाने चालू आहे.'' (टाइम्स ऑफ इंडिया-दिनांक १३ डिसें. १९६४) उक्त अधिवेशनाच्या कालावधीत दिनांक १४.१२.१९६४

रोजी विधान सभेत ह्या सत्याग्रहासंबंधी तत्कालीन सर्वश्री के. एस. धोंडगे व एस. जी. पाटील (दोघेही शे.का.प.) यांनी चर्चा उपस्थित केली. ह्या चर्चेला उत्तर देताना देसाईनी ह्या सत्याग्रहासंबंधी सांगितले की, महाराष्ट्र राज्यात चालू असलेल्या ह्या सत्याग्रहात जरी काही अनुचित घटना घडल्या असतील तरीसुद्धा, महाराष्ट्र शासनाचे, नवबौद्धांसहित दलित वर्गाच्या हिताचे जे धोरण आहे, त्याला बाधा येईल अशी कोणतीही कृती शासन करणार नाही. ह्या सत्याग्रहात रिपब्लिकन पक्षाच्या ३२००० स्वयंसेवकानी आतापर्यंत भाग घेतला आहे, त्यातील २८००० विदर्भातील आहेत. यापैकी १५००० सत्याग्रहींना सोडून देण्यात आले असून १४००० सत्याग्रहींची न्यायचौकशी चालू आहे आणि २५०० सत्याग्रहींवर आरोप सिद्ध करून शिक्षा फर्माविण्यात आली आहे. (टाइम्स ऑफ इंडिया दिनांक १५.१२.६४) दिनांक १७.१२.१९६४ रोजी विजापूरच्या तहसीलदार कार्यालयासमोर सत्याग्रह करणाऱ्या रिपब्लिकन पक्षाच्या ११ स्वयंसेवकांना अटक झाली. सत्याग्रहींची ही दुसरी तुकडी होती. पहिल्या तुकडीतील ५२ सत्याग्रहीना अटक होऊन त्यातील १७ लोकांना प्रत्येकी पाच दिवसाच्या साध्या कैदेची शिक्षा करण्यात आली. १३ स्त्रियांना व ८ मुलांना प्रत्येकी दोन दिवसाची साधी कैद करण्यात आली आणि उर्वरित लोकांना सोडून देण्यात आले. (टाइम्स ऑफ इंडिया. दिनांक १८.१२.१९६४) मुंबईत ह्या सत्याग्रहास मोठा प्रतिसाद होता. तथापि, नागपूर आणि संपूर्ण विदर्भात ह्या सत्याग्रहास असामान्य असा प्रचंड प्रतिसाद होता. दिनांक २८.१२.१९६४ रोजी रामप्रकाश नावाचा रिपब्लिकन पक्षाचा सत्याग्रही जालंदर जिल्हा जेलमध्ये मरण पावला. याने १० डिसेंबर रोजी सत्याग्रहात स्वत:ला अटक करून घेतली होती. (टाइम्स ऑफ इंडिया-दिनांक २९.१२.१९६४) ह्या सत्याग्रहात एकंदर १३ सत्याग्रही हुतात्मा झाल्याची नोंद आहे. दिनांक २९.१२.६४ रोजी नागपूर येथे रिपब्लिकन पक्षाच्या १०० सत्याग्रही स्वयंसेवकांचा तेथील जिल्हाधिकाऱ्याच्या कार्यालयाजवळ पोलीसाबरोबर प्रत्यक्षात संघर्ष झाला आणि त्यामध्ये तीन सत्याग्रही जखमी झाले. तात्पर्य हा सत्याग्रह ६० दिवस अखण्डपणे चालू होता. हा सत्याग्रह देशव्यापी होता. ह्या सत्याग्रहात तीन महिन्याच्या बालकापासून ११० वर्षांच्या वृद्ध स्त्रीपुरुषांनी तुरुंगवास भोगला. ओल्या बाळंतिणी, आपल्या तीन महिन्यांच्या छकुल्यासह, तसेच गरोदर स्त्रियांनीही तुरुंगवास पत्करला. नागपूरच्या सत्याग्रहातील एक स्त्री तुरुंगातच बाळंत झाली. मुंबईत रात्री तीन वाजता सचिवालयावर समता सैनिक दलाच्या सत्याग्रहीनी सत्याग्रह केला. सर्व राजकीय विरोधी पक्षांनी ह्या सत्याग्रहाला सक्रीय पाठिंबा दिला होता. पंजाबमध्ये कम्युनिस्ट व जनसंघाने, तर विदर्भात शे.का.प.ने सक्रीय सहभाग घेतला. डॉ. राम मनोहर लोहिया व गोपालन यांनी सत्याग्रहात भाग घेण्याची इच्छा दर्शविली होती. (प्रबुद्ध भारत ६ फेब्रु. १९६५)

**भविष्यात दादासाहेब दीपस्तंभासारखे**

भूमिहीनांचा हा सत्याग्रह असाधारण होता. तथापि, ह्या सत्याग्रहाने भारतातील भूमिहीन शेतमजूरांची समस्या संपली असे समजण्याचे काहीच कारण नाही. ही मात्र वास्तविकता आहे की, ह्या सत्याग्रहाने काही ठिकाणी भूमिहीनाना अतिरिक्त ठरलेल्या जमिनींचे, पडीक जमिनींचे व जंगल जमिनींचे वाटप झाले आहे. विशेषत: विदर्भात भूमिहीनांना उक्त प्रकारातील

जमिनी सत्याग्रहानंतर प्राप्त झाल्याचे पुरावे उपलब्ध आहेत. प्राचीन भारताच्या इतिहासापासूनची शेतजमिनीच्या वाटपातील विषमता दादासाहेब गायकवाडांच्या ह्या एका प्रयत्नातून संपेल, असे समजण्याचे काहीच कारण नाही. एक मात्र खरे की, ह्या सत्याग्रहाने ह्या देशातील जमीनदारांच्या हितसंबंधाना, आधुनिक भारताच्या इतिहासात, पहिले निर्णायक आव्हान दिले. स्वातंत्र्योत्तर काळात बंगाल व केरळ मधील कम्युनिस्ट राजवटीनी कमाल जमीन धारणा कायद्याच्या माध्यमातून भूमिहीनाना न्याय देण्याचा निश्चितच प्रयत्न केला आहे. तथापि, भारतातील इतर राज्यांत शेतजमिनीच्या समान वाटपाचा मुद्दा, (डॉ. आंबेडकरांनी स्टेटस् अँड मायनॉरिटी'मध्ये मांडलेला) फारसा कोणी विचारात घेतल्याचे निदर्शनास आलेले नाही. ह्या देशात काही विशिष्ट वर्गांच्या समाजिक आणि आर्थिक हितसंबंधाना आव्हान करण्याचे धैर्य, सर्वप्रथम डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दाखवले. कर्मवीर दादासाहेब गायकवाडांनी शेतजमिनीच्या विषम वाटपाच्या मुद्द्याला अविस्मरणीय अशी चालना दिली. त्यानंतर बँकाचे राष्ट्रीयीकरण करून दिवंगत पंतप्रधान इंदिरा गांधीनी असामान्य धैर्य दाखविले. तद्नंतर अशा प्रकारचे धैर्य, मंडळ आयोगाची स्वीकृती करून, माजी पंतप्रधान व्ही. पी. सिंग यांनी दाखवले.

आज मात्र घड्याळाचे काटे उलट फिरवले जात आहेत. दादासाहेब गायकवाडाच्या उक्त सत्याग्रहानंतर गेल्या तीस-पस्तीस वर्षांत ह्या देशातील सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थितीत आमूलाग्र परिवर्तन झाले आहे. आजच्या जागतिकीकरणाने, खाजगीकरणाने आणि निर्गुंतवणुकीच्या धोरणाने ह्या देशातील दलिताच्या आरक्षणासारख्या संविधानीक हक्कावर व दारिद्र्य निर्मूलनाच्या कार्यक्रमावर कुऱ्हाडच चालविली जात आहे. ह्या आणीबाणीच्या परिस्थितीसंबंधी कोणी फारसा विचार करताना दिसत नाही किंवा ह्या संकटाना थोपवून धरण्यासाठी कोणाकडे काही कार्यक्रम असल्याचे देखील दृष्टीस पडत नाही. हा गाफीलपणा दलितांचे भवितव्य नष्ट करण्यास कारणीभूत ठरेल नेमक्या ह्याचवेळी कर्मवीर दादासाहेब गायकवाडांचे प्रकर्षाने स्मरण होते. ह्या देशातील लहानमोठ्या धरणाच्या बांधकामावर शासनच्या तिजोरीतून कित्येक हजार कोटी रुपये खर्च केले जातात. ह्या देशातील ग्रामीण भागातील नाडलेल्या भूमिहीन शेतमजूरांच्या श्रमांचा कररूपाने वसूल केलेला निधीसुद्धा अशा धरणांच्या बांधकामात जर उपयोगांत आणला जात असेल, तर मग अशा धरणांच्या पाण्यावर भूमिहीन शेतमजूरांचा निश्चितच कायदेशीर अधिकार आहे. तथापि, ह्या आणि अशा अन्य काही भूमिहीन शेतमजूरांच्या अधिकारासंबंधांत काहीच होताना दिसत नाहीं. तथापि, पश्चिम महाराष्ट्रात मा. नागनाथ अण्णा नायकवडी मात्र भूमिहीन शेतमजूरांच्या धरणातील पाण्यावरील हक्कासाठी आंदोलन करताना दिसतात. मा. नागनाथअण्णा नायकवडी हे 'दादासाहेब गायकवाड जन्मशताब्दी समिती' ह्या अशासकीय समितीचे अध्यक्ष आहेत.

दादासाहेबांनी त्यांच्या जीवनाच्या संध्याकाळी, काँग्रेसबरोबर तडजोड केली. अशा तडजोडी बेरजेच्या राजकारणासाठी निदान महाराष्ट्रात तरी, बहुतेकांनी केल्या आहेत. तथापि, तात्पुरती तडजोड करणे आणि स्वतंत्र विचारांची अस्मिता कायमची गहाण टाकणे ह्या दोन्ही गोष्टी सर्वस्वी भिन्न आहेत. दादासाहेब गायकवाडांसारख्या बाबासाहेब आंबेडकरांच्या तालमीत वाढलेल्या, नेत्याने योग्यवेळी किंवा योग्य वेळ येताच विचारांचे आणि चळवळीचे

तेज कायम ठेवले असते. कारण दादासाहेब गायकवाड हे सतत सत्तेच्या सावलीत राहून निर्जीव संघटना सांभाळणाऱ्या नेत्यांपैकी नव्हते. कारण कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे तळागाळातील गोरगरीबांच्या वेदनेने सतत अस्वस्थ असणारे नेते होते. आणि म्हणूनच डॉ. बाबासाहेब आंबेडकराचा, शेतजमीनीच्या समान वाटपाचा कार्यक्रम जेव्हा केव्हा ह्या देशातील संवेदनशील आंबेडकरी तरुणांना अस्वस्थ करेल; तेव्हा त्यांना कर्मवीर दादासाहेब गायकवाड समुद्रातील दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरतील.

## संदर्भ ग्रंथ


१. ॲनिहिलेशन ऑफ कास्ट, पान : ९
२. प्राचीन भारतीय राजनीती : रं. पं. कंगले पाने ५३,५४,५५,५६,५७
३. लेबर इन एनसियंट इंडिया : के. एम. सरन पान : ३६
४. लँड ऑड कास्ट इन साउथ इंडिया, धर्म कुमार, पान : ३४,३५,३६,३८,४२
५. दी इकॉनॉमिक हिसट्री ऑफ इंडिया, राधा कमल मुकर्जी : पान : ६९, ७०
६. वीक विथ गांधी : लोईस फिचर : पान ४३,७२,७३
७. महाड समता संगर : रत्नाकर गणवीर : पान ७६
८. डॉ. बाबासाहेब आंबेडकर : धनंजय कीर : पान १४३
९. उक्त : पान : २४१
१०. उक्त : पान : २६९
११. उक्त : पान : २९७
१२. उक्त : पान : ३०६
१३. उक्त : पान : ३०८
१४. उक्त : पान : ३१०-३११
१५. उक्त : पान : ४०४
१६. भारतीय संविधान : महाराष्ट्र शासन : पान १७१
१७. डॉ. बाबासाहेब आंबेडकर : धनंजय कीर : पान ४०८
१८. उक्त : पान : ४०८
१९. पीझंट क्लास डिफरनूशिएशन : उत्सा पटनाईक : पान : १६०.

# कर्मवीर दादासाहेब गायकवाड : चळवळी आणि विचार

**डॉ. गंगाधर पानतावणे**

नाशिकने भारताला जे काही कर्तृत्ववान पुरुष दिले, त्यात कर्मवीर दादासाहेब गायकवाड ह्यांचे स्थान अग्रणी आहे. नाशिक हे जरी पुनरुज्जीवनाचे शहर तसेच ते परिवर्तनवाद्यांची भूमी आहे. खरे तर हे शहर म्हणजे एक युद्धभूमीच. म्हणून कर्मवीरांना लोकयोद्धे म्हणणेच अधिक सार्थ ठरले. लोकयोद्धा हा अस्तित्वात असणाऱ्या जनशक्तीचाच प्रतिनिधी असतो. तो प्रस्थापित मूल्यांना आव्हाने देऊन नवी शक्ती निर्माण करतो. तो आपल्या कर्तृत्वाने नवा इतिहासच घडवितो. त्यांचे इतिहासाला योगदान देण्याचे सामर्थ्य निर्विवाद असते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे कर्मवीरांना लाभलेले सान्निध्य त्यातून घडलेले त्यांचे व्यक्तिमत्व, अस्पृश्यांच्या मुक्तिसंग्रामात त्यांनी झोकून दिलेले आयुष्य वेळोवेळी त्यांनी व्यक्त केलेले विचार काळाने मात्रच केले आहेत. प्रज्ञासूर्य बाबासाहेबांच्या प्रत्येक चळवळीशी त्यांनी इमान राखले, कधीही फितुरी केली नाही आणि स्वयंप्रकाशाने बाबासाहेबांनंतर ते दलित चळवळीचे सेनानी झाले. टिचभर स्वार्थासाठी; त्यांनी कधी बाबासाहेबांनी निर्माण केलेल्या चळवळींपासून दूर जाण्याचा, त्यांचा विचारांपासून ढळण्याचा त्यांनी कधी विचार केला नाही. म्हणूनच ते दलितांचे 'दादासाहेब' झाले. अथक परिश्रम आणि जाज्वल्य निष्ठा तसेच संघर्ष आणि अमोघ ध्येयवाद यामुळे ते 'कर्मवीर' झाले.

दादासाहेबांनी आपल्या आयुष्यात प्राधान्याने चळवळी केल्या. त्या तीन

१) पाण्यासाठी २) मंदिर प्रवेशासाठी आणि ३) भूमीहीनांसाठी. हे सारे लढे उपेक्षित वंचित, दलित समाजासाठी होते. परंतु हे लढे मानवी होते. त्यांचा परिघ संकुचित नव्हता. दलित चळवळी ह्या मानवी आणि राष्ट्रीय चळवळी होत्या. त्यामुळे ह्या चळवळींकडे संकुचित दृष्टिकोणातून पाहाता येणार नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मानव-लढ्यांची पार्श्वभूमी दादासाहेबांच्या चळवळींना असल्यामुळे त्यांना एक व्यापक असे अधिष्ठान आहे. ह्या चळवळीत त्यांचा आत्मविश्वास, लोक जागरणाचा ध्यास आणि समाजाचे नवे चित्र निर्माण करण्याचा हव्यास प्रतीत होतो.

निसर्गाने निर्माण केलेले पाणी, समाजातल्या निम्न मानले गेलेल्या घटकांना मिळू नये ही समाजव्यवस्थेची मग्रुरी होती. एकीकडे सुजलाम् सुफलाम् अशी गर्जना करायची आणि

या देशातील अस्पृश्यांना, वंचितांना पाणी द्यायचं नाही, हा हडेलहप्पीपणा आणि हट्टाग्रह होता. 'विविधतेत एकतेचा उद्घोष करणाऱ्या मूलतत्त्ववाद्यांची ती शिरजोरी होती, माज होता आणि दुटप्पीपणा होता. म्हणूनच बाबासाहेबांच्या महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात सहभागी होणे ही कर्तव्यजाणीव आहे, हे मानून दादासाहेब महाडला गेले आणि त्यांच्या चळवळींना आरंभ झाला. पुढे तर त्यांनी स्वत:ही नाशिक जिल्ह्यातील काही गावी अस्पृश्यांना पाणी मिळावे म्हणून आंदोलने केली. त्यांच्या ह्या चळवळीत सातत्य होते. त्यातून दलितांमध्ये आत्मजाणीव तर निर्माण झालीच परंतु संघर्षाचे एक अधिष्ठानही निर्माण झाले. आपले सामाजिक व धार्मिक हक्क संपादन करणे अपरिहार्य आहे, असा एक आशावाद दादासाहेब निर्माण करू शकले.

दादासाहेबांच्या जीवनात 'काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह' आणि 'भूमिहीनांचा सत्याग्रह' ह्यांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. 'काळाराम' सत्याग्रहाचा आधार बाबासाहेब होते, परंतु त्याची योजना मांडणी आणि सेनापतीत्व दादासाहेब होते. त्यांच्या साथीला पतित पावन दास, अमृत रणखांबे, सावळाराम दाणी इत्यादी मंडळी होतीच. महाडनंतरचा प्रचंड लढा कोणता असेल तर तो हा मंदिर प्रवेशाचा सत्याग्रहच. महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेरील अस्पृश्यांचा तर ह्यात सहभाग होताच; परंतु अनेक सवर्णांनीही त्यात भाग घेतला होता. बॅ.वि.दा.सावरकरांनी एक अनावृत्त पत्रक प्रकाशित केले होते आणि हिंदूंना सत्याग्रहाला सहकार्य करण्याचे आवाहन केले होते. पण पत्रकाने चळवळी यशस्वी होतात हा भाबडेपणा आहे. प्रश्न असा उपस्थित होतो की, स्वत: सावरकर ह्या सत्याग्रहात का सहभागी झाले नाहीत? बाबासाहेब आणि दादासाहेब यांच्यासमवेत मोर्च्यामध्ये जाण्याचे त्यांनी का टाळले? 'सकल हिंदू बंधू-बंधू' हे कवितेत मांडणे सोपे असते. प्रत्यक्ष त्यापासून कोसो दूर होते. सावरकरांच्या तोंडदेखलेपणा उघड आहे. परंतु हा सत्याग्रह कोणासाठी थांबला नाही.

'काळाराम'चा सत्याग्रह हा भावनात्मक नव्हता आणि प्रतीकात्मकही नव्हता. तो मानवी हक्कांचा लढा होता. त्यासाठी अनेकांचे रक्त सांडले. अनेकांची घरे उजाड झाली. खरे तर अस्पृश्यांना नवे भान आणि नवा प्रत्यय देणारा हा लढा होता. सामाजिक आकांक्षा निर्माण करणारा लढा होता. अनेकांना तुरुंगात जावे लागले. अस्पृश्यांनी हा कारावास स्वेच्छेने स्वीकारला होता. लढ्यातूनच माणसांची आणि सामाजाची नवी मानसिकता निर्माण होते. यश-अपयश अशा वेळी महत्त्वाचे नसते. अस्पृश्यांना सरकारने काळाराम मंदिरात प्रवेश करुन देणे हा अस्पृश्यांचा पराभव नव्हता. तर तो हिंदू धर्मीयांचा, पुरोहितशाहीचा आणि पोथीनिष्ठांचा पराभव होता. सहिष्णुतेचा आणि ईश्वराच्या दृष्टीत सर्व समान आहेत ह्या पोकळ तत्त्वज्ञानाचा पराभव होता. दादासाहेब गायकवाडांचे मनोधैर्य, नीतीधैर्य आणि समग्र समाजाला संघर्षशीलता देणारी नैष्ठिकता उजळ होती. या आधारावरच पुढच्या अनेक चळवळी भक्कम होऊ शकल्या, यात शंका नाही.

१९५९ आणि १९६४ या वर्षांतील भूमीहीनांच्या सत्याग्रहाचे नेतृत्व कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी केले. १२ ऑगस्ट १९५९ रोजी त्यांनी लेकसभेत भूमिहीनांच्या सत्याग्रहासंबंधी तहकुबीची सूचना मांडून ह्या सत्याग्रहासंबंधी जोरदार समर्थन केले होते. बॅ. राजाभाऊ खोब्रागडे यांनीही राज्यसभेत दलितांच्या आर्थिक उन्नतीसाठी भूमिहीन दलितांना जमिनी

देण्याची मागणी केली होती. परंतु भूमीहीनांच्या सत्याग्रहाला धार चढली ती १९५४ मध्येच. ह्या सत्याग्रहाचे केंद्र मुख्यत्वे मराठवाडा होते. त्यावेळचे मराठवाड्याचे नेते भाऊसाहेब मोरे यांनी दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहाच्या यशस्वीतेसाठी परकाष्ठा केली होती. या अभूतपूर्व सत्याग्रहात ३ लाख ४० हजार सत्याग्रही सहभागी झाले होते. मराठवाड्यातील सर्व तुरुंग भरून गेले होते. सरकारला त्यांची व्यवस्था राखणे अशक्य झाले होते. म्हणून शाळा, धर्मशाळा येथेही सत्याग्रहींना ठेवण्यात आले. एवढा मोठा सत्याग्रह भारतात कधीही झाला नव्हता. महात्माजींच्या कोणत्याही सत्याग्रहात इतके स्त्री-पुरुष कधीही सामील झाले नव्हते. म्हणूनच दलितांच्या चळवळींच्या इतिहासात दादासाहेबांनी नेतृत्व केलेल्या भूमीहीनांच्या सत्याग्रहाला क्रांतीकारी महत्त्व आहे.

महाड, नाशिक आणि मराठवाड्यातील सत्याग्रहाने दलित चळवळींच्या विकासक्रमाला गती दिली हे जितके सत्य आहे, तितकेच दादासाहेब गायकवाडांचा सहभाग आणि नेतृत्व वर्धिष्णु होते हे मान्यच करावे लागते. ह्याव्यतिरिक्त दादासाहेबांनी, बाबासाहेब आंबेडकराच्या आदेशानुसार धर्मांतर आणि महार वतन बिलाच्या संदर्भात जनजागृती केली. संबंध देशभर सभा व संमेलने आयोजित करून लोकमने सिद्ध केली. हा चळवळीचाच महत्त्वाचा भाग होता. यातून समाज आणि कार्यकर्ते यांची जडणघडण होत होती. दादासाहेबांची समर्पण कृती, त्याग, निर्धार आणि झुंज देण्याची प्रवृत्ती त्यांच्या सर्व चळवळीतून निःसंदिग्धपणे प्रत्ययास येते. त्याचा निश्चितपणे काही कार्यकर्त्यांवर प्रभाव पडणे स्वाभाविक होते. दादासाहेबांच्या अवतीभवती अशी काही सर्वस्व झोकणारी माणसं होती. जी प्रामाणिक होती ती दादासाहेबांचा विचार आणि आंदोलने पुढे देऊ शकली. ज्यांना दादासाहेबांचे नेतृत्व मान्य नव्हते, ती माणसं कालोदरात गडप झाली.

चळवळ आणि विचार यात संगती असावी लागते. दलितांच्या आर्थिक, शैक्षणिक, सामाजिक आणि धार्मिक चळवळी ह्या कालबध्द नव्हत्या की प्रसांगिक. त्यामुळे चळवळींसाठी विचार आणि विचारातून चळवळी हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांचे सूत्र दादासाहेबांनी आत्मसात केले होते, ह्यात शंका नाही. अस्पृश्यांनी मृतमांस खाणे बंद केले पाहिजे. गावात भीक मागून शिळे व उष्टे अन्न घेऊ नये, मेलेली ढोरे ओढू नयेत ह्यासंबंधी ते गावागावांत सभातून विचार मांडत असत. स्वाभिमानाची शिकवण देत असत. १९३० च्या नाशिकच्या काळाराम मंदिर सत्याग्रहासंबंधीच्या जाहीर सभेत त्यांनी विचार मांडले.

"आपल्या लोकांचे दैनंदिन जीवन पशुवत आहे. कुत्र्यामांजरासारखे. आपली नुसती सावली सवर्णाच्या अंगावर पडली तर त्यांना विटाळ होतो. सार्वजनिक पाणवठा, विहिरी,तलाव या ठिकाणी आपला स्पर्श चालत नाही. वाण्याच्या दुकानाच्या फळीला शिवले तरी आपला विटाळ होतो. न्हाव्याने केस कापणे, परटाने आपले कपडे धुणे तर दूरच! दुरुनच मंदिराच्या पायरीवर डोके ठेवून तेथील माती कपाळाला लावून फक्त घेता येते. सार्वजनिक रस्त्यावरून आपल्याला लग्नाची मिरवणूक काढता येत नाही. असा हा रुढींचा पगडा! यातून आपल्याला वाट काढायची आहे. अंधारातून प्रकाशाकडे आपल्याला जावयाचे आहे. उच्च-नीच-जाती-जाती पद्धतीवर आधारलेली ही समाजरचना करायची आहे. रुढींच्या, परंपराच्या अंधाऱ्या साम्राज्यात घोर निद्रेत पडलेल्या आपल्या समाजाला जागृत करण्याच्या दृष्टीने हा मंदिर

प्रवेशाचा सत्याग्रह आयोजित केला आहे.

३) दादासाहेब गायकवाड : जीवन व कार्य :हरिभाऊ पगारे (पृ. १०८-९)

दलितांचे सर्वच सत्याग्रह अहिंसक आणि शस्त्रविहीन होते. याचा अर्थ हा नव्हे की, ती शरणागतता होती. सनदशीरपणे आपल्या हक्कांची मागणी करणे आणि त्यासाठी संघर्ष करणे ही त्यामागील सूत्रे होती. दास्यमुक्ती हा त्याचा कणा होता. जीर्ण समाजव्यवस्थेने सामाजिक असमतोल निर्माण केला, त्यामुळे त्याची जाणीव करुन देणे आणि नवे मानस घडविण्याचे दादासाहेबांना अपरिहार्य वाटले. अनेक सभांतून आपला हा विचार अप्रहितपणे मांडला. "दिवसेंदिवस भारतीय अस्पृश्यांचा प्रश्न न सुटता तो अधिकच चिघळत आहे.अस्पृश्यतेचे उच्चाटन करुन या वर्गाची परिस्थिती सुधारावयाची असेल तर अस्पृश्यांना सर्वच हिंदूंच्या दास्यातून मुक्त केले पाहिजे. त्यांच्यासाठी स्वतंत्र वसाहती स्थापून स्वतंत्र घरात त्यांना सुखाने जगू द्या. जेथे जेथे ते शेतीचा व्यवसाय स्वतंत्रपणे करतील व जेथे ते कुणाचेही गुलाम होणार नाहीत अशा ठिकाणी त्यांच्या स्वतंत्र वसाहती स्थापन करा." (संसदेत मांडलेले विचार - १९ मार्च १९५९)डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांनी साऊथबरो कमिशनपासून तो पुढेही अस्पृश्याच्या स्वतंत्र वसाहतीचा विचार पुन:पुन्हा मांडला होता. कर्मवीर दादासाहेबांनी ह्या विचारातील ऊर्जा घरोघर पोचविण्याचे कार्य केले. स्वतंत्र वसाहतीमुळे अस्पृश्यांच्या सर्वांगीण विकासाला गती प्राप्त होईल, असा त्यांना विश्वास वाटत होता. सरकारने अस्पृश्य, आदिवासी आणि इतर मागासलेल्या वर्गाची सुधारणी होण्यासाठी उद्योग आणि व्यापारासाठी काही सवलती द्याव्यात, त्यांना रेल्वे स्टेशनात वेगळाल्या जागी नेमावे, शासकीय खात्यांमध्ये अस्पृश्यांचे योग्य ते प्रमाण भरायला हवे असाही आग्रह ते धरीत.

शिक्षण हा जीवनाचा पाया आहे त्यामुळे अस्पृश्य विद्यार्थ्यांना सतर्क राहण्याची आणि कर्तव्यतत्परता राखण्याची निकड त्यांनी अनेकदा व्यक्त केली. १५ मे १९३७ मध्ये अमरावती येथे "बहिष्कृत विद्यार्थी परिषद" आयोजित करण्यात आली होती. त्यावेळी अध्यक्षपदावरून विचार व्यक्त करताना त्यांनी शिक्षण आणि समाज यांचा परस्परसंबंध कसा आहे ह्यावर प्रकाश टाकला होता. आजची शिक्षण पद्धती समाजाभिमुख नाही म्हणून शिक्षणाने समाजाचे आधारस्तंभ झाले पाहिजे आणि ह्याची सर्वाधिक जबाबदारी दलित/बहिष्कृत विद्यार्थ्यांवर आहे ह्याचे भान त्यांनी दलित विद्यार्थ्यांना दिले होते. शिक्षण आणि आरोग्य याचा संबंध नाकारता कामा नये, याचीही चेतावणी त्यांनी दिली होती. दादासाहेबांनी कोणत्याही महाविद्यालयात किंवा विश्वविद्यालयात प्रवेश घेतला नव्हता. परंतु समाजाच्या आणि राष्ट्राच्या उत्पादनाच्या दिशा त्यांना ज्ञात होत्या. म्हणूनच की काय त्यांनी शिक्षण आणि इतिहास यांच्या अन्योन्य संबंधांची अपरिहार्यता विशद केली होती. विद्यार्थ्यांने इतिहास वाचला पाहिजे, त्यांचे चिंतन केले पाहिजे, त्याशिवाय त्याला दास्याविरुद्ध बंड करता येणार नाही. अशी त्यांची धारणा होती. पुराणविचारसरणीचा बिमोड विद्यार्थी जीवनातच करता येतो, त्यावर त्यांचा विश्वास होतो. विद्यार्थीजीवन हे मूल्यनिर्माणाचे अधिष्ठान असल्याने समाजाभिमुख दृष्टिकोण हीच त्याची निष्पत्ती आहे, ह्यावर त्याचा भर होता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर ह्यांच्यासमवेत, दादासाहेबांनी दलितांच्या अनेक राजकीय सभात, अधिवेशनात विचार मांडले होते. काही वेळा बाबासाहेब अध्यक्ष तर दादासाहेब



डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सोबत बापूसाहेब राजभोज, शांताबाई दाणी, दादासाहेब गायकवाड आणि इतर.



दोन नेते : दादासाहेब गायकवाड व बापूसाहेब राजभोज



राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन, निलम संजीव रेड्डी, यशवंतराव चव्हाण आणि
दादासाहेब गायकवाड दिल्लीच्या बाबासाहेबांच्या पुतळयाच्या अनावरण प्रसंगी




युनिव्हर्सिटी विरोधी परिषदेत भाषण करताना दादासाहेब, खाली बसलेले बॅ. खोब्रागडे, आर. डी. भंडारे



दादासाहेब गायकवाड



दादासाहेब गायकवाड, यशवंतराव चव्हाण, बाळासाहेब देसाई, एन. एम. कांबळे, भैय्यासाहेब आंबेडकर



दादासाहेब गायकवाड



मनमाड बोर्डिंगच्या उद्घाटन प्रसंगी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, माईसाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड, पां. ना. राजभोज, पी. जे. रोहम, पी. टी. बोराळे



दादासाहेब गायकवाड यांना पद्मश्री देताना
राष्ट्रपती झाकिर हुसेन



भीमज्योतीची सांगता : चैत्यभूमीवर डावीकडून आचार्य अत्रे, यशवंतराव चव्हाण,
मुखमंत्री वसंतराव नाईक, दादासाहेब गायकवाड



मिलिंद कॉलेज, औरंगाबाद : पां. ना. राजभोज, पी. जे. रोहम, बाबासाहेब आंबेडकर, माईसाहेब आंबेडकर, प्रा. म. भि. चिटणीस, दादासाहेब गायकवाड



बापूराव गायकवाड (बडेदादा), डॉ. बाबासाहेब आंबेडकर व दादासाहेब गायकवाड नाशिकच्या कार्यकर्त्यांबरोबर



दादासाहेब गायकवाड, आप्पासाहेब गायकवाड, डॉ. बाबासाहेब आंबेडकर,
गणपत महादेव जाधव (मडकेबुवा) आणि इतर सहकारी



डॉ. आंबेडकर, पां. ना. राजभोज, दादासाहेब गायकवाड



दादासाहेब पत्नी गीताबाईसमवेत



दादासाहेब गायकवाड, बॅ. बी. डी. खोब्रागडे, भैय्यासाहेब आंबेडकर



दादासाहेब गायकवाड व बाबासाहेब आंबेडकर



इंदिरा गांधी व दादासाहेब गायकवाड, बाजूला भाऊसाहेब जगताप



एन. शिवराज, दादासाहेब गायकवाड, आवळे बाबूजी



आर. जी. खरात, आर. डी. भंडारे, दादासाहेब गायकवाड



डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड, पां. ना. राजभोज आणि सहकारी



डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दादासाहेब गायकवाड कार्यकर्त्यांसमवेत



डावीकडून डी. जी. जाधव, मुख्यमंत्री वसंतराव नाईक, भैय्यासाहेब आंबेडकर, हंसराज गजभिये, दादासाहेब गायकवाड यांच्या अमृत महोत्सव प्रसंगी



दादासाहेब गायकवाड, सरला उजगरे, एलिनॉर झिलिएट



१९६८ साली मुंबईत झालेल्या अ.भा. बौद्ध परिषदेत अध्यक्षपदावरून भाषण करताना भैय्यासाहेब आंबेडकर (डावीकडून बसलेले) लडाख धर्मगुरू खासदार कुशल बकुल, पू. दलाई लामा, दादासाहेब गायकवाड



किस्मतबाग नाशिक येथे दादासाहेबांची मुलाखत घेताना मधुकर शिंदे, रमेश शिंदे, हि. ल. अंकुश



दादासाहेब गायकवाड



भैय्यासाहेब आंबेडकर यांच्या ५०व्या वाढदिवस प्रसंगी डावीकडून, भैय्यासाहेब आंबेडकर, दयानंद बांदोडकर (मुख्यमंत्री, गोवा) दादासाहेब गायकवाड, दादासाहेब रूपवते



दादासाहेब गायकवाड



डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या पुतळ्याच्या प्रसंगी
उपराष्ट्रपती डॉ. झाकिर हुसेन यांच्याबरोबर दादासाहेब गायकवाड



ग्रामीण महाराष्ट्राचे दोन मानदंड : कर्मवीर दादासाहेब गायकवाड आणि क्रांतिसिंह नाना पाटील

वक्ते आणि काही वेळा दादासाहेब गायकवाड अध्यक्ष तर बाबासाहेब वक्ते राहत असत. कोणताही प्रसंग का असेना परंतु दादासाहेब आपले विचार निर्भयपणे आणि सूत्रबद्धतेने मांडत असत. आपल्याला १९४२ च्या अखिल भारतीय दलित वर्ग परिषदेचा संदर्भ देता येईल. स्वतंत्र मजूर पक्षानंतर बाबासाहेबांनी व्यापक अशी 'ऑल इंडिया शेड्युल्ड कास्ट फेडरेशन' या संघटनेची स्थापना नागपूर येथे केली होती. त्याचवेळी भरलेल्या परिषदेत दादासाहेबांनी तीन ठराव मांडले होते. वस्तुत: एकूण पाच ठराव होते. त्यातील तीन ठराव दादासाहेबांचे म्हणजे पक्षाच्या ध्येयधोरणासंबंधाने त्यांनी केलेली वैचारिक मांडणी अधिक मौलिक होती. हे तिन्ही ठराव म्हणजे दादासाहेबांच्या प्रगल्भ राजकीय चिंतनाचे अविष्कार होत.

भारताच्या घटनात्मक बदलासाठी ब्रिटिश सरकारने सर स्टॅफर्ड क्रिप्स यांच्या नेतृत्वाखाली भारतात एक समिती पाठविली होती. या समितीने दलित वर्गाच्या हिताचा एक शंताशानेही विचार केला नव्हता. ही योजना दलित वर्गाची विश्वासघात करणारी आहे, असा दादासाहेबांच्या एका ठरावाच्या आशय होता. तेव्हा सरकारला दलितांचे हित असेल तर काही योजना व प्रकल्प राबविणे गरजेचे आहे. अशी रोखठोक भूमिका त्यांनी दुसऱ्या ठरावात मांडली होती. क्रिप्स् समिती जे काही घटनात्मक बदल करणार असेल त्यात प्रांतिक सरकारच्या अंदाजपत्रकात दलितांच्या प्राथमिक शिक्षणासाठी रक्कम असावी, केंद्रीय तथा प्रांतिक कार्यकारी मंडळात दलितांचे कायद्याने प्रतिनिधित्व असावे, न्याय व पोलिस खात्यात तसेच सरकारी नोकऱ्यात प्रतिनिधी असावे, लोकसेवा आयोगावर दलितांची नियुक्ती व्हावी आणि दलितांना स्वतंत्र मतदार संघ प्राप्त व्हावा. या सर्व बाबी दलितांच्या कल्याणाच्या व हिताच्या असल्याने त्यांचा अंतर्भाव घटनेत असावा अशी ठरावाची मांडणी होती. गावोगाव भ्रमंती करुन दलितांची दु:खे, अवस्था आणि आर्थिक उपासमार दादासाहेबांनी अनुभविली होती. त्यांचे सर्वार्थाने शोषण होत होते. या सर्वांना वाचा फोडणारा विचार त्यांनी तिसऱ्या ठरावात व्यक्त केला. ग्रामपद्धतीत आमूलाग्र बदल झाला पाहिजे, अशी त्यांची मागणी होती. दलित सरकारने आर्थिक व सामाजिक संरक्षण दिले पाहिजे. त्याशिवाय सरकारच्या घोषणा वांझ ठरतील. दलितांना पदोपदी अन्यायाला सामोरे जावे लागते. अस्पृश्यतेमुळे त्यांचे सर्वच हक्क हिरावले जातात म्हणून त्याना कायद्याने जमिनी मिळाव्यात, आणि त्यांचे जीवन सुसह्य व्हावे म्हणून त्यांना स्वतंत्र वसाहत असाव्यात, असाही आग्रह त्यांनी केला होता. वस्तुत: बाबासाहेबांनीही स्वतंत्र वसाहतीचा मुद्दा वारंवार मांडला होता. अशा स्वतंत्र वसाहतीमुळे अस्पृश्यांना आर्थिक व सामाजिक संरक्षण मिळू शकेल, असा त्यांचा कयास होता. येथे एक बाब विशेषत्वाने लक्षात घ्यावी लागेल की, स्वतंत्र वसाहत म्हणजे स्वतंत्र दलितस्थानाची मागणी नव्हती. उलट मुस्लिमांची मागणी ही स्वतंत्र राष्ट्राची मागणी होती. हा सांस्कृतिक फरक आहे.

ही १९४२ ची अ.भा.दलित वर्ग परिषद जशी ऐतिहासिक ठरली, तशीच बाबासाहेब आणि दादासाहेब यांच्या विचारांनी दिशादर्शक ठरली. या परिषदेतील एका बाबीचा निर्देश करणे मौलिक ठरेल असे वाटते. आजवर सर्वत्र बाबासाहेबांच्या शिका, संघटित व्हा, आणि संघर्ष करा या त्रिसूत्रीचा उल्लेख आवर्जून केला जातो. आणि ह्या त्रिसूत्रीना आता सुभाषिताचे

सौष्ठव प्राप्त झाले आहे, पण वस्तुस्थिती काय आहे, १९४२च्या ह्या नागपूरच्या अधिवेशनाची समग्रवृत्तान्त आणि तपशील पाहू जाता असे लक्षात येते की, समारोपीय भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी त्रिसूत्री नाही तर पंचसूत्री सांगितली होती. पंचसूत्री अशी -

१. शिक्षित व्हा.

२. चळवळ करा.

३. संघटित व्हा.

४. आत्मविश्वास बाळगा.

५. कधीही धीर सोडू नका.

ह्या पाचही सूत्रांना अनन्यसाधारण महत्त्व आहे. तो दलितांच्या भवितव्याचा जाहीरनामा होय, असे म्हटले पाहिजे. परंतु आज फक्त तीनच सूत्रांचा विचार केला जातो आणि त्यानंतरच्या दोन सूत्रांचा समावेश केला जात नाही. ही पंचसूत्रे म्हणजे पंचशीलच होत. खरे तर तीन ऐवजी पाच सूत्रांचा सर्वत्र निर्देश करायला हवा व्हायला हवा.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे निर्वाण, त्यानंतर निर्माण झालेला रिपब्लिकन पक्ष, त्याची वसाहत, नंतर आहिस्ते आहिस्ते पक्षच मोडकळीला येणे; ह्या सर्वच घटना शोकदायी म्हणाव्या लागतात. विशेषत: पक्षाचे गटागटात रुपांतर झाल्यानंतर व्यक्तिकेंद्रीयता निर्माण होणे अपरिहार्य होते. परंतु कल्याणकारी नव्हते. तत्त्वापेक्षा भावनांचा खेळ वाढीला लागला आणि कधीही भरुन न येणारी केवळ पक्षाची नव्हे तर समग्र दलित समाजाची हानी झाली. बुरूज ढासळू लागले विघटनांचा प्रकर्ष झाला. बाबासाहेबांनी मोठ्या परिश्रमाने बांधलेला पक्षाचा आणि समाजाचा किल्ला, होता की नव्हता असे झाले. परस्पर उणीदुणी, खोटा तांत्रिक मुलामा यात शक्ती पणाला लावण्याची परकाष्ठा झाली. त्यामुळे विरोधी शक्तिशी संघर्ष करणे, एकसंधपणे दलितांचे प्रश्न वेशीला टांगणे दुरापास्त झाले. ही एक शोकांतिकाच. बाबासाहेबांनंतर एन.शिवराज, दादासाहेब गायकवाड यांचे नेतृत्व आले पण शकले बुजू शकली नाहीत. एन.शिवराज यांच्या निर्वाणानंतर दादासाहेबांनी धुरा सांभाळली हे खरे असले तरी पक्षातील वकील मंडळींनी त्यांना पुरेसा वाव दिला नाही. वाद निर्माण केले. पण अशाही वेळी, दादासाहेब राजकीय आघाड्यांवर ठामपणे उभे राहिले. विविध पक्षांशी युती करून रिपब्लिकन पक्षाचे अधिकाधिक उमेदवार निवडून आले पाहिजे, असे त्यांचे प्रयत्न होते. परंतु १९५७ हे वर्ष सोडले तर नंतर त्यात फारशे यश आले नाही. याचे कारण नेतृत्वाची दुसरी भक्कम फळी निर्माण होऊ शकली नाही. हेही आहे, ही फळी तात्त्विक पायावर आणि संघटनेचे मूलभूत सूत्र घेऊन उभी रहायला हवी होती. पक्ष बांधणीस तो एक आधार असतो. दादासाहेबांना त्या काळात पक्ष एकसंघ राखता आला नाही, हे खरे असले तरी अन्य नेत्यांच्या राजकीय महत्त्वांकाक्षामुळे त्यांना अनेकदा हात टेकावे लागले हेही खरे आहे. त्यांच्या उत्तराधातील त्यांच्या विकलांगतेचा नाहक लाभ अनेक स्वनामधन्य दलित राजकारण्यांनी घेतला हे नाकारता येत नाही. ज्यांनी त्यांचा उपहास केला त्यांना त्याच शैलीत दादासाहेबांनी उत्तर दिले. विचार व्यक्त करण्याची आणि विरोधकांना सडेतोड जबाब देण्याचा त्यांचा खुमासदारपणा प्रयत्याला येतो. "मी अडाणी आहे. मजजवळ डिग्री नाही. मी धोतऱ्या असं 'दुरुस्त'वाले म्हणतात. ते सगळं अगदी खरं आहे. मलाही कबूल आहे.

पण मला जे 'धोतऱ्या' म्हणतात. त्यांना मी असा प्रश्न विचारू इच्छितो की, ठीक आहे. आहे मी धोतऱ्या. पण अहो, मला धोतऱ्या म्हणणारे तुम्ही... तुमचा जन्म धोतरातूनच झाला आहे ना!'' (भारतीय रिपब्लिकन पक्षः संपादकः राजकुमार लिंबाळे (पृ.५७)

विधानसभेत, संसदेत आणि राज्यसभेत कर्मवीर दादासाहेबांनी कुटुंबनियोजन ग्रामपंचायती, कामगार परचक्र, बौद्धांना राजकीय सवलती, दलित व बौद्धांना लघुउद्योगासाठी सहकार्य, महार वतन बिल, इ. प्रश्नावर अभ्यासपूर्ण विचार मांडले. अतिशय प्रभावी वर्क्तृत्व आणि वैचारिक समतोल, त्यांनी मांडलेल्या विचारातून प्रतीत होतो. लोकप्रबोधक आणि लोकशाही अशी त्यांची भूमिका सातत्याने जाणवते.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड ह्यांची संबंध हयात चळवळी उभारण्यात आणि चळवळींचे नेतृत्व करण्यात आणि आंबेडकरी विचार लोकांपर्यंत पोहचविण्यात गेली. आपल्या ध्येयावर अविचल निष्ठा, आत्मविश्वास आणि लोकजागरणाचा ध्यास बाळगणाऱ्या दादासाहेबांचे कर्तृत्व अजोड आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा विश्वास त्यांनी संपादन केला होता. अनेक पक्षीय प्रश्नांच्या संदर्भात बाबासाहेब त्यांच्याशी विचारविनिमय करीत असत आणि त्यांच्यावर काही जबाबदाऱ्याही टाकत असत. अशा या विश्वास सहकार्याबद्दल बाबासाहेबांनी १४ एप्रिल १९३७ साली येवला येथे झालेल्या जाहीर सभेत उद्गारे व्यक्त केले होते.

''काळाराम सत्याग्रहाच्या वेळी माझा भाऊराव गायकवाड प्रत्येक कसोटीवर शंभरी नंबरी सोन्यासारखा उतरला आहे. हे सोने अतिशय शुद्ध आहे. सर्व प्रकारच्या आगीतून ते तावून सुलाखून निघून ते जसेच्यातसे शुध्द राहिले आहे. तेव्हा तुमचा खरा नेता हाच आहे. हाच माझा उजवा हात आहे. त्याने सार्वजनिक कार्य, तुमची उन्नती, तुमची प्रगती हेच स्वतःच्या जीवनाचे ध्येय मानले आहे.त्याला अन्य जीवन नाही.''

*(दादासाहेब गायकवाड : जीवन व कार्य : हरिभाऊ पगारे पृ. १७०)*

# पेरुमल समितीचा अहवाल व दादासाहेबांचे योगदान

डॉ. प्रल्हाद जोगदंड

Central Advisory Board for Harijan Welfareच्या सूचनेवरुन भारत सरकारच्या सामाजिक सुरक्षा विभागाने (Social Security Department) १९६५ला 'The Committee on untouchability, Economic and Educational Development of the Scheduled caste' ही कमिटी नेमली होती. या कमिटीचे अध्यक्ष इल्लाए पेरुमल होतं म्हणून या कमिटीस 'पेरुमल कमिटी' असे संबोधण्यात आले. श्री. बी. के. गायकवाड (दादासाहेब गायकवाड) श्री. सी. दास, श्री. आर अच्छुतन, श्री. पी. एल. मुजुमदार, श्री. नारायण दीन व श्री. व्ही. व्ही. वझे (विशेष कार्यकारी अधिकारी, विधी मंत्रालय) हे सभासद होते. श्री. एस. एम. सिद्दया डिसेंबर १०, १९६५सामाजिक समतेसाठी झालेल्या चळवळी : एक अवलोकनला सभासद म्हणून रूजू झाले. या कमिटीच्या उप-अध्यक्ष पदी (Chairman) म्हणून दादासाहेब गायकवाडांची सर्वानुमते नेमणूक झाली. नंतर पी. एल. मुजुमदार यांचे निधन झाल्याने श्री. जीवनलाल जयराम दास सभासद झाले. अस्पृश्यता व इतर प्रश्नांचे गांभीर्य बघून पेरुमल कमिटीने विविध राज्यातून व केंद्रशासित प्रदेशातून ३० नामांकित लोकांना 'स्वीकृत सभासद' करून घेतले. महाराष्ट्रातून श्री. आर. आर. टोंगा ओंकार, श्री. एच. टी. सोनावणे (खासदार) व श्री. एन. एस. काजरोळकर यांना सभासद म्हणून स्वीकृत केले. या कमिटीची पहिली बैठक ५ मे १९६५ रोजी पार पडली. ३० जानेवारी १९६९ला पेरुमल कमिटीने त्यावेळचे कायदा व समाजकल्याण मंत्री श्री. पी. गोविंद मेनन यांना अहवाल सादर केला आणि पार्लमेंटमध्ये चर्चेला ठेवावा अशी विनंती केली.

या कमिटीने केलेले सर्वेक्षण, काढलेले निष्कर्ष व सरकारला केलेल्या सूचना आणि कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी दिलेले बहुमूल्य योगदान काय होते हे आपण बघू.

१. अस्पृश्यतेच्या विविध बाजूंचा अनुभवजन्य सर्वेक्षण करून ती नष्ट करण्यासाठी ठोस सूचना करणे आणि अस्पृश्यता निवारण कायद्याची (१९५५) कार्यशैली तपासणे. तसेच अस्पृश्यांना मंदिरात व इतर सामुदायिक ठिकाणी प्रवेश आहे का? हे पाहणे.

२. अनुसूचित जातींच्या आर्थिक उत्थानांसाठी शासनाने राबविलेल्या कार्यक्रमांची पाहणी करून उपाय सुचविणे.

३. अनुसूचित जातींच्या शैक्षणिक प्रश्नांचा सखोल अभ्यास करुन शैक्षणिक विकासासाठी शासनाला सूचना करणे.

ही होती पेरुमल कमिटीची Terms of reference! पहिल्याच बैठकीत अनुसूचित जातींचे सरकारी नोकऱ्यातले आरक्षण परिणामकारक भरले, तरच मागासवर्गीयांचा विकास होईल अशा प्रकारची आग्रही भूमिका मांडली व Terms of referenceमध्ये ह्या बाबींचा उल्लेख केला. ६ महिन्यात पेरुमल समितीने अहवाल सादर करावा, असे सुरुवातीला ठरले होते. पण प्रश्नांचे गांभीर्य बघून व उपलब्ध कर्मचारी वर्ग आणि साधन सामुग्री पाहता ठरलेल्या कालावधीत अहवाल सादर होऊ शकला नाही. डिसेंबर १०,१९६६ ला अंतरिम अहवाल सादर केला.

अहवाल ५ भागांमध्ये आहे. १. अस्पृश्यता, २. शिक्षण, ३. आर्थिक परिस्थिती, ४. अनु. जातींसाठी उपलब्ध असलेला नोकऱ्या ५ अनु. जाती व अनु. जमाती आयोगाची काम करण्याची शैली.

जुलै १९६५ ला या समितीने विस्तृत प्रश्नावली तयार करून प्राथमिक संस्था व व्यक्तींकडून भरून घेतल्या. प्रश्नावली सर्व प्रादेशिक भाषेत भाषांतरीत करून योग्य व अचूक माहिती मिळवली. संकलन केलेल्या माहितीच्या आधारे निष्कर्ष काढले. जागच्याजागी अस्पृश्यता प्रश्नाचे स्वरूप बघण्यासाठी, कमिटीने कांही ठराविक राज्यांचा व केंद्रशासित प्रदेशांचा दौरा केला. दौऱ्यात सभासदांना आलेले अनुभव थक्क करणारे आहेत. दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली पेरुमल कमिटी पुणे, जळगाव नासिक, मुंबई, औरंगाबाद उस्मानाबाद व नागपूर व अमरावती जिल्हयांत आली होती. वरील जिल्ह्यांच्या दौऱ्यात ग्रामीण व शहरी पातळीवर अस्पृश्यता पाळली जाते का? याची चिकित्सा करून वरील दोन्ही पातळ्यांवर अस्पृश्यता वेगवेगळ्या प्रकारात पाळली जाते, असे कमिटींला समजले. ग्रामीण व शहरी भागात रसिकांना प्रदेशांचे गांभीर्य पाहून या कमिटीने प्रमुख खासदार, आमदार, अनु. जाती व अनु. जमाती आयोगाचे अध्यक्ष, स्वयंसेवी संघटनाचे कार्यकर्ते, समाजकल्याण खात्याचे अधिकारी व अन्य कर्मचारी आणि दलित वस्तीतील रहिवासी यांच्या भेटी घेतल्या वस्तीतील यावरून या कमिटीने अनु. जातीच्या बहुआयामी प्रश्नांचा सूक्ष्म अभ्यास करुन - सिद्धांत व अनुभवाच्या पातळीहून - सरकारला ठोस सूचना दिल्या आहेत, हे ध्यानात येते. सूचनांची कडक अंमलबजावणी केल्यास भारतीय समाजातून अस्पृश्यता पूर्णपे नष्ट होईल व दलितांना मानवी मूल्यांचे दर्शन होईल. अशी भूमिका मांडली.

माहिती संकलन करतेवेळी कमिटीला आलेल्या बऱ्या-वाईट गोष्टींचे अनुभव शब्दबद्ध केले आहेत. समाज कल्याण विभागाने फार अल्प प्रतिसाद दिला, या विषयी कमिटीने आश्चर्यच व्यक्त केले आहे. समाजकल्याण विभागचे अधिकारी कमिटीच्या कार्यात नेहमी हस्तक्षेप करीत असत. मात्र खालच्या स्तरातील कर्मचारी सहकार्य करीत असत. म्हणून त्यांचे खास आभार या कमिटीने मानले आहेत. जो विभाग दलितांच्या कल्याणासाठी निर्माण केला त्याची उदासीनता बघून कमिटीने नाराजी व्यक्त गेली आहे.

कमिटीचे अध्यक्ष इल्लाएपेरुमल अधून-मधून आजारी असत म्हणून सर्व जबाबदारी उप-अध्यक्ष म्हणून दादासाहेबांवर येऊन पडली. दादासाहेबांनी रात्री दोन-दोन वाजेपर्यंत जागून अधिकाऱ्यांना श्रुतिलेखन (dictation) देत असत, अशी माहिती लेख लिहित असताना समजली. लोकसेवा आयोगाचे माजी अध्यक्ष एम. एल. शहारे यांनी ही आठवण कार्यकर्त्यांना सांगितली आहे, असा संदर्भ आहे.

यावरून हा अहवाल तयार करण्यात दादासाहेबांच्या सिहांचा वाटा आहे असे ठळक स्वरुपात दिसते.

या अहवालाच्या पहिल्या भागात 'अस्पृश्यता' या समस्येबाबत चर्चा आहे. अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी केलेले कायदे, अस्पृश्यतेचे विविध प्रकार, अस्पृश्यता हद्दपार करण्यासाठी अशासकीय व शासकीय संघटनांनी केलेले प्रयत्न व १९५५ च्या कायद्याची कार्यशैली या विषयाची प्रदीर्घ माहिती आहे. अस्पृश्यतेला धार्मिक व राजकीय आधार असून ती जातीव्यवस्थेशी आणि सामाजिक संरचनेशी निगडीत आहे. ती नष्ट करण्यासाठी सामाजिक संरचना जमीनदोस्त करुन नवीन मूल्ये निर्माण करावी लागतील असे प्रतिपादन केले. त्याचबरोबर भारतीयांची मानसिकता बदलणे गरजेचे आहे असे निदर्शनास आणून दिले. अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी सामजिक संरचना जमीनदोस्त करुन नवीन मूल्ये निर्माण करावे लागतील असे प्रतिपादन केले. अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी भारतीयांचे पुर्नसामाजीकरण करणे अत्यावशक आहे असी नोंद कमिटीने केली आहे.

१९५५ सालचा कायदा पारीत करण्यापूर्वी अस्पृश्यतेचे उच्चाटन करण्यासाठी १५ राज्यांनी कायदे केले होते. महाराष्ट्रात The Bombay Harijan (Removal of civil Disabilities) Act, 1947. कायदे अस्तित्वात होते. या सर्व कायद्यांची धार बोथट असल्यामुळे अस्पृश्यतेचा प्रश्न निकालात निघाला नाही. म्हणून भारत सरकारने स्वातंत्र्यानंतर १९५५ला Untouchability Offence Act पास करुन कायद्याने अस्पृश्यता नष्ट झाली असे प्रतिपादन केले. त्याचबरोबर घटनेतील १७ व्या कलमानूसार अस्पृश्यता संपुष्टात आली व जो कोणी अस्पृश्यता पाळील त्यास सक्त दंडाची शिक्षा देण्याची व्यवस्था केली गेली.

तथापि, अस्पृश्यता निरनिराळ्या प्रकारात कशी पाळली जाते याचे विवेचन या अहवालात दिले आहे. उदा: गावाने अस्पृश्यांवर टाकलेला बहिष्कार, हॉटेलात, सामुदायिक पाणवठ्यावर व मंदिरात अस्पृश्यांना केलेल्या मज्जाव, न्हावी व धोबी सेवा बंदी इ.

अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी अशासकीय संघटनांनी केलेल्या कार्यांची नोंद घेतली आहे. त्याच बरोबर केंद्र शासनाची व राज्य सरकारांची ही प्रथा नष्ट करण्यासाठी नैतिक जबाबदारी आहे, असे स्पष्ट शब्दात सांगितले आहे.

या कमिटीने पंचायती राज्य संस्थांची अस्पृश्यता प्रश्नासंबंधीची भूमिका तीन पातळ्यावरून बंघण्याचा प्रयत्न केला आहे.

१. सर्व राज्यात पंचायती राज्य संस्थेने स्थानिक स्तरावर मागासवर्गीयांना पुरेसे प्रतिनिधित्व दिले जाते की नाही?
२. अनुसूचित जातींच्या कल्याणासाठी उप-समित्या कार्यरत आहेत का?
३. पारित केलेल्या कायदेशीर तरतुदी पंचायती राज्य संस्था राबवितात का?

वरील तीन स्तरावरील अंमलबजावणी गांभीर्यपूर्वक होत नसल्याने पेरुमल कमिटीने खंत व्यक्त केली आहे.

अनु. जातीच्या रोजगार विषयीच्या आकृतिकंधाची (Pattern) माहिती दिली आहे. अनु. जातींचे विविध रोजगार क्षेत्रात शेकडा प्रमाण किती आहे याची पाहणी केली व याही आधाडीवरील चित्र किती चिंताजनक आहे हे निदर्शनास आणून दिले. अनु. जातीचे कामगार हे शेतमजूर व इतर गलिच्छ व्यवसायात मोठ्या प्रमाणात असून, त्यांच्या कल्याणासाठी त्यांना या व्यवसायातून काढून विणकाम, कुटीर उद्योग, बास्केट बनविणे, लोहार, सुतार गवंडी व डाळमीलमजूर इत्यादी व्यवसायात आणणे महत्त्वाचे आहे, अशी व्यवहार्य सूचना अहवालात दिली आहे.

दादासाहेबांनी १९६४ ला भूमिहीनांना जमीन दिली पाहिजे, त्यासाठी संघर्ष करणे हे वादातीत आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरानंतर दलितांच्या मूळ प्रश्नाला हात घालून त्यासाठी प्रचंड सत्याग्रह केला. दलित भूमिहीनांच्या सत्याग्रहामध्ये लाखो लोक तुरुंगात गेल्याची नोंद आहे. 'कसेल त्याची जमीन पण नसेल त्याचे काय? असा रोकडा सवाल दादासाहेबांनी शासनास विचारला होता. त्यांनी अनु. जातीच्या सक्षमीकरण्यासाठी जमीनीचे पट्टे देण्यात यावेत अशी आग्रही भूमिका लावून धरली. दादासाहेबांच्या या दूरदृष्टीचे प्रतिबिंब पेरुमल कमिटीच्या अहवालात दिसून येते. दलित भूमिहीनांना जमिनीचे पट्टे वाटप करण्यासाठी तीन मार्ग असू शकतात असे ठणकावून सांगितले.

१. पडीक जमीन लागवडीस योग्य करणे.
२. कमाल जमीन कायदा पारीत करुन अतिरिक्त जमीन उपलब्ध करणे
३. भूदान, ग्रामदान चळवळीतून जमीन मिळविणे. भूमिहीनांच्या सत्याग्रहाच्या रेट्यामुळे १८ राज्यात, ऑगस्ट १९६५ पर्यंत ३९,१६,६७६ एकर जमीनीचे पट्टे मागासवर्गीयांना वाटप केले गेले, अशी नोंद अहवालात आहे. (पा. नं. ११७) जमीन वाटपानंतर लगेच जमीन कसण्यासाटी लागणारे साहित्य खरेदीसाठी पैसे देणे, लागवडीस योग्य असलेली किमान ५ एकर जमीन एका कुटुंबात देण्यात यावी, तसेच वाटपानंतर जमीनसंबंधीत व्यक्तीला नांवावर कायमस्वरुपी करण्यात यावी, वनखात्याच्या जमिनी वापरण्यास योग्य करुन त्या अनु. जातीच्या लोकांना वाटप करव्या. जेणे करुन अन्नाची दुर्मिळता व काही प्रमाणात बेकारीचा प्रश्न सुटण्यास मदत होईल, जमीन पट्टेधारकास शासनाने 'शेती साह्यता' द्यावी या इतर महत्त्वाचा सूचना कमिटीने केला आहेत.

शेत मजुरासाठी मजूर सहकारी संस्था, वृद्धांसाठी पेन्शन, पब्लिक सेक्टरमध्ये ५०% काम भूमिहीन शेतमजुंराना राखून ठेवावे, त्यांना शासनाने घरकुलं द्यावी, साफसफाई करणाऱ्या मजुरांना घरे बांधून द्यावीत. जेणेकरून त्यांच्या गतिशीलतेस हातभार लागेल. हेच उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून तिसऱ्या पंचवार्षिक, योजनेत ३२० लाख रुपयांचे प्रयोजन केले गेले आणि त्यापैकी या योजनेवर २२८.७९ लाख रु. खर्च केले गेले.

शिक्षण हा माणसाच्या सर्वांगीण विकासाचा महत्त्वाचा घटक आहे. म्हणून अनु. जातींचा सर्वांगीण विकास करण्यासाठी, त्यांचा शैक्षणिक मागासलेपणाचा विचार विनिमय करुन

ठोस सूचना कमिटीने केल्या आहेत. कमालीचे दारीद्र्य व शैक्षणिक सुविधांची उपलब्धता नसल्यामुळे ही मंडळी मागासलेली आहेत. तेव्हा त्यांच्या शैक्षणिक प्रगतीसाठी प्राथमिक शिक्षणावर शासनाने लक्ष केंद्रीत केले पाहिजे. प्राथमिक स्तरावरील मुलं व मुली यांची गळती थांबविण्यासाठी कमिटीने अनेक उपाय सुचविले आहेत. उदा. : दुपारचे जेवण मोफत देणे, पुस्तकं व लेखन सामग्रीचे मोफत वाटप, विद्यार्थ्यांना मिळणारी शिष्यवृत्ती वेळेवर द्यावी, वसतिगृह बांधणे, प्रशिक्षित शिक्षकांची नियुक्ती करणे, तांत्रिक व वैद्यकीय शिक्षणात सवलत देण्यात यावी. समुद्रापार (Over Seas) शिष्यवृत्ती देणे, सैनिकी शाळा व आश्रमशाळेत मुलांना सवलती देणे, मुलींच्या शिक्षणावर भर देऊन वसतिगृह बांधून त्यांना व्यवसायाभिमुख शिक्षण देण्यात यावे.

भारतीय समाजात समानता आणण्यासाठी व लोकशाही व्यवस्थेच्या यशासाठी स्त्रीयांना शिक्षण देणे मोलाचे आहे, असा उल्लेख झाला आहे.

पेरुमल कमिटीच्या अहवालाच्या ४ थ्या भागात अनु.जातीच्या व्यक्तींचे केंद्रशासनाच्या नोकऱ्यातील प्रतिनिधीत्व किती आहे, याची तपशीलवार माहिती आहे. मागासवर्गीयांची नोकऱ्यांत भरती कधी करावी, बढती, वयाची अट, आरक्षित जागांचा अनुशेष पुढे कसा ओढावा, राखीव पद खुले करण्याविषयीचे नियम आणि वर्ग १ व वर्ग २ संवर्गातील अनुशेष तात्काळ भरण्याविषयी पाळावयाची तत्परता, रेल्वे, भारतीय परराष्ट्र सेवेत (I.F.S), लोकसेवा आयोगाने राखीव जागा कशा भराव्या याचा आराखडा, सुरक्षा-सेवांमध्ये वाटा, या संबंधी व्यवहार्य सूचना मांडला आहेत.

केंद्रसरकार व राज्यसरकारंच्या नोकऱ्यात राखीव जागा परिणामकारक भरण्यासाठी 'Central Executive Authority' ची स्थापना करावी. असी भूमिका लावून धरली. नोकऱ्यामधील आरक्षण करण्या संदर्भात राज्यांनी टाकलेले पाऊल असमाधनकारक आहे, असे कमिटीचे मत आहे. न्यायालयात (उच्च व जिल्हा सत्र न्यायालय) मागासवर्गीयांची भरती करावी, स्थानिक संस्थांमध्ये नोकऱ्या व खादी व ग्रामउद्योगात राखीव जागा भरण्यासाठी Recrutment Board राज्यपातळीवर निर्माण करावे व त्यामार्फत राखीव पदे भरण्यात यावी. राज्याच्या निरनिराळ्या विभागांनी नोकर भरती करण्याविषयीची माहिती, उमेदवाराची पात्रता व नोकरी विषयी अन्य तपशील बोर्डाकडे द्यावा. मागासवर्गीय उमेदवार तयार करण्यासाठी बोर्डाने वेळोवेळी परीक्षा घ्यावी व त्यांच्यासाठी शिकवणी वर्ग काढावे. पात्र उमेदवारांची यादी तयार ठेवून ती जागा निघताच, राज्याच्या विविध विभागास उमेदवार उपलब्ध करून द्यावेत. माहिती संकलीत करुन राखीव जागांची तपशील दिला आहे. Central Executive Authority व Recrutment Board ची कार्यकक्षा वाढवून राखीव जागांचे धोरणांची सुलभ पद्धतीने अंमलबजावणी करावी; असा मोलाचा सल्ला कमिटीने दिला आहे. पेरुमल कमिटीने अधोरेखित केलेल्या सूचना बघितल्यास मागासवर्गीयांच्यात सामाजिक गतिशीलता आणण्यासाठी भारतीय नोकरशाहीला व विकासाचे धोरण ठरविण्यांना 'कृती कार्यक्रम' (Action Plan) दिला आहे, असेच लक्षात येते.

नोव्हेंबर १९५० साली घटनेतील ३३८ कलमान्वये भारत सरकारने अनु. जाती व अनु.जमाती आयोग स्थापन केला आहे. या आयोगाची पुनर्बांधणी करून त्याची कार्यकक्षा

व यंत्रणा सक्षम करून पूर्ण देशात त्याचे जाळे पसरावे, जागच्या जागी चौकशी करण्यासाठी व लोकांच्या तक्रारीची नोंद करण्यासाठी स्थानिक पातळीवर आयोगाची यंत्रणा निर्माण करणे अत्यावश्यक आहे. हा आयोग शोभेची वस्तू न राहता आयोगाला विशेष अधिकार, जबाबदारी आणि कृती करण्यासाठी कायदेशीर अधिकार निश्चित ठरवून दिले पाहिजेत असे ठरवून दिले पाहिजे असे ठासून सांगितले आहे.

थोडक्यात, आपल्या समाजातून अस्पृश्यता नष्ट केल्याशिवाय समानता, न्यायावर व आधारलेला समाज निर्माण करणे अशक्य आहे, त्याचबरोबर लोकशाहीच्या वाढीसाठी न्यायावर आधारलेला समाज निर्माण करणे, हे भारतीयाचे काम आहे असा अर्थ ध्वनित होतो.

मागासांच्या कल्याणासाठी उपलब्ध असलेली धोरणे प्रामाणिकपणे राबविली जावीत असा आग्रह पेरुमल कमिटीने धरला आहे. जमीन वाटपासंबंधी दादासाहेब गायकवाडाची सुचविलेले उपाय तर लाख मोलाचे आहेत. खेड्यापाड्यांत जाऊन कमिटीने ग्रामीण-नागरी दलितांच्या व्यथा जाणून घेतल्या व त्यावर ठोस उपाय अहवालात सूचविले. एक नवीन दृष्टी (Vision) देणारा कृतिकार्यक्रम पेरुमल कमिटीने दिला आहे. कमिटीने सुचविलेले उपाय आजघडीलाही किती लागू होतात, ते ध्यानात येते. कमिटीच्या सर्व सभासदांचे व विशेषत: कर्मवीर दादासाहेब गायकवाडांचे शासनाने व मागासवर्गीयाने ऋण व्यक्त केले पाहिजे. दादासाहेबांच्या जन्मशताब्दी वर्षामध्ये त्यांच्या कार्याची दखल घेऊन त्यानुसार कार्यक्रम आखणे हितावह आहे. कमिटीच्या सर्व सभासदांना व विशेषत: दादासाहेबांना माझे कोटी कोटी प्रणाम.

# संसदेत दादासाहेब

**डॉ. वसंत पवार**

कर्मवीर दादासाहेब गायकवाड, १९५७ मध्ये झालेल्या लोकसभेच्या निवडणुकीत संयुक्त महाराष्ट्र समितीचे उमेदवार म्हणून नाशिक मतदारसंघातून लोकसभेवर निवडून गेले. १९५७ ते १९६२ या कालावधीत रिपब्लिकन पक्षाचे प्रतिनिधी म्हणून त्यांनी अनेक विषयांवर संसदेत आवाज उठविला. सत्ताधारी पक्षाच्या सदस्यांशी अगदी सभापतींपासून तर अनेकांपर्यंत, त्यांचे जनतेच्या प्रश्नावरुन खटके उडत. सर्व उपेक्षित व मागासवर्गीय नागरीकांवरील अत्याचार, त्यांचे शिक्षण व न्याय्य अधिकार आणि आरक्षणाच्या प्रश्नांवर त्यांनी सतत आवाज उठविला. कांद्याचा प्रश्न, सहकारातील अडचणी, कामगार चळवळ, नाशिक रोडच्या इंडिया सिक्युरिटी प्रेसचा संप आदी अनेक विषयांवर त्यांनी विविधांगी, अभ्यासपूर्ण चर्चा घडवून आणली आहे. पंडित जवाहरलाल नेहरू, पंडित गोविंद वल्लभ पंत यांसारख्या संसदपटूंचा सहवास त्यांना लाभला. विविध विषयांवरील चर्चेत त्यांनी भाग घेतला. अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या आयुक्तांनी सादर केलेल्या विविध अहवालांवर त्यांनी अभ्यासपूर्ण भाषणे केली. आरक्षण आणि त्यासाठीच्या लढाईत त्यांचे योगदान महत्त्वपूर्ण आहे. मागासवर्गीयांच्या सवलती व आरक्षण हा विषय सामाजिक पाठिंब्याशिवाय कागदावरच कसा राहिला; त्याबाबत शासन व प्रशासनातही कशी उदासीनता आहे याविषयी आयुक्तांच्या अहवालावरच चर्चेत त्यांनी केलेले भाषण अभ्यासपूर्ण आहे. या अहवालाबाबत झालेल्या चर्चेचा काही भाग येथे देत आहोत.

**दादासाहेब गायकवाड :** आदरणीय सभापती महोदय, भारताच्या माननीय राष्ट्रपतींनी २६ नोव्हेंबर १९४९ ला राज्यघटनेचा स्वीकार केल्यावर यातील कलम ३३८ नुसार अनुसूचित जाती व अनुसूचित जमातींच्या हितांचे रक्षण करण्यासाठी १९५० मध्ये एका विशेष अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली. अनुसूचित जाती व जमातीच्या नागरिकांच्या हक्कांशी निगडीत सर्व घटनांची चौकशी करून त्याबाबत माननीय राष्ट्रपतींना त्याबाबत अहवाल सादर करणे हे या अधिकाऱ्यांचे काम आहे. राष्ट्रपती या प्रकरणांची शहानिशा करून संबंधितांना योग्य ते दिशादर्शन करू शकतील. त्याबाबतची कारणमीमांसा संसदेच्या दोन्ही सभागृहापुढे ठेवतील. म्हणून अनुसूचित जाती-जमाती आयुक्तांचा १९५७-१९५८ चा अहवाल विचारात घेतल्यावर याबाबत संबंधित अधिकाऱ्यांनी या घटकांच्या कोणत्या हितांचे रक्षण केले आहे. सरकारने त्यावर काय कारवाई केली आहे?

सर्वप्रथम मी राज्यघटनेच्या कलम १७ बाबत बोलू इच्छितो. या कलमात म्हटले आहे, 'अस्पृश्यता निर्मूलन करण्यात आले आहे. कोणत्याही स्वरूपात अस्पृश्यता पाळणे गुन्हा आहे. अस्पृश्यता पाळण्याची सक्ती करणे गुन्हा असून तो शिक्षेस पात्र असलेला गुन्हा आहे.'

शासनाने अस्पृश्यता निवारण विधेयक आणले आहे. हे अस्पृश्यता निर्मूलन कायदा विधेयक १९५५ मध्ये मंजूर झाले आहे. मग आता आपल्यापुढे प्रश्न आहे की, अस्पृश्यता नष्ट झाली आहे काय? आयुक्त त्यांच्या अहवालात म्हणतात, 'उपलब्ध माहितीनुसार मध्यप्रदेशात असे निदर्शनास आले आहे की, १९५५, १९५६ आणि १९५७ मध्ये या कायद्यान्वये अनुक्रम २७, ४२ आणि ३३ तक्रारी पुरेसा पुरावा नसल्याने दाखल करण्यात आल्या नाहीत. ही परिस्थिती असे सूचित करते की, अद्यापही लोक अशा प्रकरणांत पुरावे देण्यास पुढे येत नाहीत. या कालावधीतील बहुसंख्य प्रकरणांत प्रथमदर्शनी असे दिसते की, मागासवर्गीयांची अशी मानसिकता वाढत आहे की, अन्य समाजाबरोबरच शांततेने राहावे. आहे त्या परिस्थितीशी जमवून घ्यावे.'

माझ्या मते, आयुक्तांनी व्यक्त केलेले मत बरोबर नाही. ग्रामीण भागात मागासवर्गीय समाजाला हिंदूंच्या दयेवर सोडण्यात आले आहे. त्यांना पूर्णतः आणि मनापासून हिंदूंच्या मर्जीवरच अवलंबून राहावे लागते. ते स्वयंपूर्ण नाहीत. अडचणीच्या वेळी मागासवर्गीय समाजाला बहुसंख्याक हिंदूंच्या स्वाधीन होऊन त्यांच्या मताप्रमाणे वागावे लागते. त्यांनी बहुसंख्याक हिंदूंच्या मनाविरुद्ध काहीही केले तर त्यांचा छळ केला जातो. त्यांच्यावर बहिष्कार टाकला जातो. त्यांना मारही खावा लागतो.

या बहिष्काराबाबत अधिक खुलासेवार सांगण्यासाठी माझ्याकडे पुरेसा वेळ नाही. हा बहिष्कार म्हणजे मागासवर्गीयांना काहीही मिळू नये अशी व्यवस्था आहे. त्यांना जगणे अशक्य करणे, त्यांना गावात राहून त्यांची भाकरी याच बहुसंख्याक समाजाच्या चाकरीवर अवलंबून असते. अगदी त्यांना नैसर्गिक विधीला जायचे असले, तर त्यासाठी गावातील याच लोकांच्या जमिनीवर जावे लागते. माझी अशी माहिती आहे, की पंजाब राज्यात जवळजवळ दिल्लीत मागासवर्गीय समाजाला खुल्या मैदानांवर नैसर्गिक विधीसाठी जाण्यास मज्जाव करण्यात आला आहे. त्यामुळे त्यांनी आपल्या लहानशा झोपड्यांत शौच खड्डे खोदले आहेत. मी स्वतः ते पाहिले आहे. अनुसूचित जाती-जमातीसाठीच्या आयुक्तांनीही ते पाहिले आहेत. ही परिस्थिती आहे.

**एक सदस्य :** हे चुकीचे आहे.

**दुसरा सदस्य :** हे बरोबर आहे.

**सभापती :** शांत व्हा, आता आपण सदस्याचे ऐकून घेऊ.

**दादासाहेब गायकवाड :** मला याबाबत सरकारला एक प्रश्न विचारायचा आहे. सरकारचे कधी अनुसूचित जाती, अनुसूचित समातीच्या नागरिकांना स्वयंपूर्ण करण्यासाठी प्रयत्न केले आहेत? याबाबत माझे उत्तर 'नाही'. त्यांनी काही केले असेल तर त्यांनी स्पष्टीकरण करावे.

जेव्हा अनुसूचित जातीच्या नागरिकांनी लागवडीसाठी अनेक ठिकाणी शासकीय जमिनी

मागितल्या तेव्हा त्याला नकार देण्यात आला. जर त्यांना स्वत:चा व्यवसाय अथवा उद्योग सुरु करायचा असला तर जसे अनेक मान्यवर सदस्यांनी सांगितले त्याप्रमाणे, त्यांचे पूर्वज पूर्वी तो उद्योग, व्यवसाय करीत नव्हते, असे सांगून त्यांना परवाना दिला जात नाही. जसे काही व्यवसाय करणे आणि परवाना मिळवणे; काही लोक आणि समाजघटकांची मक्तेदारी झाली आहे. हे लगेचच थांबायला हवे. आम्ही तशी मागणी केली आहे. तसा प्रस्तावही केंद्रीय सल्लागार मंडळाकडे सादर करण्यात आला आहे. हा प्रश्न सुटण्यासाठी सगळ्यांनी लक्ष घालूनही किती कालावधी जाईल, हे सांगता येत नाही.

**एक सदस्य :** तो प्रस्ताव वाणिज्य मंत्रालयाने फेटाळला आहे.

**श्री. गायकवाड :** हे सुरूच आहे. आयुक्त आपल्या अहवालात पृष्ठ क्रमांक १५ वर म्हणतात. 'मध्यप्रदेश आदिवासी विकास संचालनालयाने राज्यातील गावांची एक यादी तयार केली आहे. त्यात ज्या गावांत अद्यापही अस्पृश्यता पाळली जाते त्या गावांचा समावेश आहे. राज्याच्या आठ जिल्ह्यांतील ३,२६० गावांचा त्यात समावेश आहे. ओरिसा राज्य सरकारने आठ जिल्ह्यांतील ८,६०६ गावांची यादी कळविली आहे. त्यांनी काही नावांचाही उल्लेख केला आहे. त्याचा उल्लेख करण्याची, ओरिसा राज्यातील अन्य जिल्ह्यातील माहिती अद्याप प्राप्त झालेली नाही.

महोदय, मध्यप्रदेशातील आठ जिल्ह्यांतील ३,२६० गावे आहेत, जिथे अस्पृश्यता पाळली जाते. ओरिसातील ८,६०६ गावांत जिथे अस्पृश्यता पाळली जाते त्या ठिकाणी या अहवालावर सरकारने काय कार्यवाही केली आहे. सरकारला घटना आणि त्यांनी मंजूर केलेल्या या कायद्याबाबत थोडीशीही सहानुभूती असेल, तर मग त्यांनी याबाबत काय केले? जर काही केले नसेल तर का केले नाही? जे अस्पृश्यता पाळतात त्या ग्रामस्थांवर सरकार खटले का दाखल करीत नाही?

मला माहिती आहे, की 'अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आयुक्तांचे हे कर्तव्य आहे, की त्यांनी याबाबत सरकारला माहिती द्यावयाची असते. मात्र सरकारलाच त्याबाबतची कारवाई करायची असते. मग याबाबत सरकारने काय कारवाई केली याबाबत मला जाणून घ्यायचे आहे. (गोंधळ...) ते काहीही कारवाई करणार नाहीत.'

आता मी विहिरींकडे वळतो. सार्वजनिक विहिरीतून पाणी भरण्यास परवानगी नसलेली एक घटना नाही; तर हजारो आणि हजारो घटना घडलेल्या आहेत. त्यांना सार्वजनिक विहिरींतून पाणी भरु दिले जात नाही. जेव्हा आम्ही त्याबाबत माहिती मागतो तेव्हा माहिती उपलब्ध नाही असे सांगितले जाते. आयुक्तांनी हे या अहवालात नमूद केले आहे. बिचारे आयुक्त तरी काय करतील? ते फार तर केंद्र सरकारला माहिती हवी असल्याबाबत राज्य सरकारला पत्र लिहू शकतात. जेव्हा त्यांना माहितीच उपलब्ध केली जात नाही, तेव्हा ते तरी काय करणार? याला सरकार जबाबदार आहे.

इथे एक गोष्ट मी नमूद केली पाहिजे, की केंद्रात आणि केरळचा अपवाद वगळता बहुसंख्य राज्यांत काँग्रेस पक्ष सत्तेवर आहे. म्हणूनच या संदर्भात एखादी माहिती मागविल्यावर ती देण्यास का नकार दिला जातो?

**श्री. एम. आर. कृष्णा** (करीमनगर राखीव मतदार संघ) : त्यांच्याकडे माहिती नाही.

**अन्य सदस्य :** त्यांना त्यात रस नसतो.

**श्री. गायकवाड :** माझ्या आदरणीय सहकाऱ्यांनी काहीही मते व्यक्त केली असली तरीही, सरकारकडे माहिती असते, मात्र त्यांना सादर करण्याचे धाडस होत नाही. जर ही माहिती सगळ्यांच्या पुढे आली, तर त्यांना हात जोडून क्षमायाचना करावी लागेल. कारण हजारो ठिकाणी अशा सार्वजनिक विहिरी आहेत, की ज्या मागासवर्गीयांना खुल्या नाहीत. नवीन विहीरी खोदण्यासाठी सरकारचे नवे धोरण असे आहे, की जर नवी सार्वजनीक विहीर खोदायची असेल तर ग्रामस्थांनी पन्नास टक्के वाटा उललला पाहिजे. जेव्हा असा प्रश्न उपस्थित होतो, तेव्हा गावातील बहुसंख्य हिंदू मंडळी म्हणतात, 'जर विहीर सगळ्यांसाठी खुली असेल तर आम्ही पन्नास टक्के वाटा का उचलावा. नैसर्गिकपणे गावातील हे लोक आपला पन्नास टक्के वाटा देत नाही आणि दलित लोक खूपच गरीब असल्याने ते पन्नास टक्के वाटा देण्याची त्यांची परिस्थितीच नसते. त्यामुळे असे दिसेल की, ग्रामीण भागात एकही विहीर बांधण्यात आलेली नाही. आपण येथे वातानुकूलित सभागृहात बसलो आहोत, मात्र खेड्यात गेलो तर दिसेल की, दलितांना सार्वजनिक विहिरींवर पाणी भरण्यासाठी तासन् तास वाट पहावी लागते. जर त्यांना कोणी पाणी दिले नाही तर त्यांना गटाराचे पाणी प्यावे लागेल. आदरणीय मंत्री महोदय, श्री. दातारसुद्धा हे समजून घेतील अशी अपेक्षा करुया. ते आमच्याबरोबर आले तर आम्ही त्यांना हे सर्व दाखवू.'

ज्या गावात सार्वजनिक विहिरी नाहीत, तेथे खाजगी विहिरी आहेत. हिंदू समाज त्यांची तहान या खाजगी विहिरींच्या पाण्यावर भागवू शकतो. दलित वगळता सगळे लोक या विहिरींवर जाऊन पाणी घेऊ शकतात. जर आम्ही सरकारकडे जाऊन ही व्यथा मांडली तर ते सांगतात ती खाजगी विहिर आहे. तुम्हाला खाजगी विहिरींवर पाणी भरण्यास परवानगी मिळणार नाही.

याबाबत माझी अशी विनंती आहे, की सरकारने याबाबत पुढे यावे आणि यावर परिणाम होऊ शकेल अशी घोषणा करावी की, पिण्याच्या पाण्यासाठी असलेली कोणतीही विहीर मग ती सार्वजनिक असो वा खाजगी; ती सगळ्यांसाठी खुली करण्यात येईल. एवढेच नव्हे तर माझा असा प्रस्ताव आहे, की दिल्लीत ज्याप्रमाणे झोपडपट्टी निर्मूलनासाठी पोलिसांचे खास पथक आहे, ते अनधिकृत झोपड्या पाडून त्या फेकून देतात. त्याप्रमाणे शासनाचे स्वतंत्र पोलिस पथक असावे. या पथकाने केवळ अशा सार्वजनिक विहिरींचा शोध घेऊन त्या अनुसूचित जातीच्या नागरिकांसाठी खुल्या झाल्या आहेत, की नाही हे पहावे. (गोंधळ...) आणि माझा प्रस्ताव आहे, की त्या पथकाचा प्रमुख अनुसूचित जातीतील असावा. तो याबाबत अधिक गांभीर्याने काम करील. इतर समाजाचे पोलिसही त्या पथकात असावेत, मात्र पथकाचा प्रमुख अनुसूचित जातीतीलच असावा, तो त्या समाजाच्या लोकांसाठी अधिक रस घेईल.

**श्री. सोनवणे (सोलापूर) :** त्या पथकाचे नियंत्रण गृह मंत्रालयाकडे का नसावे?

**श्री. गायकवाड :** मी कलम २३ आणि ४३कडे येतो. कलम २३ म्हणते, 'वेठबिगारी आणि भिकारी आणि अशा प्रकारची अन्य कामे प्रतिबंधित आहेत, याबाबत काही उल्लंघन होत असेल तर त्याबाबत कायद्यान्वये ते शिक्षेस पात्र आहेत.'

**कलम ४३ :**

'राज्यांनी याबाबत खबरदारी घ्यावी, की सर्व कामगार, शेतकरी, औद्योगिक अथवा अन्य कामगार यांना मिळणारे वेतन त्यांची कामाची परिस्थिती व जीवनमानाचा दर्जा उत्तम असावा. त्यांना सामाजिक, दैनंदिन सांस्कृतिक संधींचा आनंद घेता येईल आणि त्यासाठी राज्यांनी ग्रामीण वैयक्तिक व सहकारी तत्त्वावर कुटिरोद्योगांना प्रोत्साहन मिळेल असे वातावरण निर्माण करावे. त्याबाबत योग्य तो कायदा अथवा आर्थिक संघटना निर्माण करावी.'

घटनेत अशी तरतूद आहे. आता मी असे विचारू इच्छितो, की भिक्षा मागणे आणि वेठबिगारी याचे निर्मूलन झाले आहे. ते सबंध देशात सगळीकडे, कुठेही...

**एक सदस्य :** पंजाबमध्ये झालेले नाही.

**श्री. गायकवाड :** ते उत्तर प्रदेशातही आहे. तुम्ही देशाच्या कोणत्याही भागात जा आणि स्वत:च खात्री करा. खेड्यातील लोक, खेड्यातील बडी मंडळी आणि सरकारसुद्धा वेठबिगारीसाठी मजूर नेते. सरकार त्याबाबत काहीही कारवाई करीत नाही. गेल्या वेळी किमान वेतन कायद्यावर बोलताना, लोकांना चार ते पाच रुपये मजुरी देऊन महिनाभर काम करण्यास सांगितले जाते. हे वेगळे काही नसून वेठबिगारीच आहे. हे उत्तर प्रदेशात आणि अन्य सर्व राज्यात सुरु आहे... (गोंधळ...)

आपल्या देशातील लोकांना आणि विशेषत: दलितांना काम उपलब्ध केले जात नाही. पुरेसे वेतन दिले जात नाही. चांगले जीवनमान उपलब्ध केले जात नाही. याबाबत सरकार काय करणार आहे? घटनेने रोजगार उपलब्ध करण्याची, किमान वेतन आणि चांगले जीवनमान उपलब्ध करण्याची जबाबदारी निश्चित केली आहे. सरकार ते कधी करणार आहे?

घटनेच्या ४६ व्या कलमात स्पष्ट उल्लेख करण्यात आला आहे, की राज्यांनी सामाजिक संरक्षण, शैक्षणिक आणि समाजातल्या कमकुवत घटकांचे आर्थिक हितसंबंध आणि विशेषत: अनुसूचित जाती, अनुसूचित जमातींना सर्व प्रकारच्या अन्याय व अत्याचारापासून संरक्षण दिले पाहिजे. हे कलम प्रामुख्याने समाजातील कमकुवत घटकांसाठी आहे. लाखो अनुसूचित जातीच्या लोकांनी बौद्ध धर्म स्वीकारल्याने ते आता अनुसूचित जातीचे राहिले नाहीत. ते स्वत:ला तसे म्हणवून घेत नाहीत. परिच्छेद दहामधील दुसऱ्या भागाच्या अहवालात आयुक्तांनी; बौद्ध धर्म स्वीकारलेल्या अनुसूचित जातीच्या लोकांना राज्यांनी व केंद्रीय प्रशासनाने त्यांना दिलेल्या सवलतींचा उल्लेख करण्यात आला आहे. त्यात तुम्हाला असे आढळेल की, पंजाब वगळता अन्य राज्यांनी याबाबत काहीही केलेले नाही. माझी अशी सूचना आहे, की अनुसूचित जातीच्या लोकांनी बौद्ध धर्म स्वीकारला आहे, त्यांना देशातील दुर्बल घटक अशी मान्यता देऊन शासनाने त्यांना शैक्षणिक, अर्थसहाय्य, नोकऱ्यांतील आरक्षणाच्या; यापूर्वी अनुसूचित जातीच्या लोकांना मिळत असलेल्या सवलती घटनेत दुरुस्ती न करता सुरू ठेवाव्यात.

कलम ३३५मध्ये म्हटले आहे, की कार्यक्षम प्रशासनाबाबत राज्यांनी नेमणुका करताना अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमातीच्या नागरिकांचे नोकऱ्यांतील आरक्षणाचे प्रमाण अत्यंत कमी आहे. याबाबत आपली मते मांडलेल्या बहुतांशी मान्यवर सदस्यांनी यावर

प्रकाशझोत टाकला असून अनुसूचित जाती, अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचा वर्ग - १ आणि वर्ग - २ मधील नोकऱ्यांतील प्रमाण भरुन काढण्यासाठी काय कार्यवाही केली आहे हे मला विचारावयाचे आहे. जेव्हा सभागृहात याबाबतचा प्रश्न उपस्थित होतो तेव्हा शासन असा घोषा लावते की, सुयोग्य उमेदवार, या आरक्षित जागा भरण्यासाठी पुढे येत नाही. याबाबत सुयोग्यता हे जणू भारतातच नव्हे तर जगाचे आश्चर्य बनले आहे. शैक्षणिक पात्रता पूर्ण करणाऱ्या उमेदवारांबाबतही त्यांना अपात्र ठरविण्यात येते. मला माहीत असलेल्या एक दोन घटना मी सांगू इच्छितो. माझे काँग्रेसचे मित्र त्यात सहानुभूतीने लक्ष देतील, अशी आशा करतो.

'काँग्रेसचे माजी अध्यक्ष श्री. ढेबर सौराष्ट्राचे मुख्यमंत्री असताना अनुसूचित जाती, अनुसूचित जमातीसाठी आरक्षण भरण्यात आलेले नाही. त्यांनी जेव्हा सचिवांना ती पदे भरण्याच्या सूचना दिल्या तेव्हा सचिवांनी त्यांना सांगितले, की ही पदे भरण्यास अनुसूचित जाती व जमातीचे योग्य उमेदवार उपलब्ध होत नाहीत. तेव्हा आम्ही अंदाजपत्रक समितीत चर्चा करीत होतो तेव्हा आम्हाला हे सांगण्यात आले. श्री. ढेबर यांनी सचिवांना असे सांगितले, की जोपर्यंत अनुसूचित जाती, अनुसूचित जमातीचे उमेदवार मिळत नाहीत, तोपर्यंत ही पदे भरण्यात येऊ नयेत. या आदेशाने काय चमत्कार झाला माहीत आहे? या आदेशानंतर लगेचच सचिवांना अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे योग्य उमेदवार पदे भरण्यास उपलब्ध झाले. त्यांच्या नेमणुका झाल्या. श्री. ढेबर यांनी हे सौराष्ट्रात करुन दाखविले. माझ्या काँग्रेसच्या मित्रांनी आणि मंत्र्यांनी यापासून धडा घ्यावा.'

**श्री. एम. आर. कृष्णन :** राजाजींनी हे केले आहे.

**श्री. गायकवाड :** आम्ही त्यांचे कौतुक करतो. जर काँग्रेसचे लोक काही चांगले करत असतील तर आम्ही त्यांचेही कौतुक करु. आमच्याकडे तेही धाडस आहे.

पात्रता स्पष्ट करणारे आणखी एक उदाहरण आहे. मी आता त्या अधिकाऱ्याच्या नावाचा उल्लेख करणार आहे. कारण ते अधिकारी, श्री. एम. के. जाधव, आता निवृत्त झाले आहेत. ते मुंबई राज्याचे महसूल विभागाचे जिल्हाधिकारी म्हणून निवृत्त झाले आहेत. १९२६ मध्ये जेव्हा ते कला शाखेची प्रथम श्रेणीतील पदवी घेऊन उत्तीर्ण झाले तेव्हा त्यांनी जिल्हाधिकाऱ्यांकडे नोकरीसाठी अर्ज केला. पुणे जिल्ह्यातील एका मामलेदार कार्यालयात त्यांची कारकून म्हणून नेमणूक झाली. काही महिन्यांतच त्या मामलेदारांनी जिल्हाधिकाऱ्यांकडे तक्रार केली, की श्री. एम. के. जाधव कारकुनाचे काम करण्यास अपात्र आहेत. ते पदवीधर असूनही कारकुनाचे काम करीत असून त्यांना नोकरीतून कमी करण्यात यावे. १९२७ मध्ये मुंबई प्रांताच्या गव्हर्नरांनी असे जाहीर केले की, 'त्यांना डीप्रेस्ड क्लासवर्गातील काही उमेदवारांची थेट भरती करायची आहे. अनुसूचित जातीला तेव्हा 'डीप्रेसड क्लास' म्हटले जायचे. श्री. जाधव त्यासाठी एक उमेदवार होते. योगायोगाने त्यांची महसूल विभागात उपजिल्हाधिकारी पदावर निवड झाली. काही महिन्यांच्या प्रशिक्षणानंतर त्यांची पुणे जिल्ह्यात ते मामलेदार काम करीत असलेल्या ठिकाणी नेमणूक झाली. ते त्या मामलेदाराकडे कारकून म्हणून काम करीत होते व त्या मामलेदारांनी त्यांना त्या पदासाठी अपात्र असल्याने नोकरीतून कमी केले होते, त्याचे वरिष्ठ अधिकारी म्हणून कार्यरत झाले. एवढेच नव्हेतर... पूर्ण माहिती देण्यासाठी

माझ्याकडे वेळेची कमतरता आहे.

**सभापती :** माननीय सदस्यांचा वेळ संपला आहे.

**श्री. गायकवाड :** धन्यवाद, मी आपला आभारी आहे. नेहमीच मला दया दाखवता.

**सभापती :** यावेळी मी तुम्ही अपेक्षा करता तशी दया दाखवू शकणार नाही. तुम्ही आपले म्हणणे लवकर पूर्ण करण्याचा प्रयत्न करा.

**श्री. गायकवाड :** दयाळू माणूस नेहमीच दयाळू असतो. महोदय, आता मी संपवतो. श्री. जाधव तेथे उपजिल्हाधिकारी म्हणून राहिले. नंतर ते जिल्हाधिकारीही झाले. त्याच पदावरून निवृत्त झाले. जिल्हाधिकारी आणि जिल्हा दंडाधिकारी म्हणून त्यांनी विविध निवाडे दिले. अनेक खटले त्यांनी चालविले. मात्र एकाही खटल्यात त्यांचा निकाल अपिलात बदलला गेला नाही. एव्हढेच नव्हे तर ते एक कर्तव्यदक्ष अधिकारी म्हणून नावाजले गेले. म्हणून जी व्यक्ती कारकुनाच्या पदासाठी अपात्र ठरते, ती कार्यक्षम जिल्हाधिकारी म्हणून काम करू शकते. कार्यक्षमता अशी असते. अनुसूचित जाती, अनुसूचित जमातीचे लोक अपात्र आहेत, हे लोकसेवा आयोग सांगते. त्यावर विश्वास ठेवू नका. ते चालू देऊ नका.

**उपसभापती :** हे योग्य नाही. असे म्हणता कामा नये. लोकसेवा आयोग त्यांच्या अहवालात एखाद्या पदाबाबत, ती अपात्र आहे असे सांगते. त्याचा आधार घेऊ नका. ती घटनेने निर्माण केलेली स्वतंत्र, स्वायत्त संस्था आहे. मला त्याविषयी श्रद्धा आहे आणि मी कोणत्याही माननीय सदस्यांना भारतीय लोकसेवा आयोगाविषयी असे बोलण्यास परवानगी देणार नाही. मी अशी सूचना करते की तसा उल्लेख वगळण्यात यावा, त्यांना तसे म्हणावयाचे नसावे.

**श्री. के. यू. परमार** (अहमदाबाद अनुसूचित जातीसाठी राखीव) **:** आपण याबाबत चौकशीसाठी उच्चस्तरीय समिती नेमण्याबाबत प्रस्ताव आणला पाहिजे.

**सभापती :** लोकसेवा आयोगाऐवजी ते कदाचित अन्य अधिकाऱ्यांबाबत बोलले असतील.

**श्री. गायकवाड :** लोकसेवा आयोग म्हणते की पात्र उमेदवार मिळाले नाहीत. जर मी चुकत नसेल तर या अथवा गेल्या अधिवेशनात माननीय मंत्री श्री. दातार यांनी अशी घोषणा केली आहे की, लोकसेवा आयोगाने जे अभिप्राय सादर केले आहेत ते स्वीकारण्याची आमच्यावर बंधने नाहीत. आमच्याकडे स्वत:ची मते आहेत. मग इथे काय झाले आहे मला समजत नाही. ते मान हलवून नाही, नाही म्हणत आहेत. परंतु मी ते निदर्शनास देईन.

**गृहराज्य मंत्री श्री. दातार :** ते माझ्या म्हणण्याचा विपर्यास करीत आहेत.

**सभापती :** होय. ते इथे आताच उघड झाले आहे. आता माननीय सदस्य असे सांगत होते की, मंत्री म्हणाले की लोकसेवा आयोगाच्या शिफारशी बंधनकारक नाहीत. मात्र प्रत्यक्षात त्यांच्यावर ते बंधनकारक असो वा नसो, मात्र ते नेहमीच त्यांना सूचना मिळेल त्याप्रमाणे कार्यवाही करतात.

**श्री. गायकवाड :** मी केवळ नेमके कुठे बोचते आहे ते दाखविण्याचा प्रयत्न करीत होतो. मी नेमके कुठे बोचले, हे स्पष्ट करतो.

**गृहराज्यमंत्री श्री. दातार :** लोकसेवा आयोगाबाबत माननीय सदस्यांनी केलेला उल्लेख

वगळण्यात यावा अन्यथा...

**सभापती :** ते वगळण्यात येतील.

**श्री. गायकवाड :** काय? महोदय.

**सभापती :** लोकसेवा आयोगाबाबत उमेदवार पात्र नाहीत. माननीय सदस्यांनी हे केलेले मतप्रदर्शन आयोगाला कळविण्यात येऊ नये.

**श्री. गायकवाड :** मी तो उल्लेख मागे घेतो.

**सभापती :** मला क्षमा करा, आता आपण आपले वक्तव्य पूर्ण करावे.

**श्री. गायकवाड :** महोदय, मी संपवतो. केंद्र शासनात एक वाईट प्रथा सुरु आहे. जेव्हा अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीसाठीच्या राखीव जागा असतात. विशेषत: त्या वर्ग एक आणि वर्ग दोनमधील असतात. तेव्हा केंद्रशासनाकडे या घटकांतील उमेदवार असतात तेव्हा ते अपात्र ठरतात. त्यानंतर ती पदे अराखीव होतात आणि अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीबाहेरच्या उमेदवारांची त्यावर नेमणूक होते. महोदय, या तरतुदींमुळे जाणीवपूर्वक आणि वाईट हेतूने विविध मोठे नेते आणि वरिष्ठ अधिकारी संगनमताने असे प्रयत्न करीत असतात. त्या सगळ्यांना या पदांत रस असतो. त्या सगळ्यांना त्यांची मुले, जावई आणि अन्य नातेवाईकांना त्या वर्ग - १ व वर्ग - २ च्या वरिष्ठ पदांवर नेमावयाचे असते. हे नेहमीच होत राहते. हा हेतू साध्य करण्यासाठी त्यांनी हे प्रचलित कारण शोधले आहे. त्यात यशस्वी होण्यासाठी ते या गरीब अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना अयोग्य, अपात्र अशी विशेषणे जोडून आपल्या हिताच्या व्यक्तींसाठी जागा निर्माण केली आहे. त्याचे बळी हे उमेदवार ठरतात. जर सरकार खरोखरच आपल्या कर्तव्यांबाबत प्रामाणिक आणि गंभीर असेल तर ते सौराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. ढेबर यांनी जे केले तेच केंद्रशासनाच्या मंत्र्यांनीही करावे. त्यांनी अशी घोषणा करावी, की वर्ग - १ व वर्ग - २ची पदे अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीबाहेरच्या उमेदवारांव्यतिरिक्त भरली जाणार नाहीत. हे उमेदवार उपलब्ध होईपर्यंत ही पदे रिक्त ठेवण्यात येतील. महोदय, तुमच्या लक्षात येईल की, अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे उमेदवार जे आज अपात्र व अयोग्य ठरत आहेत ते उद्या पात्र व योग्य ठरतील. महोदय, मला आणखी दोन मिनिटे मिळतील काय?

**सभापती :** मी आता तुम्हाला केवळ बसण्यासाठीच परवानगी देईन. श्री. बर्मन. माननीय सदस्य बोलण्यास सुरवात करण्याआधी मी एक बाब मांडू इच्छितो. येथे सुमारे ८० अनुसूचित जाती, अनुसूचित जमातीचे सदस्य आहेत आणि यातील प्रत्येकाने या चर्चेत भाग घेऊन आपली मते व्यक्त करण्याची परवानगी मागितली आहे. दुसऱ्या बाजूला अन्य सदस्यही आहेत, की ज्यांना या चर्चेत भाग घेता आलेला नाही. त्यामुळे त्यांना माझ्या अडचणी लक्षात आल्या असतील. त्यांना आपण कसे सहभागी करून घेऊ शकू. त्यामुळे माझी माननीय सदस्यांना अशी विनंती आहे, की जर शक्य असेल, तर कमीतकमी वेळ घ्यावा. प्रत्येकाने घटनेच्या प्रत्येक कलमाचा उल्लेख करू नये, त्याचा काही भागच सभागृहापुढे सादर करावा.

# आठवणीतील दादासाहेब

**रा. सु. गवई**

माझे वैयक्तिक जीवन ज्यांच्या आचारविचारांनी व्यापलेले आहे, ज्यांच्या स्मृती माझ्या अंत:पटावर अढळपणे विराजमान आहेत व माझी जीवननौका ज्यांच्या आशीर्वाद व मार्गदर्शनाने संघर्षाच्या महासागरात योग्य मार्गाने वाटचाल करू शकली; ते माझ्या जीवनातले परम पूजनीय महापुरुष आहेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि कर्मवीर दादासाहेब गायकवाड.

दादासाहेबांचा जन्म जेमतेम परिस्थिती असलेल्या शेतकरी कुटुंबात 'आंबे' या गावी झाला. शिक्षण पण बेताचेच होते. त्यांच्या जीवनाची सुरुवात एका वसतिगृहाचे अधीक्षक या नात्याने झाली. आपल्या बांधवांच्या उत्कर्षाची तळमळ तर मनात होतीच पण मार्ग सापडत नव्हता. प्रत्येक माणसाच्या आयुष्यात एक क्षण असा येतो की, ज्यामुळे त्याच्या जीवनाला कलाटणी मिळते. ज्याला आपण इंग्रजी 'टर्निंग पॉइंट' म्हणतो. अर्थातच ह्या, जीवनाला कलाटणी देणाऱ्या क्षणाचा योग्य उपयोग करून घेण्यासाठीदेखील अंगी सामर्थ्य असावे लागते आणि ते नक्कीच दादासाहेबांचे जवळ होते. म्हणूनच १९२६ साली बाबासाहेबांच्या झालेल्या भेटीच्या योगामुळे त्यांच्या जीवनाला वळण तर लागलेच पण त्याचबरोबर त्यांना त्यांच्या जीवनध्येयाचा मार्ग गवसला आणि बाबासाहेबांची ती भेट, त्यांचे सान्निध्य त्यांच्या भावी यशस्वी आयुष्याची मुहूर्तमेढ ठरली. बाबासाहेब, चांदवडच्या एका बाईच्या खुनाच्या केसच्या संबंधात नाशिकला आले होते. तेथील बाबासाहेबांच्या शाहू बोर्डिंगमधील वास्तव्यातच त्यांची प्रथम भेट झाली. आपल्या समाजातील विलायतेहून पदवी घेऊन आलेली विद्वान व्यक्ती, आपल्या समाजाला न्याय मिळवून देण्यासाठी ते करीत असलेले अविरत प्रयत्न, त्यांचे प्रगल्भ आचारविचार, त्यांनी जोपासलेली नैतिक मूल्ये ह्या सर्व गोष्टींचा पगडा दादासाहेबांच्या मनावर प्रथमपासूनच होता. प्रत्यक्ष भेटीत तर ते भारावूनच गेले. बाबासाहेबांच्या तेथील वास्तव्यात दादासाहेबांनी त्यांची भरपूर सेवा केली. बाबासाहेबांची वैयक्तिक कामेदेखील मन:पूर्वक आणि आनंदाने केली. त्यांची ही सेवा बाबासाहेबांच्या नजरेतून सुटली नाही. बाबासाहेबांनी त्यांची सर्व विचारपूस केली. दादासाहेबांच्या स्वभावातील चौकसपणा, त्यांचे चातुर्य, हुशारी, हरहुन्नरीपणा, त्यांची जिद्द, महत्त्वाकांक्षा आणि लोकसेवेची जिवंत तळमळ हे सर्व त्यांच्या स्वभावातील गुणविशेष बाबासाहेबांच्या जाणत्या नजरेने हेरले. रत्नपारखीच हिऱ्याची खरी परीक्षा करतो. बाबासाहेबांनीच ह्या हिऱ्याची पारख केली. एवढेच नाही तर आपल्या समाजाच्या उत्थानाकरिता सुरू असलेल्या महासंग्रामातील एक आघाडीचा सैनिक

म्हणून दादासाहेबांची निवड केली. काळाच्या ओघात आणि भविष्याच्या परिसरूपी कसोटीवर त्यांची ही निवड पूर्णांशाने खरी ठरली.

१९२६ ते १९५६ पर्यंतच्या तीस वर्षांच्या या कालखंडात बाबासाहेबांनी सामाजिक न्याय, समानता आणि समाजकल्याणासाठी उघडलेल्या प्रत्येक मोहिमेत दादासाहेब अग्रगण्य होते. मग ती मोहीम अस्पृश्यांवरील लष्कर प्रवेशाची बंदी उठवण्यासाठी असो की तळ्याचे आणि विहिरीचे पाणी घेण्याच्या हक्कासाठी असो, नाशिकचे राम मंदिरच नाहीतर सर्व मंदिरे खुली करून देण्यासाठी असो, की पांडवप्रतापाचे पारायण करून त्याची पालखीतून मिरवणूक काढण्यासाठी असो, मतदानाचा हक्क व स्वतंत्र मतदारसंघाच्या मागणीसाठी असो वा सरकारी नोकरीत आरक्षण मिळण्यासाठी असो, राजकीय, सामाजिक, आर्थिक आणि शैक्षणिक क्षेत्रात ज्या ज्या ठिकाणी असमानता होती त्या त्या ठिकाणी समानतेसाठी बाबासाहेबांनी जो लढा उभारला; जो संघर्ष केला त्या प्रत्येक लढ्यात, संघर्षात बाबासाहेबांनीच पारखलेला हा आघाडीचा सैनिक. दादासाहेब अग्रगण्य तर होतेच पण त्याचबरोबर या संघर्षलढ्याच्या यशस्वितेत त्यांचा फार मोठा वाटा होता. बाबासाहेबांचे दादासाहेबांवर अकृत्रिम प्रेम होते, आत्मीयता व गाढ विश्वास होता. पण तरीही बाबासाहेबांच्या शेवटच्या काळात एकदा गालबोट लागलेच. काही विघ्नसंतुष्ट हितशत्रूंनी दादासाहेबांच्या विरोधात बाबासाहेबांचे कान भरले आणि त्यांचा गैरसमज करून दिला. दोघांच्या भेटीगाठीदेखील झाल्या नाहीत. दादासाहेबांची त्या वेळी मानसिक अवस्था काय झालेली असेल ह्याची आपण कल्पनाच करू शकत नाही. पण अशा परिस्थितीतही दादासाहेबांच्या बाबासाहेबांवरील श्रद्धेला कुठलाच तडा गेला नाही. कारण ती अढळ होती. एक प्रकारे दादासाहेबांच्या एकनिष्ठेच्या परीक्षेचीच ही वेळ होती. पण दादासाहेब या कसोटीवरही खरे ठरले. दादासाहेबांविषयी असलेल्या जिव्हाळ्यामुळे म्हणा किंवा सत्यतेची जाणीव झाल्यामुळे असेल बाबासाहेबांनीच धीरोदात्तपणे पुढाकार घेतला आणि हा मतभेद मिटविला. शेवटपर्यंत ही गुरूशिष्यांची जोडी अतूट राहिली. इतिहासाकडे बघता राजकीय जीवनात गुरूशिष्यांच्या काही जोड्या प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ, महात्मा गांधी-जवाहरलाल नेहरू, जवाहरलाल नेहरू-लालबहादूर शास्त्री; तसेच बाबासाहेब आंबेडकर-दादासाहेब गायकवाड ही गुरूशिष्यांची जोडी अजरामर होणार यात शंका नाही.

१९५६ साली बाबासाहेबांच्या दुःखद निधनामुळे दादासाहेबांचा जीवनाधार गेला. पण दादासाहेबांनी आपली हिंमत खचू दिली नाही. गुरू निधनाचं दुःख त्यांनी आपल्या गुरूच्या शिकवणीलाच आदर्श मानून पचवलं. गुरुपुण्याईची शिदोरी त्यांना आयुष्यभर पुरली आणि त्या जोरावरच ते जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत आपल्या गुरुच्या कार्याला सिद्धीस, पूर्णत्वास नेण्यासाठी झटले. गुरुभक्ती म्हणजे काय या प्रश्नाचं उत्तर म्हणजे दादासाहेबांनी बाबासाहेबांच्या चरणी अर्पण केलेले आपले जीवन आणि त्यांना वाहिलेली निष्ठा आहे.

१९५६ ते १९७१ पर्यंतचा काळ म्हणजे दादासाहेबांनी स्वतंत्रपणे केलेल्या कार्याचे सुवर्णयुग म्हणता येईल. बाबासाहेबांचे प्रत्यक्षपणे मार्गदर्शन नसतानादेखील स्वबळावर निर्णय घेऊन त्यांनी हे युग गाजवले. ह्या काळातील काही महत्त्वाच्या घटना म्हणजे १९५७ साली ते श्री. गोविंदराव देशपांडे यांच्यासारख्या मातब्बर व्यक्तीचा पराभव करून

ते लोकसभेवर निवडून आले. १९६२ साली व नंतर १९६८ साली त्यांनी राज्यसभेत प्रवेश केला. आपल्या बांधवांच्या अनेक संयुक्तिक प्रश्नांना त्यांनी भारताच्या या सर्वश्रेष्ठ सदनामध्ये वाचा फोडली व त्यांच्या आर्थिक शोषणातून मुक्ततेकरिता १९६४ साली भूमिहीनांचा सत्याग्रह पुकारला. त्यांनी केलेल्या आव्हानाला त्यांच्या बांधवांनी दिलेली साथ ही त्यांच्या कर्तृत्वाची पावती आहे. या सत्याग्रहाच्या यशस्वितेला अनन्यसाधारण महत्त्व आहे. ते म्हणजे १९५७ साली झालेल्या रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडियाच्या निर्मितीनंतर लगेचच एक वर्षानंतर पार्टीच्या काही प्रमुख नेत्यांनी फाटाफूट केलेली होती. पार्टी विभागली जात होती. कुशल नेतृत्वाच्या अभावी दिशाहीन झालेल्या कार्यकर्त्यांना एकत्रित आणण्याचे फार मोठे काम या सत्याग्रहामुळे घडले आणि त्याचबरोबर बाबासाहेबांनंतर विघटित होत चाललेल्या पक्षाला संघटित करण्याचे कार्यही घडले. त्यातूनच दादासाहेबांचे संघटनकौशल्य सिद्ध झाले. भूमिहीनांचा यशस्वी सत्याग्रह हा दादासाहेबांच्या शिरेटोपात मानाचा तुरा आहे आणि ह्याच काळात त्यांना भारत सरकारने गौरव करून बहाल केलेली 'पद्मश्री' ही उपाधी, त्यांनी आयुष्यभर एकनिष्ठेने केलेल्या कार्याचा सुवर्ण कळस आहे.

दादासाहेबांचे व्यक्तिमत्व भारदस्त होते. नियमित व्यायामाने घडविलेले पिळदार शरीर व त्यातूनच निर्माण झालेली चपलता वार्ध्यक्यातही तरुणाला लाजवील अशीच होती व कोणत्याही साहसाला आव्हान देण्याचे सामर्थ्य दर्शविणारीच होती. अंगी चाणाक्ष बुद्धिमत्ता असूनही चेहऱ्यावर मात्र निरागसताच नांदत होती. धोतर, शर्ट, कोट, टोपी आणि पायात कोल्हापुरी चप्पल ही त्याची वेशभूषा. 'साधी राहणी आणि उच्च विचारसरणी' ह्या म्हणीचे ते प्रतीक होते. साध्या राहणीमानाला शोभेसाच त्यांचा सरळमार्गी स्वभाव. वाकड्यात शिरणे त्यांना माहीतच नव्हते. तोंडपुजेपणा, लांगुलचालन, हांजीहांजी, भ्रष्टाचार, स्वत:साठीच संपत्ती जमविणे इत्यादी काही गोष्टी नेत्यांच्या ठिकाणी आज आपल्याला प्रामुख्याने आढळून येतात. परंतु दादासाहेब त्यापासून शेकडो योजने दूर होते. स्वाभिमान होता पण त्यात गर्वाचा लवलेशही नव्हता. आपदग्रस्तांना सढळ हातांनी मदत केली पण त्यात उपकारकर्त्याची भावना नव्हती. कुठल्याही बाबतीत 'तर्कशुद्ध निर्णयाची क्षमता'—ज्याला आपण 'रोबर्ट कॉमनसेन्स' म्हणतो—ते त्यांच्या स्वभावाचे खास वैशिष्ट्य होते. म्हणूनच, भगवान बुद्धांना, ते फिरावयास निघाले असताना वाटेत भिकारी, रोगी, वृद्ध व प्रेत दिसले असता त्यांच्या मनावर परिणाम होऊन त्यांनी राजत्याग, गृहत्याग केला; ही कथा त्यांच्या तर्कशुद्ध विचारसरणीला पटली नाही. त्यांचे मन ही कारणमीमांसा मानायलाच तयार नव्हते. त्यांनी बाबासाहेबांशी ह्या विषयावर खूप चर्चा केली. बाबासाहेबांनाही त्यांचे तर्कशुद्ध विचार पटले आणि शेवटी शाक्य आणि लिच्छवी ह्यांच्यातील रोहिणी नदीच्या पाण्याच्या वाटणीवरून निर्माण झालेला वाद दूर करण्यासाठीच त्यांनी राज्य व गृहत्याग केला हे मनाला पटणारे कारणच त्यांनी मान्य केले. ह्या त्यांच्या स्वभावाबरोबरच आणखी एक स्वभाववैशिष्ट्य होते आणि ते म्हणजे त्यांच्या अंगी असलेला 'ग्रामीण शहाणपणा'. त्याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे 'पांडवप्रतापा'चे पारायण करून ग्रंथाची पालखीतून मिरवणूक काढण्याच्या वेळी घडलेल्या घटनेचे देता येईल. अस्पृश्यांच्या ह्या पालखी सोहळ्याला स्पृश्यांचा कडाडून विरोध होता, आणि कुठल्याही परिस्थितीत ही मिरवणूक काढायचीच ही दादासाहेबांची व

समस्त अस्पृश्यांची जिद्द होती. आपल्या ह्या जिद्दीतही दादासाहेबांनी स्वत: व त्याचबरोबर आपल्या समाजालाही शांततेचे काटेकोरपणे पालन करावयास लावले. पण स्पृश्य समाज मात्र हिंसेवर आरूढ झाला. त्यांनी अस्पृश्यांना जबर मारहाण केली व 'पांडवप्रतापा'चा ग्रंथही जाळला. हे लाजिरवाणे कृत्य करीत असताना ते 'महात्मा गांधी की जय' म्हणत होते. ह्या घटनेची प्रसारमाध्यमांनी चांगलीच दखल घेतली. ही अन्यायपूर्ण घटना सर्वच वर्तमानपत्रात ठळकपणे छापून आली. त्याचवेळी लंडनमध्ये गोलमेज परिषद चालू होती व डॉ. बाबासाहेब व महात्मा गांधीदेखील या परिषदेच्या निमित्ताने लंडमध्येच होते. श्री. दादासाहेबांनी चातुर्याने लागलीच ह्या सर्व वर्तमानपत्रांची कात्रणे लंडनला पाठवली. 'लंडन टाइम्स'सारख्या बलिष्ट वर्तमानपत्रानेदेखील त्याची दखल घेतली, व लंडनमधील सर्वच वर्तमानपत्रांत स्पृशांकडून अस्पृश्यांवर झालेल्या या अन्यायाच्या बातम्या ठळकपणे प्रसिद्ध झाल्या. महात्मा गांधी स्वत:ला अस्पृश्यांचे कैवारी म्हणून घेतात आणि त्यांच्याच नावाचा जयजयकार करून अस्पृश्यांवर अन्याय होतो, हे विरोधाभासात्मक चित्र केवळ भारतीयांच्याच नव्हे, तर इंग्रजांच्या व सर्व जगाच्या डोळ्यांसमोर उभे करण्यात दादासाहेबांनी त्यांच्या अंगी ओतप्रोत भरलेल्या ग्रामीण शहाणपणाचाच दाखला दिला आहे.

दादासाहेबांचे शिक्षण बेताचेच होते पण त्यांची बुद्धिमत्ता ही एका प्रगाढ विद्वानाला साजेशीच होती. त्यांचे विचार प्रगल्भ होते. कारण त्यांनी जीवनातील प्रत्येक स्तरावरील अनुभव उघड्या डोळ्यांनी घेतले होते. लोकसभेत आणि राज्यसभेत त्यांनी आपल्या भाषणाद्वारे मांडलेले विचार त्यांच्या परिपक्व बुद्धिमत्तेची साक्ष देतात आणि एक यशस्वी 'सांसद'—'पार्लमेंटरीयन' या नात्याने आपले श्रेष्ठत्व सिद्ध करतात.

अमरावती येथे शासकीय ॲकॅडेमिक हायस्कूल व विदर्भ महाविद्यालयात १९४७ ते १९५७च्या दहा वर्षांच्या कालखंडात मी विद्यार्थिदशेत असताना जेव्हा जेव्हा दादासाहेब अमरावतीला आले तेव्हा तेव्हा त्यांच्या सभेला उपस्थित राहत होतो. एकाग्र चित्ताने त्यांचे विचार मी ऐकत होतो आणि भारावून जात होतो. बाबासाहेबांचे पट्टशिष्य, त्यांचा उजवा हात आणि बाबासाहेबांनंतरचा नेता, हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव माझ्यावर पडत गेला आणि तो वृद्धिंगत होत गेला. १९५२ ते १९५६च्या कालखंडात मला बाबासाहेबांचाही सहवास लाभला. १९५२च्या त्यांच्या भंडाऱ्याच्या निवडणुकीत मी स्वयंसेवक म्हणून काम केले. त्यांच्या अनेक सभांना मी उपस्थित होतो. त्या वेळी बाबासाहेबांबरोबर दादासाहेबही असायचे. १९५६ साली माझ्या जीवनातील तो अविस्मरणीय प्रसंग घडला; जेव्हा विद्यार्थिनेता या नात्याने बाबासाहेबांशी १५ मिनिटे नागपूरच्या शाम हॉटेलमध्ये चर्चा करण्याचे भाग्य मला लाभले. माझ्या जीवनातील तो एक अमोल ठेवा आहे. ह्याच काळात मी अमरावती जिल्ह्याचा विद्यार्थिनेता म्हणून काम करीत होतो. त्यामुळे दादासाहेबांचा आणि माझा वारंवार संबंध येत गेला. भेटीगाठी, विचारविनिमय होत गेला आणि त्यातूनच त्यांच्याविषयी प्रेम, आदर निर्माण होऊन त्याचेच रूपांतर त्यांच्यावरील नि:सीम श्रद्धेत झाले. आपल्या बांधवांवर होणारे अन्याय दूर करून त्यांना न्याय मिळवून देण्यासाठी, त्यांच्या आर्थिक व शैक्षणिक प्रगतीसाठी व समाजातील इतर घटकांप्रमाणेच एक घटक या नात्याने सामाजिक मान मिळवून देण्यासाठी दादासाहेब करीत असलेल्या कठोर परिश्रमांचे मी अवलोकन करीत

होतो आणि त्यातूनच मला माझ्या जीवनाचे 'ध्येय' प्राप्त झाले व अभावितपणेच बाबासाहेबांनंतर दादासाहेबांना मनोमन मी माझा परम आदरणीय गुरू मानले आणि त्यांनीदेखील मला केवळ शिष्यच नव्हे, तर आपल्या पोटच्या पोराप्रमाणे पित्याच्या नात्याने माझ्यावर अपरिमित प्रेम केले. त्या नितांत प्रेमाचे गाठोडे आजही मी माझ्या उराशी बाळगून आहे.

दादासाहेबांच्या सान्निध्यातले काही प्रसंग मला आठवतात. त्यांपैकी एक सांगतो. १९६४ साली दादासाहेबांच्या प्रेरणेने भूमिहीनांचा सत्याग्रह झाला होता. एक प्रकारचे 'जेलभरो' आंदोलनातच होते. योग्य ती पडीक जमीन दलित बांधवांना देऊन त्यांची आर्थिक शोषणातून मुक्तता करण्याचा त्यामागे स्तुत्य उद्देश होता. त्या वेळी महाराष्ट्रातील इतर भागांच्या तुलनेने माझ्या विभागातून म्हणजे विदर्भातून सर्वात जास्त जवळ जवळ तीन लाख—सत्याग्रहींना मी एकत्रित केले होते आणि त्यांपैकी एकही तुरुंगात जाण्यासाठी घाबरला नव्हता. इतके ते ध्येयनिष्ठ होते. माझ्या या कर्तबगारीची पावती दादासाहेबांनी लगेचच मला दिली. या यशस्वी लढ्याची सांगता अमरावतीलाच व्हावी असा आदेश मला दादासाहेबांनी दिला. त्यांचा हा आदेश म्हणजे मला एक प्रकारचे आव्हानच होते. त्यानिमित्त केवळ सभेचे आयोजनच नाही तर मोठ्या प्रमाणात कार्यकर्त्यांना एकत्रित आणण्याची एक प्रकारे जबाबदारीच माझ्यावर सोपविण्यात आलेली होती. त्यांची आज्ञा मी शिरसावंद्य मानली. खरं म्हणजे त्यांच्या या आदेशामुळे मला मन:पूर्वक आनंद झाला होता. कारण त्यामधून त्यांचा माझ्यावर असलेल्या विश्वासाची जाणीव मला होत होती. माझ्यासाठी तो एक सुखद अनुभव होता. मनाला हुरूप देणारा आणि शरीरात चैतन्य आणणारा. त्या हुरूपानेच मी सभेची आखणी केली. माझ्या प्रयत्नांना माझ्या कल्पनेपेक्षाही जास्त यश आले. ती सभा प्रचंड नाही तर विराट ठरली. सभेला जमलेल्या चार लाख कार्यकर्त्यांचा तो महासागर पाहून दादासाहेबांनी माझी कौतुकाने पाठ थोपटली. आपलं मन मोठं विचित्र असते. आपण जर का एखाद्या कार्यात यशस्वी झालो तर आपल्याला मनस्वी आनंद होतो पण त्याचबरोबर जर इतरांनी आणि त्यातल्या त्यात ज्या व्यक्तीला आपण मानतो; ज्याच्या ठायी आपली श्रद्धा आहे अशा व्यक्तीने जर का आपल्या यशाचे कौतुक केले तर आपला आनंद बहुगुणित तर होतोच पण त्याचबरोबर एक प्रकारची धन्यता वाटते. त्याच धन्यतेची अनुभूती मी दादासाहेबांनी माझ्या केलेल्या कौतुकातून अनुभवली. ह्या सभेत प्रथम काही वक्त्यांची भाषणे झाली. त्या सर्वांनी मला 'विदर्भ केसरी' म्हणून संबोधित केले; पण श्री. दादासाहेबांनी एक पाऊल पुढे जाऊन उत्स्फूर्तपणे मला 'महाराष्ट्र केसरी' ही पदवी प्रदान केली. ही पदवी म्हणजे माझ्या कर्तबगारीची श्री. दादासाहेबांनी मला दिलेली पावती तर आहेच पण त्याचबरोबर माझ्या जीवनातील ते पहिले मानपत्र आहे. त्यानंतरच्या काळात मला अनेक मानपत्रांनी गौरविण्यात आले पण श्री. दादासाहेबांनी मला दिलेले अलिखित मानपत्र माझ्यासाठी अमोल ठेवा आहे.

१९६२च्या लोकसभेच्या निवडणुकीत दादासाहेबांचा पराभव झाला. त्यांच्या पराभवाचे दु:ख मला सहन होत नव्हते. वास्तविक पाहता, त्या वेळी माझी मन:स्थिती स्वत:साठी बिघडावयास हवी होती. कारण मीदेखील त्या वेळी लोकसभेची निवडणूक डॉ. पंजाबराव देशमुख यांच्यासारख्या मातब्बर व्यक्तीच्या विरोधात अकोला निर्वाचन क्षेत्रातून लढलो होतो आणि अल्पमतांनी पराभूत झालो होतो. मी दिलेल्या दमदार लढतीबद्दल निवडून आलेले

असतानादेखील स्वत: डॉ. पंजाबराव देशमुखांनी माझे कौतुक केले होते. पण दादासाहेबांच्या अपयशाच्या वेदना माझ्या वेदनेपेक्षा अधिक जीवघेण्या होत्या. खर सांगायचे झाले तर माझ्या पराभवाच्या दु:खाचे मला विस्मरणच झाले होते. तीव्र वेदना होत्या त्या फक्त दादासाहेबांच्या अपयशाच्या. असे म्हणतात की, अपयशातूनच माणसाला यशप्राप्तीची जिद्द निर्माण होते. माझ्याही बाबतीत तसेच घडले. त्याच वर्षी होऊ घातलेल्या राज्यसभेच्या निवडणुकीत दादासाहेबांना निवडून आणायचेच ही मला वाटलेली जिद्द हा त्याचाच परिपाक होता. कुठल्याही परिस्थितीत त्यांच्या नावामागे लागलेली 'खासदार' ही उपाधी परत जाऊ द्यायची नाही असा माझ्या मनाचा निर्धारच मी केला होता. आपल्या परम पूजनीय गुरूसाठी आपण काहीतरी करावे ही टोचणीदेखील माझ्या मनाला होतीच. 'दिशा' तर मला सापडली होती पण एकंदर परिस्थितीची 'दशा' मात्र ठीक नव्हती. माझ्यासमोर दोन यक्ष प्रश्न होते. एक, दादासाहेबांचे राज्यसभेच्या उमेदवारीकरीता मन वळविण्याचा आणि दुसरा म्हणजे विपरीत परिस्थितीवर मात करण्याचा. प्रथम मी त्यांचे मन वळविण्याच्या मार्गाला लागलो. अर्थात ते तितकसे सोपे नव्हते. विजयासाठी लागणाऱ्या मतांचे मी आखलेले गणित त्यांना समजावून सांगितले. त्यांचा माझ्यावर पूर्ण विश्वास होता पण माझ्या गणितावर मात्र बसत नव्हता. त्यातच 'या पोराच्या नादाला लागू नका' असा अनाहूत सल्ला काही व्यक्तींनी त्यांना, न मागता दिला होता. शेवटी मी प्रत्यक्ष कृती करायचे ठरवले. त्या वेळी मी आमदार नव्हतो पण एकवीस आमदारांचा संच मात्र माझ्या बाजूने होता. त्यात चार आमदार तर अमरावतीचेच होते. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात दादासाहेब प्राणपणाने लढले पण समितीतर्फे मात्र त्यांच्या नावाला पुढाकार नव्हता. काँग्रेसशी त्या वेळी आमची युती नव्हती, तरीही तत्कालीन मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी श्री. बी. सी. कांबळे यांच्या उमेदवारीकरिता काँग्रेसची शिल्लक मते देण्याचा निर्णय घेतलेला होता. अशा विपर्यस्त परिस्थितीतही मी माझा धीर खचू दिला नाही. कारण त्यांनी उभे राहावेच ही प्रबळ इच्छा त्यामागे होती. मी पुढाकार घेऊन प्रजा समाजवादी पक्षाचे नेते श्री. रहांगडे यांच्याशी समझोता केला. त्यात श्री. रहांगडे यांच्या उमेदवारीला विधान परिषदेकरिता व दादासाहेबांना राज्यसभेकरिता एकमेकांनी मदत करायची हे निश्चित झाले. माझ्या बाजूने असलेला एकवीस आमदारांचा संच अधिक प्रजा समाजवादी पक्षाशी झालेला समझोता यामुळे परिस्थितीत सकारात्मक फरक पडला. केवळ माझ्या आग्रहाखातर, अनिच्छेनेच का होईना; पण दादासाहेब राजी झाले. इथे एक बाब मला उद्धृत करावीशी वाटते. दादासाहेबांना राजी करण्यात सुश्री. शांताबाई दाणी व श्री. सदानंदजी फुलझेले ह्यांचे मला मोलाचे सहकार्य लाभले. लढत मात्र फारच अटीतटीची होती. एकेका मताला किंमत होती. मी त्या वेळी दादासाहेबांच्या वतीने निवडणूक प्रतिनिधी म्हणून काम केले. प्रथम आणि द्वितीय प्राधान्याच्या मतांची गोळाबेरीज, मतमोजणीची प्रक्रिया ह्या सर्व बाबतीतील बारकावे मी त्या वेळीच शिकलो. शेवटी या निर्णायक लढतीचा निकाल लागला. दादासाहेब विजयी झाले. ह्या विजयाची, माझ्या आनंदाच्या परिणतीची वार्ता देण्यासाठी मी दादासाहेबांकडे धावतच गेलो. पण ते होते कुठे? बरीच शोधाशोध झाली तेव्हा कळले की, आपल्या विजयाची खात्री पटत नसल्यामुळे निकाल न ऐकताच ते सामान परत आणण्यासाठी पंजाब मेलने दिल्लीला

रवाना झाले. मी लागलीच त्यांच्या बोगीचा उल्लेख करून स्टेशन मास्तर, भुसावळ यांना दादासाहेबांना विजयाची बातमी कळविण्यासाठी तातडीची तार केली. ती तार भुसावळच्या स्टेशन मास्तरने गाडी भुसावळला पोहोचल्यावर दादासाहेबांना दिली. ते तिथूनच मुंबईला परतले. दादासाहेबांच्या विजयामुळे श्रमसाफल्याच्या समाधानाबरोबरच माझ्या कुवतीप्रमाणे मी थोडी का होईना, पण गुरुदक्षिणा त्यांच्या चरणी वाहू शकलो, ही धन्यता मला आयुष्यभर सुखावणारी आहे. अर्थातच् माझ्या प्रामाणिक प्रयत्नांना दादासाहेबांच्या आशीर्वादाची जोड होती हे नम्रपणे नमूद करतो.

दादासाहेबांच्या बाबतीत मी खऱ्या अर्थाने तेव्हा कृतार्थ झालो, जेव्हा माझी सेवा त्यांच्या चरणी त्यांच्या अंतिम काळात रुजू झाली. १९७१ साल. माझ्या जीवनातील ते काळं वर्ष आहे. त्या वेळी मी विधान परिषदेत उपसभापती होतो. नुकताच तीन वर्षांपूर्वी मी या पदावर पोहोचलो होतो. काही नवीन शिकण्याच्या उमेदीत होतो आणि त्यातच दादासाहेबांची तब्येत बिघडली. उपसभापती पदाच्या कामाचा व्याप आणि श्री. दादासाहेबांची ढासळत चाललेली तब्येत यामुळे मी अगदी विमनस्क मन:स्थितीत होतो. ढासळतच चाललेल्या त्यांच्या तब्येतीकडे बघता अत्याधुनिक उपचाराकरिता त्यांना दिल्लीला आणले. मी त्यांच्याबरोबरच होतो. दिवसरात्र मी त्यांच्या सेवेत असे. डॉक्टर्सदेखील प्रयत्नांची शिकस्त करीत होते. पण दादासाहेबांचे आपल्या बांधवांच्या कल्याणासाठी झिजलेले शरीर त्याला साथ देत नव्हते. शेवटी तो काळा दिवस उगवला. दादासाहेब इहलोकाची यात्रा संपवून बौद्धवासी झाले. त्यांच्या निधनाचं दु:ख मी शब्दात वर्णन करू शकत नाही. अश्रूंनी डबडबलेल्या डोळ्यांना पुढचे काहीच दिसत नव्हते. वाटत होतं, 'मी पोरका झालो.' मला स्वत:ला सांभाळणे कठीण जात होतं. कसंबसं स्वत:ला सांभाळले आणि दादासाहेबांच्या पार्थिव देहाला रक्षा मंत्रालयातील विमान माझ्या नावाने भाड्याने घेऊन त्यांच्या अंतिम इच्छेप्रमाणे अंतिम संस्काराकरिता नाशिकला घेऊन गेलो. महाराष्ट्र शासनातर्फे स्वत: मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक शासकीय विमानाने त्यांना अंतिम निरोप देण्यासाठी नाशिकला आले. माझे आणि दादासाहेबांचे नाते लक्षात घेता ते माझी पत्नी सौ. कमल हिला पण बरोबर घेऊन आले. दादासाहेब तर गेलेच पण त्यांचे आचार, विचार आणि आपल्या बांधवांच्या उद्धाराकरिता त्यांना वाटत असलेली तळमळ माझ्या पुढील आयुष्याच्या मार्गदर्शनासाठी ठेवून गेले.

दादासाहेबांनी आपल्या बांधवांसाठी उभं आयुष्य वेचलं आहे. बाबासाहेबांच्या चितेसमोर ओल्या डोळ्यांनी केलेली प्रतिज्ञा त्यांनी आयुष्यभर पाळलेली आहे. आपल्या बांधवांना कधीच कुणाच्या लवावळचणीला जाऊ न देता आम्हाला माणुसकीचे हक्क प्राप्त करून दिलेले आहे. पूर्वीच्या काळी उच्चवर्णीयांच्या डोळ्यांना डोळा भिडला तर त्यांचा अवमान होईल म्हणून खाली मान करून चालणारे दलित बांधव, शेजारी राहिल्यास विटाळ होईल म्हणून गावाबाहेर राहणारे दलित बांधव, शिक्षणापासून वंचित राहिल्याने पिढ्यान्‌पिढ्या उच्चवर्णीयांच्या गुलामगिरीतच समाधान मानणारे दलित बांधव, उच्चवर्णीयांकडून लादण्यात आलेल्या अनिष्ट रूढी, परंपरा यांना आव्हान देऊन त्यात बदलाव आणण्यासाठी, आपल्या हक्कांसाठी संघर्ष करण्याची मानसिकता नसलेले दलित बांधव, राजदरबारीच नव्हे तर समाजातील प्रत्येक क्षेत्रात उपेक्षितांचे अपमानित जीवन जगणारे दलित बांधव आज सुशिक्षित

होऊन आपल्या हक्कांसाठी संघर्ष करीत आहे. खाली मान घालून न चालता ताठ मानेने, स्वाभिमानाने सन्मानाचे जीवन जगतो आहे आणि उच्चवर्णीयांच्या मांडीला मांडी लावून विचारांची देवाणघेवाण करतो आहे. या बदललेल्या चित्राचे श्रेय, बाबासाहेबांनंतर दादासाहेबांनाच आहे. उच्चवर्णीयांचे हृदयपरिवर्तन होऊन हे चित्र बदललेले नाही; तर त्यामागे या दोन्ही महापुरुषांचे अथक परिश्रम आहेत. 'सुशिक्षित व्हा, संघटित व्हा आणि संघर्ष करा' ही बाबासाहेबांनी बोधवाक्याद्वारे दिलेली शिकवण दादासाहेबांनी कटिबद्ध होऊन पुढे चालवली आणि आपले हक्क सन्मानाने मिळविले. चालू आणि भावी पिढ्यांना ती मार्गदर्शक ठरणारीच आहे. मी माझ्या समस्त बांधवांना नम्रपणे सांगू इच्छितो की, दादासाहेबांनी आपल्यासाठी केलेल्या परिश्रमांची नोंद घ्या, त्यांच्या स्मृती आपल्या हृदयात गोंदून ठेवा आणि भावी पिढीला मार्गदर्शन करा. तीच दादासाहेबांना खरी आदरांजली ठरेल.

दादासाहेबांचे ऋण मी कधीच फेडू शकणार नाही. एकाच वाक्यात सांगायचे झाले तर 'आज मी जो कुणी आहे त्याचे शिल्पकार बाबासाहेबांनंतर, दादासाहेब आहेत.'

माझे परम पूजनीय गुरू, माझे श्रद्धेचे, निष्ठेचे स्थान असलेल्या कर्मवीर दादासाहेब गायकवाड ह्यांच्या पवित्र स्मृतीस माझे विनम्र अभिवादन.

# चवदार तळ्याचा सत्याग्रह : कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाचे बीजारोपण

**आर. जी. रुके**

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रकाशित करण्यात येणाऱ्या ग्रंथासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने मला पत्र पाठवून "चवदार तळ्याचा सत्त्याग्रह आणि दादासाहेब" या विषयावर मी लिहावे असे कळविले, त्याबद्दल मला समाधान वाटले. कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्याबरोबर काही काळ कार्य करण्याची मला संधी मिळाली आणि त्यांचे जीवनकार्य जवळून न्याहाळता आले. त्यांच्या कार्याचा व्याप प्रंचड होता. ते कार्यकर्त्यांशी अतिशय आपुलकीने आणि प्रेमभावनेने वागत. मग ते रिपब्लिकन पक्षाच्या चळवळीतील असोत, संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनातील असोत किंवा सामाजिक धार्मिक, सांस्कृतिक किंवा साहित्यिक क्षेत्रातील असोत; त्या सर्वांनाच ते ममतेने व जिव्हाळ्याने वागवित.

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे ते एक विश्वासू सहकारी होते व त्यांच्या सर्वच चळवळीत त्यांचे 'उजवा हात' म्हणून ओळखले जात. त्यांच्या नेतृत्वाखाली हजारो लोकांचा सहभाग असलेले अनेक मोठमोठे लढे यशस्वीरित्या लढले गेले आहेत. सन १९५८ च्या महाराष्ट्रातील भूमिहीनांच्या लढ्यात चाळीस हजार सत्याग्रही तुरुंगांत गेले होते. तर सन १९६४ साली व्यापक अशा दहा मागण्यांवर झालेल्या देशव्यापी सत्याग्रहात देशभरातून तीन लाख चाळीस हजार सत्याग्रही तुरुंगात गेले होते. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या आदेशानुसार त्यावेळचा शेड्युल्ड कास्ट्स् फेडरेशन हा पक्ष सक्रीय सहभागी झाल्यानंतर कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखाली त्या लढ्याला प्रचंड धार प्राप्त झाली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या धम्मप्रचारातसुद्धा ते अग्रेसर होते. डॉ. बाबासाहेबांनी उद्घोषित केलेला "रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडीया" हा पक्ष बाबासाहेबांच्या महापरिनिर्वाणानंतर कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्याच नेतृत्वाखाली प्रस्थापित झाला. अशा या कर्तृत्ववान नेत्याच्या जीवनावर विस्तृत स्वरूपात लिहिणे आवश्यक होते. परंतु मला विषय देऊन लिहावयास सांगितल्यामुळे त्या मर्यादेतच मी याठिकाणी लिहित आहे.

## महाडच्या दोन ऐतिहासिक परिषदा

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली महाड, जिल्हा रायगड येथे दोन ऐतिहासिक परिषदा झाल्या. पहिली परिषद १९ व २० मार्च १९२७ रोजी झाली. "कुलाबा जिल्हा : बहिष्कृत परिषद अधिवेशन पहिले" या नावाने भरलेल्या परिषदेत चवदार तळ्यावर जाऊन त्या तळ्याचे पाणी प्राशन करण्याचा जो अभूतपूर्व कार्यक्रम झाला, व त्या कृतीकार्यक्रमामुळे माथी भडकलेल्या सवर्ण लोकांनी अस्पृश्य समाजावर अत्याचार केले. त्यांनी आपल्या भाषणात अस्पृश्यवर्गाच्या पूर्वस्थितीची जाणीव करून देताना सांगितले की, "...एकेकाळी जो अस्पृश्यवर्ग सेवक म्हणून नांदत होता तोच वर्ग पलटणीतील नोकरीमुळे अधिकारसंपन्न होऊन दुसऱ्या वर्गावर सत्ता गाजविणारा झाला होता. या पलटणीतील नोकरीमुळे हिंदूसमाजाच्या रचनेत एक क्रांती झाली होती, असे म्हणण्यास काहीच हरकत नाही. ज्या महार, चांभार लोकांना गांवात मराठे वगैरे लोक शिवू देत नसत व ज्यांनी जोहार किंवा राम राम केला नाही तर मराठे लोक आपला अपमान झाला असे समजत, तेच मराठे शिपाई महार व चांभार सुभेदारास लवून सलामी देत असत.....एवढा अधिकार अस्पृश्य जातीच्या लोकांस या देशात कोणत्याही प्रांतांत व यापूर्वी केव्हाही प्राप्त झाला नव्हता; असे म्हणता येईल. या प्रांतांतील अस्पृश्यवर्गाने आपला दर्जा वाढविला होता. इतकेच नव्हे, तर त्यांची शिक्षणातही विलक्षण प्रगती झाली होती. असे असताना आजही आपली अवनत अवस्था का झाली, याचे कारण पलटणीतील नोकरी बंद झाली असे सांगितले जाते. ते काही अंशी खरे आहे, पण ती नोकरी म्हणजे सर्वस्व नव्हे. आपणाला दुसऱ्यांच्या उष्ट्या खरकट्यावर जगण्याची सवय झाली आहे, ती सोडून द्या. तसेच सर्व गलिच्छ कामे सोडून द्या असा आदेश देऊन ते म्हणाले, तुम्ही इतरांसारखे शेती करा, तसेच पांढरपेशा पत्करा. ते पुढे म्हणाले, आचार, विचार आणि उच्चार यांची शुद्धी जोपर्यंत झाली नाही तोपर्यंत अस्पृश्य समाजात जागृतीचे अथवा प्रगतीचे बी कधीही रुजणार नाही." त्यांनी शेवटी अस्पृश्य समाजाला असेही बजावले की "जागृतीचा विस्तव तुम्ही कधीही विझू देता कामा नये."

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या या भाषणाचा अस्पृश्यवर्गावर जबरदस्त परिणाम झाला. त्या दिवसांपासून मेलेली ढोरे ओढणे, गुरांचे कातडे काढणे, घरोघर जाऊन पाईन मागणे इत्यादी कामे अस्पृश्यवर्गाने बंद केली. यामुळे खरे म्हणजे अस्पृश्यांचेच नुकसान झाले. असे असताना गावातील मराठे लोक ही कामे करण्यासाठी त्यांच्यावर सक्ती करू लागले व त्यामुळे रायगड व रत्नागिरी जिल्ह्यातील जवळपास प्रत्येक गांवामध्ये स्पृश्य व अस्पृश्य यांच्यामध्ये मारामारी व झगडे होऊ लागले. अस्पृश्यावर सामुदायिक बहिष्कार टाकणे, नेहमीच्या जाण्यायेण्याच्या वाटा बंद करणे, खोटे खटले दाखल करणे वगैरे अत्याचार होऊ लागले.

परंतु या सर्व अत्याचाराला अस्पृश्यवर्ग पुरून उरला व बाबासाहेबांच्या आदेशाचेच त्यांनी पालन केले. ही अस्पृश्यवर्गास गौरवास्पद अशीच घटना होती.

अस्पृश्यवर्गाच्या पाच हजार वर्षांच्या गुलामगिरीच्या इतिहासामध्ये आपले मानवी हक्क प्रस्थापित करण्यासाठी चवदार तळ्याचे पाणी प्राशन करण्याचा अभूतपूर्व कार्यक्रम केला

गेला. त्याचे वर्णन रक्ताच्या शाईनेच करावे लागेल. या परिषदेचे पडसाद नंतर नाशिक, पुणे या ठिकाणी उमटून अस्पृश्यवर्गात फार मोठी जागृती आणि चैतन्य निर्माण झाले. या जागृतीचे वर्णन करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरित्रकार श्री. चां. भ. खैरमोडे म्हणतात की, ''या सर्व क्रांतीकारक स्फोटांचे परिणाम असे झाले की सामाजिक, शैक्षणिक आर्थिक, राजकीय, धार्मिक सांस्कृतिक इत्यादी सर्व क्षेत्रात आम्ही तुमच्या मांडीला मांडी लावून बसणार व त्यासाठी सर्वस्व पणाला लावून लढा देणार अशी भाषा पददलित-अस्पृश्य समाज हिंदू समाजासमोर छातीठोकपणे उभा राहून बोलू लागला!''

अशा पहिल्या ऐतिहासिक परिषदेचे स्वागताध्यक्ष होते संभाजी तुकाराम गायकवाड. या परिषदेला तीन हजार लोक उपस्थित होते. गं. नी. सहस्रबुद्धे, अनंत विनायक चित्रे, सीताराम नामदेव शिवतरकर, बाळाराम रामजी आंबेडकर, धोंडीराम श्रीराम कोंडविलकर, निवृत्ती तुळशीराम जाधव, पांडुरंग नथुराम राजभोज, शांताराम अनाजी उपशाम, रामचंद्र बाबाजी मोरे, रामचंद्र शिंदे, मोरे, धोंडीराम नारायण गायकवाड, शिवराम गोपाळ जाधव इत्यादी समाजसेवक उपस्थित होते.

**तळ्याचे शुद्धीकरण**

चवदार तळ्याच्या पाण्याला स्पर्श करून अस्पृश्यांनी चवदार तळे बाटविले, या सबबीखाली महाडातील सवर्णांनी चवदार तळ्याचे शुद्धीकरण केले. ही सवर्णांची कृती डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जिव्हारी लागली. त्याबद्दल दिनांक २१/११/१९२७ रोजीच्या बहिष्कृत भारतात ते लिहितात'' ...खरे म्हटले असता अस्पृश्यता इतकी अपमानकारक गोष्ट आहे की तिच्या निवारणार्थ काहींचे प्राण खर्ची पडले तरी हरकत नाही. आपल्या स्पर्शाने अपवित्र झालेली वस्तू गोमूत्र शिंपडून शुद्ध होते असे स्पृश्य लोक मानीतात. स्वधर्माच्या मनुष्याच्या स्पर्शाने जे विटाळते, ते पशूचे मूत्र शिंपडल्याने शुद्ध होते या अत्यंत तिरस्कारणीय विचारात, ती मानवी स्पर्शाच्या भ्रष्टतेची कल्पना अधिक धिक्कारणीय आहे किंवा ती पशूच्या मूत्राने शुद्ध करण्याची भावना अधिक तिरस्कारणीय आहे; हे सांगणे जरी कठीण असले तरी एक गोष्ट उघड आहे की, पशूंच्या मलमूत्रात जेवढे पावित्र्य आहे, तेवढे देखील पावित्र्य स्पृश्यांच्या दृष्टीने अस्पृश्यातील माणसांत नाही; ही स्थिती जगण्यासारखी आहे, असे कोणाही स्वाभिमानी माणसाला वाटणार नाही.''

सवर्णवर्गाच्या या अमानवी कृतीविरुद्ध आवाज उठविण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी बहिष्कृत हितकारिणी सभेच्या वतीने दुसरी सत्याग्रह परिषद महाड येथे दिनांक २५, २६ व २७ डिसेंबर १९२७ रोजी घेण्याचे घोषित केले. स्पृश्यवर्गांसमोर एक प्रकारचे आव्हान उभे केले. या परिषदेला जागेसह कोणतीही इतर वस्तू मिळू नये असा बंदोबस्त सवर्णांनी केला होता. परंतु डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी नेमलेले प्रचारक आणि श्री. अनंत विनायक तथा भाई चित्रे व महाडातील कायस्थ तरूणांनी या सर्व गोष्टीवर मात करून ही परिषद यशस्वी करून दाखविली. या सत्याग्रहाचे जे पहिले पत्रक प्रसिद्ध करण्यात आले. त्यावर डॉ. भीमराव रामजी आंबेडकर अध्यक्ष व सभासद म्हणून सर्वश्री शिवराम गोपाळ जाधव, संभाजी तुकाराम गायकवाड, बाळाराम रामजी आंबेडकर, निर्मल लिंबाजी गंगावणे,

राघो नारायण वनमाळी, गणपत महादेव जाधव, गोविंद रामजी आड्रेकर, पांडुरंग महादेव ववुरकर, लक्ष्मण गणू पूसयीनकर, सखाराम रत्ना नागावकर, अर्जुन रामजी नडगावकर, चांगदेव नारायण मोहिते, पांडुरंग बाबाजी मांडलेकर, भागूराम रामजी शिरगावकर, सोनू सजन संदिरकर, विठ्ठल लक्ष्मण तीडकर, भाऊ बाळू जाधव, भाविकनाथ रत्नू साळवे, पंढरीनाथ रामचंद्र आसूडकर, व सीताराम नामदेव शिवतरकर, सेक्रेटरी, सत्याग्रह समिती यांची नांवे आहेत.

या सत्याग्रहाकरिता डॉ. बाबासाहेब आंबेडकर व दोन-अडीचशे कार्यकर्ते दिनांक : २४ डिसेंबर १९२७ रोजी सकाळी पद्मावती बोटीने निघाले या मंडळीत मुंबईचे शिवतरकर, धोंडो नारायण गायकवाड, कांबळे, गंगावणे, वनमाळी, पुण्याचे राजभोज नाशिकचे भाऊराव गायकवाड वगैरे अस्पृश्य पुढारी होते. स्पृश्य समाजसेवकांपैकी श्री. गं. नी. सहस्रबुद्धे, प्रधानबंधु इत्यादी होते.

### मनुस्मृतीचे दहन

दिनांक २५ डिसेंबर १९२७ रोजी परिषदेच्या कामकाजाला प्रारंभ झाला. सर्वप्रथम डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अत्यंत प्रभावी असे भाषण झाले. त्यांनी आपल्या भाषणात या सत्याग्रह परिषदेची तुलना फ्रान्सच्या क्रांतीशी केली व असे घोषित केले की, "ही परिषद समतेची मुहुर्तमेढ रोवण्यासाठी बोलाविण्यात आली आहे." या भाषणाबद्दल कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी असे म्हटले आहे की, डॉ. बाबासाहेबांची इतर अनेक भाषणे मी विसरून गेलो आहे. पण त्यांचे महाड येथील भाषण आजही माझ्या कानात गुणगुणत आहे. फ्रान्सच्या क्रांतीत तेथील त्रैवर्णिकांचा एक वर्ण करण्यात आला व जगाला शाश्वत मूल्ये देणारी समता, स्वातंत्र्य व बंधुत्व या तत्त्वाचा उद्घोष करण्यात आला. त्यानुसार भारतातील चार वर्णिकांचा समाज मोडून त्यांचा एक वर्ण करण्यात यावा व त्यांस "हिंदू" या संज्ञेने संबोधण्यात यावे अशी बाबासाहेबांची इच्छा होती. याद्वारे त्यांना हिंदूंची संघटना मजबूत करून त्याद्वारे त्यांना उभारणीचे कार्य करावयाचे होते त्याकरिता त्यांनी हिंदूमात्राचा जन्मसिद्ध हक्कांचा जाहिरनामा घोषित केला. तो असा-

### हिंदूमात्राचा जन्मसिद्ध हक्कांचा जाहिरनामा

१) सर्व माणसे जन्मतः समान दर्जाचीच आहेत. व ती मरेपर्यंत समान दर्जाचीच राहातील. लोकोपयोगित्वाच्या दृष्टीनेच त्यांच्या दर्जात फरक पडू शकेल. एरव्ही त्यांचा समान दर्जा तसाच कायम राहिला पाहिजे. म्हणून राज्यकारभारात आणि सार्वजनिक व्यवहारात समानतेच्या तत्त्वाला बाधा येईल अशा कोणत्याही धोरणाला व विचाराना थारा मिळू नये असे या सभेचे मत आहे.

२) वरील जन्मसिद्ध मानवी हक्क कायम राहावेत हाच राज्यव्यवस्थेचा व समाजव्यवस्थेचा अंतिम हेतू असला पाहिजे. याकरिता हिंदू समाजाच्या विषमतामूलक रचनेचा व तशा रचनेचा पुरस्कार करणाऱ्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथवचनांची, ही सभा तीव्र निषेध करते.

३) अखिल प्रजा हेच सर्व प्रकारच्या अधिकाराचे व सत्तेचे उगमस्थान आहे. कोणत्याही

व्यक्तीचे, समुदायाचे. अगर वर्णाचे विशिष्ट हक्क; जर ते बहुजन समाजाने दिलेले असतील तर ते इतर कशाच्याही आधारावर - मग तो आधार राजकारणाचा असो अगर धर्मकारणाचा असो — मान्य होण्यास पात्र नाही. यास्तव समाजव्यवस्थेच्या बाबतीत श्रुती, स्मृती व पुराणे वगैरे ग्रंथाचे प्रामाण्य कबूल करण्यास ही सभा तयार नाही.

४) कोणत्याही व्यक्तीला आपल्या जन्मसिद्ध हक्काप्रमाणे वागण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे. त्यावर मर्यादा घालण्यात आली तर ती दुसऱ्या व्यक्तीला तिचा तशाच प्रकारचा जन्मसिद्ध हक्क उपभोगण्यास अवसर मिळावा, इतक्यापुरतीच घालता येईल. ती मर्यादा खुद्द लोकांनी केलेल्या कायद्यांनी ठरविली पाहिजे. धर्मशास्त्राच्या किंवा दुसऱ्या कसल्याही आधाराने ती ठरविली जाता कामा नये. यास्तव अष्टाधिकारासारख्या बाबतीत जाती-जातीत ठरवून दिलेल्या असमानतेच्या व्यवस्थेचा ही सभा धिक्कार करते.

५) जेवढ्या गोष्टी समाजास विघातक होतील तेवढ्याच करण्याची कायद्याने बंदी केली पाहिजे. तसेच जी गोष्ट करणे कायद्याने अवश्य ठरविली नसेल ती गोष्ट करावयास कोणासही भाग पाडता कामा नये. यास्तव, रस्त्यांच्या, सार्वजनिक जगांच्या, सार्वजनिक पाणवठ्यांचा व देवालयांचा वगैरे उपयोग करण्यास कोणाला कोणाचाही मज्जाव असता कामा नये. यास्तव, तसा मज्जाव करू पाहाणारे लोक हे सुव्यवस्थित समाजरचनेचे व न्यायाचे शत्रू आहेत, असे ही सभा समजते.

६) कायदा म्हणजे अमूक एका वर्गानेच ठरविलेली बंधने नव्हेत. तो कोणत्या प्रकारचा असावा, हे ठरविण्याचा हक्क सर्व प्रजेस अगर तिच्या प्रतिनिधीस पाहिजे. हा कायदा संरक्षणात्मक असो वा शासनात्मक असो, तो सर्वांना सारखाच लागू असला पाहिजे आणि समाजरचना, समतेच्या पायावर करावयाची असल्यामुळे मान-सन्मान,अधिकार व व्यवसाय यांच्याबाबतीत जात आड येता कामा नये. भेदाभेद व्हावयाचा तो केवळ व्यक्तीच्या गुणभेदामुळेच झाला असला पाहिजे. अन्यायामुळे होता कामा नये. याकरिता प्रचलीत जातीभेद पद्धतीचा व तदनुषंगिक विषमतेचा ही सभा तीव्र निषेध करते.

हा जाहिरनामा ठराव क्रमांक एक म्हणून मांडण्यात आला. तो ठराव सत्त्याग्रह समितीचे सेक्रेटरी सीताराम नामदेव शिवलकर यांनी मांडला व त्यास कर्मवीर दादासाहेब गायकवाड यानी पाठिंबा दिला. एन. टी. जाधव व गंगाबाई सावंत यांची या ठरावावर भाषणे झाली. चवथ्या ठरावाने "धर्माधिकारी" ही संस्था विशिष्ट समाजापुरती मर्यादित न ठेवता ती लोकानुवर्ती व लोकनियुक्त करण्यात यावी अशी मागणी करण्यात आली. अशा प्रकारचे दिवसभराचे कामकाज पार पाडल्यानंतर श्री. गं. नी. सहस्त्रबुद्धे व अस्पृश्य समाजातील चार-पाच साधू यांचे हस्ते मनुस्मृतीचे जाहीर दहन करण्यात आले. या घटनेचे पडसाद केवळ भारतापुरतेच नव्हे तर संपूर्ण जगभर उमटले. मनुस्मृती जाळल्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यावर चौफेर अशी टीका करण्यात आली. या टीकेला डॉ. बाबासाहेबानी अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने उत्तर दिले. मनुस्मृति का जाळली याचे विवेचन करताना

डॉ. बाबासाहेब म्हणतात, "आम्ही जे मनुस्मृतीचे वाचन केले आहे, त्यावरून आमची खात्री झाली आहे की, त्या ग्रंथात शूद्रजातीची निंदा करणारी, त्यांचा उपमर्द करणारी, कुटाळ उत्पत्तीचा कलंक त्यांच्या माथी मारणारी व त्यांच्याविषयी समाजात अनादर वाढविणारी वचने ओतप्रोत भरलेली आहेत. त्यात धर्माची धारणा नसून असमतेची मात्र धुळवड घातली आहे. स्वयंनिर्णयाचे तत्त्व प्रस्थापित करावयास निघालेल्या सुधारणावाद्यास, असला ग्रंथ कधीच मान्य होणे शक्य नाही व तो अस्पृश्य वर्गासही मान्य नाही. एवढेच दर्शविण्याकरिता महाड येथे त्याची होळी करण्यात आली."

दिनांक २६ डिसेंबर १९२७ रोजी सकाळी ९.३० वाजता दुसऱ्या दिवसाच्या कामकाजाल सुरुवात झाली. त्या दिवशी प्रामुख्याने सत्याग्रहावर चर्चा होणार होती त्यामुळे परिषदेला विषयनियामक कमिटीचे स्वरूप देण्यात आले. 'सत्याग्रह करावा' असा ठराव स्वत: डॉ. बाबासाहेब आंबेडकर यानीच चर्चेसाठी मांडला. या ठरावावर १२ अनुकूल व ८ प्रतिकूल लोकांची भाषणे झाली. त्यानंतर डॉ. बाबासाहेब यांनी सत्याग्रहात भाग घेणाऱ्या लोकांची नाव-गावासह यादी तयार करण्याकरिता १०-१२ लोकांना मुक्रर केले. एका तासातच तीन हजार आठशे चौऱ्याऐशी लोकांनी आपली नावे नोंदविल्यामुळे शेवटी हे नोंदणीचे काम सोडून देण्यात आले. एकूण दहा हजार लोक तुरुंगात जाण्यास तयार झाले. त्यानुसार डॉ. बाबासाहेबांनी कलेक्टरांना लोक सत्याग्रह करण्यास आग्रही आहेत असे कळविले.

**कलेक्टरांची मध्यस्थी**

सायंकाळी ५ वाजता कलेक्टर पोलीस सुपरिटेंडेन्टसह परिषदेच्या स्थळी दाखल झाले. त्यांनी परिषदेत भाषण करताना सांगितले की, महाडच्या सवर्णांनी दिवाणी न्यायालयात केस दाखल केली असून त्या केसचा निकाल लागेपर्यंत चवदार तळ्यावर जाण्यास तात्पुरता मनाईहुकूम मिळविला आहे. सबब आपण कायद्याचे उल्लंघन न करता आपला सत्याग्रह काही काळ स्थगित करावा. कलेक्टरांचे हे भाषण झाल्यानंतर सभामंडपातून ते निघून गेले. तदनंतर या प्रस्तावावर कोणाला बोलावयाचे आहे का असे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी विचारताच, कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी मला बोलावयाचे आहे असे सांगितले. ते भाषणासाठी उभे राहिले. ते आपल्या भाषणात म्हणाले "माझ्या बांधवानो, आताच डॉ. बाबासाहेबांचे भाषण आपण ऐकले आहे. मी तर कालपासून त्यांचे विचार जीवाचे कान करून ऐकत आलो आहे. कालच्या त्यांच्या भाषणातील आवेश, आवेग, आजच्या त्यांच्या भाषणाला मिळालेली कलाटणी, यातील फरक माझ्या अल्पमतीला समजत नाही. ते म्हणतात, स्पृश्य हिंदूंनी तळ्यावर प्रवेश करण्याबद्दल कोर्टाकडून मनाईहुकूम मिळविला आहे. ठीक आहे. तेव्हा हा लढा आता सरकार आणि आपल्यामध्ये होणार आहे, असा त्यांच्या भाषणाचा रोख आहे, म्हणून हा सत्याग्रह आपण स्थगित करावा अशी त्यांची इच्छा आहे. मला हे पसंत नाही. मित्रांनो, आपली ही चळवळ कशासाठी आहे? मानवी हक्क प्रस्थापित करण्यासाठी आपण सारे स्वखर्चाने इथे आलो आहोत. तीन-तीन, चार-चार, दिवसांच्या भाकरी बांधून, घरदार, शेती, रोजचा उद्योग तसाच मागे ठेवून येथे आपण जमलो आहोत ते असे परत जाण्यासाठी नव्हे. आम्ही परत गेल्यावर तेथे काय सांगणार?

कोर्टाचा मनाईहुकूम आला म्हणून आम्ही तळयावर जाऊ शकलो नाही! ते तर अत्यंत नामुष्कीचे आहे. पहिल्यांदाच एवढ्या मोठ्या संख्येने महाराष्ट्रातून आपण सारे जमलो आहोत तेव्हा नुसते हात हालवित परत जाणे पुरुषार्थाला शोभून दिसणार नाही. खूप दिवसांनी एखाद्या बाईला मूल होत आहे पण दुर्दैवाने ते मूल जर आडवे आले तर मग कापून काढण्याशिवाय दुसरा इलाज नसतो. तसेच स्पृश्य हिंदूंना कायद्याच्या दृष्टीने मदत करणाऱ्या या इंग्रज सरकारला आता कापून काढण्याची वेळ आली आहे. तेव्हा बांधवानो! माझ्या मते तर हा सत्याग्रह कोणत्याही परिस्थितीत झालाच पाहिजे.''

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या भाषणाला लोकांनी उत्स्फूर्त प्रतिसाद दिला. परंतु त्यावेळची एकंदर परिस्थिती विचारात घेता, सरकार व स्पृश्यवर्ग या दोघांविरुद्ध एकाचवेळी लढणे अस्पृश्य वर्गाला मुळीच परवडणारे नव्हते. त्यामुळे शेवटी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या शब्दाला मान देऊन त्यांनी सत्याग्रह तहकुबीचा जो ठराव मांडला होता, त्यास सर्व जनतेने कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचेसह पाठिंबा दिला व सत्याग्रह तहकूब करण्यात आला. अशा प्रकारे दुसऱ्या दिवसाचे कामकाज संपले.

तिसऱ्या दिवशी, दिनांक २७ डिसेंबर १९२७ रोजी जमलेल्या सर्व प्रतिनिधींची महाड शहरातून प्रचंड मिरवणूक काढण्यात आली. त्या मिरवणुकीने तळ्याच्या चारी बाजूला वेढा देण्यात आला. तद्नंतर मिरवणूक शांततेने परत सभामंडपात आली. परिषदेला पुन्हा सुरूवात झाल्यानंतर श्री. शिवतरकर यानी खालील ठराव सभेपुढे मांडला –

''ही परिषद यशस्वी करण्याचे कामी ज्या अस्पृश्येतर सद्गृहस्थांनी मदत केली त्यांचे व विशेषत: खालील सद्गृहस्थांचे ही सभा कृतज्ञतापूर्वक आभार मानीत आहे.

सर्वश्री अ. वि. चित्रे, सुरेंद्रनाथ टीपणीस, फत्तेखान साहेब, मुठोलीकर, शांताराम रघुनाथ, पोतनीस, केशवराव देशपांडे, ग. नी. सहस्त्रबुद्धे नंतर श्री. वामनराव पत्की व श्री. कमलाकर टिपणीस यांनी केलेल्या कामागारीबद्दल त्यांचे आभार मानून त्यांना दोन सोन्याच्या आंगठ्या अर्पण करण्यात आल्या. तद्नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्वत: ठराव मांडला. सत्याग्रह परिषदेकरिता नेमलेले प्रचारक सर्वश्री शिवराम गोपाळ जाधव, संभाजी तुकाराम गायकवाड, भाऊ बाळू वारंगकर, पंढरीनाथ रामचंद्र आसूडकर, भाविनाथबुवा फलाणकर व पाडुरंग महादेव वोडरकर यांनी आपली कामगिरी बजाविल्याबद्दल ही परिषद त्यांचे आभार मानते. व श्री. वोडरकर, सखाराम गोपाळ आचलोलकर, महादेव आचलोलकर यांनी आपणास परिषदेच्या कार्याकरिता स्वखुषीने अर्पिले हे ध्यानात घेऊन त्यांना एक एक चांदीचा बिल्ला पारितोषिक म्हणून देत आहे.''

यानंतर अस्पृश्योन्नती व स्त्रियांची जबाबदारी या विषयावर तेथे जमलेल्या अस्पृश्यवर्गातील स्त्रियांसमोर डॉ. बाबासाहेबांनी भाषण करून स्त्रियांनीसुद्धा अस्पृश्योद्धाराच्या चळवळीत भाग घेऊन पुरुषांच्या बरोबरीने कार्य केले पाहिजे. असा उपदेश केला. तद्नंतर परिषदेचे कामकाज संपले.

या परिषदेपुढे कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी जे क्रांतीकारक भाषण केले ते विचारात घेता, त्यांच्या भावी नेतृत्वाचे बीजारोपण या परिषदेमध्ये झाले, असे म्हणणेच रास्त ठरेल. त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन!

# डॉ. आंबेडकर यांच्या महापरिनिर्वाणानंतरची चळवळ आणि दादासाहेब

**अविनाश महातेकर**

दलित आणि शोषितांच्या प्रश्नांचे उठाव; हाही महाराष्ट्राच्या सर्वांगाच्या इतिहासाचा भाग मानला, तर या उठावाचे नायक कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे महाराष्ट्राचे एक प्रमुख नेते ठरतात. पण आपल्याकडे इतिहासाचे मापदंड फार वेगळे आहेत. त्यामुळे दादासाहेबांच्या कार्यकर्तृत्वाचं राज्याच्या पातळीवर नीट मोजमाप झालेलं नाही.

'कसेल त्याची जमीन, पण नसेल त्याला काय?' हा बुलंद सवाल कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी शासनकर्त्यांसमोर उभा केला. हा सवाल म्हणजे केवळ वाक्यरचनेची मोहक करामत नव्हती. तर, इथल्या जातीपातीच्याही पलिकडं असलेल्या सर्वात भुकेकंगाल समूहाचा अहम् प्रश्न या शब्दातून उभा केला होता. या प्रश्नावर दादासाहेबांनी उभ्या देशभर आंदोलन केलं, नी भूमिहीन समूहाचे अस्तित्व त्यांच्या प्रश्नासकट चर्चेला आणलं. हे दादासाहेबांच्या कर्तृत्वाचं मोठेपणच होतं. ज्या वर्गाचं अस्तित्वच इथं मान्य नव्हतं, त्यावर्गाचं अस्तित्व आणि त्यांचा प्रश्न मध्यवर्ती प्रवाहात चर्चेला आणायचं काम दादासाहेबांनी केलं. आणि म्हणूनच कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे समग्र भुकेल्या समूहाची भूक जाणणारे नी त्यावर मूळातून उपाय शोधणारे नेते ठरतात.

दादासाहेब गायकवाड हे आंबेडकरी चळवळीतले कसलेले नी रांगड्या व्यक्तिमत्वाचे रिपब्लिकन कर्मवीर होते. त्यांची पहिली आणि अंतीम ओळख म्हणजे ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे जवळचे सहकारी, विश्वासू अनुयायी, त्यांच्या विचारांवर निष्ठा बाळगून रान उठवणारे हाडाचे संघटक, आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या पश्चात या समाजावर मायेचा पदर धरणारे नेते, ही होय. डॉ. आंबेडकर म्हणजे विस्तीर्ण आभाळ. त्या आभाळाच्या सावलीची आस असलेल्यांना धीराचा शब्द देणं हे उदात्त काम दादासाहेबांवर येऊन पडलं. हे काम अंगावर घेणं म्हणजे स्वत:ची आगळी वेगळी ओळख विसरून झोकून देऊन काम करणं होय. ते दादासाहेबांनी समर्पित भावनेनं पार पाडलं.

मी दादासाहेबांना शेवटचं पाहिलं ते; ते भीमज्योत घेऊन पुण्याला आले होते तेव्हा दादासाहेब रिपब्लिकन पक्षाचे लोकनेते होते, नी आम्ही शाळकरी मुलं होतो. भीमज्योतीचं पुण्यात प्रचंड मोठं स्वागत झालं. त्यावेळी नुकतीच खरेदी केलेली नि आतापर्यंत वादग्रस्त

ठरलेली बुद्धीस्ट सोसायटीची, जुन्या मोदीखान्याजवळ भवानी पेठेत मोठी मोकळी जागा होती. तिथे मंडप आणि मोठा स्टेज उभारलं होतं. दिवसभर पुण्याचे कार्यकर्ते धावपळ करीत होते. भीमज्योतीची वाट पहात होते. या ज्योतीसोबत असलेले दादासाहेब रात्री उशीरा सभेच्या ठिकाणी आले. आले म्हणजे त्यांना आणलं गेलं. दादासाहेब त्या भव्य स्टेजवर चढू शकत नव्हते. स्टेजच्या बाजूला एका घाईघाईत आणलेल्या खुर्चीवर दादासाहेबांना कसंबसं बसवलं होतं. प्रचंड गर्दीचा कल्लोळ भीमज्योतीचं दर्शन घेत होता, नी त्याच भावनेने दादासाहेबांचं दर्शन घेत होता. अभिवादनासाठी त्यांचा हात कसाबसा हालत होता. दादासाहेबांच्या अंगावरून वारं गेलं होतं. त्यांना पॅरेलिसीसच्या दुखण्याने खिळवून ठेवलं होतं. अर्ध शरीर गलितगात्र झालेलं होतं. मदतीशिवाय त्यांच्या हालचाली होत नव्हत्या. तोंडातून शब्द कसेबसे घरंगळायचे आणि तरीही डोक्यावर निळ्या टोपीची ऐट होती. एक सळसळत्या रक्ताचा देह सरत चालला होता. जे पहिल्यापासून एका लढवय्या सैनिकाची भूमिका जगले होते, ते दादासाहेब विकलांग होत चालले होते. जनता डोळ्यात आसवं आणून दादासाहेबांचं दर्शन घेत होती. आम्हा लहान मुलांना यावेळी काही कळत नव्हतं. पण शरपंजरी पडलेला हा भीष्म आमच्या काळजाला भिडत होता. सर्वांग, सर्वपरीचे वार झेलून घायाळ झालेले, पण झुंजार माणसं रणमैदान सोडत नाहीत. दादासाहेबांनी रणांगण सोडलेलं नव्हतं.

याउप्पर माझ्यासारख्यांनी दादासाहेबांना किती पाहिलंय माहीत नाही. पण जेव्हा चळवळ कळू लागली तेव्हा दादासाहेबांना ओलांडून पुढे जाता येत नाही, असंही कळलं.

एखाद्या मोठ्या ताकदीच्या व्यक्तीनंतर त्या चळवळीचं नेतृत्व करण्याची जबाबदारी ज्यांच्यावर येते, त्यांचा खरंच कस लागतो. फार कुचंबणा होते. त्या भारलेल्या व्यक्तीमत्त्वाचा प्रचंड प्रभाव जनतेवर असतो. तुलना होत राहते. त्या महान व्यक्तीविषयी समाजाला वाटत असलेल्या श्रद्धेला अजिबात तडा जाऊ न देता आणि त्या व्यक्तिमत्त्वाची सही सही नक्कल करतोय असंही समाजाला भासू न देता समाजाचं नेतृत्व करणं ही जिकीरीचीच गोष्ट. ती दादासाहेबांसमोर वाढून ठेवली होती. डॉ. आंबेडकर म्हणजे कुठून सुरूवात करावी नी कुठं नेऊन भिडवावं असं अपरंपार व्यक्तिमत्त्व. चंद्राला म्हणतंय उगवू नको नी सूर्याला म्हणतंय मावळू नको, अशा तेजोमय ताकदीचं. त्यांच्यानंतर लोकांना लख्खकन् बघायला लावील असं नेतृत्व होणंच मुश्कील. लोकांच्या मानसिकतेचीच एक पोकळी तयार होते. या पोकळीत राहून कितीही काम केलं तरी कमीच पडतं. कार्यकर्तृत्वाचा हा असा कालखंड दादासाहेबांच्या वाट्याला आला, नी त्यांनी तो सहज झेलला.

आंबेडकरी चळवळीतल्या अनेक मातब्बर नेत्यांच्या कर्तृत्वाचं योग्य ते मूल्यमापन झालं नाही, किंवा कौतुकाचे चार शब्द त्यांच्या वाट्याला आले नाहीत. असं मला वाटत राहतं. एकतर एवढ्या उंचीच्या माणसानंतर, तेवढ्या उंचीचं नेतृत्व देणं कुणीच शक्य नाही. त्यामुळं नंतरच्या नेतृत्वानं कितीही काम केलं तरी ते कमीच वाटावं अशी अवस्था. त्यात भरीसभर म्हणून डॉ. आंबेडकर आपल्या उतारवयात चळवळीसंबंधी असं म्हटल्याचं जगजाहीर झालंय की, 'हा रथ मी इथवर आणलेला आहे. तो पुढे नेता आला नाही तर नेऊ नका. पण मागे जाऊ देऊ नका!' डॉ. आंबेडकरांची अनेक साधीसुधी वाक्यं ही एखाद्या सिद्धांताचं

काम करतात. हा रथ मागे नेऊ नका. हा त्यांचा संदेशही अगदी रास्त आहे. रथ पुढे नेला नाही तर चालेल, या मागची; माझ्यानंतर ही चळवळ चालवण्याचा वकूब कार्यकर्त्यांमध्ये आहे की नाही, अशी शंका जर डॉ. आंबेडकरांना असेल, तर त्यातही काही चूक नाही. डॉ. आंबेडकरांची दृष्टी कळायला त्यांच्या महानिर्वाणानंतरची एवढी वर्षं जावी लागली. डॉ. आंबेडकरांच्या या एका वाक्यामुळं चळवळीचं मोजमाप करायला समाजाला एक मापदंड मिळाला. रथ पुढे गेला नाही ही लोकांची आमभावना आहे. तो जागेवरच उभा आहे की घरंगळत मागे आलाय यावर मतभिन्नता आहे. पण मुद्दा असा आहे की, या रथाला ज्यांनी शक्ती लावून पेलून धरलं त्यांचं चळवळीच्या ओघात योग्य ते मूल्यमापन झाले नाही. दादासाहेबांवर तर मोठाच अन्याय झाल्याचं दिसून येईल. डॉ. आंबेडकरांच्या मार्गदर्शनाखाली कुशल संघटक म्हणून ख्याती मिळवलेल्या दादासाहेबांना, स्वत: मार्गदर्शकाची भूमिका बजावताना खूप वार अंगावर घ्यावे लागले. त्यामुळं नंतरच्या काळातली त्यांची संसदीय राजकारणातली भूमिका, धर्मांतराचा प्रसार, बौद्धांच्या सवलतीचा प्रश्न, भूमिहीनांचे आंदोलन, संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीतला सहभाग इत्यादी वेळी दिसून आलेला कणखरपणा, संपूर्ण राज्याच्या नेतृत्वाशी तुलना करता काहीसा दुर्लक्षितच राहिला.

नंतरच्या काळातल्या रिपब्लिकन पक्षाच्या नेतृत्वाच्या पोकळीतच पँथरच्या खाणाखुणा उमटल्या असं मानलं जातं. रिपब्लिकन नेतृत्वाचे सडेतोड विच्छेदन करणाऱ्या पँथरनेही दादासाहेबांच्या नेतृत्वाला अपवाद केला होता. डॉ. आंबेडकर कळलेला एकमेव रांगडा माणूस म्हणून दादासाहेबांचा गौरव केला होता. 'कागदाला कोण हुंगतय' असं म्हणत दादासाहेब धारदारपणे रस्त्यात उतरत होते. त्याबद्दल आम्ही त्यांना मानत होतो.

कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या नेतृत्वाखाली जे सामाजिक प्रश्न धसास लागत होते त्यातला त्यांचा सहभाग, नी डॉ. आंबेडकरांनी समाजासाठी राजकीय सत्ता मिळवण्याचा जो प्रयत्न केला त्यातला त्यांचा वाटा; आणि दुसरा; डॉ. आंबेडकरोत्तर चळवळीला तोलून धरण्याचं त्यांनी दाखवलेलं नेतृत्वाचं कसब आणि त्या परिणामी आजच्या पिढीवर त्यांची राहिलेली छाप!

डॉ. आंबेडकरांनी एकेक करून उभ्या केलेल्या सामाजिक संघर्षाच्या मुद्द्यांवर दादासाहेबांचा सहभाग हा आग्रही आणि आक्रमक होता. महाडच्या पाण्याची परिषद असो किंवा मंदिर-प्रवेशाची चळवळ असो, दादासाहेबांमधल्या आक्रमक सेनानीचं आणि लोकलढा लढवण्याच्या बांधिलकीचं त्यात दर्शन घडतं. डॉ. आंबेडकरांनी वैचारिक पातळीवर सामाजिक पिळवणूक करणारा हिंदू धर्म धारेवर धरला होता. त्यासाठी त्यांनी वेगवेगळी व्यासपीठं निर्माण केली होती. या वैचारिक लढ्याला लोकसंघर्षाचा आधार देण्याचं काम करण्यात दादासाहेब आघाडीवर होते. नाशिक हे महाराष्ट्रातलं एक तीर्थक्षेत्रच. त्यावेळी मुंबईसारख्या ठिकाणी संघर्ष करणं ही वेगळी गोष्ट होती नि गावभागात धार्मिक मुद्द्यावर संघर्ष करणं, ही वेगळी बाब होती. दादासाहेबांनी रणमैदान म्हणून नाशिकची निवड केली. काळराम मंदिर प्रवेश, पांडव प्रतापाची अस्पृश्यांनी काढलेली मिरवणूक, येवला परिषद या प्रत्यक्ष धार्मिक बंडाच्या गोष्टी त्यांनी नाशिकात घडवल्या. दादासाहेबांची या प्रत्येक आंदोलनाच्या पाठीमागे तर्कशुद्ध व डॉ. आंबेडकरांच्या विचारांशी सुसंगत अशी भूमिका होती. त्यामुळे एवढा मोठा संघर्ष

उभा करून नाशिकातील तमाम लोकांना दादासाहेबांविषयी आदर वाटत राहिला. त्याच दरम्यान ते दलितांच्या आर्थिक प्रश्नावरही लढत होते. धुळे, जळगाव, अमळनेर इथले अतिक्रमीत जमिनीचे लढे त्यांनी लढवले. मनमाडपर्यंत रेल्वेने कब्जा केलेली पण पडून असलेली जमीन भूमिहीन शेतकऱ्यांना द्यावी म्हणून ते लढत होते. डॉ. आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली दादासाहेबांचं नेतृत्व घडत गेलं, आकार घेत गेलं.

इसवी सन १९५६नंतरची दादासाहेबांच्या नेतृत्वाची कळाच वेगळी आहे. डॉ. आंबेडकरांच्या महानिर्वाणानंतर त्यांच्या शोकाकुल झालेल्या दुबळ्या जनतेवर मायेचं पांघरूण दादासाहेबांनी धरलं यात शंका नाही. पक्षातला अंतर्गत संघर्ष अंगावर घेऊनही दादासाहेबांनी काही महत्त्वाच्या गोष्टी केल्या. ज्या उत्तुंग माणसाने देशाला लोकशाही आणि संविधान दिलं, त्यांच्या डोक्यात एका अपरिहार्य राजकीय पक्षाची संकल्पना घोळत होती. भारतीय जनतेला खुले पत्र लिहून ती राजकीय संकल्पना त्यांनी कागदावर उतरवली होती. डॉ. आंबेडकरांच्या पश्चात त्यांच्या अनुयायांनी रिपब्लिकन पक्षाची स्थापना केली. या संस्थापनकार्यात दादासाहेबांचा वाटा मोठा होता. ही स्थापना निश्चितच सोपी नव्हती. दबून असलेले वाद उफाळून आले होते. शिकलेले अन् न शिकलेले, पँटवाले नि धोतरवाले अशा स्वरूपावर हे वाद पोचत होते. डॉ. आंबेडकर कुणाला कळले असा त्यातला ज्ञानाचा गंड होता. प्रत्येकाच्याच कार्यशैलीवर प्रत्येकाचेच आक्षेप होते. सगळ्या गोष्टी होत्या. अशा अविश्वासाच्या परिस्थितीत रिपब्लिकन पक्षाचा जन्म झाला. पक्षाचे पदाधिकारी आणि नेते कोण होते, हा मुद्दा नाहीये. पण त्याही परिस्थितीत बाबासाहेबांनंतर दादासाहेब अशी भावना तयार होत गेली. तीन ऑक्टोबर एकोणिसशे सत्तावन्न रोजी रिपब्लिकन पक्षाची स्थापना झाली. दादासाहेब, म्हटलं तर सर्वेसर्वा होते. पण सहकाऱ्यांची विरोधाची भावना लक्षात घेऊन दादासाहेब अध्यक्षपदापासून लांब राहिले. मद्रासचे एन. शिवराज हे पक्षाचे अध्यक्ष झाले. दादासाहेब पक्षाच्या स्थापनेनंतर तब्बल आठ वर्षांनी, म्हणजे चौसष्ट साली दिल्ली अधिवेशनामध्ये पक्षाचे अध्यक्ष झाले. पण हा सारा काळ रिपब्लिकन पक्ष म्हणजेच दादासाहेब असाच होता.

एका महत्त्वाच्या घटनेसाठी दादासाहेब आख्ख्या महाराष्ट्राच्या लक्षात राहिले पाहिजेत. अवघ्या महाराष्ट्राने त्यांची कृतज्ञता व्यक्त केली पाहिजे. पण तसे होत नाही. का होत नाही हा छळणारा प्रश्न आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीमध्ये कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या नेतृत्वाखालील रिपब्लिकन पक्षाचा सुपाएवढा वाटा आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात दादासाहेब आणि रिपब्लिकन पक्ष पूर्ण ताकदीने उतरला होता. त्यावेळी तो शेकाफे ते रिपब्लिकन अशा नामसंक्रमणाच्या अवस्थेत होता. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनात उतरण्याचा निर्णय डॉ. आंबेडकरांच्या हयातीतच आणि त्यांच्याशी विचारविनिमय करूनच झाला होता. त्यावेळी डांगे, जोशी, गोरे, अत्रे, ठाकरे इत्यादी नामवंत मंडळी समितीचं नेतृत्व करीत होते. समाजवादी व कम्युनिस्टांची कामगार संघटनांवर मजबूत पकड होती. त्यामुळे सबंध कामगार या लढ्यात उतरला होता. शेतकरी होता. पण आंबेडकरी समाज या लढ्यात उतरल्यानंतरच त्याला खरी ताकद प्राप्त झाली हे देखील एक वास्तव आहे. दादासाहेबांचा झंझावाती दौरा, समितीच्या सभांतून केलेली तडफदार भाषणं, युक्तिवाद, मोर्चा-आंदोलनातून त्यांनी उतरवलेली दलितांची ताकद ह्या सगळ्या संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीला आकार

देणाऱ्या गोष्टी आहेत. तोपर्यंत काँग्रेसला निवडणूकीतला पराभव माहीत नव्हता भरघोस विजयाची त्यांना सवय झाली होती. पण दादासाहेबांच्या प्रभावी भाषणाने काँग्रेसला धडकी भरली होती. सत्तावन्नच्या निवडणुकीत समितीला मोठं यश मिळालं, त्याचं कारण रिपब्लिकन पक्षाचा 'हत्ती' त्यांच्या सोबत होता. म्हणून तर शिवाजीपार्कच्या कलशसभेत जेव्हा सारेच वक्ते यशवंतराव चव्हाणांची स्तुती करीत होते, तेव्हा दादासाहेब गरजले की 'या महाराष्ट्राचे जन्मदाते बाप आम्ही आहोत.' ती केवळ तोंडवेल्हाळ माणसाची दर्पोक्ती नव्हती, तर संयुक्त महाराष्ट्र मिळवण्यात आमचाही सिंहाचा वाटा आहे, हे सांगणारी अभिमानाची ललकारी होती.

संयुक्त महाराष्ट्राचा प्रांजळ इतिहास समोर आला तर त्यातला दादासाहेबांचा नि रिपब्लिकन अनुयायांचा वाटा स्पष्ट होईल. डॉ. आंबेडकरांनी सुद्धा त्यांची राज्यपुनर्रचने विषयाची मतं बाजूला ठेवून संयुक्त महाराष्ट्राला पाठिंबा दिला, आंदोलनात उतरण्याच्या सूचना त्यांच्या अनुयायांना दिल्या ही देखील लढ्याचे बळ वाढवणारी गोष्ट आहे.

संयुक्त महाराष्ट्र समितीच्या लढ्यातील सहभागाने एक गोष्ट झाली होती. तोपर्यंत अस्पृष्यांचे प्रश्न ते राखीव जागा या लढ्याच्या परिणामी आंबेडकरी समूह गावोगावी एकटा पडला होता. पण जेव्हा संविधानावर आधारित साऱ्या देशाचे राजकारण ही प्रक्रिया सुरूवात झाली तेव्हा इतर समूहातून राजकीय मित्र जोडले जाणे आवश्यक होते. रिपब्लिकन पक्षाची संहिता ही व्यापक राजकारणाची सुरुवात होती. पण ही संहिता समजून घ्यायला वेळ लागणार होता. त्यामुळे स्वत: भोवती अपरिहार्यपणे पडलेले कोंडलेपण समितीच्या माध्यमातून तोडता आलं. गावोगावी दोन समुहामध्ये असलेला दुरावा संपुष्टात आणायच्या प्रक्रीयेला सुरूवात झाली. त्याचा परिणाम सत्तावन्नच्या निवडणुकीत दिसून आला. ती निवडणूक समितीचा घटक म्हणून शेकाफेच्या नावानं लढली गेली असली तरी रिपब्लिकन पक्षाची ती पहाट होती. या पहाटेच्या पारीच रिपब्लिकन पक्षाला भरघोस यश मिळालं. विधानसभेत तेरा आमदार नी लोकसभेत नऊ खासदार, पैकी सहा खासदार महाराष्ट्रातले, हा पक्षाचा ऐवज होता. राज्यातल्या सर्व भागातून पक्षाचे आघाडीचे कार्यकर्ते आमदार, खासदार झाले होते. हे यश तर मोठं होतंच, पण सत्तेतल्या सार्थ प्रतिनिधीत्वाची, आणि तेही स्वत:च्या ताकदीवर मिळवण्याची सुरूवात होती. दलितांचे बरेचसे प्रश्न समर्थपणे मांडले गेले ते याच काळात. दादासाहेब खासदार होते नि संसदेत दलितांच्या प्रश्नावर नेतृत्व करीत होते.

डॉ. आंबेडकरांच्या महापरिनिर्वाणोत्तर आंबेडकरी समूहाचे स्वत:चे म्हणून जे प्रश्न उभे राहिले ते भूक आणि प्रतिष्ठा या दोनही पातळ्यांवर महत्त्वाचे होते. १९५६ साली डॉ. आंबेडकरांनी धर्मांतराची ऐतिहासिक महत्त्वाची घटना घडवून आणली होती. 'मी हिंदू म्हणून जन्मलो असेन, पण हिंदू म्हणून मरणार नाही', ही प्रतिज्ञा त्यांनी पुरी केली होती. ही नुसतीच प्रतिज्ञा नव्हती तर क्रांतीचं चक्र गतीमान करण्याची सुरूवात होती. 'भीमराज करे पुकार... बौद्ध धम्मका करो स्वीकार' असा नारा देत गावोगावी धर्मांतराचे कार्यक्रम घडत होते. संविधानाने अनुसूचित जातींना नोकरी, शिक्षण आणि राजकीय सवलती दिलेल्या होत्या. या सवलती धर्मांतराने जातील असं धोरण केंद्रसरकारने अंगीकारलं होतं. अस्पृश्य जातींचा हिंदू धर्मत्यागाचा वेग रोखून धरण्यासाठी तेवढी एकच कळ सरकारच्या

हातात होती. यातून धर्मांतरीत बौद्धांचा सर्वस्तरावरील सवलतींचा मुद्दा तयार झाला होता. दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली त्यासाठीही आंदोलनं होत होती. एका बाजूला धर्मांतराच्या प्रचाराचं काम करावं लागत होतं, तर दुसऱ्या बाजूला धर्मांतरीत बोद्धांच्या सवलतीसाठी आंदोलनं उभी करावी लागत होती. असं पेचात अडकून नेतृत्व करायची वेळ कुणावर आली होती का?

दादासाहेबांचं नेतृत्व आणखी एका गोष्टीसाठी उजळून उभं रहातं 'भूमिहीनांचं आंदोलन'. दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली रिपब्लिकन पक्षानं दोन वेळा भूमिहीनांचं आंदोलन लढवलं. १९६४ चं आंदोलन तुलनेने प्रभावी होतं. या निमित्ताने देशभरातील भूमिहीनांचा प्रश्न जोरदारपणे चर्चेला आला. भूमिहीनांच्या मागण्यांसाठी रिपब्लिकन पक्षाने देशभर जेलभरो आंदोलन सुरू केलं. ६ डिसेंबरला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना भावपूर्ण अभिवादन करून ७ डिसेंबर १९६४ पासून या सत्याग्रहाची सुरूवात झाली. ३० जानेवारी १९६५ ला सत्याग्रह थांबवण्यात आला. तब्बल दोन महिने जेलभरो आंदोलन होत राहिलं. देशभरातून तीन लाखाच्या वर लोक तुरुंगात गेले. कुणीही माफीनामा लिहून देऊन तुरुंगवास चुकवायच्या मन:स्थितीत नव्हतं. या आंदोलनकाळातल्या सत्याग्रहींच्या खूप थरारक  आठवणी लोक सांगतात. तिहार किंवा पंजाबमधल्या तुरुंगात एका भरती झालेल्या कार्यकर्त्यांची संख्याही लक्षणीय होती. नुसतीच लक्षणीय होती असं नव्हे, तर शेतीची जमीन नसलेले भूमिहीन समूह लेकराबाळांसकट आंदोलनात सामील झाले होते. या प्रश्नानं घेतलेलं आंदोलनाचं रूप बघून सरकार नमलं. संरक्षणमंत्री यशवंतराव चव्हाण यांच्या मध्यस्थीने पंतप्रधान लालबहादूर शास्त्री, गृहमंत्री गुलझारीलाल नंदा आणि रिपब्लिकन पक्षाचे दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखालचं शिष्टमंडळ यांच्यात चर्चा झाली. भूमिहीनांचा प्रश्न सरकारने स्वीकारला, व तो सोडवण्याचा कल दाखवला. ३० जानेवारी १९६५ रोजी पक्षाने आंदोलन मागे घेतलं.

या एकाच आंदोलनाने दादासाहेबांची 'लोकनेता' ही प्रतिमा अधिक स्पष्ट होत जाते. त्या वेळी, अंतर्गत गटबाजीमुळं दादासाहेबांच्या धोरणावर आरोप झाले. पण तरीही जनसामान्यांचं नेतृत्व करण्याची क्षमता दादासाहेबांनी दाखवून दिली. त्याहीपेक्षा महत्त्वाची बाब म्हणजे नव्यानं स्वतंत्र झालेल्या आपल्या देशाच्या राजकारणात 'भूमिहीन' समूहांचा मुद्दा उपस्थित करून त्यांनी सर्वांचं लक्ष वेधून घेतलं.

पन्नास वर्षांपूर्वीच्या राजकीय-सामाजिक परिस्थितीमध्ये जमिनीची मालकी हा महत्त्वाचा मुद्दा होता. भारतीय अर्थव्यवस्था बहुतांशी शेतीप्रधान होती. समाजव्यवस्था विषम होती. या विषम समाजव्यवस्थेत दलितांच्या हातात उत्पन्नाचं काहीच साधन नव्हतं. गावगाड्यातली जमीनदारी व्यवस्था, सर्व सत्ता आपल्या हातात ठेवून होती. फार मोठ्या संख्येचा समूह शेतीत राबत होता, पण जमीन त्यांची नव्हती. वेठबिगारीने भाकरीचाही प्रश्न सुटत नव्हता. १९३०-३२ सालापासून देशातल्या विविध भागात या विषयाचे संघर्ष सुरू झाले होते. त्यातून अनेक भागात 'जबरनजोत' हे आंदोलन सुरू झालं होतं.

शेत जमिनीच्या या प्रश्नावर डॉ. आंबेडकर स्वत: सुरुवातीपासून काम करीत होते. डॉ. आंबेडकरांनी गावकी विरुद्ध जागृती सुरू केली. त्यांच्या प्रयत्नाने मुंबई असेंब्लीत गावकामगार

कायदा झाला. वतनी जमिनी रयताव्यात आल्या. कोकणातल्या खोतांच्या जमिनी कसणाऱ्यांना मिळाव्यात म्हणून डॉ. आंबेडकर १९३०-३२ सालापासूनच लढत होते. तोच धागा पकडून दादासाहेब गावोगावच्या वतनाच्या जमिनीसाठी काम करू लागले होते. उत्तर महाराष्ट्र, मराठवाडा आणि विदर्भाच्या काही भागात या विषयावर त्यांनी संघटित सत्याग्रह देखील केले होते. धुळे, अमळनेर, जळगाव, बुलढाणा या भागा पडीक जमिनीचा मोठा प्रश्न होता. वेळोवेळी या विषयावर दादासाहेब सतत संघर्ष - संबंधित अधिकाऱ्यांशी चर्चा वगैरे माध्यमातून काम करीत होते. त्याचं सतत संघर्ष करीत रहाणं हे देखील काही लोकांना अडचणीचं वाटत होतं.

ह्या सर्वातला सार्थ मुद्दा असा की कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी ऐरणीर आणलेला भूमिहीनांचा प्रश्न खूप महत्त्वाचा होता. आपला विज्ञाननिष्ठ विकास साधू पहाणाऱ्या आपल्या देशाला, एका महत्त्वाच्या प्रश्नाची जाणीव भूमिहीन शेतकऱ्यांच्या आंदोलनातून झाली. हा प्रश्न तात्कालिक स्वरूपाचा अजिबात नव्हता. आज तिसऱ्या पिढीतल्या लोकांसमोरही हा प्रश्न जसाच्या तसा आहे. कर्मवीर दादासाहेब गायकवाडांनी भूमिहीनांचं आंदोलन रिपब्लिकन पक्षाच्या माध्यमातून उभं केलं. तो केवळ एक मोर्चा नव्हता, पोस्टरवरचा विषय नव्हता, केवळ एक घोषणाही नव्हती, केवळ प्रसिद्धीचा स्टंट नव्हता; तर देशाच्या ग्रामीण अर्थव्यवस्थेचं विच्छेदन करून उपेक्षित समूहांच्या हातात उत्पन्नाचं साधन देणारा कार्यक्रम होता. या एकाच कार्यक्रमामुळे दादासाहेब गायकवाड हे उपेक्षित समूहांचे राजकीय नेते ठरतात.

संघर्षाची मांडणी करताना दादासाहेबांची भूमिका दगडावर डोकं आपटून घेणाऱ्याची दिसून येत नाही. हटवादी नि जनता मातीत मिळवून टाकण्याची त्यांची भूमिका आढळत नाही. साडेतीन - चार लाख सत्याग्रहींना तुरुंगात धाडल्यानंतर अधिकृतरीत्या त्यांनी ३० जानेवारी ६५ रोजी भूमिहीनांचं आंदोलन थांबवलं. त्याआधी त्यांनी सरकारशी चर्चा केली. चौदा मागण्या त्यांनी सरकारकडे ठेवल्या. त्यातून तोडगा निघाला आणि त्यांनी आंदोलन मागे घेतलं. कधी कधी आंदोलनाची एक नशा चढते. त्या प्रश्नाचा कार्यकारणभाव उतरला तरी आपण चव जाईपर्यंत आंदोलन करीत राहातो. सरकारने चौदा मागण्या मान्य केल्या, पण त्याचा लेखी करार नव्हता. दादासाहेब म्हणायचे 'हा सज्जनांचा करार आहे.' त्यांना लिखापढीची गरज वाटत नव्हती. ज्या दिवशी सरकार हा करार मोडीत काढेल त्या दिवशी आंदालनाचा झेंडा हातात घ्यायची त्यांची तयारी होती. दादासाहेब गायकवाड यांच्या ह्या नीतीतूनच त्यांनी संसदेच्या परिसरात डॉ. आंबेडकरांचा पुतळा बसवून घेतला. संसद सभागृहात डॉ. आंबेडकरांचं तैलचित्र लावण्यास तत्त्वत: मान्यता मिळवली.

दादासाहेबांचं एक सूत्र होतं. ते म्हणायचे 'मिळेल ते पदरात पाडून घ्या आणि उरलेल्यासाठी संघर्ष करा!' किती तरी सोप्या शब्दात त्यांनी चळवळीचं सूत्र समजावून सांगितलं होतं. काहीच न मिळवता जनतेला संघर्षासाठी चिथावत राहणं, हे सुद्धा नेतृत्वाचं अपयश आहे; आणि थोडंफार मिळाल्यानंतर त्यातच समाधान मानून 'उरलेलं' सोडून देणं हेदेखील नेतृत्वाचं अपयशच आहे. दादासाहेबांची मांडणी ही फक्त देण्याघेण्यापुरतीच मर्यादित नाहीये. तर देणाऱ्याच्या भूमिकेत असणाऱ्याशी आपले संबंध काय असावेत याचंदेखील

दिग्दर्शन दादासाहेब करतात. पदरात पडलंय ते कोणी उपकार म्हणून दिलेलं नाहीये; तो आपल्या चळवळीचा रेटा आहे, ही जशी एक भावना आहे; तद्वतच थोडंसं मिळालंय मग आता उरलेल्यासाठी संघर्ष कशाला करा, या ठिसूळ मानसिकतेलाही नकार देणारी भावना आहे. राजकीय परिभाषेत 'हितसंबंध तयार होऊ न देण्याची दक्षता घेणं' असं याला म्हणतात. वेळोवेळी ही भावना डॉ. आंबेडकरांनी दाखविली आणि दादासाहेबांनीही दाखविली.

रिपब्लिकन पक्षाचे नेते म्हणून दादासाहेब गायकवाडांच्या राजकीय मैत्रीची चर्चाही खूप मोठी आहे. एक वेगळेच पर्व रिपब्लिकन राजकारणात सुरू झाले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या महानिर्वाणोत्तर काळातील दादासाहेब गायकवाडांच्या नेतृत्वाचा पोत बघताना, हा मुद्दा महत्त्वाचा आणि अपरिहार्य ठरतो. सगळ्या राजकीय भूमिकेचाच हा भाग आहे. तत्त्व म्हणून आणि व्यवहार म्हणून रिपब्लिकन पक्षाची राजकीय भूमिका कितपत उचित ठरली याच मुद्द्यावर आपण येतो. खरं तर तो एक स्वतंत्र आणि प्रदीर्घ चिंतनाचा मुद्दा आहे. या ठिकाणी आपण, अशी मैत्री करताना दादासाहेबांनी दाखवलेल्या धोरणाचाच विचार करू. कारण, एकतर जन्मानंतर अवघ्या एक वर्षात दृष्ट लागावी तसा रिपब्लिकन पक्ष फुटत गेला. तीन पिढ्या ह्या फुटीच्या खेळात होरपळून निघाल्या. दुसरं असं, की जन्माबरोबर रिपब्लिकन पक्षाला जे भरघोस यश सत्तेच्या सर्व पायऱ्यांवर मिळाले, तेवढे यश तद्नंतर कधीही दिसले नाही. त्यामुळे ह्या युतीचे नीट विवेचन करणे जमणार नाही. पण या सबंध कालखंडात नेतृत्वाची वृत्ती कशी काम करीत होती, हे पहाणेही महत्त्वाचे ठरेल.

दादासाहेब आणि त्यांचा पक्ष १९५६ साली समितीबरोबर होता. १९५७चं भरघोस यशही समितीबरोबर राहून मिळालं होतं. पण जेव्हा समितीतून बाहेर पडायचा निर्णय घ्यायची वेळ आली, तेव्हा त्यांनी तो निर्णय बिनदिक्कत घेतलाही. अडखळले नाहीत. किंवा कावरेबावरे झाले नाहीत. समिती आणि तत्सम कालखंडातला इतिहासही खूप उद्बोधक आहे. आणि जनतेला माहीत नसलेल्या अनेक गोष्टींवर प्रकाश टाकणारा आहे. तो भाग वेगळा. पण खासदारक्या, आमदारक्या मिळाल्यानंतरही समितीतून बाहेर पडायचा निर्णय दादासाहेब घेऊ शकले. आणि त्यांच्या सहकार्यांनीही तो स्वीकारला. याचं सर्वात महत्त्वाचं कारण, समितीबरोबर जाताना त्यांची आणि त्यांनी सहकार्याची घडवलेली मानसिकता हेच होय. 'त्यांनी' आपल्याला काय दिलंय ही सद्गदित भावना त्यांची झाली नाही. तर आपल्यामुळे 'त्यांना' मिळालंय ही बाणेदार भावना होती. समितीतून योग्य वेळी दादासाहेब बाहेर पडले असेच म्हणावे लागेल. कारण त्यानंतर समितीलासुद्धा भरघोस यश मिळाल्याचा दाखला नाहीये!

काँग्रेसबरोबर युती करतानाही दादासाहेबांचा कणा ताठ राहिला. यशवंतराव चव्हाणांसोबत दादासाहेबांची मैत्री होती नि त्या मैत्रीचे दादासाहेबांच्या निर्णयावर परिणाम झाले होते. हे खरंही असलं तरी मैत्रीचा भाग बाजूला सारून दादासाहेबांनी काँग्रेसबरोबर तह केला होता. काँग्रेसयुतीचं समर्थन करताना त्यांना सारी ताकद पणाला लावावी लागली होती. कारण त्यांच्या विरोधकांना दादासाहेबांवर टीका करायला खूप चांगली संधी चालून आली होती. डॉ. आंबेडकर हे काँग्रेसचे कठोर टीकाकार होते. त्याच्या भाषणाचे उतारेच्या उतारे देत दादासाहेबांवर टीकेची राळ उठली होती. त्यातली महत्त्वाची टीका होती की 'बाबासाहेब

म्हणायचे की काँग्रेस हे जळतं घर आहे' म्हणून, खरंही होतं ते. काँग्रेसचं विश्लेषण करणारं डॉ. आंबेडकरांचं अतिशय मर्मग्राही भाषण होतं ते. दादासाहेब तर डॉ. आंबेडकरांचे सहकारी, अनुयायी, निष्ठावान पाईक वगैरे वगैरे. मग त्यांनी हे भाषण ऐकलं नव्हतं का? काय समर्थन केलं असेल दादासाहेबांनी काँग्रेस युतीचं? ते सामाजिक अभिसरण वगैरे बुद्धीवादी मुद्दे थोडा वेळ बाजूला ठेवा. सभेला उपस्थित असलेल्या हजारो अनुयायांसमोर दादासाहेब आत्मविश्वासाने गरजायचे 'काँग्रेसचं ते घर कधीच जळून राख झालंय!' असे दादासाहेब आणि असा त्यांचा काळ! एक आव्हानात्मक जगण्याची भूमिका त्यांना पार पाडावी लागली!

दादासाहेबांनी काँग्रेसबरोबर जी युती केली होती तिच्या दोन लक्षणीय गोष्टी होत्या. एक तर ह्या युतीची सुरूवात लोकसभा किंवा विधानसभा निवडणुकांच्या वेळी त्यांनी केली नाही. बहुतेक वेळा युत्या ह्या लोकसभा निवडणूकीच्या वेळी होतात. त्या नेत्यांना लाभदायक असतात. पण दादासाहेबांनी काँग्रेसबरोबर युती ही जिल्हा परिषदा-पंचायत समित्यांच्या निवडणुकांच्या वेळी केली. ती तळाच्या्जा कार्यकर्त्यांना फायदेशीर होती. दुसरी गोष्ट, युतीचं समर्थन करतानाही दादासाहेब म्हणायचे 'ही गाजराची पुंगी आहे. वाजली तर वाजली नाही तर मोडून खाल्ली.' कोणत्याही पक्षाबरोबर युती करताना दादासाहेबांची अशी बाणेदार वृत्ती होती.

बघता बघता कर्मवीर दादासाहेब गायकवाडांची जन्मशताब्दी आली. आणि आपण ती साजरी करतोय. उपेक्षित समूहातल्या नेत्यांना कर्तृत्वाची प्रभा दाखवण्यात अनंत अडचणी असतात. कितीतरी मातब्बररीत्या काम करूनही नेतृत्त्वाच्या बाबतीत ते झाकोळूनच राहतात. जातवास्तव ही नाही म्हटलं तरी मोठी अडचण ठरते. त्यात दलित चळवळीतलं बारा जोत्यांचं भांडण. ही सगळी परिस्थिती घेऊन दादासाहेब जगले आणि नेतृत्वकर्ते झाले. त्यांचा वकूब हा महाराष्ट्राचं समग्र नेतृत्व करणाऱ्याचा होता. परिस्थितीनं ती संधी त्यांना दिली नाही. पण महाराष्ट्रातील नेत्यांच्या गुणगौरवाचा आलेख जर प्रांजळपणे मांडला गेला तर दादासाहेबांचं कसदार नेतृत्व ओलांडून पुढे जाताच येणार नाही. दादासाहेब त्यांचं उत्तर आयुष्य रिपब्लिकन पक्षाशी निगडितरीत्या जगले. आणि म्हणून, त्यांच्या कार्यकर्तृत्वाच्या समग्र आलेखासकट ते एक धुरंधर रिपब्लिकन ठरतात!

# डॉ. आंबेडकरांचा वारसा चालविणारे कर्मवीर दादासाहेब गायकवाड

**ग. प्र. प्रधान**

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी महाराष्ट्राच्या सामाजिक आणि राजकीय चळवळीत केलेले कार्य अविस्मरणीय आणि अमोल आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची शिकवण त्यांनी पुरेपूर आत्मसात केली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या इतर अनेक शिष्यांपेक्षा दादासाहेब कमी बोलत; परंतु त्यांनी त्यांच्या कृतीतून आणि दैनंदिन आचरणातून डॉक्टर आंबेडकरांच्या तत्त्वनिष्ठेचा वारसा खऱ्या अर्थाने चालविला. दादासाहेबांच्या बरोबर काम करण्याचे भाग्य मला लाभले नाही; कारण त्यांच्या ऐन कर्तृत्वाच्या काळात मी नोकरी करीत होतो. संयुक्त महाराष्ट्र चळवळीत मी त्यांना जवळून पाहिले. त्या वेळच्या दोन आठवणी पुढीलप्रमाणे : एका कार्यकर्त्यांच्या बैठकीत माझे मित्र व कम्युनिस्ट पक्षाचे एक नेते कॉ. प्रभाकर वैद्य म्हणाले, "संयुक्त महाराष्ट्र होणे म्हणजे केवळ मराठी भाषिकांची राजकीय आकांक्षा पूर्ण होणे असे मानता कामा नये. संयुक्त महाराष्ट्र हा समतावादी असेल. येथे कामगार हा क्रांतीचा अग्रदूत राहील आणि 'कसेल त्याची जमीन' या तत्त्वाची काटेकोर अंमलबजावणी होईल." वैद्यांचे भाषण प्रभावी झाले आणि त्यांना चांगला प्रतिसाद मिळाला. दादासाहेब गायकवाड धीरगंभीर आवाजात शांतपणे म्हणाले, "वैद्यांची समतावादी भूमिका हीच माझीही भूमिका आहे. मला फक्त एकच प्रश्न विचारायचा आहे की, कसेल त्याची जमीन हे बरोबर आहे, पण नसेल त्याला काय देणार?" दादासाहेबांनी एका वाक्यात आपल्या पुरोगामित्वाची मर्यादा दाखवून दिली आणि भूमिहीन शेतमजुरांच्या प्रश्नाकडे बैठकीचे लक्ष वेधले. दादासाहेबांच्या प्रश्नामुळे तळागाळातल्या माणसांना न्याय मिळाला तरच 'समता' या शब्दाला अर्थ आहे, याची जाणीव आम्हा सर्वांना झाली.

दुसऱ्या एका बैठकीत समाजवादी आणि कम्युनिस्ट कार्यकर्त्यांमधील तीव्र मतभेद उघड झाले आणि काहीजण हमरीतुमरीवर आले. त्या वेळी दादासाहेब शांत स्वरात म्हणाले, "प्रत्येकाचा स्वत:च्या मताबद्दल आग्रह आहे आणि तो असणारच. परंतु हा आग्रह किती ताणायचा हे सर्वांनीच ठरवले पाहिजे. संयुक्त महाराष्ट्र समिती हे आपले हत्यार आहे. तुम्ही आपापसात भांडून ते हत्यार मोडून टाकाल. असे करता येणार नाही. जनता तुम्हाला ते करू देणार नाही. सगळे राजकीय पक्ष हे समितीचे घटक आहेत. कोणताही घटक समितीपेक्षा

मोठा नाही.'' दादासाहेबांच्या या शब्दांमुळे भांडणाऱ्या कार्यकर्त्यांचे आवाज एकदम खाली आले.

१९७१च्या निवडणुकीमध्ये कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या नेतृत्वाखालील रिपब्लिकन पक्षाने इंदिरा गांधींना पाठिंबा द्यावयाचे ठरविले. मला हा निर्णय पटला नव्हता. त्या वेळी एकदा दादासाहेबांची गाठ पडली असताना मी त्यांना ''आपण हा निर्णय का घेतलात?'' असे विचारले. त्यावर ते म्हणाले, ''१९६९ साली काँग्रेसमध्ये फूट पडली आणि जुना प्रतिगामी गट काँग्रेसच्या बाहेर पडला. अशा वेळी इंदिरा गांधींना पाठिंबा दिल्यानेच डाव्या विचाराला बळ येईल असे मला वाटते. सर्व समतावाद्यांची एकजूट करताना काँग्रेसमधील नव्या प्रवाहाचे स्वागत करणे मला योग्य वाटते.'' मला दादासाहेबांचे म्हणणे पटले नाही. परंतु कोणत्याही परिस्थितीत पुरोगामी विचाराच्या लोकांनी एकजुटीने काम केले पाहिजे ही त्यांच्या मनातील तळमळ मात्र निश्चितच जाणवली.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांना कसलीही वैयक्तिक महत्त्वाकांक्षा नव्हती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या शिकवणुकीप्रमाणे त्यांनी दलितांची संघटना टिकविली आणि नेतृत्व करताना कार्यकर्त्यांना सतत वाव दिला. दादासाहेबांच्या त्यागमय जीवनास माझे विनम्र प्रणाम!

# समाजक्रांतिकारक दादासाहेब

## कॉ. माधवराव गायकवाड

दीनदलितांच्या लढ्याला ज्या नेत्यांमुळे सर्वव्यापी स्वरूप प्राप्त झाले अशा मोजक्या नेत्यांमध्ये कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचा समावेश करावा लागेल. दलितांनाही माणूस म्हणून जगण्याचा हक्क आहे; दलित हादेखील समाजाचा जबाबदार घटक आहे, यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांना खऱ्या अर्थाने व्यापक चळवळीची जोड दादासाहेबांमुळे मिळाली. कम्युनिस्ट पक्षाच्या झेंड्याखाली मी काम करीत असल्याने दादासाहेबांचे संघर्षमय नेतृत्व, सामाजिक न्यायासाठी त्यांनी दिलेला प्रदीर्घ लढा व त्यासाठी केलेला त्याग हे सारे मला जवळून बघता आले हे मी माझे भाग्य समजतो. दादासाहेबांचा जन्म नाशिक जिल्ह्यातील असल्याने त्यांचे कर्तृत्वही याच परिसरात फुलले, बहरले पण दलित चळवळीला व्यापक अधिष्ठान निर्माण करून देणे; दलित चळवळीचा पाया अधिकाधिक व्यापक करत जाणे हे दादासाहेबांचे जीवनध्येय बनल्याने त्यांच्या नेतृत्वाने जिल्ह्याच्याच नाही, तर राज्याच्याही सीमा ओलांडल्या.

त्या काळात दलित बांधवांकडे बघण्याचा अन्य समाजाचा दृष्टिकोण अतिशय तुच्छ असा होता. खेड्यात व शहरात दलित बांधव अत्यंत हालअपेष्टांचे जिणे जगत होते. अनेक ठिकाणी तर दलितांना पशूवत वागणूक मिळत होती. सर्वच दृष्टीने प्रतिकूल असलेल्या परिस्थितीत दादासाहेबांनी डॉ. आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली आपल्या सामाजिक व आर्थिक लढाईस प्रारंभ केला. "गुलामाला त्याच्या गुलामगिरीची जाणीव करून द्या म्हणजे तो बंड करून उठेल" हा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा तेजस्वी विचार दादासाहेबांच्या संघर्षमय जीवनाचा बीजमंत्र ठरला. दीनदलितांना समजेल, रुचेल अशा भाषेत एकीकडे त्यांच्यावर होत असलेल्या अन्यायाची जाणीव करून देणे तर दुसरीकडे हा अन्याय व अत्याचार दूर करुन संघटित लढ्यासाठी त्यांना उद्युक्त करणे, असे दुहेरी कार्य दादासाहेबांनी निष्ठेने केले. संघटित दलित समाज हे त्या काळी वाटणारे स्वप्न दादासाहेबांनी रक्ताचे पाणी करून प्रत्यक्षात उतरवले. दादासाहेबांची साधी राहणी आमच्यासारख्या कार्यकर्त्यांना चटकन आकर्षून घेत असे. जाहीर सभांतील त्यांची भाषणे सडेतोड वक्तृत्व आणि विचारांचा स्पष्टपणा माझ्या अजूनही स्मरणात आहे.

संयुक्त महाराष्ट्रात लढा अंतिम टप्प्यात असताना आचार्य अत्रे व दादासाहेब गायकवाड यांच्याबरोबर मी अनेक सभा बैठकांमध्ये वावरलो. दलितांच्या सहभागामुळे संयुक्त महाराष्ट्र

चळवळ खऱ्या अर्थाने लोकचळवळ झाली. दलितांना या चळवळीत सहभागी करून घेण्याचे सारे श्रेय दादासाहेबांचेच आहे. शेड्युल्ड कास्ट फेडरेशन रिपब्लिकन पक्षामार्फत दादासाहेबांनी सर्व दलित ताकद आचार्य अत्रे यांच्यामागे उभी केली.

महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह, नाशिकचा काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह आणि भूमिहीनांचा सत्याग्रह हे दलित चळवळीतील प्रमुख टप्पे असून तीनही लढ्यांमध्ये दादासाहेबांचे नेतृत्व, मार्गदर्शन महत्त्वपूर्ण ठरले. दादासाहेबांना समाजवादाविषयी आस्था असल्याने अनेकदा सामाजिक व आर्थिक न्याय, कष्टकरी व गोरगरिबांचे प्रश्न, दलित स्त्रियांचे प्रश्न याबाबत त्यांच्याशी समक्ष चर्चेचा योग आला. पुस्तकी समाजवादापेक्षा प्रत्यक्ष तळागाळातील जनतेपर्यंत जाऊन समानतेच्या उद्दिष्टांसाठी लढा कसा उभा करावा याचे दादासाहेब म्हणजे एक आदर्श 'मॉडेल'च मानावे लागेल.

दलित व गोरगरीब महिलांच्या हक्कासाठी जी चळवळ सुरू केली, त्यात माझी पत्नी कुसुम गायकवाड हिचा महत्त्वपूर्ण सहभाग होता. दलित व गोरगरीब कुटुंबांना सरकारी जमीन कसायला मिळाली ह्यासाठी हा लढा पुकारण्यात आला होता. मनमाड-नांदगावमधील ५० महिला आंदोलकांच्या तुकडीचे नेतृत्व कुसुमने केले होते. भुकेल्यांना कामे द्या, दलितांना जमिन द्या, अशा घोषणा देत शासनाचा हुकूम मोडून हे महाराष्ट्रव्यापी आंदोलन सुरू झाले. कुसुमसह सर्व आंदोलकांना अटक करण्यात येऊन नाशिकच्या कारागृहात ठेवण्यात आले. दादासाहेबही ह्याच तुरुंगात होते. सर्वांनी २५ दिवस तुरुंगवास भोगला. माझ्या कुटुंबाशी निगडित दादासाहेबांची, ही संस्मरणीय आठवण ठरावी. समाजवादी उद्दिष्टाला एक नवी शक्ती दादासाहेबांमुळे प्राप्त होणार असल्याने आम्ही या आंदोलनात हिरीरीने उतरलो.

१९५७ साली दादासाहेब काँग्रेसचे गो. ह. देशपांडे यांचा पराभव करून संयुक्त समितीतर्फे विजयी झाले. जनतेच्या प्रश्नासाठी सदैव लोकसभागृहात व बाहेर लढा देणारा आदर्श प्रतिनिधी कसा असावा याचा आदर्श वास्तुपाठ दादासाहेबांनी आमच्यापुढे घालून दिला होता. गोरगरीब व दीनदलितांच्या प्रश्नांसाठी राजसत्तेबरोबर संघर्षापासून ते जनसामान्यांच्या हितासाठी, सरकारला काही गोष्टी करणे भाग पाडेपर्यंत दादासाहेब चिकाटीने पाठपुरावा करीत. आर.पी.आय.तर्फे विडी कारखान्यात मजुरांचे प्रश्न सोडविण्यासाठी एक अधिवेशन १९५८ साली नागपूर येथे झाले. दादासाहेब या अधिवेशनाच्या अध्यक्षस्थानी होते. शांताबाई दाणी यांच्या अध्यक्षतेखाली १९५७ साली रिपब्लिकन पक्षाची अखिल भारतीय महिला परिषद झाली. त्या वेळचे दादासाहेबांचे भाषण महत्त्वपूर्ण ठरले होते.

लढे, चळवळी, आंदोलने यांचे नेतृत्व करीत असताना दलित व गोरगरिबांच्या उन्नतीसाठी संस्था स्थापणे; त्या उत्तमरीत्या चालाव्या यासाठी आर्थिक तजवीज करणे, हे ५० वर्षांपूर्वी केलेले त्यांचे कार्य दादासाहेबांच्या द्रष्टेपणाची साक्ष देते. आज; आहेत त्या संस्था संपविणारे नेते सर्वत्र दिसतात परंतु दादासाहेबांनी महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर खडतर प्रवास करून संस्था काढल्या व त्या नीट चालतील अशी व्यवस्था केली. यांपैकी नाशिकचे रमाबाई आंबेडकर विद्यार्थिनी वसतिगृह, डॉ. आंबेडकरनगर वसाहत व रमाबाई आंबेडकर सभागृह आदी अनेक त्याचीच फळे आहेत.

भारतीय राजकारणाला, संघटित दलित शक्तींना दणका देत कलाटणी द्यावी, या संघटित दलित शक्तींच्या आधारे सामाजिक व आर्थिक न्याय अंतिम घटकांपर्यंत जावा ही दादासाहेबांची आंतरिक तळमळ होती. आज दलित चळवळ पर्यायाने दलित शक्ती-सत्तेसाठी विविध गट उपगटांमध्ये विभाजित झाल्याचे दिसते. दादासाहेबांची जन्मशताब्दी साजरी करीत असताना सुसंघटित दलित शक्तींचा समर्थ पर्याय उभा करण्याच्या दृष्टीने विचारमंथन व्हायला हवे. अशा विचारमंथनातून दादासाहेबांसारखेच सर्वमान्य नेतृत्व जेव्हा पुढे येईल; तेव्हा तीच खरी दादासाहेबांना आदरांजली ठरेल.

# कर्मवीर दादासाहेब यांचे धार्मिक मुक्ती आंदोलन

**डॉ. भाऊ लोखंडे**

भारत देश जगातील प्राचीन व महान संस्कृतीचे प्रतीक मानला जातो. 'वसुधैव कुटुंबकम्'चे स्वप्न उराशी बाळगून सर्व प्राणिमात्रांच्या कल्याणाची करुणा भाकली जाते ती हिमालयाच्या कुशीत विसावणाऱ्या या महान देशातच. असे असले तरी भारतात धार्मिक क्षेत्रात 'भेदाभेद अमंगल' मानले गेले नाहीत. साऱ्या प्राणिमात्रांचा तथाकथित जन्मदाता ईश्वर किंवा ब्रह्म मानला गेला असला तरी त्याच्या दर्शनाची समान संधी सर्व जातीच्या जनतेला नव्हती. देवदेऊळ, तळे, शाळा, विहिरी सवर्णांच्या वेगळ्या आणि अवर्ण अस्पृश्यांच्या वेगळ्याच होत्या. जगाच्या इतिहासात आपल्याच धर्माच्या देवदेवतांच्या देवळात दर्शनासाठी सत्याग्रह व उपोषणादी संघर्षाच्या मार्गाचा अवलंब करायला लावणारा मुठभर समाज फक्त 'स्वर्गादपि गरीयसी' समजल्या जाणाऱ्या आपल्या भारतदेशातच सुखाने नांदताना दिसतो. गांधीजींना स्वातंत्र्यप्राप्तीसाठी मिठाचा सत्याग्रह केल्याचे ऐकून आपली मान जशी गर्वोन्नत होते तशीच ती काळाराम मंदिरातील प्रवेशासाठी किंवा महाड तळ्यातील पाण्याला स्पर्श करण्यासाठी बाबासाहेब आंबेडकरांना कराव्या लागलेल्या सत्याग्रहाच्या पार्श्वभूमीमुळे खालीही जाते. गांधींचा सत्याग्रह राजकीय स्वातंत्र्यासाठी होता तसाच डॉ. आंबेडकरप्रणीत काळाराम मंदिरप्रवेश व महाड सत्याग्रह सामाजिक समता, धार्मिक बंधुता व मानवी स्वातंत्र्यासाठी होता. बाबासाहेब आंबेडकरांच्या मार्गदर्शनाखाली काळाराम मंदिर सत्याग्रहाचे सूत्रसंचालन ज्या महान शिष्योत्तम सरसेनापतीने केले त्यांना भाऊराव कृष्णराव ऊर्फ दादासाहेब गायकवाड या नावाने सामाजिक न्यायाच्या इतिहासात मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. बाणगंगेच्या तीरावरून गोदावरीच्या तीरावर आपल्या कर्तृत्वाने गाजणारे हे नाव मार्क्स, लेनिन, बुद्धआनंद अशा नामावलीत समाविष्ट झाले आहे. बाबासाहेब त्यांना तावूनसुलाखून निघालेले अस्सल सोनें असलेला आपला उजवा हात मानतात. आपल्या तब्येतीची काळजी करण्यापेक्षा आपल्या कार्याची धुरा दादासाहेबांनी आपल्या समर्थ खांद्यावर घ्यावी अशी अभिलाषा व्यक्त करतात. नदीत बुडणाऱ्या बाबांना वाचविणारे दादासाहेब बाबासाहेबांना 'जीवनदाते' वाटतात. शाहू बोर्डिंगला भेट देऊन तेथील स्वच्छता, विद्यार्थ्यांतील जागृती, त्यांचे वादविवाद प्रभुत्व इत्यादी बहुश्रुतवादी गुणांची दादासाहेबांनी त्या विद्यार्थ्यांत केलेली पेरणी याहून बॅ. सावरकर नोंदवहीत दादासाहेबांचे कौतुक करतात. खुद्द महात्मा गांधी या बोर्डिंगात आढळणारी साफसफाई, स्वावलंबन व शिस्त पाहून आनंद व्यक्त करतात. समाजसुधारणेचे व्रत दादासाहेबांच्या रक्तातच भिनले

होते. त्यामुळे संधी मिळताच दादासाहेब प्रत्यक्ष कृती करीत असत. अस्पृश्यसमाजातील लग्नसमारंभातील अवडंबर व स्तोम कमी करण्याची सतत धडपड करीत असत. त्या काळी लग्नासाठी नातलगांबरोबरच सर्व अस्पृश्य मंडळींना आमंत्रण द्यावे लागे. सार्वजनिक कार्यकर्त्यांकडील लग्नात तर पाचसहा हजार लोकांचे जेवण करावे लागे. लग्नाआधी आठ दिवस आणि नंतर चारपाच दिवस सर्वजण ठाण मांडून बसत. त्यामुळे लग्नाचा बराच खर्च सोसावा लागे. दादासाहेबांनी यातून समाजाची सुटका करण्यासाठी १९३५ पासून लक्ष द्यायला सुरुवात केली. अगदी साध्या पद्धतीने केल्या जाणाऱ्या लग्नालाच ते हजेरी लावीत. दुपारी बाराला लग्न लावून चार वाजेपर्यंत जेवण आटोपून पाहुणे परतीच्या प्रवासाला लागत. म्हणजे एकाच पंगतीत संपूर्ण लग्न आटोपत असे. लग्नपद्धती दादासाहेबांनी नव्याने आरंभिली होती.

दादासाहेब आपल्या जेवणासाठी लोकांवर भुर्दंड पडू देत नसत. 'मी मागच्याच गावाहून जेवण करून आलो' असं म्हणत गावाच्या बाहेर कुठल्याशा ओढ्यावर भाकरी खाऊन घेत. दोनचार दिवस पुरतील एवढ्या भाकरी, चटणी व कांदे सोबत ठेवत असत. कधी कधी त्यांच्या भाकरी संपत पण सभा संपत नसत. दादासाहेबांनी जाणीवपूर्वक धार्मिक व जातीय विटाळचांडाळ संपवण्याचा प्रयत्न केला. अगदी जाणीवपूर्वक त्यांनी भंगी जातीच्या माणसाच्या हातचे दूध प्राशन केले. त्यांना जातिबहिष्कृत करणाऱ्या समाजातील भोपंजी मेहेतऱ्यांची लोकांनीच चांगली जिरवली. दादासाहेबांकडे वर्षातून दोनदा गुऱ्हाळ चाळे. परंतु स्वतःचे गुऱ्हाळ असूनही घरची मंडळी गुऱ्हाळाला शिवू शकत नसे. दादासाहेबांना हे पटत नसे. कोळी, मराठे, कुणबी, ब्राह्मण सारे आपल्या गुऱ्हाळात कढईजवळ बसून गरम गरम काकवी, साय आणि ताजा ताजा गूळ खातात आणि आपलाच गूळ त्यांच्याकडून आपल्याला मागून घ्यावा लागतो. हे दादासाहेबांना अपमानास्पद वाटे. म्हणून त्यांनी स्वतःच गूळ तयार करायचे ठरवले. त्यांनी गुऱ्हाळ लावून गूळ तयार केला पण अस्पृश्याकडील गूळ घ्यायला बाजारात कुणी तयार होईना. मग दादासाहेबांनी महारांसह सर्व मांग, चाभार, मांगगारुडी यांना गूळ मोफत वाटायला सुरुवात केली. एवढेच नव्हे तर त्यांना सोबत पंगतीला घेऊन बसू लागले. नुकसान सोसूनही दादासाहेबांनी समाजसुधारणेचे आपले व्रत कायम ठेवले. स्वतःला वाळीत टाकल्याबद्दल आपली बाजू मांडताना दादासाहेब सडेतोडपणे म्हणाले. "समाजात महारांना अजिबात स्थान नाही. एक तर धार्मिकदृष्ट्या त्यांना हीन आणि क्षुद्र लेखले जातच आहे, पण त्यांना स्वतःचाच स्वतःला अभिमान राहिलेला नाही. स्वतःची इज्जत त्यांनी स्वतःच घालविली आहे. घरात धान्य आणि हातात काबाडकष्ट करण्याची ताकद असूनही महार गावात दारोदार भिक्षा मागण्याचा हक्क बजावतात. पूर्वापार वडिलांच्या रितीभाती आता तरी बदलत्या काळात सोडल्या पाहिजेत. मेलेल्या जनावरांचे मांस खाण्याचे जे गिधाडाचे कार्य आहे ते आपण करू नये. आपण समाजात कमी लेखले जातो किंवा उपेक्षित आहोत याबद्दल तक्रार करण्याचा काय अधिकार आहे? आपल्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारखा एक विद्वान जन्मास आला आहे. सातासमुद्रापलीकडे जाऊन, जगातले ज्ञान संपादन करून तो आला आहे. आपल्या समाजाच्या उद्धाराची त्याला तळमळ लागली आहे. त्यांनी दिलेली शिकवणच मी तुम्हाला आजवर सांगत आलो आहे. त्यात

माझा कोणता स्वार्थ व फायदा होता?

"मला माझ्या अनुचित, अनैतिक अशा गैरवर्तनावरून या मेहेतरांनी वाळीत टाकले असते तर वाईट वाटले नसते. माझ्या हातून हा समाजाचा एकच गुन्हा घडला आहे. तो म्हणजे तुमच्यात जागृती करण्याचा प्रयत्न केला. तुम्ही समाजात हीन, दीन राहू नये म्हणून मी माझी शक्ती आजवर खर्च केली आहे. त्याबद्दल वाळीत टाकत असाल तर माझी तक्रार नाही. कारण हा जागृतीचा प्रयत्न मी मुद्दाम जाणूनबुजून करतो आहे. मी कोणताच बुरखा धारण केलेला नाही, की मुखवटा तोंडावर चढवला नाही. माझे खायचे दात निराळे व दाखवायेच निराळे अशी स्थिती नाही. तेव्हा अगदी कळीकाळ जरी आला, यमराज जरी माझ्यासमोर येऊन उभा राहिला तरी मी स्वीकारलेल्या मार्गापासून अगदी केसभरदेखील ढळणार नाही. समाजाने मला आयुष्यभर दूर ठेवले, जन्मभर माझ्यावर बहिष्कार टाकला तरी मी सांगतो माझ्या बांधवांनो, माझ्या जिवलग मित्रांनो मी डरणार नाही! मी जे करतो आहे ते आपल्या समाजाला पूर्वीपेक्षा चांगले दिवस दिसावेत म्हणून. आपल्या पोराबाळांना 'म्हारडे' म्हणून कुणी हिणवू नये म्हणून. त्यांचे जीवन वाऱ्यावरच आणि उष्ट्या शिळ्या अन्नावर संपू नये म्हणून!

"आपले बाबासाहेब आंबेडकर नेहमी म्हणतात, 'तुम्हाला कुणी अस्पृश्य मानू नये, तुमचा विटाळ कुणी पाळू नये, तुम्हाला कुणी दूर बसवू नये म्हणून तुम्हीही भंगी, मांग गारुडी इत्यादी समाजाला अस्पृश्य मानू नका. त्यांचा विटाळ लावू नका. त्यांना दूर बसवू नका. आणि हेच मी माझ्या बांधवांनो, तुम्हालादेखील सांगत आलो आहे. नुसते सांगून थांबणे मला योग्य वाटले नाही म्हणून गोकुळाष्टमीच्या दिवशी मी आमच्या मारूकडे त्याच्या हातचे दूध प्यालो. आमच्या घरच्या लग्नात भंग्यांना वाढपी ठेवले. त्यांच्याबरोबर जेवू लागलो. हे सारे तुमची स्थिती सुधारावी म्हणून." असे म्हणून पंचायतीतून निघून गेलेल्या दादासाहेबांना यजमानांनी मानसन्मानाने परत बोलावून आणले आणि त्यांना सन्मानपूर्वक जेवण करविले.

१९३० साली दादासाहेब गायकवाडांनी बाबांच्या काळाराम मंदिर प्रवेशाचा सत्याग्रह सुरू करण्यासाठी रणशिंग फुंकले. आम्ही हिंदू आहोत तर आमच्याच देवाच्या दर्शनासाठी मंदिरप्रवेश कां नसावा? त्यासाठी 'चलो काळाराम मंदिर' अशा घोषणा गगनात दुमदुमू लागल्या. बाळासाहेबांनी या धर्मसंगराचे समर्थन करीत शुभाशीर्वाद देत म्हटले, "आपण सत्याग्रह केलाच पाहिजे. कारण कोणतेही हक्क आपणांस स्वस्थ बसून स्पृश्य हिंदूंकडून मिळतील असा गैरसमज करून घेणे चुकीचे होईल. तुम्ही हे जे पाऊल उचलत आहात त्यास माझा व्यक्तिश: पूर्ण पाठिंबा आहे. मात्र शांत व सनदशीर मार्गानेच आपणास सत्याग्रहाचा मार्ग चोखाळला पाहिजे." या सत्याग्रहाच्या पूर्ततेसाठी कार्यालय भाड्याने घेण्यात आले. त्याचे नाव 'आर्यसमाजमंदिर'. दुपारी मिरवणुकीसाठी जमलेल्या सत्यागृहींना उद्देशून दादासाहेब म्हणाले, "येथे आपण एखादा उत्सव किंवा उरूस साजरा करण्यासाठी, शोभेच्या बाहुल्या म्हणून केवळ मिरवण्यासाठी जमलो नाही. आपण मंदिर प्रवेशाचे ध्येय डोळ्यांसमोर ठेवून येथे जमलो आहोत. आपला मार्ग सोपा नाही. आजपर्यंत अनेक सत्याग्रह आपण पाहिले असतील त्यांना महात्मा गांधींचा, काँग्रेसचा आशीर्वाद होता.

म्हणून त्यांस पैशाची कुमकही मोठमोठ्या धनिकांकडून मिळत होती. आपणाला तर तेवढी मदत कुणाकडूनदेखील मिळणार नाही. कारण हा अस्पृश्यांनीच स्वत:च्या उद्धारासाठी स्वयंस्फूर्तीने केलेला सत्याग्रह आहे तेव्हा सरकार, सनातनी लोक असे कितीतरी काटेकुटे, दगडधोंडे आपल्या वाटेत आडवे टाकणारच आहेत. पण त्यांना आपण दूर केले पाहिजे. एकाच धर्मात जन्मलेले ते आणि त्याच धर्मात जन्मलेलो आम्ही, पण आमच्याच धर्माचे दैवत जे क्षत्रिय जातीत जन्माला आले आहेत असे रामकृष्णादी देव यांचे दर्शन घेण्यासाठी आम्हास सत्याग्रह करावा लागत आहे. हे किती विचित्र आहे. पण आमच्या स्पर्शाने एवढेच नाहीतर दुरून मूर्तीचे दर्शन घेण्याने आमच्याच धर्माचे दैवत विटाळते, मोठे अजब तर्कशास्त्र आहे. पण ही वस्तुस्थिती आहे. या वस्तुस्थितीतच तुम्हा-आम्हाला बदल घडवावयाचा आहे. त्यासाठी बद्धपरिकर होऊ या! नुसते १४४ कलम जारी झाले म्हणून आपले मनोधैर्य, आपले मनोबल खचता कामा नये.'' आणि बाबासाहेबांच्या आदेशानुरूप सनदशीर मार्गाने दादासाहेबांनी सत्याग्रह सुरू केला. सबइन्स्पेक्टर कर्णिकांना मिरवणुकीबाबत दोन बाबी सांगण्यात आल्या. एक म्हणजे अस्पृश्य स्पृश्यांबरोबर रथ ओढण्यात सहभागी होतील आणि दोन म्हणजे अस्पृश्य स्पृश्यांबरोबर रथातील रामाच्या मूर्तीची पूजा करतील. जिल्हाधिकारी कर्णिकांबरोबर परत येऊन म्हणाले, ''तुमच्या अटी स्पृश्य हिंदूंना मान्य आहेत. स्पृश्य हिंदू मंदिराच्या मुख्य दरवाजापाशी रथ आणतील. तेथून दहा फुटापर्यंत स्पृश्य हिंदूंनी हा रथ ओढल्यानंतर अस्पृश्य त्यांच्यात सामील होऊ शकतील आणि तेही स्पृश्याप्रमाणेच रथाचा दोर आपल्या हाताने ओढू शकतील.'' बाबासाहेबांनी पाच हजाराच्या जमावातून फक्त पन्नास जवान निवडून काढले आणि त्याना बजावले, ''फक्त तुम्हा पन्नास जणांनाच या मिरवणुकीत रथ ओढण्यात सामील व्हायचे आहे.'' परंतु येथेही सनातनी मनोवृत्तीने घात केला. ठरल्याप्रमाणे स्पृश्यांनीच रथ देवळाबाहेर आणला. परंतु त्यांनी सरकार व अस्पृश्य दोघांचीही फसवणूक केली. म्हणजे रथाचा दोर इतका दाटीवाटीने धरला की अस्पृश्यांना हात धरायला जागाच ठेवली नाही. दुसरे म्हणजे रथ मंदिराच्या दाराजवळ थांबला तर अस्पृश्य रथातील मूर्तीची पूजा करतील. ती पूजा टाळण्यासाठी त्यांनी रथ वेगाने पळविला. त्यामुळे पूजाही करता आली नाही आणि दोर धरून रथही अस्पृश्यांना ओढता आला नाही. या कपट कारस्थानाचे वर्णन करीत बाबासाहेब म्हणतात, ''अगदी थोड्यावेळापूर्वी दिलेले अभिवचन मुळीसुद्धा न पाळणाऱ्या स्पृश्यांच्या या कृतीचा अस्पृश्यांना संताप येणे स्वाभाविकच होते. पण याहीपेक्षा दंग्याला तोंड फुटले ते स्पृश्य हिंदू जमातीच्या पोलिसांच्या वर्तणुकीमळे. त्यांनी रथाचा दोर पकडण्याची धडपड करणाऱ्या अस्पृश्यांवर लाठीहल्ला करण्यास सुरुवात केली. या हिंदू पोलीस शिपायांनी अगदी उघड उघड स्पृश्य हिंदूंचीच बाजू घेतली होती. अशा रीतीने एका बाजूने पोलिसांचा अत्याचार व दुसऱ्या बाजूने स्पृश्य हिंदूंची रथाच्या दोरासाठी चाललेली गळचेपी, या कार्यात ते पन्नास अस्पृश्य सापडले. स्पृश्य हिंदू तर अस्पृश्यांना आपल्या जवळसुद्धा येऊ देईनात. मग दोराला स्पर्श करण्याचे तर दूरच राहिले. आणि जेव्हा अस्पृश्य दोर पकडण्याची केविलवाणी धडपड करीत तेव्हा हे पोलीस त्यांच्या हातावरच लाठीचा तडाखा ठेवून देत किंवा बंदुकीच्या नळीचा त्यांना तडाखा बसे. जेव्हा अस्पृश्यांचा जथा आपल्याजवळ येतो आहे हे स्पृश्यांनी पाहिले तेव्हा त्यांनी रस्त्यावरच रथ सोडून दिला आणि जवळच्याच शेतातून अस्पृश्यांवर दगडांचा जोराने वर्षाव करण्यास सुरुवात केली.

कितीतरी अस्पृश्य जखमी झाले. त्यांच्या डोक्याला, हातापायाला जखमा झाल्या. काही दगड वर्मी लागून रस्त्यावर बेशुद्ध झाले. तरीही अस्पृश्यांनी संयम सोडला नाही. याचा पुरावा म्हणजे स्पृश्यांपैकी एकही माणूस जखमी झाल्याची नोंद नाही.'' हा सत्याग्रह पुढच्या वर्षी पुन्हा सुरू करण्याचा निर्धार दादासाहेबांनी व्यक्त केला. त्यावर आपली संमती व्यक्त करीत बाबासाहेबांनी सत्याग्रह करण्यास माझी संमती आहे. मात्र सत्याग्रहासंबंधी आपल्या योजना, सत्याग्रहाची आखणी इत्यादी गोष्टी नाशिकच्या कलेक्टरांच्या धोरणावर अवलंबून ठेवण्याचे कारण नाही. तुम्ही किंवा मी आपल्या चळवळी जर सरकारी अधिकाऱ्यांच्या मर्जीवर अवलंबून ठेवल्या तर मग यशाची आशा कधीच करावयास नको. तुम्ही जेव्हा सत्याग्रह सुरू कराल तेव्हा मी नक्की भारतात असेन.''

तीन वर्षं चाललेला हा सत्याग्रह दादासाहेबांच्या नेतृत्वाची आणि सहनशीलतेची कसोटी पाहणारा ठरला. दादासाहेबांनी आपला संयम सोडला नाही किंवा वैफल्यग्रस्तही झाले नाहीत. निव्वळ कायदेभंग करणे किंवा अराजक माजविण्यात दादासाहेबांना भूषण वाटत नव्हते. ते म्हणत, ''आमची चळवळ जाचक धार्मिक रूढीविरुद्ध आहे; मुद्दाम कायदेभंग करणे हे आमच्या सत्याग्रहाचे ध्येय नाही.'' २२ डिसेंबर १९३१ रोजी मुंबईचे पारशी गृहस्थ नाशिकला सत्याग्रही शिबिरास भेट देऊन त्वेषाने म्हणाले, ''तुम्ही असल्या अनत्याचारी सत्याग्रहावर मुळीच विश्वास ठेवू नका. युगानुयुगे जरी तुम्ही असा अनत्याचारी सत्याग्रह करीत बसलात तरी त्याचा उपयोग होणार नाही. म्हणून तुम्ही लाठीबाज बना! तुम्हाला पशूपेक्षा नीच रीतीने वागविणाऱ्यांची टाळकी चांगली शेकून काढा... म्हणजे त्यांना फार विचार करावा लागेल.'' दादासाहेबांनी त्यांची तळमळ जाणून संयम सुटू न देता उत्तर दिले. ''अत्याचार हे आमच्या सत्याग्रहाचे धोरण नाही.'' रामकुंडावर सनातनी व सत्याग्रहींमध्ये एक प्रकारे आट्यापाट्यांचा खेळ सुरू झाला. ते पाहून एक सनातनी कुत्सितपणे म्हणाला, ''हा सत्याग्रहाचा प्रकार नव्हे, शांतपणे प्रतिस्पर्ध्यासमोर उभे राहून सत्याग्रह केला पाहिजे.'' आपल्यावरील त्याचा रोख ओळखून हजरजबाबी दादासाहेब तत्काळ उत्तरले, ''मिठाचा सत्याग्रह काँग्रेसने जेव्हा वडाळ्याच्या मिठागारावर केला तेव्हा काँग्रेस सत्याग्रहीही पोलिसांबरोबर अशाच आट्यापाट्या खेळत होते. त्या वेळेस आपल्यासारख्यांनी त्याचे कोडकौतुक केले त्यांचाच कित्ता आमचे हे वीर तरुण सत्याग्रही गिरवीत आहेत.'' अशी तटस्थपणाची नव्हे तर सहानुभूतीशून्य भूमिका घेणारी बहुसंख्य सवर्ण मंडळी असली तरी काही शहाणीसुरती आणि माणुसकीचा पाझर असलेली सवर्ण मंडळीदेखील त्या काळी हयात होती. नाशिक काँग्रेस कमिटीचे सचिव श्री. गोविंदराव देशपांडे यांच्या विधानावरून याची प्रचिती येते. ३० नोव्हेंबर १९३१ रोजी नाशिक मंदिर प्रवेश सत्याग्रह या विषयावर व्याख्यान देताना सत्याग्रहाचे मूल्यमापन करताना म्हणाले, ''सध्या नाशिकला मंदिरप्रवेश सत्याग्रह जोरात सुरू आहे. हा सत्याग्रह अतिशय पद्धतशीर रीतीने चालू आहे. त्यांचे कार्य इतक्या व्यवस्थित रीतीने होते आहे की, जो ते प्रत्यक्ष पाहील तो त्याची वाहवाच करील. त्यांच्या शुद्ध व स्वाभिमानपूर्ण हेतूकडे लक्ष देऊन आपणही त्यांना मदत केली पाहिजे, त्यांच्यात आपणाला कल्पना नाही अशी अतिशय मोठी जागृती झाली आहे. त्यांच्यातील तरुण पिढी या बाबतीत वाटेल ते हाल सोसण्यास तयार आहे. 'जगू तर माणुसकी मिळवून जगू नाही तर हालअपेष्टा भोगून मरू' अशी त्यांच्यातील कित्येकांची प्रतिज्ञा आहे. याबाबतीत त्यांनी

काँग्रेसचे अनुकरण केले आहे. तेव्हा त्यास नावे ठेवता येणार नाहीत. ज्याप्रमाणे काँग्रेसने 'स्वराज्यासाठी प्रथम अर्ज-विनंत्या करून पाहिल्या व शेवटी कायदेभंग सुरू केला; काँग्रेसच्या चळवळीमुळे जसे नवचैतन्य इतर समाजात निर्माण झाले तसेच मंदिरप्रवेश सत्याग्रहामुळे अस्पृश्यांत नवचैतन्य निर्माण झाले आहे. काही झाले तरी आता सत्याग्रह बंद होणे शक्य नाही. आपण हा सत्याग्रह यशस्वी होईल अशीच मदत अस्पृश्यांना केली पाहिजे. आपल्या शाब्दिक सहानुभूतीची त्यांना काही जरुरी नाही. त्यांचा डॉ. आंबेडकर या एकाच पुढाऱ्यावर अत्यंत विश्वास आहे. इतर कोणीही किंवा स्पृश्य वर्गापैकी कितीही थोर व्यक्तीने अस्पृश्य वर्गात जाऊन लुडबूड करण्याचा प्रयत्न केला तरी तो यापुढे व्यर्थ होणार आहे. म्हणून अस्पृश्य वर्गाला उपदेश करण्यापेक्षा आपण सनातन्यांच्या मतपरिवर्तनाच्या कार्यास लागले पाहिजे. राजकारणात गांधी-आंबेडकरांचे वाटेल ते खटके उडाले असले तरी आपण अस्पृश्यांना देवळे मोकळी होतील असाच प्रयत्न केला पाहिजे. नाशिकला अस्पृश्य समाजाला जे विरोध करतात ते प्रमुखत: सर्व ब्राह्मणच आहेत. या विरोधकांत तीनचार वकीलही आहेत. परंतु त्यांना भिऊन जाण्याचे कारण नाही. थोड्या दिवसापूर्वी बऱ्याच अस्पृश्यांना व पाच सनातन्यांना सत्याग्रहाबाबत शिक्षा झाल्या तेव्हा अस्पृश्य वीरांनी त्या शिक्षेचा आनंदाने स्वीकार केला, परंतु पाचही सनातन्यांनी माफी मागण्याचा प्रयत्न केला. पण त्यात दोघांनाच यश आले व तिघांना शेवटी तुरुंगात जावे लागले. तेव्हापासून सनातनी लोक देवळाकडे फारसे फिरकत नाहीत. वर्तमानपत्रांनीही अस्पृश्यांची खरी बाजू जगापुढे मांडली पाहिजे. कारण त्यांची बाजू न्यायाची व सत्याची आहे. त्यांच्या सत्याग्रह चळवळीला नावे ठेवणे निदान काँग्रेसला तरी उचित होणार नाही. अस्पृश्यांना देवळे खुली झाल्याशिवाय स्पृश्यांपैकी कोणीही देवदर्शन घेऊ नये अशी परिस्थिती काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी निर्माण केली पाहिजे.'' गोविंदराव देशपांडे हे दादासाहेबांचे राजकारणातले प्रतिस्पर्धी होते हे लक्षात घेणे अगत्याचे आहे. त्यांच्या विचारांची सनातन्यांनी बूज राखली नाही हे वेगळे सांगायला नकोच. डॉ. मुंजे हे हिंदू महासभेचे अध्यक्ष होते. त्यांनीही नाशिक मंदिरसत्याग्रहाला समर्थन देताना म्हटले, ''अस्पृश्य समजले जाणारे लोकही हिंदूच आहेत. नाशिकच्या सनातनी हिंदू बांधवांनी अस्पृश्यांच्या मंदिर प्रवेशाबद्दलची विरोधी वृत्ती सोडून द्यावी, कारण सबंध हिंदू जातीवर त्यामुळे मोठे संकट येणार आहे. अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशाला विरोध करून सनातनी बांधवांनी धार्मिक व राजकीयदृष्ट्या आत्मघात करून घेऊ नये.'' एक्केचाळीस अस्पृश्यांना कायदेभंगाबद्दल एक महिन्याची सक्तमजुरीची शिक्षा झाली. त्यांनी बाबासाहेबांचा जयजयकार करीत शिक्षेचा आनंदाने स्वीकार केला. त्यात बारा वर्षांचा एक मुलगाही होता. त्याला जामीन मागितला असता तो, कोर्टाला म्हणाला, ''माझा जामीन डॉ. बाबासाहेब आंबेडकर आहेत पण ते विलायतेत आहेत. मला शिक्षा द्या!'' त्याला दहा दिवसांची साधी कैद झाली. उलट सनातन्यांपैकी दोघांनी माफीपत्र लिहून देऊन स्वत:ची सुटका करून घेतली. नाशकातील हिंदुहृदयसम्राट बॅ. सावरकर यांनी सवर्ण बंधूंना समजावून सांगितले की, ''अस्पृश्य हे तुमचेच बंधू आहेत. आपण सारे एकाच धर्मात जन्म घेतलेले लोक आहोत. ख्रिश्चन धर्म कुठल्या का जातीमधील माणसाने स्वीकारलेला असो, त्याला चर्च सदैव उघडे असते, चर्च त्याला कधीच कुणाकडूनही अगदी युरोपियन, इंग्रज माणसाकडूनही तो 'काळा' आहे म्हणून बंद केले जात नाही; तसेच कोणत्याही जमातीतील व्यक्तीने इस्लामी

धर्म स्वीकारलेला असो, त्याला मशीद बंद झाल्याचे उदाहरण कधी तुम्ही पाहिले वा ऐकले आहे का? मग जे अस्पृश्य गेले एक दीड वर्ष काळ्या राममंदिरातून प्रवेश करण्यासंबंधी आपला धार्मिक हक्क बजावू पहात आहेत; जी गोष्ट हिंदू धर्माला अत्यंत अभिमानाची आहे अशा वेळी त्यांना देऊळ खुले करून दारातच स्पृश्य सनातनी हिंदूंनी त्यांना कडकडून मिठी मारून पिढ्यान्पिढ्या त्यांच्यावर केलेल्या अन्यायाचे चांगल्या व स्तुत्य मार्गाने परिमार्जन करण्याची वेळ आली आहे. असा प्रसंगी आता सनातन्यांनी वृथाभिमान टाकून द्यावा व एवढ्या मोठ्या संख्येने आणि अतिशय शिस्तबद्ध रीतीने व सूत्रबद्ध पद्धतीने चालवलेल्या या सत्याग्रहाचे मोकळेपणाने स्वागत करून त्यांच्यासाठी देवळांची दारे उघडा. त्याशिवाय तुम्हाला आता तरणोपाय नाही.'' बॅ. सावरकर हे हिंदुहृदयसम्राट म्हणविले जात परंतु सनातनी हृदयावर त्यांचा आदेश किंवा विनंती कुठलाही परिणाम करू शकली नाही. उलट दादासाहेब गायकवाड आणि अमृतराव रणखांबे यांच्यावर मुखेड येथे लाकडी प्रहार करून दोघांनाही रक्तबंबाळ करण्यात आले. आणि पालखी व 'पांडवप्रताप' या ग्रंथावर घासलेट ओतून 'महात्मा गांधी की जय!', 'भारतमाता की जय!' या घोषणांच्या गजरात जाळून टाकला. बाळासाहेब मराठे यांनी 'स्वराज्य' या वृत्तपत्रात लिहिले, ''महात्मा गांधी तर अस्पृश्यांचे नेते म्हणवतात, मग त्यांच्या नावाचा जयजयकार करून हिंदूंचाच 'पांडवप्रताप' ग्रंथ हिंदूंनी कसा जाळला? 'पांडवप्रताप' पोथीच्या मिरवणुकीवर केलेल्या अत्याचाराबद्दल मुखेडच्या लोकांनी दादासाहेबांची लेखी माफी मागितली. ह्या लेखी माफीमुळे कोर्टातून खटला काढून टाकण्यात आला होता. तीन वर्षे सत्याग्रह करून शेवटी दादासाहेबांना तुरुंगवास पत्करावा लागला. तेथेही दादासाहेबांनी अस्पृश्यतेविरुद्ध लढा उभारला. तेथे अस्पृश्यांची पंगत वेगळी आणि व अन्नही दुरून वाढीत. हिंदू-मुसलमान मात्र जवळ बसून जेवत. जेल मॅन्युअलच्या ४६२ ते ४७० पर्यंतच्या नियमांची पायमल्ली होताना पाहून दादासाहेबांनी धुळ्याला कलेक्टरसमोर आपली फिर्याद मांडली, ''आम्ही माणुसकीच्या हक्कप्राप्तीसाठी झगडलो व अटक झाली म्हणून तुरुंगात आलो. देवळे खाजगी असू शकतात. पण तुरुंग तर पूर्ण सरकारी आहे ना? परंतु सरकारी तुरुंगातही हौदाला शिवू देत नाहीत. हे मात्र आम्ही कदापिही सहन करणार नाही.'' एवढा निकरचा लढा देऊनही शेवटी रामकुंडाचा निकाल अस्पृश्यांविरुद्ध देण्यात आला. बाबासाहेबांचा पुरता भ्रमनिरास झाला होता. त्यांना आता हा सत्याग्रह निरर्थक वाटायला लागला होता बाबासाहेब दादासाहेबांना म्हणतात, ''मी तर अगदी निक्षुन सांगू इच्छितो की ही चळवळ करण्याची आता मुळीच जरुरी नाही. ती आता नुसती स्थगितच करावयाची असे नव्हे तर पुन्हा काळ्या राममंदिरावर सत्याग्रह करण्याचे नावही कधी काढायचे नाही. या सत्याग्रह चळवळीचा जनक मी आणि मी हे सांगतो की इतके दिवस मी या सत्याग्रह चळवळीला विरोध करीत नव्हतो. कारण मूर्तिपूजेचा साधा मामुली हक्कही वर्षानुवर्षे त्यांच्यापासून हिरावून घेतला होता. मंदिरप्रवेशामुळे अस्पृश्यांना हिंदू धर्मात समानतेचे हक्क मिळतील आणि हिंदू धर्मात त्यांचा मानाने समावेश होईल. हिंदू धर्मात अस्पृश्यांनी शिरण्यापूर्वी हिंदू धर्मातील अस्पृश्यतेच्या कल्पनेचा पूर्ण कायापालट झाला पाहिजे. मी मुद्दामच सत्याग्रहाला पाच वर्षांपूर्वी संमती दिली होती; कारण त्यामुळे अस्पृश्यांना हिंदू धर्माची वास्तव कल्पना येईल आणि हिंदू धर्मात आपले स्थान काय दर्जाचे आहे हेही त्यांना कळेल. त्या दृष्टीने माझा हेतू साध्य झाला आहे. आता मला

मंदिरप्रवेश चळवळीची मुळीच आवश्यकता वाटत नाही. यापुढे अस्पृश्यांनी आपली सारी शक्ती, आपले सारे बळ, आपले सामर्थ्य राजकारण आणि शिक्षण या बाबींवरच खर्च करावे. मला खात्री वाटते की, अस्पृश्य बांधवांना यापुढे राजकारण आणि शिक्षण या दोन्हींचेही महत्त्व किती आहे हे समजून येईल. १४ जूनला दादासाहेबांना बाबासाहेबांची तार मिळाली. दादासाहेब मुंबईला गेले आणि १९३५ साली येवले मुक्कामी मोठी परिषद आयोजित करण्याचे निश्चित झाले. या परिषदेच्या यशासाठी व प्रचारासाठी दादासाहेब पायदळ, सायकल, मोटार मिळेल त्या साधनाने बाबासाहेब यांचा संदेश पोहोचवीत होते. अध्यक्षीय भाषण करताना बाबासाहेब म्हणाले, "आपल्या वर्गाची केवळ धार्मिक क्षेत्रातच नव्हे तर आर्थिक, राजकीय, सामाजिक साऱ्या क्षेत्रांत अतिशय ससेहोलपट झालेली आहे. आपणास पद्धतशीरपणे ठेचण्याचा प्रयत्नच चहुबाजूंनी होत आहे. खरे तर आपण अस्पृश्य मंडळी हिंदूंचे नुसते बांधव नाहीत. रक्ताचे बांधव आहोत. पण तरीही साध्या देवदर्शनाला आपणास परवानगी नाही. तो साधा हक्क आपणास मिळावा यासाठी आपण सर्वस्व पणाला लावून अगदी प्राणपणाने गेली पाच वर्षे नाशिकच्या काळाराम मंदिरासमोर सत्याग्रह केला, त्यात आपणास किती हालअपेष्टा, शारीरिक त्रास आणि दारुण दु:ख सहन करावे लागले हे सर्वांना पुन्हा सांगण्याची गरज नाही. आपले माणुसकीचे साधे अधिकार मिळविण्यासाठी व्यतीत केलेला वेळ, काळ आणि पैसाही वाया गेला आहे. ही मोठी दु:खदायक वस्तुस्थिती आहे. म्हणून आपण या गोष्टीसंबंधी अखेरचा निर्णय घ्यायची वेळ येऊन ठेपली आहे. आपली ही दुर्बलतेची आणि अवनतीची स्थिती आपण हिंदू समाजाचे घटक आहोत म्हणून आपल्यावर ओढवली आहे. म्हणून जो धर्म आपणास समान दर्जा देईल, समान हक्क देईल आणि योग्य तऱ्हेने वागवील अशा एखाद्या दुसऱ्या धर्मात जावे असे तुम्हास वाटत नाही काय?" नंतर आवाजची धार तीव्र करीत बाबासाहेब म्हणाले, "हिंदू धर्माशी असलेला संबंध तोडा, स्वाभिमान आणि शांतता मिळेल अशा दुसऱ्या धर्मात जा. परंतु लक्षात ठेवा जो धर्म तुम्ही निवडाल त्यात समान दर्जा, समान संधी आणि समान वागणूक मिळाली पाहिजे. दुर्दैवाने मी अस्पृश्य जातीत जन्माला आलो हा माझा काही गुन्हा नाही. परंतु मरतांना मात्र मी हिंदू म्हणून मरणार नाही." हिंदू धर्माच्या सामर्थ्यशाली होण्याबद्दल बाबासाहेब पुढे म्हणतात, "हिंदू समाजात इतर समाजाच्या बरोबरीने सर्व प्रकारचे हक्क मिळविण्यासाठी दहा वर्षे अस्पृश्य समाजाने एकसंधपणे अविरत लढा दिला होता. अस्पृश्यांना हिंदू धर्माने समानतेची वागणूक दिली असती तर इतिहासात पूर्वी कधीही नव्हता एवढा हिंदू धर्म बलशालीपणे संघटित झाला असता. पण स्पृश्यांनी अस्पृश्यांच्या प्रत्येक लढ्याला तुच्छतापूर्वक आणि तिरस्कारयुक्त जी प्रतिकूलता दाखविली त्यामुळे अस्पृश्यांचा काळ, वेळ आणि पैसा फुकट गेला आहे. तेव्हा यापुढे कोणत्याही धार्मिक झगड्यात आपली अमोल शक्ती वाया न घालविता भारतातील इतर समाजाच्या बरोबरीचे स्थान अस्पृश्यांनी शिक्षणाने व स्वत:च्या कर्तृत्वाने निर्माण करावे. धर्म हा व्यक्तिगत प्रश्न असला तरी आपल्या धर्मांतराला आता फार मोठे सामाजिक स्वरूप प्राप्त झाले आहे. तेव्हा आपण जो विचार करणार तो व्यक्तिगत नव्हे तर साऱ्या अस्पृश्यांचा असेल. एक धर्म सोडताना अनुभवाला आलेल्या अडचणी पुन्हा दुसऱ्या धर्मात वाट्याला येऊन आपली त्रिशंकूसारखी अवस्था होऊ नये."

अखेरीस बाबासाहेबांनी बौद्ध धर्माची दीक्षा नागपूरला १९५६ साली विजयादशमीच्या दिवशी (१४ ऑक्टोबरला) घेतली. बॅ. सावरकर म्हणाले, ''अस्पृश्यांनी हिंदू धर्मात रहावे असे हिंदूंनी त्यांच्यासाठी काहीही केले नाही.'' 'तरुणभारत'कार भाऊसाहेब माडखोलकर म्हणाले, ''बौद्ध धम्माची दीक्षा घेऊन बाबासाहेबांनी हिंदू धर्मावर अनंत उपकार केले.'' दादासाहेबांनी बाबासाहेबांच्या पार्थिव शरीराच्या साक्षीने मुंबईच्या चैत्यभूमीवर दहा लाख भीमभक्तांना भदन्त आनन्द कौसल्यायनजींकडून धम्मदीक्षा देऊन बाबांचे धम्मचक्र अखंड फिरते ठेवले.

नवदीक्षित बौद्धांच्या हक्कासाठी दादासाहेब सतत लढा देत राहिले. राज्यसभेत दादासाहेब म्हणाले, ''नवबौद्धांना सवलती देऊ असे जाहीर होऊनही अडीच वर्षे झाली आहेत. पण याबाबतीत काहीच हालचाल झालेली नाही. असे सांगितले जाते की, 'यासाठी घटनेत दुरुस्ती करावी लागेल.' अध्यक्षमहाराज, मी वकील किंवा बॅरिस्टर नाही. पण मी सभागृहास सांगू इच्छितो की मागासलेल्या व आर्थिकदृष्ट्या मागासलेल्यांना सवलती देण्यासाठी घटनेत दुरुस्ती करण्याची आवश्यकता नाही. भारतात निर्वासितांचा लोंढाच्या लोंढा आला आणि सरकारला चारशे कोटी रुपये त्यांच्यासाठी खर्च करावे लागले, तेव्हा घटनेत दुरुस्ती करावी लागली नाही. तसेच सुवर्णनियंत्रण कायदा पास झाला तेव्हा अनेक सुवर्णकारांना आर्थिक व शैक्षणिक सवलती देण्यात आल्या त्या वेळी घटनेत दुरुस्ती करणे आवश्यक वाटले नाही. अशा परिस्थितीत माझी विनंती आहे की, जे अस्पृश्य बौद्ध झालेत त्यांना सवलतीचे हक्क द्यावेत. सरकारने घटनादुरुस्तीची लंगडी सबब पुढे करू नये व हे कार्य लवकरात लवकर करावे.''

अशा प्रकारे दादासाहेब गायकवाड यांनी बाबासाहेबांचे सरसेनापती बनून महाड, नाशिक, मुखेडच्या लढ्यात प्राणाची पर्वा न करता आपल्या पराक्रमाने सर्वांचे डोळे दिपवून टाकले. धम्मदीक्षा समारोहात बाबांच्या पाठीशी उभे राहून पाठिंबा दिला आणि बाबांच्या महापरिनिर्वाणसमयी दादर चौपाटीच्या चैत्यभूमीवर दहा लक्ष आंबेडकरी अनुयायांना त्रिशरण पंचशील देऊन बौद्धधम्मात दीक्षित केले. दादासाहेबांनी हे धार्मिक आंदोलन यशस्वी करण्यासाठी आपल्या हाडांची काडे आणि रक्ताचे पाणी केले. तेव्हाच तर बाबासाहेब म्हणाले, मोठ्या गर्वाने, ''काळाराम मंदिर सत्याग्रहाच्या वेळी हा माझा भाऊराव गायकवाड प्रत्येक कसोटीवर शंभर नंबरी सोन्यासारखा उतरला आहे. हे सोने अतिशय शुद्ध आहे. सर्व प्रकारच्या आगीतून ते तावूनसुलाखून तसेच्या तसेच शुद्ध राहिले आहे. तेव्हा तुमचा खरा नेता हाच आहे. हाच माझा उजवा हात आहे.'' यातच दादासाहेबांची महानता दडली आहे.

# आंबेडकरी चळवळीचे सेनापती कर्मवीर दादासाहेब गायकवाड

डॉ. म. ल. शहारे

**मी पाहिलेले दादासाहेब**

मी शाळेत असताना दादासाहेबांची भाषणे कधीच चुकवीत नसे. ते नागपूरला वारंवार येत असत. त्यांच्या सभांना खूप गर्दी असायची. गोरगरीब आणि दलित समाजाचे प्रश्न ते आपल्या खास शैलीत मांडीत असत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मला सप्टेंबर १९५२ मध्ये प्राध्यापकांच्या जागेवर मिलिंद महाविद्यालयात नेमले. त्या वेळेस कॉलेजचे बांधकाम चालू होते. बाबासाहेब स्वत: बांधकामाची पाहणी करण्याकरिता अधूनमधून येत असत. त्या वेळेस बाबांनी दादासाहेब गायकवाड, रायसाहेब मेश्राम आणि प्राचार्य चिटणीसांची समिती, बांधकामाची पाहणी करण्यासाठी नेमली होती. त्यामुळे दादासाहेब औरंगाबादला नेहमीच येत असत. मी माझे भाग्य समजतो कीं, त्या वेळेस मला दादासाहेबांना फार जवळून पाहण्याचे आणि त्यांच्याशी अनेक विषयावर चर्चा करण्याची संधी मिळाली. रायसाहेब मेश्रामच्या मृत्यूनंतर तर बाबांनी दादासाहेबांना इन्चार्ज केले आणि त्यांनी जवळ जवळ सहा महिने काम पाहिले. बाबांनी दादांना 'तुम्हीच औरंगाबादच्या संस्थांचे काम संभाळा' म्हणून आग्रह केला. पण दादांनी ते नम्रपणे नाकारले. दादा म्हणाले, ''माझे क्षेत्रच वेगळे आणि एकदम निराळे. राजकारण आणि समाजकारणात माझी रुची. लोकांचे प्रश्न घेऊन लढे उभारावेत. सत्याग्रह करावेत. तेव्हा मला कृपा करून मोकळे करा.'' बाबांनी लगेच त्यांना मोकळे केले.

मी १९५८-६१ मध्ये पीएच.डी.च्या अभ्यासासाठी दिल्लीत होतो. त्या वेळेस (१९५७-६२) आरपीआयचे नऊ खासदार निवडून आले होते. त्या वेळेस 'दिल्ली राजधानी' आंबेडकरमय झाली होती. आंबेडकर भवनमध्ये दर रविवारी जंगी सभा असे. पंजाब, हरियाणा आणि उत्तर प्रदेशात आरपीआयचे बरेच आमदार निवडून आले होते. काही मंत्री आणि उपसभापतीही झाले. ह्यांत दादासाहेब, बॅ. खोब्रागडे, रा. ब. शिवराज इत्यादींचा सिंहाचा वाटा होता. दादासाहेबांनी उत्तर भारतात खूप दौरे केले. लवकरच हिंदी भाषेवर प्रभुत्व मिळविले. त्यांची भाषणेही ह्या भागात खूप गाजली.

त्यानंतर फेब्रुवारी १९६८ मध्ये मी दिल्लीला संघ लोकसेवा आयोगाचा सदस्य म्हणून

कार्यभार सांभाळला. त्या वेळेस मी दादांकडे नेहमीच जात असे. ते माझ्याकडे सहकुटुंब जेवायला अधूनमधून मोठ्या खुषीने येत असत. मी नेहमीच फोनवर त्यांच्या प्रकृतीची चौकशी करीत असे. त्यांचे उत्तर असे, "भाऊसाहेब, दरबार भरलेला आहे." दोन-चारदा मी स्वत: त्यांचा दरबार पाहिला आहे. कुणाला सर्टीफिकेट दे, कुणाची बढती अडली म्हणून मंत्र्याला पत्र लिही, नानातऱ्हेची गाऱ्हाणी. मधेच फोन येत. तेही घ्यायचे. दरबार खाली होईपर्यंत ते जेवायला बसत नसत. कधी कधी तर रात्रीचे १०-११ वाजायचे. नंतर पार्लमेंटचे कागद पाहणार. भाषण करायचे असेल त्याची तयारी. दुसऱ्या दिवसी सकाळी पार्लमेंट हाऊसला निघेपर्यंत पुन्हा दरबार. त्यांची मंत्र्यांना आणि अधिकाऱ्यांना लिहिलेली पत्रे मी स्वत: पाहिली आहेत. त्यांची लिहिण्याची शैली एकदम पहिल्या प्रतीची आणि खूप परिणामकारक.

दादासाहेबांचे माझ्यावर फार प्रेम. ते नेहमी पार्लमेंटच्या अधिवेशनाला दोन-तीन दिवस अगोदरच येत असत. ते संध्याकाळी पंजाब मेलने आले की मला फोन करायचे, "भाऊसाहेब, तुमच्याकरिता बाजरीचे पीठ आणि बोंबिल आणले आहेत." द्राक्षांच्या हंगामात द्राक्षेही आणत असत.

त्यांची पार्लमेंटमधील भाषणेही खूप गाजली. खूप अभ्यासपूर्ण भाषणे. जसे महात्मा कबीरांनी शास्त्रांना आणि शब्दप्रामाण्यांना नाकारले.

*तू कहता, कागज की लेखी*
*मे कहता हूँ, आखों देखी*

त्यांच्या भाषणातून आणि कर्तृत्वातून त्यांची बुद्धिवादिता तसेच यथार्थवादाचे दर्शनही घडते.

ते केवढे परिश्रम घ्यायचे, ह्याचे दर्शन मला पेरुमल कमिटीच्या वेळेस घडले. संपूर्ण भारतात त्यांनी दौरा केला. सर्व थरांतील लोकांशी (विद्यार्थी, प्राध्यापक, विचारवंत, समाजसुधारक, राजकारणांतील नेते मंडळी इत्यादी) त्यांनी चर्चा केली. संपूर्ण अहवाल दादासाहेबांच्या बंगल्यावर लिहिला गेला. आम्ही १०-१२ मंडळी सतत ३-४ महिने त्यांच्या बंगल्यावर काम करीत होतो. दादासाहेब आमच्याजवळ बसून मार्गदर्शन करीत व डिक्टेशन देत. हा अहवाल प्रत्येकाने वाचून त्यावर सखोल अभ्यास करावयाची फार जरुरी आहे. माझी तर खात्री आहे की, अहवालातील शिफारशी जर अमलात आणल्या गेल्या; तर दीनदुबळ्यांचे व समाजातील सर्व कमजोर वर्गांचे प्रश्न सुटू शकतील. आज तर हा अहवाल मिळेनासा झाला आहे. मी दिल्लीच्या तीस वर्षांच्या वास्तव्यात बरेच खासदार पाहिले, पण दादासाहेबांसारखी कामाची शैली, त्यांचे पार्लमेंटमधील कार्य, त्यांचे परिश्रम आणि इतर गुण ह्याला तोड नाही.

दादासाहेबांनी मला जीवनात एक दिशा दिली आहे. एक दिवस मला जवळ घेऊन दादासाहेब म्हणाले, "भाऊसाहेब, तुम्ही आता संघ लोकसेवा आयोगाच्या सदस्यपदी आहात. बाबासाहेब म्हणायचे की, आमच्या लोकांनी मानाच्या जागा पटकावयाला पाहिजेत. तुम्ही भाग्यवान आहात. तुम्हाला ती जागा मिळाली. सेवेचे आहे हे पद. आपले जीवन स्वच्छ आणि पारदर्शक ठेवा. तीच तुमची संपत्ती. तुमचे समाजात नाव राहील." नंतर मी

संघ लोकसेवा आयोगाचा अध्यक्षही झालो. मी दादांचा उपदेश तंतोतंत पाळला, ह्याचा मला अभिमान आहे.

बाबांचा जन्म जेथे झाला त्या 'महू' गावी मी चार वर्षे होतो. तेथे मी डॉ. बाबासाहेब आंबेडकर राष्ट्रीय सामाजिक विज्ञान संस्थानचा पहिला महानिदेशक होतो व ती संस्था चांगली नावारूपाला आणली. मी, बाबासाहेबांनी स्थापन केलेल्या पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या गव्हर्निंग बॉडीचा सदस्य आहे. त्यामुळे मला सेवेची संधी मिळाली आहे तसेच भारत सरकारच्या बऱ्याच समित्यांवरही आहे. हे सर्व दादासाहेबांचा आदर्श माझ्यासमोर आहे, म्हणून घडत आहे.

माझे मित्र प्रा. गरूड यांच्याबरोबर दादासाहेबांच्या कार्याबद्दल बरीच चर्चा केली. आमचा दोघांचाही दादांशी घनिष्ठ संबंध. आम्ही पूर्वीसुद्धा अनेकदा त्यांच्या जीवनाबद्दल आणि कर्तृत्वाबद्दल चर्चा केली आहे. या चर्चेतून निघालेली काही वैशिष्ट्ये :

**महान वरदान**

बाबासाहेब आंबेडकर आणि दादासाहेब गायकवाड ही दलित समाजाला नियतीनं दिलेली दोन महान वरदानं आहेत. ह्या देशांतील अमानुष सनातनी शक्तींचे बुरूज जमीनदोस्त करणारा युगंधर महामानव; डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे नियतीनं दलित समाजाला दिलेलं 'न भूतो न भविष्यति' असं महान वरदान आहे. परंतु बाबासाहेबांच्या नंतर त्या तोलामोलाचं नसलं, तरी त्याच्याशी ज्याची तुलनाच करता येणार नाही, किंबहुना 'या सम हाच' असंही ज्यांच्या बाबतीत सार्थ अभिमानाने म्हणता येईल, असा दलित समाजातील एक – नव्हे; एकमेव थोरपुरुष म्हणून कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचं थोरपण मान्य करावंच लागतं. कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या समग्र थोरपणाचा सम्यक अनुभव घ्यायचा असेल, तर त्यांच्या वैयक्तिक खडतर जीवनप्रवासातील सर्व टप्पे समजावून घ्यावे लागतील, त्यांच्या जीवन आणि ध्येयनिष्ठा बारकाईने तपासाव्या लागतील. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील गुणवैशिष्ट्यांचा शोधक बुद्धीने वेध घ्यावा लागेल. तरच कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्वांग परिपूर्ण असं दर्शन आपणास घडू शकेल. बाबासाहेबांच्या युगंधर अशा प्रचंड सामर्थ्यशाली व्यक्तिमत्त्वाचं सम्यक् आकलन आणि दर्शन अद्याप कोणालाच होऊ शकलं नाही, अशी एक रास्त तक्रार आहे. त्याचप्रमाणे दादासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाचेदेखील सम्यक् आणि सर्वांग परिपूर्ण दर्शन अद्याप कोणीही घडवू शकले नाही, ही तक्रारसुद्धा तितकीच रास्त आहे.

दादासाहेबांचे चरित्रलेखन करण्याचे दोन-तीन प्रयत्न झाले. सौ. भावना भार्गवे आणि श्री. हरिभाऊ पगारे यांनी दादासाहेबांचे चरित्र लिहिले आहे. तरी पण दादासाहेब गायकवाड एक व्यक्ती (किंवा माणूस) म्हणून, एका थोर नेत्याचा निकटचा निष्ठावंत अनुयायी म्हणून, एक त्यागी आणि समर्पित सामाजिक कार्यकर्ता म्हणून, एक निर्भीड आणि धडाडीचा नेता म्हणून, निस्पृश्य राजकारणी आणि फर्डा वक्ता म्हणून अशा अनेक अंगांनी कर्मवीर दादासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाचं आपणास सम्यक् आकलन होऊ शकतं. असं सम्यक आकलन झालं, तर दलित समाजात बाबासाहेबांच्या नंतर दादासाहेब गायकवाडांच्या तोलामोलाचा अन्य कोणी नेता झाला नाही, अशीच सहजपणे कोणाचीही धारणा होण्यासारखी आहे.

## एक खराखुरा थोर पुरुष

तशी संख्येनं माणसं खूप आहेत, पण माणुसकी असलेली माणसं किती? असा प्रश्न विचारला, तर उत्तर देणं अवघड जातं. कारण अशी माणसं नगण्य आहेत. माणुसकीचा ओलावा असलेली माणसं आता शोधूनही सापडणं कठीण झालेलं आहे. या पार्श्वभूमीवर ज्याच्या ठिकाणी माणुसकी सुखेनैव नांदत असेल, अशा माणसाचं थोरपण निश्चितच डोळ्यांत भरण्यासारखं असणार! परंतु एखाद्या थोर पुरुषाच्या ठिकाणची माणुसकी पाहून माणुसकी जणू आपल्या माहेरी आलेली आहे, असा प्रत्यय जेथे येतो, तेव्हा त्या ठिकाणाला तीर्थस्थानाचं स्वरूप प्राप्त होत असतं. कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या सहवासात आलेल्यांना किंवा त्यांना प्रसंगोपात् भेटण्याचा योग लाभलेल्यांना सर्वांनाच त्याचा प्रत्यय आलेला आहे. दादासाहेब यांची नाशिक आणि दिल्ली येथील निवासस्थाने म्हणजे जणू समाजमंदिरेच! या मंदिरात येणाऱ्या-जाणाऱ्यांची सतत रीघ लागलेली असायची. दादासाहेबांच्या दोन्ही धर्मपत्नी ह्या 'लोकमाता' होत्या. या येणाऱ्या-जाणाऱ्यांच्या सेवेतच त्यांचा सगळा वेळ जात असे. बऱ्याचदा स्वत:चे जेवण सोडून दादासाहेब त्यांच्याकडे येणाऱ्या लोकांची कामे करीत. बाहेरगावच्या गरजूंवर किंवा कार्यकर्त्यांवर नाशिक आणि दिल्ली शहरांत राहण्याची वेळ आली, तर दादासाहेब त्यांच्या राहाण्याची, खाण्या-पिण्याची स्वत: काळजी घेत. दादासाहेब आपल्या कार्यकर्त्यांना खूप जीव लावत. त्यांना आपल्या पोटच्या पोरासारखे ते जीव लावायचे. कार्यकर्ता चुकला तर त्याला न दुखावता ते समजावून सांगत. कोठे अन्याय झाला, कोणावर अत्याचार झाला, तर दादा कमालीचे अस्वस्थ होत. अन्याय किंवा अत्याचार निवारण्यासाठी स्वास्थ्य, तहानभूक विसरून ते कामाला लागायचे. अन्याय, अत्याचाराचे ठिकाण कितीही गैरसोयीचे असो, दादासाहेब कोणतेही साधन उपलब्ध नसेल, तर पायी जात असत. हे सर्व पुष्कळदा ते स्वत:च्या खर्चाने करत. दौऱ्यावर असतानाही ते अगोदरच इतरांची सर्व सोय करत. आपल्या कार्यकर्त्यांना स्वत:चे कपडे देऊन दादासाहेबांनी वर्तमानपत्रे पसरून त्यावर अनेक रात्री व्यतीत केल्या. दादासाहेबांच्या माणुसकीचे असे शेकडो आदर्श किस्से आहेत. दादासाहेबांनी दलित समाजमन जिंकले होते. ह्याचे कारण, त्यांची दुसऱ्यांना लाजवणारी माणुसकी आणि अखंड खडतर सेवाव्रत हे होय.

## कर्मवीर : एक निष्ठावान अनुयायी!

मोठा नेता होणं जितकं कठीण; तितकंच मोठ्या पुढाऱ्याचा निष्ठावान अनुयायी होणं कठीण! कित्येकजण स्वत:ला बाबासाहेबांचे अनुयायी म्हणवतात. निष्ठेच्या निकषावर अशा अनुयायांचे अनुयायीत्व तपासले, तर सच्चे किंवा निष्ठावंत अनुयायी म्हणून किती सिद्ध होतील? अर्थात, हे चित्र निश्चितच अत्यंत दयनीय आणि खेदजनक असं असेल. जगातील सर्वच थोर पुरुषांच्या अनुयायांच्या बाबतीत कमी-अधिक प्रमाणात हेच चित्र पहायला मिळेल. परंतु बाबांना जे थोडे-थोडके निष्ठावान अनुयायी मिळाले, त्यांत कर्मवीर दादासाहेब गायकवाड अग्रगण्य आहेत. त्यांनी आयुष्यभर अव्यभिचारी निष्ठा जतन केल्या. त्यांनी आयुष्यभर डोक्यावर निळी टोपी ठेवली. निळ्या टोपीसाठी आणि निळ्या झेंड्यासाठीच राजकारण केलं. बाबासाहेबांनी ज्या अव्यभिचारी निष्ठांनी समाजकारण, राजकारण आणि

धर्मकारण केलं, तितक्याच अव्यभिचारी निष्ठेने दादासाहेबांनीही समाजकारण आणि राजकारण केलं. दादासाहेबांनी राजकारणात शुचिर्भूतता पाळून आपल्या युगंधर नेत्यावरील महान निष्ठा सिद्ध केली. ही बाबांच्या सच्चा अनुयायीत्वाची स्पष्ट ग्वाही आहे.

**कर्मवीर : एक लोकप्रिय नेता**

चांगला अनुयायीच चांगला नेता बनू शकतो. म्हणूनच ते बाबानंतर दलितांचे सर्वश्रेष्ठ नेते म्हणून मान्यता पावू शकले. कर्मवीर जरी दलितांचे नेते असले, तरी सर्व जातिधर्मांतील लोकांच्या मनांत त्यांच्याबद्दल अत्यंत आदर होता. दादासाहेब नाशिक येथील त्यांच्या निवासस्थानी असोत किंवा दिल्ली येथील खासदारकीच्या निवासस्थानी असोत, सर्व थरांतील मंडळी (विचारवंत, समाजसेवक, प्राध्यापक, ऑफिसर्स, खासदार, नामदार इत्यादी) त्यांना आवर्जून भेटायला येत. त्यांच्या प्रकृतीची विचारपूस करत. त्यांच्याशी अनेक विषयांवर चर्चा करीत. बऱ्याच वेळा मी स्वत: अशा चर्चेत भाग घेतला आहे.

**कर्मवीर : एक महान वक्ता!**

दादासाहेब यांच्या अनेक अंगभूत गुणांपैकी एक महत्त्वाचा आणि ज्यांच्या थोरपणाला भूषण ठरलेला गुण म्हणजे त्यांचे वक्तृत्व. दादासाहेबांच्या वक्तृत्वाला त्यांच्या समकालीनांत जोड आणि तोडही नव्हती. आजही दादांसारखा, अतिसामान्यांची मने अगदी सहजपणे जिंकणारा, स्पष्ट आणि निर्भीडपणे बोलणारा वक्ता महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही सापडणे कठीण आहे. दादासाहेब तास-न्-तास बोलत. पण त्यांचे भाषण कोणालाही कंटाळवाणे वाटत नसे. साध्या, सोप्या, सरळ भाषेतून दादासाहेब हवी ती किमया करत. दादासाहेब आपले टीकास्त्रदेखील इतक्या सहजपणे पण परिणामकतेने सोडत की ज्याच्यावर ते सोडलेले आहे, तो हमखास 'गारद' व्हायचा. दादासाहेब मात्र निर्विकारपणे पुढची चढाई सुरू करायचे, त्यांचे प्रश्न, उत्तरे, स्पष्टीकरणे सर्व काही बिनतोड असायचं. ह्याला (कित्येक सभांना) मी स्वत: साक्षी आहे.

कर्मवीरांना माझा प्रणाम!

# दादासाहेबांचा विकासाचा विचार

## पार्थ पोळके

दादासाहेब गायकवाड हे दलित मुक्तीचे अनभिषिक्त नेते होते. महामानव डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली दादासाहेब गायकवाडांनी दलित मुक्ती चळवळीचे धडे घेतले. या दलित मुक्तिच्या संघर्षासाठी लागणारी वैचारिक आणि क्रांतिकारी बैठक दादासाहेबांनी डॉ. बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली करून घेतली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी या देशाच्या इतिहासाची, संस्कृतीची नव्याने मांडणी केली. एतद्देशिय मूळ जीवनशैलीची ओळख करुन देणारी मांडणी डॉ. बाबासाहेबांनी केली. या मांडणीच्या जोरावर दलित मुक्ती आंदोलनाला वैचारिक शिदोरी पुरवली. या वैचारिक शिदोरीच्या जोरावर देशात आजपर्यंत दलित मुक्तीची वाटचाल चालू आहे.

डॉ. बाबासाहेबांच्या काळात त्यांच्या वैचारिक भूमिकेची धुरा वाहणारे आणि व्यवहार करणारे अनेक नेते तयार झाले होते. भाऊराव उर्फ दादासाहेब गायकवाड हे त्या काळातील बिनीचे नेते होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दलित मुक्तीचा जो विचार मांडला, तोच मूळात या देशाच्या विकासाचा विचार होता. या देशातील दलितांचा विकास झाल्याशिवाय खऱ्या अर्थाने देशाचा विकास होणार नाही. ही डॉ. बाबासाहेबांची भूमिका अतिशय रास्त आणि योग्य होती. या देशाच्या विकासातील सर्वात मोठा अडथळा हा जातीसंस्थेचा होता. जातीसंस्था मोडल्याशिवाय या देशाच्या विकासाला गती येणार नाही. हे आज सर्वांनी मान्य केलेले आहे. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी इथल्या जातीव्यवस्थेवर आणि जातीव्यवस्था निर्माण करणाऱ्या वैदिकधर्मीय ब्राह्मणी व्यवस्थेवर कडाडून हल्ले केले. डॉ. बाळासाहेबांच्या या भूमिकेचा धागा पकडून दादासाहेब गायकवाडांनी या कार्याची धुरा खांद्यावर घेतली.

१५ ऑक्टोबर १९०२ साली नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यात, आंबेगावात पवळाबाई आणि किसनराव या दलित कुटुंबात भाऊरावांचा जन्म झाला. घरची पार्श्वभूमी मूळात दोन्ही अर्थाने भाऊरावांच्या कार्याला पूरक समज देणारी होती. भाऊराव महार जातीत जन्माला आले होते. दुसरी, भाऊरावांचे वडील किसनराव गायकवाड हे आंबेगावातील सधन शेतकरी होते. एका बाजूला महार असणे आणि पुन्हा शेतकरी असणे, या दोन्ही बाबींचे अनुभव भाऊरावांच्या विकासाच्या कार्याला मदत करणारे होते.

जातीवेदनेचा अनुभव किती दाहक असतो, याचा अनुभव भाऊरावांना लहानपणीच आला होता. वयाच्या पाचव्या वर्षी भाऊरावांना शाळेत घातले, त्याचवेळी त्यांच्या कोवळ्या

मनावर आपण 'हीन,दलित, इतरांच्यापेक्षा खालच्या जातीतील आहोत.' या डागण्या कोरल्या होत्या. दादासाहेबांना आलेला हा अनुभव सौ. भावना भार्गवे यांनी 'पद्मश्री दादासाहेब गायकवाड' या ग्रंथात अतिशय चांगल्या रीतीने मांडलेला आहे. भार्गवे लिहितात - 'शाळेत मात्र भाऊरावांना दूर बसावे लागे. सर्व मुलांच्या रांगा संपल्या की, मग मध्ये अंतर राखून भाऊराव बसत. मास्तरांना जवळून स्पर्श करता येत नसे. बाकीची पोरे मास्तरांचा सरळ हात धरीत, 'मास्तर, आमची पाटी बघा ना!'म्हणून कोणी त्यांचा सदरा पाठीमागून ओढी, तर कोणी खोडकर विद्यार्थी धोतर ओढी. आपणही मास्तरांच्या असे अंगलट यावे; त्यांना जवळून स्पर्श करावा, असे भाऊला मनोमन वाटे. पण इलाज नसे. स्पर्शच कशाला - त्यांच्या हातात उदाहरणे सोडवलेली पाटी द्यावी लागे, तीही दुरून भाऊ ती पाटी जमिनीवर ठेवी, मग मास्तर ती पाटी उचलून पाहत असत. मुलांनाही कधी बुक्के मारता येत नसत. सारा कारभारा दुरूनच असे. जन्मापासूनच ते अंगवळणी पडले होते. शालेय जीवनात भाऊरावांच्या कोवळ्या मनावर दिलेल्या या डागण्या भाऊरावांच्या विकासाच्या कामाला पुरणारा अनुभव होता.

या देशाच्या विकासाचे पहिले साधन हे 'शिक्षण' आहे. आणि या शिक्षणाचा प्रसार दलित समाजात होणे गरजेचे आहे. ही भूमिका भाऊरावांनी पक्की केली. भाऊरावांनी शाहू बोर्डिंगमध्ये सुपरिटेंडंट पद स्वीकारले आणि आपल्या कार्याला सुरुवात केली. शिक्षणाविषयीची भाऊरावांची भूमिका ही त्यांचे गुरु डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भूमिकेतूनच आली होती. दलितांनी प्रथम शिक्षण घेतले पाहिजे, शिक्षणाने आपल्या विकास साधता येतो. हे डॉ. बाबासाहेबांनी सिद्ध केले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे गुरु म. जोतिराव फुले यांनी शिक्षणाचे महत्त्व सांगताना म्हटले आहे,

'विद्येविना मती गेली, मती विना गती गेली, गतीविना वित्त गेले, वित्तविना शूद्र खचले एवढे अनर्थ एका अविद्येने केले. शिक्षण आणि ज्ञान हा दलितांच्या विकासातील स्टेपिंग स्टोन आहे. हे ओळखूनच भाऊरावांनी शाहू बोर्डिंगचे सुपरिटेंडंट पद स्वीकारले होते. त्या बोर्डिंगमध्ये भाऊरावांनी मुलांशी निर्माण केलेले भावनिक नाते, त्यांच्या प्रगतीसाठी केलेले कार्य हे भाऊरावांच्या जीवनातील महत्त्वाचे कार्य मानले जाते. भाऊरावांनी आपल्या चळवळीची सुरुवातच शैक्षणिक कार्यापासून केली. बोर्डिंगचे सुपरिटेंडंट असतानाच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सुरु केलेल्या दलित मुक्तीच्या संघर्षात दादासाहेब गायकवाड कार्यरत होते. त्यांना ज्या ज्यावेळी संधी मिळाली, त्या त्या वेळी त्यांनी दलितांच्या शिक्षणासाठी आणि एकंदरीतच शिक्षण व्यवस्थेविषयी आपली मते परखडपणे मांडलेली आहेत. त्यांनीही स्वत: शैक्षणिक संस्था चालवून मुलांच्या शिक्षणासाठी प्रयत्न केले. मनमाड येथे मुलांसाठी छात्रालय काढले. नाशिक येथे किस्मत बागेत रमाबाई आंबेडकर विद्यार्थिनी वसतीगृह काढले. शासनाकडून शैक्षणिक संस्थांची हेळसांड होत आहे. त्यांच्याकडे दुर्लक्ष होत आहे. असे लक्षात आल्याबरोबर दादासाहेबांनी त्यांच्याविरुद्ध आवाज उठवला.

दलितांची अस्मिता जागृत करणाऱ्या महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात दादासाहेबांनी महत्त्वाची भूमिका निभावली या सत्याग्रहाविषयी आजपर्यंत अनेकांनी आपापल्या भूमिका आणि विचार मांडलेले आहेत. वेगवेगळ्या अर्थाने त्याचे विश्लेषणही केलेले आहे. चवदार

तळ्याचे पाणी पेटवून डॉ. बाबासाहेबांनी दलितांच्या मुर्दाड मनातील भावना चेतवल्या. चवदार तळ्याचा संदेश प्रत्येकाने आपापल्या गावी पोचवला. आजअखेर सार्वजनिक ठिकाणचे पाणवठे दलितांसाठी खुले करण्याची चळवळी केल्या जात आहेत. भाऊराव उर्फ दादासाहेब गायकवाड यांनी या चळवळीत सातत्याने भाग घेतला. ज्या सार्वजनिक पाणवठ्यावर दलितांना पाणी भरू दिले जात नव्हते. अशा ठिकाणी दादासाहेब धावून जात आणि तो पाणवठा सार्वत्रिक करत. डॉ. बाबासाहेबांनी केलेल्या महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहानंतर या पेटलेल्या पाण्याचा वणवा दादासाहेबांनी सर्वदूर नेला. पाणवठे खुले करण्यासाठी दादासाहेबांनी 'पाणवठा चळवळ' केली. ही चळवळ विकासाची चळवळ होती. पाणवठ्यावर जाऊन पाणी काढणे, एवढा माफक अर्थ या चळवळीच्या नव्हता तर माणुसकीचा हक्क सिद्ध करण्याचा तो प्रयत्न होता. 'माणुसकीच्या हक्काची हाक' हा दलितांच्या विकासातील पहिला टप्पा होता. या संघर्षाच्या टप्प्यात दादासाहेबांनी विकासाची अर्धीअधिक लढाई जिंकली, कारण दलितांनी आपल्या 'अस्मिते'चा शोध सुरू केला होता.

महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहानंतर नाशिकच्या काळाराम मंदिराच्या प्रवेशाचा संघर्ष; ही अतिशय महत्त्वाची लढाई दादासाहेब लढले. या घटना दलित मुक्तिच्या घटना नाहीत, तर त्या दलित अस्मिता जागृत करणाऱ्या आहेत. पदोपदी तुम्ही, महार, मांग आहात, दलित आहात, धर्माने तुम्हास असेच जीवन जगण्याचा आदेश दिलेला आहे. वैदिकधर्मीय ब्राह्मणांचा धार्मिक विचार हा या देशातील एका मोठ्या समूहाला क्रियाहीन बनवणारा होता. धर्माने निष्क्रीय केलेल्या या समुहाचे अनेक उपजत विकासाचे गुण मारून टाकले. चवदार तळ्याच्या संघर्षाने, नाशिकच्या काळाराम मंदिर प्रवेशाच्या संघर्षाने तमाम दलितांच्या भावना चेतवल्या गेल्या. हा अस्तित्वहीन झालेला समूह क्रियाशील झाला. दलित समूहाला क्रियाशील बनवण्याचे काम डॉ. बाबासाहेब यांच्या नेतृत्वाखाली दादासाहेबांनी केले. दलित समूहात निर्माण झालेली ही क्रियाशीलता दलितांच्या विकासाचा एक भाग बनली. सातत्याने दलित समूहाला संघर्षप्रवण ठेवण्यात दादासाहेब यशस्वी झाले. स्थितीशील झालेला कोणताही समूह संघर्षाशिवाय विकासभिमुख, गतिशील बनू शकत नाही; हे दादासाहेबांनी ओळखले होते दलित समूहांना गतिशील बनावायचे असेल, तर तो सातत्याने संघर्षप्रवण असला पाहिजे. याचे पूर्ण भान दादासाहेबांना होते.

दादासाहेबांनी आपल्या जीवनात दलितांचे नेते म्हणून केलेल्या चळवळींचा आढावा घेतला. तर दादासाहेबांच्या कार्याची नेमकी दिशा कळून येते. ज्या धर्मबंधनांने दलितांच्या विकासाला अडथळे घातले होते, त्या धर्माला आणि धर्माच्या व्यवहारालाच आव्हान देऊन दादासाहेबांनी दलितांच्या विकासाचा मार्ग मोकळा केला. 'आम्ही तुमच्या धर्माचे आहोत, तुमचा नि आमचा धर्म एकच आहे, मग त्या धर्माचा तुम्ही जो व्यवहार करता, तो व्यवहार करण्यास आम्हाला बंदी का? असे प्रश्न दलित समुहाला उपस्थित करायला लावले आणि दलित समूहाने ते उपस्थित केले. असे प्रश्न उपस्थित करणाऱ्या समुहाला 'तुमचे येथे या देशात काय स्थान आहे? याची जाणीव करुन दिली. मानवी हक्कांपासून वंचित असणारांना, तुम्ही आपल्या हक्कांसाठी संघर्षास सदैव तयार रहा. असे आवाहन दलित जनतेला केले. दादासाहेबांनी या लोकांना घेऊन सर्वांचे श्रद्धास्थान असणाऱ्या नाशिकच्या काळारामाला

आव्हान दिले. तर मुखेड येथे चातुर्मासात सर्वांचा धर्मग्रंथ असणाऱ्या 'पांडवप्रतापा'चे महारांना पारायण करायला लावून धर्मसंगर उभा केला. काळाराम मंदिर प्रवेशासाठी पाच वर्षे सत्याग्रह केला. मुखेड येथे चातुर्मासात महारांनी पांडवप्रताप पोथीचे पारायण केले. पारायणानंतर पांडवप्रताप या ग्रंथाची गावातून मिरवणूक काढायची असा निर्णय मुखेडच्या महारांनी घेतला. मिरवणुकीला सुरुवात झाली. मिरवणूक गावात गेल्यानंतर गावातील सवर्णांनी ही मिरवणूक अडवली. महारांनी, सवर्ण गावकऱ्यांकडे ही मिरवणूक चालू ठेवण्यासाठी विनंती केली. परंतु सवर्णांनी ते ऐकले नाही. तेव्हा महार आणि सवर्णांच्यात पांडवप्रतापाच्या मिरवणुकीसंदर्भात बाचाबाची झाली. शेवटी सवर्णांनी महारांना शिव्या देऊन पांडवप्रताप ग्रंथासह पालखी जाळून टाकली.

चळवळकर्त्या दादासाहेबांच्या दृष्टीने ही घटना अत्यंत महत्त्वाची होती. 'तुमचा आमचा धर्म एक, तुमची आमची श्रद्धास्थाने एक, तुमचे आमचे धर्मग्रंथ एक, तरीही आम्ही तुमच्यापेक्षा हीन कसे? तुमच्या पासून आम्ही वेगळे कसे? हे प्रश्न उपस्थित करुन या गोष्टी मिळविण्यासाठी तुम्ही लढले पाहिजे.' अशा उदाहरणांनी दादासाहेब पुन:पुन्हा दलित समुहाच्या भावना चेतवत होते. त्यामुळे हा समाज संघर्षातून विकासाकडे आपला मार्ग आक्रमित होता. मी या हक्कापासून वंचित आहे, हे माझ्या हक्काचे आहे, ते मला मिळालेच पाहिजे. त्यासाठी मी कोणतीही किंमत मोजावयास तयार आहे. ही भावना दादासाहेब दलित समुहात रुजवत होते.

हक्काचा लढा म्हणजेच दलितांच्या विकासांचा लढा. असे समीकरण त्याकाळात तयार झाले होते. दादासाहेबांनी त्यांना मिळालेल्या प्रत्येक संधीचा वापर दलितांच्या विकासासाठीच केला. नाशिक नगरपालिकेत शासननियुक्त सदस्य म्हणून, नियुक्त केल्यानंतर त्यांनी दलितांच्या विकासासाठी नगरपालिका प्रशासनाला कार्यरत होण्यास भाग पाडले. आपल्या तार्किक मांडणीने दादासाहेब समोरच्यांना पराभूत करीत असत. २८ मार्च १९३२ रोजी नाशिक नगरपालिकेच्या सभागृहात दादासाहेबांनी एक महत्त्वाचा पेच टाकणारे वक्तव्य केले. दादासाहेब एकाच वेळी दलितांच्या विकासाच्या ज्या दोन महत्त्वाच्या गोष्टी आहेत – एक सामाजिक विकास आणि दोन आर्थिक विकास – या दोन्ही बाबींसाठी दादासाहेब आपली व्यूहरचना करीत. नगरपालिकेतील पुढील प्रसंगाने त्याची प्रचीती येते.

दादासाहेबांनी नाशिक नगरपालिकेत या अनुषंगाने जो ठराव मांडला तो, खालीलप्रमाणे– '१ एप्रिल १९३२ पासून अस्पृश्य, मुसलमान व मागासलेल्या याच वर्गातील लोकांना नोकरीस लावण्यात यावे' हा ठराव मांडल्याने सनातनी एकदम प्रक्षुब्ध झाले. त्यांनी दादासाहेबांवर टीकेची झोड उठवली. नाशिक नगरपालिकेत तळाजिया नावाचे एक सदस्य होते. त्यांनी दादासाहेबांना प्रत्युत्तर देताना मुद्दा मांडला की, 'आज म्युनिसिपालिटीतील नोकर वर्गावर जो पगार खर्च पडतो आहे, त्यात निम्म्यापेक्षा अधिक पैसा महार, भंगी वगैरे लोकांना देण्यात येत आहे. तेव्हा या जातीचे लोक म्युन्सिपालटीत नोकरीस नाहीत, म्हणून त्यांनाच नोकरीस लावण्यात यावे. या म्हणण्यात काहीच तथ्य नाही. तळाजियांच्या या म्हणण्याला दादासाहेबांनी तेवढ्याच प्रखरपणे उत्तर दिले की, "मुन्सिपालिटीत निर्माण होणाऱ्या कारकून आणि अधिकाऱ्यांच्या जागा अस्पृश्य, मुसलमान आणि ब्राह्मणेतरादी

मागासलेल्या वर्गातील लोकांना देण्यात याव्यात. असे माझे म्हणणे आहे. नगरपालिकेसारख्या सार्वजनिक संस्थांचा कारभार कसा चालवावा, हे जर इतर जातींना शिकवायचे असेल तर झाडूवाले अगर भंगी यांच्या नोकऱ्या करून हे काही शिकता येणार नाही. त्यांना ऑफिस ॲडमिनिस्ट्रेशन कसे चालते, हे शिकवायचे आहे. त्याचकरता मी हा ठराव मांडला आहे. परंतु माझे मित्र श्री. तळाजिया म्हणतात त्याप्रमाणे झाडूवाले, भंगी या लोकांचाच साफसफाई, भंगी या खात्यात भरणा असला, तरी तो म्युन्सिपालिटीने मुळीच चालू देऊ नये. दादासाहेबांची इथपर्यंतची मांडणी तशा अर्थाने साधी आणि सरळ आहे. परंतु दादासाहेबांचे त्याच्या पुढचे वक्तव्य गंभीर स्वरूपाची मागणी करणारे आहे.

२८ मार्च १९३२ रोजी दादासाहेबांनी केलेली मागणी आजही सवर्ण समाजाने दलित, ओबीसी व इतरांच्या राखीव जागांसाठी ओरडणाऱ्या ब्राह्मण मंडळींनी १९३२ सालचे दादासाहेबांचे वक्तव्य स्विकारले नाही. दादासाहेबांचे म्हणणे असे होते की, भंगी आणि झाडूवाले काम करीत असलेल्या आरोग्य क्षेत्रात दलित, मुसलमान यांचे प्रमाण जास्त आहे. कारण अजूनही ही घाणीची कामे दलितानाच करायला आपण लावतो. तेही जातीच्या मानसिकतेतून ही कामे स्वीकारतात. याच विषयाची दुसरी बाजू म्हणजे ब्राह्मणवादी इतर सवर्ण समाज, घाण कामे आपण करायची नसतात, भंगी, झाडूवाले करतात त्या घाण कामांसाठी आपला जन्मच नाही. या जातीच्या मानसिकतेत ही मंडळी आहेत. ही जातीची मानसिकता व जातीनिहाय वाटलेल्या व्यवसायाचे स्वरूप बदलले पाहिजे. अशी भूमिका दादासाहेबांनी घेतली होती. दादासाहेबांनी मांडलेला हा ठराव या अर्थाने होता, म्हणून हेल्थ खात्यात भंगी व झाडूवाले यांच्या जागेवर त्याच जातीतील लोकांची प्रमाणाबाहेर झालेली भरती कमी करावी व या जागांची वाटणी सर्व जातीत समप्रमाणात करून झालेला अन्याय दूर करावा. दादासाहेबांच्या म्हणण्याचा अर्थ ब्राह्मणांनाही भंग्याच्या आणि झाडूवाल्यांच्या नोकऱ्या द्याव्यात. दादासाहेबांचा हा तोडगा आजअखेर कोणीही स्वीकारलेला नाही. दलित मंडळी आता कुठे प्रशासनात येऊ लागली आहेत. विशेष संधीच्या आधारावर ते ऑफिसर होऊ लागलेत. कोर्ट-कचेऱ्या, राखीव जागा हटाव दलितांना संधी नाकारणारी आंदोलने ब्राह्मणजातीवाद्यांकडून होत आहेत. प्रशासनातील ऑफिसरच्या जागा दलित, मुसलमान, भंग्यांसाठी मागण्याची दादासाहेबांची भूमिका या समाजाला विकासाकडे घेऊन जाणारी होती.

दादासाहेब लोकनियुक्त प्रतिनिधी असल्यामुळे लोकल-बोर्ड, नगरपालिका व कायदे मंडळात मिळेल त्या संधीचा फायदा वंचितांच्या विकासासाठी व्हावा यासाठी आग्रह धरीत. विशेषत: देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आणि स्वातंत्र्यपूर्व काळात कायदेमंडळात दादासाहेबांनी केलेली भाषणे किंवा निरनिराळ्या बिलांवर मांडलेले विचार हे या लोकांच्या विकासाचा आग्रह धरणारे होते. या देशातील ९७% लोक शेती व्यवसायाशी आणि त्या अनुषगांने येणाऱ्या अनेक छोट्या-मोठ्या व्यवसायाशी निगडीत आहेत. हा देश मूळातच शेतीप्रधान आहे. दादासाहेबांचा शेती हा आवडता विषय आहे. शेतकरी कुटुंबात जन्मल्यामुळे शेतकऱ्यांच्या जीवनातील सुख:दुखाची जाणीव दादासाहेबांना होती. शेतीच्या व्यवसायाशी निगडीत असणाऱ्या कोणत्याही विषयावर दादासाहेब गांभीर्याने विचार करीत असत. लँड रेव्हेन्यूविषयी

मांडलेले विचार, कूळकायद्याविषयी घेतलेली भूमिका किंवा महारवतनाविषयी डॉ. बाबासाहेबांनी घेतलेल्या भूमिकेला लोकांचा पाठिंबा मिळविण्यासाठी दादासाहेबांनी जीवाचे रान केले. शेतकरी, बहुजनसमाज, मागासवर्गीयांच्या विकासाच्या बाजूने जे-जे करता येईल ते-ते करण्यास दादासाहेब कोठेही कमी पडत नसत.

दादासाहेब एकाचवेळी या दलित मागासवर्गीय बहुजन समाजाला आत्मभान देण्याचे काम करीत होते. त्याचबरोबर त्यांचा आर्थिक विकास व्हावा यासाठीही ते प्रयत्न करीत होते. वर सांगितल्याप्रमाणे नाशिक नगरपालिकेच्या अर्थसंकल्पीय मिटींगमध्ये मागासवर्गीयांच्या नोकऱ्यासंदर्भात केलेली मागणी, त्याचबरोबर महार वतनाच्या संदर्भात डॉ. बाबासाहेबांनी घेतलेल्या भूमिकेला पाठिंबा देण्यासाठी कायदेमंडळात दादासाहेबांनी केलेले प्रयत्न हेही महत्त्वाचे आहेत. त्या काळात महार जातीतील लोक गावकीची कामे करीत होते. त्या कामाच्या मोबदल्यात या महारांना वतन म्हणून जमिनी दिल्या होत्या. महारांना जमिनी दिलेल्या आहेत. म्हणून गावाशी संबधित असणारा प्रत्येक अधिकारी या महारांना जनावरांप्रमाणे वागवून घेत होता. रात्री-अपरात्री कामाला लावणे, विशेषत: ग्रामसेवक, तलाठी, मामलेदार, पोलिस, देवीडॉक्टर्स आणि इतर अधिकारी या महारांना छळत असत. त्यांना त्यांच्या कुटुंबात, लेकराबाळात, प्रापंचिक गोष्टीत लक्ष घालण्यासाठी वेळ मिळू देत नसत. त्यांना आपल्या कुटुंबाच्या सुख-दु:खात सहभागी होता येत नसे. शिवाय हे अधिकारी या वतनी महारांना अर्वाच्चपणे 'म्हारड्या' म्हणून जातीवाचक घाणेरड्या शिव्या देत असत. गावाची ही कामे केली नाहीत; तर आपल्याला मिळालेले वतन सरकार काढून घेईल. म्हणून हे महार कोठेही तक्रार करीत नसत. डॉ. बाबासाहेबांना, या वतनी महारांना होणाऱ्या त्रासाविषयी अत्यंत वाईट वाटत होते. त्यामुळे या लोकांची ही कामे बंद व्हावीत, परंतु ही कामे बंद होत असतानाच त्यांना मिळालेल्या वतनी जमिनी व वतनाचे इतर फायदे कायम रहावेत. अशी भूमिका डॉ. बाबासाहेबांनी घेतली. महार वतनाविषयी डॉ. बाबासाहेब जसे दक्ष होते, तसेच दादासाहेबही याविषयी सजग होते. दादासाहेबांनी या महारवतनी बिलासंदर्भात गावोगावी जनजागृतीचे काम केले. या बिलाबाबत दादासाहेब अतिशय पोटतिडकीने डॉ. बाबासाहेबांचे म्हणणे लोकांपर्यंत पोहोचवत होते. दलितांच्या विकासातील हा एक महत्त्वाचा टप्पा होता. महार वतनी बिलामुळे दलित समूहाला दोन अर्थाने फायदा होणार होता पैकी एक, या समाजाला, दलित असल्यामुळे जी घाण कामे करावी लागत, त्यापासून सुटका होणार होती. त्याचबरोबर शेतीसारखे स्वत:चे उत्पादनाचे साधन मिळणार होते. स्वत:ची जमीन आणि त्यात स्वत:चे कष्ट याची वेगळीच जाणीव या महार समाजाला होणार होती. गावगाड्यातील सवर्ण समाजाप्रमाणेच या महार वतनदारांना कसायला जमीन मिळणार होती. या देशातील शेती हे महत्त्वाचे उत्पादनाचे साधन आहे. त्याच्याशी कायमस्वरुपाची बांधिलकी निर्माण व्हावी. अशी या दोन महान मुक्तिदात्यांची भूमिका होती. दलितांमधील एका मोठ्या जातीला आर्थिक उत्थानाची संधी मिळणार होती. पुढे ही संधी 'महार वतन बिल' स्विकारून शासनाने या समाजाला दिली.

दादासाहेब हे जन्मत:च शेतकरी असल्याने आणि शेतीशी त्यांचा कायमचा संबंध असल्याने शेतीच्या उत्पन्नातून समाजाचा विकास होऊ शकतो. हे दादासाहेबांनी स्वत:

अनुभवले होते. त्याकाळातील शेती हे एकमेव उत्पन्नाचे साधन आहे. हे दादासाहेबांनी जाणले होते. १९३२ च्या काळात एका महार कुटुंबाकडे उसाची शेती असणे, ही एक आश्चर्यकारक बाब होती. दादासाहेब स्वत:च्याच वर्तनाने आणि व्यवहाराने समाजापुढे विकासाचा आदर्श ठेवत. स्वत:च्या शेतात पिकणारा ऊस गाळून तयार होणार गूळ आणि त्या गुळाचे येणारे पैसे दादासाहेबांच्या कुटुंबाला मिळत होते. हे जरी खरे असले तरी स्वत:च्या शेतीच्या उत्पन्नात आपल्याला जातीव्यवस्थेमुळे सर्वस्वी सहभागी होता येत नाही, याची खंत दादासाहेबांना होती. याविषयी दादासाहेबांना आलेला अनुभव आणि त्याचे स्वरूप अतिशय गंभीर आहे.

आपल्या शेतात ऊस आहे; परंतु उसापासून तयार होणाऱ्या गुळाची विक्री करेपर्यंत आपण किंवा आपल्या जातीतील कोणीही त्याला स्पर्श करायचा नाही. हे जातीबंधन जेवढे गमतीशीर आहे, तेवढेच सामाजिक विकासाच्या दृष्टीने गंभीरही आहे. वर्ष-सव्वावर्ष घरच्या विहिरीतील पाण्याने उसाची शेती घरचेच लोक भिजवत होते. ऊस तोडणे, गुऱ्हाळात गाळणे, गूळ तयार करणे या सर्व प्रक्रिया दादासाहेबांच्या घरातील लोक व त्यांच्या जातीतील लोकांनी करायच्या नाहीत. ही सर्व कामे सवर्ण समाजाने करायची, अशी पद्धत! जातीव्यवस्थेमुळे त्या काळात होती. शिकल्या-सवरलेल्या चळवळ्या दादासाहेबांना हे स्वीकारणे शक्य नव्हते. त्यांनी स्वत:च निर्णय घेऊ ऊस तोडणे, गुऱ्हाळ गाळणे, गूळ तयार करणे ही सर्वच कामे आपल्याच लोकांनी करायची. असा निर्णय घेतला आणि अमलातही आणला. याचा परिणाम, दादासाहेबांचा गूळ नाशिकच्या व्यापारांनी विकत घेतला नाही; म्हणून तो नाशिकरोडला नेला. दादासाहेबांनी तयार केलेल्या गुळाची पूर्वपीठीका समजली; तेव्हा दलित महारांचा गुळ कोणीही घ्यायचा नाही. असा निर्णय नाशिकरोडच्या व्यापारांनी अगोदरच घेतला होता. त्यामुळे तेथेही हा गूळ कोणी विकत घेतला नाही. जातीव्यवस्थेमुळे दलितांच्या आर्थिक विकासाला कशा प्रकारे अडथळे निर्माण केले जात होते? याचा अनुभव स्वतः दादासाहेबांनी घेतला होता.तरीही शेतीच्या बाबतीत कोणत्याही प्रकारची तडजोड करावयाची नाही, अशा प्रकारची भूमिका दादासाहेबांनी घेतली होती. दादासाहेबांच्या वरील अनुभवामुळे दलित लोकांमध्ये दोन संदेश गेले. एक दादासाहेब स्वत:ची शेती स्वत: करतात, आपणही आपली शेती स्वत: करावी. आपलीही दादासाहेबांप्रमाणे शेती असावी ही भावना निश्चितपणे दलितांमध्ये निर्माण झाली असणार. शेतीशी निगडीत असणारी दादासाहेबांची जवळीक कायमस्वरुपाची राहिली आहे.

१५ ऑगस्ट १९४७ रोजी या दिशाला स्वातंत्र्य मिळाले. २६ जानेवारी १९५० रोजी हा देश प्रजासत्ताक झाला. कायदेकानून तयार करण्याचे सर्व अधिकार एतद्देशीयांच्या हाताता आले. या देशाचा विकास करण्याच्या सर्व उपलब्धता एतद्देशीयांच्या हातात आल्या. पं. जवाहरलाल नेहरूंच्या मंत्रिमंडळात डॉ. बाबासाहेब कायदामंत्री झाले. त्यामुळे खालच्या समाजाच्या आशा पल्लवीत झाल्या. घटना लिहितानाच बाबासाहेबांनी घटनेत दलितांच्या आरक्षणाची तरतूद आणि कायद्यानुसार जात पाळण्याचे बंधन घातल्यामुळे दलितांच्या विकासाला हळूहळू गती प्राप्त होऊ लागली. शासनकर्तेही बहुजन समाजातीलच असल्यामुळे आणि ब्राह्मणी अधिकाऱ्यांच्या कचाट्यातून लोकाभिमुख दलित, शेतकरी इ. बहुजन समाजातील

विविध घटकांना न्याय देण्याचा प्रयत्न केला गेला. दादासाहेबांनी डॉ. बाबासाहेबांच्या महानिर्वाणानंतर स्वत:च्या कार्यकर्तृत्वाचा व्याप आणि त्यांच्या मर्यादा ओळखल्या; त्याचप्रमाणे दलित नेत्यांमध्ये नेतृत्वासाठी होणारे झगडे टाळून या समूहाच्या विकासासाठी काहीतरी केले पाहिजे, ही भूमिका घेतली. आणि काँग्रेसबरोबर आपल्या रिपब्लिकन पक्षाची युती केली. पूर्वानुभवानुसार काँग्रेसशासनाने नवबौद्धांच्या राखीव जागांना मंजूरी दिली. महारवतनी बिल मंजूर केले होते. या आधारावर दादासाहेबांनी काँग्रेसबरोबर युती केली. गावगाड्यामधील शिकल्यासवरलेल्या, पुढारलेल्या ब्राह्मणांकडे मोठ्या प्रमाणात जमिनी होत्या. परंतु या जमिनी ब्राह्मणमंडळी स्वत: कधीही कसत नसत. गावातील काही लोक या जमिनी करीत. परंतु या कसणारांकडे त्या जमिनींची मालकी नव्हती. 'कूळ' म्हणून या जमिनी कसण्यात या लोकांचा सहभाग होता. बहुतांशी लोक या जमिनीत राबत असल्याने 'कसेल त्याची जमीन' या आशयाचा कुळकायदा शासनाने केला. आणि महाराष्ट्रभर कसेल त्याच्या जमिनीचा, पर्यायाने कुळकायद्याचा गवगवा झाला. दलितांचे मुक्तिदाते आणि शेतीची जाण असणाऱ्या दादासाहेबांनी प्रश्न उपस्थित केला. 'कसेल त्याची जमीन; नसेल त्याचे काय?' हा दादासाहेबांनी दिलेला नारा, कसेल त्याच्या जमिनीपेक्षा आव्हान म्हणून लोकांपर्यंत गेला. शेती हे विकासाचे साधन आहे. याची जाण असणारे; परंतु स्वत:ची शेती नसणारे कोट्यवधी लोक या देशात होते आणि आहेत. कसले त्याची जमीन, नसेल त्याचे काय? हा दादासाहेबांचा आवाज जमीन नसणाऱ्या कोट्यावधी भूमिहीनांसाठी होता. दादासाहेबांनी या लोकांना जमीन मिळवून देण्यासाठी ३-४ वर्षे जागृती केली. आणि डॉ. बाबासाहेबांच्या स्मृतिदिनादिवशी, डॉ. बाबासाहेबांना आदरांजली अर्पण करून ६ डिसेंबर १९६४ रोजी भूमिहीनांचा देशव्यापी सत्याग्रह घडवून आणला. त्या दिवसापासून ३० जानेवारी १९६५ पर्यंत त्यांनी हे आंदोलन चालवले. देशातून ४ लाख लोक तुरुंगात गेले. सत्याग्रहींना ठेवण्यासाठी तुरुंग अपुरे पडत होते. मद्रास इलाका, आंध्रपदेश, उत्तर प्रदेश, बिहार या राज्यातील भूमिहीनांनी जमीन मिळावी म्हणून आंदोलने केली. महाराष्ट्रात, खानदेश, मराठवाडा, विदर्भ या भागात भूमिहीनांनी जमीन मागण्यासाठी मोठ्या प्रमाणात सत्याग्रह केला. शासनाने शासकीय मालकीच्या जमिनी या भूमिहीनांना वाटण्याचा निर्णय घेतला. दादासाहेबांच्या या भूमिहीनांच्या सत्याग्रहाचे दडपण आजही कोणत्याही पक्षाचे शासन असले; तरी त्याच्यावर कायमचे आहे.

एकंदरीतच दादासाहेबांनी आपले संपूर्ण आयुष्य समाजाच्या विकासासाठी घालवले. दलित समाजातील महार जातीत दादासाहेबांचा जन्म झाला असल्याने या समूहाच्या विकासासाठीच त्यांना लढावे लागले असले तरी या समाजाची संख्याही कमी नाही. या समाजाच्या विकासाचे लढे लढवत असतानाच इतर समाजाच्या प्रश्नांसाठीही दादासाहेब लढले. दादासाहेबांच्या विकासाच्या या लढ्याचे स्वरूप दुहेरी होते. एकीकडे धार्मिक जातीबंधनातून या समूहाला मुक्त करणे आणि त्यांना विकासभिमुख बनवणे आणि ही विकासाभिमुखता यशस्वी होण्यासाठी, त्यांचा आर्थिक विकास होण्यासाठी त्यांच्या हातामध्ये नोकऱ्या, जमीनी ही उत्पादनाची साधने देणे हे कामही दादासाहेबांनी त्या काळात केले; हे कोणालाच नाकारता येत नाही.

# दादासाहेबांचे चरित्रलेखन करताना

**भावना भार्गवे**

चौतीस वर्षांपूर्वीची गोष्ट. स्थळ : नाशिक येथील कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचे निवासस्थान. त्यावेळी ते नेहरू गार्डन समोरील रमाबाई आंबेडकर विद्यार्थिनी वसतिगृहात राहत होते. सौ. गीताबाई गायकवाड ह्या वसतिगृहाच्या अधीक्षक होत्या. त्यामुळे विनोदप्रिय दादासाहेब गप्पांच्या ओघात, खळाळत्या हास्यप्रवाहात भोवतालच्यांना ओलेचिंब करीत उद्गारायचे... "अहो, मी ह्या आमच्या बाईसाहेबांचा आश्रित, त्यांनी वेळीअवेळी येणाऱ्या ह्या पाहुण्याला दार उघडलं तरच मी घरात येणार ना! बापरे, त्या आहेत वसतिगृहाच्या अधीक्षिका. कठोर शिस्तीच्या. माझे अवगुण त्यांनी मला हाकलायाला पुरेसे आहेत...!"

सीताबाईपण मोकळेपणानं हासून ह्या वक्तव्याला दाद येत... लगेच कुणातरी विद्यार्थिनीला हाक मारून म्हणत "सुवर्णा, जा बरं आतून चहा घेऊन ये." येणारा कुणीही फाटका, गरीब माणूस असो नाहीतर मोठा अधिकारी वा दादासाहेबांचा स्नेही असो... चहा घेतल्याशिवाय ते ह्या लोकांना पायरी उतरूच देत नसत.

१९३० पासूनच भाऊरावांच्या नावाचा बोलबाला नाशिक शहरात होऊ लागला होता. हे तर १९६८ साल होते. ह्यावेळी ते राज्यसभेवर राष्ट्रपती नियुक्ती म्हणून खासदार होते. खासदार म्हणजे बहुधा दिल्लीतच वास्तव्य करणारा. हे त्यास अपवाद. संसदेचे अधिवेशन नसलं की, दादासाहेब नाशिकला लगेच परतायचे आणि दुसऱ्याच दिवसापासून मतदार संघातल्या अगदी खेड्यापाड्यातून हिंडत राहायचे. लोकांच्या अडचणी, तक्रारी आणि व्याधींचं निवारण हे त्यांचं जीवनव्रतच होतं. ते नाशकात नसले तरीही लोक त्यांच्या निवासस्थानी सकाळपासून जमायचे. कुणी गरजू, कुणी तक्रारी घेऊन आलेला, अगदी आपली बैलगाडी जप्त केलीय, जिल्हाधिकाऱ्यांनी, कारण तगाई भरली नाही आणि आता उदरनिर्वाह करू कसा? दोनशे रुपये तगाई भरण्यासाठी पैसे नाहीत. बैलगाडीच उत्पन्नाचं साधन... अशा नानाविध तक्रारी ह्यासाठी आपण खासदाराला भेटण्यापेक्षा कार्यकर्त्यांना भेटावं असं त्या गरीब बिचाऱ्या शेतकऱ्याच्या मनातही येत नसे. काम करणारा माणूस, हिडीस-फिडीस न करणारा माणूस, आपली तक्रार सहानुभूतीने ऐकणारा देवमाणूस, ह्या विश्वासाने ह्या व्यक्ती दादासाहेबांच्या खोलीबाहेर असलेल्या दगडी बाकांवर बसून राहत. कधी त्यांच्या भेटीसाठी तिथे मुक्कामही करीत. मळक्या कपड्यात बांधून आणलेल्या भाकरीबरोबर गीताबाई आपल्या घरातून कालवण आणि कांदा वगैरेही ह्या लोकांना देत.

आमचे दादासाहेब भेटले मात्र पाहिजेत.

हल्ली दादासाहेबांची प्रकृती विशेष बरी राहत नसे. ताप,खोकला,सर्दी अशा आजाराला ते कधी शरीरात थाराच द्यायचे नाहीत. परंतु सरकारच्या अनेक समित्यांचे ते सदस्य असल्याने त्यांना विविध प्रकारची कामे करावी लागत. निष्ठा, प्रामाणिकपणा, कामाचा निपटारा प्रत्यक्ष करण्याची वृत्ती, लोकांमध्ये मिसळून त्यांची परिस्थिती जाणून घेऊन त्यांच्या अडचणी तेथल्या तेथे निवारण करण्याची विशेष तळमळ ह्यामुळे त्यांच्या पायाला सदैव भिंगरी लागलेली असे. १९६८ मध्ये ते 'पेरुमल कमिटी' वर काम करीत होते. स्वत: श्री पेरुमल आजारी असल्याने अध्यक्षपदाची प्रभारी धुरा दादासाहेबच प्रत्यक्ष सांभाळत होते. त्यामुळे देशातील सर्व राज्यांत त्यांचा दौरा असे. देशातील दलितांची आर्थिक,सामाजिक,शैक्षणिक दृष्टीने पाहणी करण्याचं काम ह्या समितीकडे होतं. म्हणून दादासाहेब नाशकात बहुधा नसतच. क्वचित आजारी पडले की हा पक्षी घरट्याकडे धाव घेई.

'पद्मश्री' हा राष्ट्रीय बहुमान १६ एप्रिल १९६८ला भारताचे राष्ट्रपती डॉ. झाकीर हुसेन ह्यांच्या हस्ते दिल्लीला स्वीकारल्यानंतर दादासाहेबांचे अनेक सत्कार महाराष्ट्रात व इतरत्र होत होते. ही दगदग त्यांच्या शरीराला पेलवत नव्हती. मन तर सदाबहार, प्रफुल्लित, प्रसन्न पण शरीर साथ देत नव्हते... अशा वेळी त्यांच्या पक्षाच्या सर्वात ज्येष्ठ कार्यकर्त्या आणि अनेक पदांच्या अधिकारी नाशिकस्थित शांताबाई दाणी ह्यांना सतत वाटत होतं... ह्या एवढ्या मोठ्या कर्मवीराचं अवघं जीवन हे केवळ आपल्या लोकांच्या सर्वांगीण प्रगतीसाठी समर्पित असं आहे. चढउतार, त्यांना मिळालेला लौकिक, त्यांचे मानापमान हे सारं लोकांसमोर यायला हवं आहे. 'आंबे' गावच्या एका शेतकऱ्याचा व तोही दलित समाजातील मुलगा आयुष्याच्या सायंकाळी दिल्लीला एकदा नव्हे, दोनदा खासदार होतो... डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा सर्वात जवळचा कार्यकर्ता म्हणून अत्यंत निरलसपणे कसे अविरत कार्य करतो, हे सर्व लोकांसमोर यायला हवं.

दाणीबाईंच्या मनात कितीतरी दिवस हे घोळत असलेले विचार. मात्र प्रत्यक्षात आणायचे कसे...? अशा वेळी नाशकात जायचं एकाच महनीय व्यक्तीकडे. ते म्हणजे कुसुमाग्रज तथा तात्यासाहेब. दादासाहेब गायकवाड अन् तात्यासाहेब दोघांची घट्ट मैत्री. शांताबाई तर तात्यासाहेबांच्या कॉलेजमधील वर्गभगिनी. त्यामुळे ही सूचना त्यांना निरातिशय आवडली. फारच छान. लगेच मग चर्चा सुरू. चरित्र लिहायचं कुणी? कुणाला ते लिहायला द्यायचं...? दोघांच्याही मनात निश्चितच काही निकष असणार. त्यावर चर्वितचर्वण खूप झालं.. नाव ठरलं. शांताबाई माझ्याकडे आल्या, त्या तात्यासाहेबांचा निरोप घेऊनच.

हे काम अवघड नसलं तरी खूप आव्हानात्मक होतं. सर्वांच्या हृदयावर विराजमान झालेल्या, नाशिकातच नव्हे तर महाराष्ट्रात अन् आता खासदार झाल्यापासून सर्वदूर दलितांच्या मनांवर अधिराज्य गाजवणाऱ्या अशा दादासाहेबांचं चरित्र लिहायचं. तेही छोटं शालेय नव्हे तर त्यांच्या साऱ्या कार्याचा मागोवा घेणार. डॉ. बाबासाहेबांचे ते जणू उजवे हात. बाबासाहेबांना ध्रुवतारा मानलं तर हे दीपस्तंभ. त्यांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचा सुयोग्य अविष्कार त्यातून व्हायला हवा. त्यांच्या राजकीय जीवनाची एवढी माहिती नव्हती. सामाजिक जीवनाचे सर्वच पैलू ज्ञात नव्हते. त्यांचे शैक्षणिक विचार अन् कार्य वरवर ऐकलं

होतं. शे.कास्ट फेडरेशन, रिपब्लिकन पक्ष, त्यांचे सत्याग्रह, मोर्चे, लोकसभेतील अभ्यासपूर्ण भाषणं कितीतरी बाबी तशा अपरिचितच होत्या. ह्या कार्यसागरात उडी घ्यायची कशी आणि पैलतीरी पोहोचायचं कसं? हे मंथन करताना सर्वांच्याच हाती अमृतथेंब गवसायला पाहिजे. हलाहल नको. त्यामुळे शांताबाईंचा हा आग्रह कसा प्रत्यक्षात आणायचा ह्याबद्दल मनाशी खूप विचार केला. परंतु मीच हे काम केलं पाहिजे असं पुन:पुन्हा शांताबाई अन् तात्यासाहेब शिरवाडकर ह्यांच्याकडून ठणकावून सांगितलं गेलं, तेव्हा आता हे गिरीशिखर चढण्याच्या प्रयत्नाला दृढनिश्चय करण्याशिवाय गत्यंतरच राहिलं नाही.

प्रथम दादासाहेबांनी चरित्राची कल्पनाच उडवून लावली!

"श्री. धनंजय कीर ह्यांनी डॉ. बाबासाहेबांचं मोठ्ठं चरित्रं अभ्यासपूर्ण रीतीने लिहिलं आहे त्यात माझा त्या त्या प्रसंगी उल्लेख आलेला आहेच त्यामुळे पुन्हा माझं चरित्र लिहिणं मला पटत नाही; आणि मी कोण एवढा मोठा ढुढ्ढाचार्य लागून गेलो आहे, मी केलंय तरी काय... आदेश देणाऱ्या बाबासाहेबांचा मी एक आज्ञाधारक, निष्ठावंत असा छोटा कार्यकर्ता. त्यांनी मला मोठं म्हटलं हा त्यांचा मोठेपणा. महान नेत्यांची कार्य करवून घेण्याची अशीच पद्धत असते. गोंजारण्याची!"असं सारखं दादासाहेब म्हणायचे. मग मधला दुवा शांताबाई. पुनश्च दादासाहेब नाशिकला असताना त्यांना भेटणं. शांताबाईंनी सातत्यानं दादांना समजावावं. सध्या त्यांना बरं नसल्याने ते पुष्कळदा नाशिकला असत. एके दिवशी शांताबाईंचा मला निरोपच आला, 'भेटायला या.'

दादासाहेब त्या दिवशी छान ताजेतवाने, सुस्नात असे दिसत होते. तो दिवसच मोठा आनंदाचा म्हटला पाहिजे. स्वत:हून दादासाहेबांनी चरित्रलेखनाचा विषय काढला. ते म्हणाले होते –

"तुम्ही कुठून कशी सुरुवात करणार? तुम्हाला कितीतरी साधनसामुग्री गोळा करावी लागेल. काही गावांना प्रत्यक्ष जावं लागेल... काही जुनी वृत्तपत्रे धुंडाळावी लागतील. माझ्याजवळ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी वेळोवेळी पाठवलेली पत्रे आहेत. आमच्या काही वयस्कर व्यक्ती आहेत. ज्यांनी माझे व बाबासाहेबांचे कार्य जवळून पाहिले आहे. त्यांच्या भेटीगाठी घ्याव्या लागतील. त्यांच्या गावांना जावं लागेल; माझ्याबद्दलची एकूण मतं ऐकण्यासाठी दादासाहेब पोतनीस आदी आमच्या वेळच्या ह्या मोठ्या व समाजमान्य असलेल्या व्यक्तींशी सर्वंकष चर्चा करावी लागेल"... इत्यादी इत्यादी.

जसंजसं हे कानावर पडू लागलं तसतसा हा पर्वत दुर्गम वाटू लागला. हिमालयाचं हे एव्हरेस्ट शिखरच वाटू लागलं. मनाची द्विधा स्थिती बनत चालली. एका बाजूला फिरतीची नोकरी, संसार आणि हे शिवधनुष्य. कसं पेलवणार...

शांताबाईंना दुसऱ्यांची मनं चटकन् वाचता येत. त्या मध्येच उद्‌गारल्या. "दादा तुम्ही तुमच्याच चरित्रलेखकाला असं घाबरवून टाकता कामा नये. त्यांना तुमचंच सर्वतोपरी सहकार्य मिळायला नको का? एवढं सगळं सांगताय. पण तुम्ही रोज लिहित असलेल्या गेल्या तीस-चाळीस वर्षांच्या डायऱ्या? त्यांचा त्यांना उपयोग होईल ना! आधी त्या त्यांना वाचू देत...!"

मग काय, एकच धांदल! सगळ्या वर्षवार लावलेल्या डायऱ्या समोर अर्ध्या तासात

टेबलावर रचण्यात आल्या. अक्षरश: १९२० सालापासून म्हणजे दादा १८ वर्षांचे होते तेव्हापासूनच्या लिहिलेल्या ह्या डायऱ्या होत्या. त्या अगदी त्या दिवसापर्यंत. मध्ये एकही पान कोरं नव्हतं.

'खुल जा सिमसिम' म्हणावं आणि हिरे, माणकं अशा रत्नांची गुहाच समोर प्रकट व्हावी असं झालं. चला, दादासाहेबांचं अंतरंग कळण्यासाठी त्यांच्या ह्या डायऱ्या प्रथम वाचून काढूया. सुरूवात तर करायलाच हवी. त्याचबरोबर दादासाहेब नाशिकात असताना किमान २ ते ३ तास तरी रोज त्यांच्याशी बोलणं व्हायला हवं होतं. साऱ्या प्रसंगांवर त्याचं भाष्य हवं, चर्चा व्हायला हवी. तेही महत्प्रयासानं त्यांनी कबूल केलं. "ठीक आहे. प्रथम डायऱ्या तर वाचा. खरं तर डायरी म्हणजे अगदी गुह्य आणि खासगी गोष्ट असते. तेव्हा जरा जपून तुम्ही शस्त्र चालवा. लेखणी म्हणजे तलवार असं कुणीसं म्हटलं आहे ना... बघा... विश्वासानं आता तुमच्या हातात ही साधनसामग्री दिली आहे...!" पुष्कळ हास्यविनोद झाले. "आमची शेंडी तुमच्या हातात.. कृष्णानं गोपींचे पळविलेले कपडे'- आदी दृष्टान्त दादासाहेब देत होते.

कुणीही आपल्या खाजगी डायऱ्या; त्याही जवळजवळ ४८ वर्षांच्या; अशा दुसऱ्यांच्या हातात सुपूर्द केल्या नसत्या. परंतु एका बाजूला आदर व दुसऱ्या बाजूला विश्वास ह्यांचा हा परिपाक होता.

श्री. धनंजय कीर ह्यांनी डॉ. बाबासाहेबांचं चरित्र लिहिलं होतं. सर्वदूर ते लोकमान्य पावलं होतं. त्यांचा केवढा व्यासंग अन् अभ्यास? साधन साहित्यांची छाननी अन् त्यातून एकेका प्रसंगांची मांडणी. ते चरित्र, तसंच तात्यासाहेबांनी दोन-तीन इंग्रजीतली चरित्रं इंग्रजीत वाचायला सांगितली होती. "रूपरेषा कशी आखून घ्याल? अन् त्या त्या चौकटीत मौल्यवान तेवढं भरताना त्यांची विभूतिपूजा होईल असं करू नका. दादासाहेबांना पाहिल्यापासून लोकनेते करून टाकून त्यांच्या दबावाखाली तुमची लेखणी चालायला नको. एका सर्वसामान्य माणसाची घडण परिस्थिती,त्याचे स्वत:चे प्रयत्न अन् परिस्थितीशी होणारी त्याची प्रतिक्रिया-आंतरक्रिया, त्याची तडजोड, आव्हानं स्वीकारण्याची वृत्ती, ते ते निवडक प्रसंग, सगळा सगळा विचार करा..." पटत चाललं. विभूतिपूजा नको पण माणूस म्हणून दादासाहेबांच्या अवघ्या व्यक्तिमत्त्वाकडे पहायला हवं. आता ह्यापुढे जास्त वेळ चर्चेत नाही घालवायचा... डायरी, दादासाहेबांचं भाष्य हे प्रथम मनात साठवून त्याची टिपणं काढायला हवीत. रोज त्यांच्याशी मुलाखती व्हायला हव्यात. त्यासाठी आपण आपले प्रश्न, शंका त्यांना विचारायला हव्यात.

"काय वाचल्यात का आमच्या डायऱ्या? आमचं अक्षर म्हणजे दिव्य. पोटात कोंबडी आणि कोंबडीचे पाय कागदावर. कळतं ना अक्षर...? कुठपर्यंत आलंय..?"

त्यांना मुलाखतींबद्दल विचारलं. म्हणाले- "वेळ काढला पाहिजे. आमच्याकडे कसा दरबार भरलेला असतो पाहिलंय ना? तुम्ही माझं चरित्र लिहिता आहात एवढा नुसता सुगावा जरी ह्या लोकांना लागला ना; तर संगमनेर, धुळे, नगर, निफाड, विंचूर कुठून कुठून लोक येथे धावत येतील आणि माझ्यासमोर (मी जिवंत असताना!) माझ्या आठवणी सांगत बसतील.. तेव्हा इथून उठून कुठेतरी शांत ठिकाणी बसायला हवं.

शांताबाई दाणींनी लगेच तसं स्थळ शोधून काढलं आणि दादासाहेब, दाणीबाई ह्यांच्या उपस्थितीत किती तरी गोष्टींचा उलगडा होत चालला. हास्यविनोद, गप्पागोष्टी, चर्चा ह्यातून वहीत टिपणे साकार होऊ लागली.

एके दिवशी दादासाहेब गेल्या गेल्या म्हणाले... "आज तुमच्यासाठी फार मौल्यवान गोष्ट काढून ठेवली आहे. खरं तर ती अमोलच. त्याची किंमत जगात कुणी नाही करू शकणार... येतो का काही अंदाज... नाहीच करता येणार... आतापर्यंत मीसुद्धा फारसं कुणाला दाखवत बसलो नव्हतो. काही अभिमानाच्या गोष्टी असतात. ही तर माझ्या अहंकाराची आणि गर्वाची सुद्धा वस्तू आहे."

दादासाहेब खूप खूप आपुलकीनं, जिव्हाळ्यानं सांगत होते. पुढं पुढं त्यांना गहिवरून आलं... कळेचना, असं हे कशाबद्दल बोलत आहेत. कोणती अमूल्य गोष्ट.

त्यांनी खरंच अगदी हलक्या हाताने जपून ते मोठं पाकीट बाहेर काढलं - उघडलं आणि म्हणाले, "बघा, मला बाबासाहेबांनी पाठवलेली ही पत्रं... सगळीच पत्रं बहुतेक इंग्रजीत आहेत... फार फार प्रेम केलं हो माझ्यावर ह्या मोठ्या माणसानं... कोणते हे लागेबांधे...? मी होतो कोण आणि झालो कोण... एखाद्या शिल्पकारानं छिन्नीनं दगडातून सुंदर मूर्ती हळूहळू घडवीत जावी तसं त्यांचं माझ्या आयुष्यातलं स्थान..." खूपच दाटून आला होता त्यांचा गळा...

हळुवारपणानं त्या खजिन्याला स्पर्श केला. अंगावर रोमांच उभे राहिले. हे तर कोणत्याही रत्नांपेक्षा अमूल्य असं होतं. दादासाहेबांनी जपलेला अंतरीचा दिवा. डायऱ्या म्हणजे 'तिळा तिळा दार उघड' असं वाटलं होतं; आता तर हा त्रैलोक्याचा ठेवाच हाती आला होता.

"बघा, वाचा... कोठे उपयोग होतो का हे तुम्हीच ठरवणार.." दादासाहेब सावरले होते.

एकेक पत्र. एकेक प्रसंग. 'भाऊराव' हे संबोधन पत्रात वापरलेलं. 'माय डिअर भाऊराव' मग अगदी मोकळ्या अक्षरात, दुसऱ्या लिपीत तशाच मनमोकळेपणानं लिहिलेली ही पत्रं. त्यातून काय काय कळत गेलं. डॉ. बाबासाहेबांच्या जीवावर बेतलेला तो भयंकर प्रसंग. १९२५-२६ह्या वर्षातला. माघ महिना, त्र्यंबकेश्वरला मोठी यात्रा भरणार होती. यात्रेनंतर डॉ. बाबासाहेबांची सभा होणार होती. सगळं पूर्वनियोजन भाऊरावांनी करून ठेवलेलं होतं. सकाळीच डॉ. बाबासाहेब नाशकात आले होते. तेव्हा भाऊराव शाहू बोर्डिंगचे अधीक्षक होते. त्यांच्याकडेच ते उतरले. भाऊराव रोजच गोदावरी नदीवर घारपुरे घाटावर पोहायला जात. त्या दिवशी त्यांच्या बरोबरच येण्याचा 'हट्ट' बाबासाहेबांनी केला. त्यांना समुद्रात पोहण्याची सवय. "तेथे पोहणारा लाटेवर तरंगतो, पाणी तुडवीत जात नाही" असं त्यांना भाऊरावांनी सांगून बघितलं. पण डॉक्टर कसले ऐकतात... पोहताना पाणी कापत कापत भाऊराव खूप पुढे गेले. मागून डॉक्टरसाहेब येतच असणार ह्या खात्रीने. मागे वळून पाहिलं तर बाबासाहेब तरंगून तरंगून थकले.. गटांगळ्या खाऊ लागले. शेवटी झपाट्याने पाणी तुडवीत भाऊराव त्यांच्याजवळ आले, त्यांना खेचतच त्यांनी नदीकाठावर आणले...

तर ह्याबद्दल मुंबईहून नंतर पाठविलेल्या पत्रात भाऊरावांना त्यांनी 'तारणहार' म्हटले होते! त्यानंतर कित्येकदा ते भाऊरावांना म्हणत.. 'हे आलेत आमचे जीवनदाते... त्या दिवशी हे नसते तर...!' एकदा तर भाऊरावांनी विनयपूर्वक पण त्राग्यानं त्यांना म्हटलं

होतं... "आता हा इतिहास झाला. तो तुम्ही विसरून जा. पुन्हा असं बोलून मला लाजवीत नका जाऊ.. तुमचं नसणं आम्हाला परवडणारं नाही...!"

किती तरी पत्रांवरती मग दादासाहेबांचं भाष्य व्हायचं. त्यांना ते ते प्रसंग आपण पुन्हा अनुभवीत आहोत असं वाटायचं. बाबासाहेबांचा सहवास, त्याचे सान्निध्य व त्यांचे मार्गदर्शन ह्याबद्दल किती बोलू अन् किती सांगू असं दादासाहेबांना होऊन जायचं. त्या दोघांमधील पत्रव्यवहारातून ही जवळीकीची वीण कशी दिसामाजी घट्ट विणली जात होती, ते दिसायचं. असंच एक पत्र होतं. १५ डिसेंबर १९४६चं. इकडे दादासाहेब आजारी होते म्हणून त्यांची पत्रे बाबासाहेबांना जाऊ शकत नव्हती. काय चाललंय्... म्हणून डॉ. बाबासाहेबांनी लिहिलेल्या पत्रात पुन:पुन्हा म्हटलं होत की, "तुम्ही लवकरात लवकर बरे व्हा...!" असं लिहिताना स्वत:च्या प्रकृतीबद्दल त्यांना सांगितल्याशिवाय बाबासाहेबांना रहावलं नाही... ते लिहितात... "माझी प्रकृती झपाट्याने खालावते आहे. पण तुम्ही मात्र माझी काळजी स्वत: आजारी असतांना करू नये. काही झाले तरी तग धरून रहाणार. आपल्या लोकांना जोपर्यंत माझी जरुरी आहे, तोपर्यत मी निश्चित जिवंत रहाणार आहे. ह्या माझ्या दुर्दम्य इच्छेमुळेच मी माझ्या क्षीण प्रकृतीवर मात करू शकतो... निदान तेवढे तरी आयुष्य द्यावे अशी माझी परमेश्वरजवळ प्रार्थना आहे." ... हे पत्र मूळात वाचून दाखवताना दादासाहेब खूप सद्‌गदित झाले होते... पुढचं त्यांना बोलवेना. परंतु स्वत:वर लगेच संयम ठेवण्याची, विवेकानं भावनेवर मात करण्याची त्यांची प्रवृत्ती असल्याने ते म्हणाले... 'बघा, ह्याच पत्रात त्यांनी 'शूद्रां'वर लिहिलेले नवे पुस्तक मला पाठवले आहे. पुन्हा माझ्या प्रकृतीची काळजी आहेच. महनीय नेत्यांनी, कार्यकर्त्यांना असं सांभाळायचं असतं. तीच शिकवण माझ्यात उतरली..."

मग तिथं उपस्थित असलेल्या दाणीबाई, इतर व्यक्ती दादासाहेबांबद्दल सांगायला लागायचे. चरित्रलेखकाला अशा छोट्या छोट्या गोष्टी हव्याच असतात. कुणीतरी सांगत होतं... "अहो आम्ही एका गावाजवळ रेल्वेने असेच पहाटे उतरलो. तेथल्या नळावर हातपाय धुतले. जवळ झोपड्या दिसल्या. एका झोपडीसमोर शेळीचं दूध एक म्हातारी बाई काढत होती. तिनं दादासाहेबांना पुष्कळदा पेपरमधल्या फोटोत पाहिलेलं असावं. पण तिनं त्यांच्याबद्दल ऐकलेलंही होतं. त्यांच्याकडे पाहून तिनं त्यांना ओळखलं. बसायला लावलं, खाटलं टाकलं अन् शेळीचं ते ताजं धारोष्ण दूध पितळेच्या पेल्यात ओतून त्यांच्या हाती दिलं. म्हणाली, "ऊन ऊन भाकरी टाकते. मिरचीबरोबरच खावा..!"

असं हे दोन्ही बाजूंनी प्रेम. प्रेम द्यावं तर दुप्पट मिळतं. दादासाहेबांजवळ हेकेखोरपणा, गर्विष्ठपणा, आत्मसंतुष्टता असती तर त्यांनी एवढा विराट लोकसंग्रह जमवून बाबासाहेब गेल्यानंतरही मोठमोठे सत्याग्रह पार पाडले नसते.

एकदा दादासाहेब म्हणाले, "अहो, तुम्ही 'राजगृहा'वर एकदा प्रत्यक्ष जाऊन या ना. तेथे बाबासाहेबांची मोठी लायब्ररी आहे. शिवाय तुम्हाला त्यांचे 'मूकनायक', 'बहिष्कृत भारत', 'जनता' ह्या वृत्तपत्रांच्या फाईल्सही चाळायला मिळतील. मी चिठ्ठी देतो. तुमच्याबरोबर आमचा एक मोठा माणूस देतो... जाऊन याच...!"

चरित्रलेखकाने, अशा सव्यसाची अन् सर्वंकष चौफेर समृद्ध व्यक्तित्व असलेल्या माणसाच्या जीवनाचे हरएक पैलू समजावून घेतले पाहिजेत. नाशिकच्या काळाराम मंदिर सत्याग्रहापासून

तर दादासाहेबांचे संघटनकौशल्य, यंत्रणेचे व्यवस्थापन, कार्यकर्त्यांना आपल्या चळवळीचं उद्दिष्ट समाजवून देऊन शिस्तीने काम करण्यास त्यांनाच प्रवृत्त करणं हे सगळं त्या त्यावेळी बाबासाहेबांनी ते संपादित करीत असलेल्या नियतकालिकांमध्ये मोकळेपणानं मांडलं होतं. म्हणूनच जेव्हा हे अंक, त्यातील एकेक चळवळ, निदर्शन, मोर्चा, सत्याग्रह ह्याबद्दल वाचायला मिळालं, त्यानंतर वाटलं की ह्याबाबत त्यावेळी प्रचलित असलेल्या 'केसरी' आदी नियतकालिकांनी कोणती मतं मांडली आहेत तेही वाचावं, चाळावं, त्यांची टिपणं काढावी. म्हणून 'राजगृहा'तील काम पाच-सहा दिवसात आटोपून आवश्यक त्या गोष्टींची टांचणं करून मग पुण्याला गायकवाड वाड्यात 'केसरी' ऑफीसमध्ये जायचं ठरवलं.

स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी झालेल्या गोलमेज परिषदा, नाशिकचा काळाराम सत्याग्रह, महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह आदी कितीतरी घटनांबद्दल आणि त्यावरील डॉ. बाबासाहेबांच्या भाष्याबद्दल 'केसरी' मध्ये भरपूर लिहून यायचं. त्या दोन्ही बाबींचा पडताळा घेणं, हे तसं अवघड काम होतं. कारण विरोधी बाजूंमध्ये मतमतांतरे असणारच. मग ह्याबद्दल चर्चा करायची नाशिकला आल्यावर दादासाहेब गायकवाडांशी, 'गावकरी' चे संपादक दादासाहेब पोतनीसांशी. त्यामुळे सम्यक् विचारसरणी निर्माण होत होती.

दादासाहेबांनी आपल्या सार्वजनिक ज़ीवनाला सुरूवात केली ती शाहू बोर्डिंग नाशिकच्या अधीक्षकपदापासून. तेथे राहून स्वत:चे वाचन, वक्तृत्व, शरीरप्रकृती, विद्यार्थ्यांचे संघटन इत्यादी अनेक गोष्टी ते स्वत: शिकले. आपले छंद त्यांनी वाढवले. सार्वजनिक वाचनालय, नाशिक ही त्यांची पंढरी बनली. पुढे स्थानिक स्वराज्य; त्यात नाशिक नगरपालिका, नाशिक जिल्हा लोकलबोर्ड ह्या माध्यमातून दलितांना विहिरी खुल्या करणे, त्यांच्यावर जमिनीच्या मालकीबाबत होणारे अन्याय दूर करणे इकडेच सर्वथैव त्यांचे लक्ष असे. विहिरी खुल्या करण्याच्या कामाबद्दल जेव्हा ते बोलत आणि त्यांना आलेल्या विदारक अनुभावांचे कथन करीत; तेव्हा 'नरेचि केला हीन किती नर!' हे पदोपदी आठवत राही. दादासाहेब लोकल बोर्डाच्या अधिकाऱ्यांना घेऊन खेडोपाडी विहिरी खुल्या करीत पण त्यांची पाठ फिरली की त्या विहिरीचं पाणी कचरा, विष्ठा इत्यादी टाकून ते पिण्यासाठी अयोग्य केलं जाई. त्या पुन्हा दलितांना बंद होत.

हे पुनश्च सांगताना किंवा त्या त्या प्रसंगी डायरीत लिहून ठेवताना दादासाहेब खूप व्यथित झालेले असत. कशा होणार सुधारणा, कितीवेळा ठराव घ्यायचे... कलेक्टरांना देखील नेहमी नेहमी जाऊन भेटून देखील इकडे तळागाळातील सवर्णांच्या मनोवृत्तीबदल होणार कसा? नुसते कागदी आदेश उपयोगी पडत नव्हते.

पुढे पुढे दादासाहेबांनी बाबासाहेबांच्या सर्व कार्यात स्वत:ला झोकून दिले. तो इतिहास ज्ञात आहे. त्या इतिहासाच्या पानापानांवर ह्या दोघांची कार्यमुद्रा उमटली आहे व त्यांच्याबरोबर अनेक कार्यकर्त्यांची, त्या-त्या भागातील नेत्यांची देखील.

स्वातंत्र्य मिळालं. नंतर १९४७ च्या २९ ऑगस्टला भारताची घटना तयार करण्यासाठी सरकारने लेखनसमितीची नियुक्ती केली. तिचे अध्यक्ष म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची नियुक्ती झाली. दादासाहेबांच्या जीवनातील हा सोन्याचा क्षण. त्यांनी त्या दिवशी डायरीत लिहिलं होतं... ''आमचा हा नेता आता खऱ्या अर्थाने भारताचा 'अत्याधुनिक मनू' झाला!

मला स्वत:ला त्यांचा शतश: अभिमान वाटतो.''

स्वातंत्र्य, फाळणी... त्यातून सिंध, बंगाल, पंजाब प्रांतात सुरू झालेले हत्याकांड... प्रत्यक्ष त्या घटनांबद्दल - आगगाडीला प्रेतं कशी बांधलेली असत.. रक्ताचे पाटच्या पाट कसे वाहत असत हे सगळं दादासाहेब सांगत असता ऐकवलं जायचं नाही. पक्ष समर्थ करण्यासाठी ते झटत होते. त्यांच्या डायरीत १९४७च्या ऑक्टोबरच्या दौऱ्याचा निर्देश होता. यवतमाळ, पांढरकवडा, वणी, चांदा, बल्लारपूर, आर्वी, बालाघाट, नागपूर, बऱ्हाणपूर, अमरावती इत्यादी ठिकाणी ही संघटना बलशाली करण्यासाठी त्यांनी सभा घेतल्या होत्या.

पुन:पुन्हा ते सांगत की त्या काळी दलितांचे हरतऱ्हेने उत्थापन, त्यांची उन्नती हेच त्यांचे उदात्त सार्वजनिक कार्य होते. इकडे १८ ऑक्टोबरला त्यांच्या सासऱ्यांचं-रखमाजी दाणी - ह्यांचं देहावसान झालं पण त्यावेळी ते येऊही शकले नाहीत.

दादासाहेब ठिकठिकाणी सभा, परिषदा घेत - पुष्कळदा त्यांचं आयोजन, नियोजन, संचलन सर्व त्यांनाच करावं लागे. जितकी तळमळ जास्त, तितके विविधांगी अनुभव. कोणतीही फलाशा वा स्वार्थ नसताना केलेल्या ह्या सार्वजनिक कामाबाबतही त्यांच्यावर हेत्वारोप होत. अतिशय संयमी आणि सहनशील असणाऱ्या दादासाहेबांचा एक दिवस सोशिकपणाच संपला अन् त्यांनी १९४७च्या ऑक्टोबरमध्ये डॉ. बाबासाहेबांना पत्र पाठविले- ''मला ह्या सार्वजनिक कार्यातून निवृत्त करा; मुक्त करा,''

ह्याचं उत्तर डॉ. बाबासाहेबांनी दादासाहेबांना जे दिलं ते एवढं चिरंतन, शाश्वत आहे की प्रत्यक्ष दादासाहेबांनी ते वाचून दाखवलं आणि म्हणाले- ''एवढं तळमळीनं, कळकळीनं, नेटकेपणानं ह्या महात्म्यानं मला लिहावं... तेव्हा तर मी ढसढसा रडलो होतो...!'' डॉ. बाबासाहेब लिहितात... ''भाऊराव, तुमची कार्यकर्त्याविरुद्ध असलेली तक्रार खरी आहे. निर्मळ कार्यकर्ते फार कमी असतात. स्वार्थी कार्यकर्ते मात्र भरपूर असतात. पण याचा अर्थ असा नव्हे की, प्रत्येक चळवळीचे तुम्ही जे अध्वर्यू आहात... त्यांनी या कामातून मुक्त व्हावे! वाईटातून जास्तीत जास्त चांगले करता येणे, हीच नेत्याच्या सामर्थ्याची कसोटी असते...!''

सार्वजनिक व आपल्या समाजासाठी पडेल ते काम करणारे दादासाहेब आर्थिकदृष्ट्या तसे फारसे सधन नव्हते. हे माहीत असल्याने डॉ. बाबासाहेबांनी त्यांना डिसेंबर १९४७ मध्ये एक नोकरी देऊ केली. कुरुक्षेत्रावर जायचं होतं. निर्वासित मोठ्या संख्येने पंजाबमध्ये येत होते. दलित निर्वासितांची परिस्थिती अत्यंत हलाखीची होती. तेथेही त्यांना अस्पृश्य समजलं जात होतं. अन्याय निवारणार्थ, त्यांच्या पुनर्वसनासाठी ही नेमणूक होती.

दादासाहेब जेव्हा तिथल्या निराश्रित कँपचे वर्णन करीत, तेव्हा वाटे स्वातंत्र्याच्या पोटामध्ये केवढ जहर दडलं होतं. दादासाहेबांची रहाण्याची व्यवस्था दयनीय होती. फक्त एक तंबू, ना खुर्ची, ना टेबल. तरीही त्यांनी तेथल्या दलितांच्या तक्रारींची बाजू राखली, वरिष्ठांनी दखल घ्यावी म्हणून खूप प्रयत्न केले आणि त्यांना माणुसकीचे हक्क काही प्रमाणात तरी मिळवून देण्यात ते यशस्वी झाले... तरीही प्रत्यक्ष दादासाहेबांना वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून हलकी व अपमानित वागणूक मिळे. आपली अस्मिता जपणाऱ्या ह्या माणसाने वेतन, भत्ते इत्यादी फायद्यांचा मुळीच विचार न करता राजीनामा दिला. त्यावेळी

कँपमध्ये दलित निर्वासित अक्षरश: ओक्साबोक्शी रडले.

दादासाहेबांना कुरुक्षेत्रावरील नोकरीपेक्षा महाराष्ट्रातील आपल्या कामाचं क्षेत्र मोलाचं वाटत होतं. तेथे एकटे असताना त्यांना येथल्या आपल्या स्नेह्यांच्या, सहकाऱ्यांच्या आठवणी येत. तेथे असताना मात्र बाबासाहेबांचं एक अतिशय व्यक्तिगत पत्र त्यांना मिळालं होतं. त्यात त्यांनी आपल्या प्रकृती अस्वास्थ्यावर उपाय म्हणून आपण लग्न करायचं कसं ठरवलं, पत्नीबद्दल अपेक्षा इत्यादी सविस्तरपणे दादांना कळवलं. दादासाहेब म्हणाले होते- "बाबासाहेब तसे एकाकीच. त्यामुळे त्यांनी एवढं विश्वासानं मला लिहिलं. मला ते पटलं... मी त्यांना अभिनंदनाचे पत्र पाठवले. पण अनेकांनी मात्र त्यांना शिष्टाचारास सोडून पत्रे लिहिली होती. कारण तो आंतरजातीय विवाह होता!

दादासाहेबांना, बाबासाहेबांनी अनेक पदांवर काम करण्याचा सल्ला आणि संधीही दिली होती. म्हणूनच त्यांचं फिरणं सदैव चालू असे. अनुभवांच्या समृद्धीत भर पडे. सिद्धार्थ कॉलेजच्या सल्लागार समितीवर आणि कार्यकारिणीवर दादासाहेबांना घेतलं होतं.

अशा वेळी मधूनच शांताबाई सांगत - "दादासाहेबांना किती दिवसापासून आम्ही सांगत होतो की, आपल्या मुलींसाठी स्वतंत्र शाळा काढा. आता हे वसतिगृह चांगलं चालतंच आहे ना? ह्या मुली तर आमच्या शाळेत येतीलच. गावातूनही येतील. पण ते हट्टी फार...!"

दादासाहेबांना १९६४ पर्यंत तरी वाटत होतं आता पुन्हा नवी जबाबदारी व तीही मुलींच्या शाळेची माध्यमिक व प्राथमिक दोन्ही - घेऊ नये. इतर शाळांत ह्या मुलींना बरोबरीनं वागवलं जात नव्हतं पण त्या अनुभवातून दादासाहेब जळी, स्थळी, काष्ठी,पाषाणी गेलेच होते. विरोधातूनच विकास होतो हे त्यांचं आवडतं तत्त्व होतं. पण बरोबरीच्या लोकांशी चर्चा करायची, त्यांचे मुद्दे पटले तर आपल्या आग्रही मुद्द्यांचं पुनर्परिक्षण स्वतःच करायचं, ह्या त्यांच्या आत्मशोधातूनच मुलींसाठी स्वतंत्र माध्यमिक शाळा १९६५ मध्ये स्थापन झाली. त्यांच्यासमोरच शाळेने केवढी प्रगती करून दाखविली.

तसे तर बाबासाहेबांनी औरंगाबाद मिलिंद महाविद्यालयाच्या इमारतीचे काम दादासाहेबांवर सोपवले होतेच. अर्थात बाबासाहेबांनी पत्राद्वारे कसे कॉन्ट्रॅक्टस् करावेत, विटा किती लागतील, सिमेंट किती लागेल इत्यादी गोष्टींबद्दल माहिती दिलीच होती.

पूर्वीचं आठवतांना दादासाहेबांनी शे.का.फे.ची थोडी पूर्वपीठिका सांगितली. १९५२च्या निवडणुका जवळ आल्या त्यावेळी शे.का.फे.ची मुंबई प्रांताची सर्व जबाबदारी दादासाहेबांवर सोपवली गेली होती. नंतर तर त्यांना मध्यप्रदेश, हैदाबाद इकडेही प्रचारासाठी जावं लागे. परंतु निवडणुकीत शे.का.फे.चा पराभव झाला... ह्याबाबत दादासाहेबांनी सर्वत्र पुन्हा फिरून सर्वेक्षण केले. बाबासाहेबाशी चर्चा केली.त्याबाबत डॉ. बाबासाहेबांनी एक तर्कशुद्ध पत्र दादासाहेबांना पाठवलं होतं. युती का? कशी? कोणाशी करावी? ह्याबद्दलही त्यांचे विचार आजही अभ्यासावेत असं दादासाहेबांचं म्हणणं होतं.

डॉ. बाबासाहेबांनी त्या पत्रात निराश होऊन शेवटी म्हटलं होतं... "आता प्रकृतीची काळजी करण्याचे मी सोडून दिले आहे. गौतम बुद्धाने म्हटलेच आहे की, ह्या जगात जी, जी गोष्ट अस्तित्वात आहे तिचा कधी ना कधी शेवट होतोच... माझ्या प्रकृतीची काळजी करण्यापेक्षा आता माझ्यावरील साऱ्या जबाबदाऱ्या तुम्ही स्वतः स्वीकारण्याची

मनाची तयारी लवकरच केली पाहिजे. कारण मी काही फार दिवस जगणार नाही, याबद्दल माझी खात्री होऊन चुकली आहे!''

हे पत्र दिल्लीहून १४ मे १९५२ ला पाठवलं होतं. १६ वर्षांनी त्याचं वाचन करताना दादासाहेबांना पुढचे शब्द दिसेनात. घशात हुंदके दाटून आले. १९५६ मध्ये डॉ. बाबासाहेबांचं महानिर्वाण झालं होतं. ते सारं दृश्य दादासाहेबांच्या मन:चक्षूंसमोर होतं... तसे मनाने कणखर, निष्ठांवत, दृढनिश्चयी असे असूनही दादासाहेब बाबासाहेबांच्या बाबतीत... जसजसे त्यांचे आजारपण वाढत चालले तसतसे... हळवे, खूपच हळवे होत गेले. मध्ये बौध्द धर्माचा विराट दीक्षान्त समारंभ नागपूरला झाला होता. त्याबद्दलही बाबासाहेब-दादासाहेब ह्यांच्या रंगलेल्या चर्चा; सगळं सांगून झालं होतं.

६ डिसेंबर १९५६... दादासाहेब सांगत होते, ''अहो, मधेच हा अपशकुनी, घोर आघात करणारा दिवस येईल हे आमच्या ध्यानी ना मनी... आम्ही तर १६ डिसेंबर १९५६ला मुंबईला नागपूरसारखीच मोठी धर्मांतराची सभा घ्यायची ह्या पूर्वतयारीत होते. डॉ. बाबासाहेब तेथे येणार होते. धर्मांतरामागील भूमिका, धर्मांतरानंतर काय? अशा कितीतरी गोष्टींचा त्यांच्या शैलीत ऊहापोह करणार होते... आणि ती भयंकर बातमी येऊन थडकली— ६ डिसेंबर १९५६ रोजी पहाटे झोपेतच हृदयक्रिया बंद पडून दादासाहेबांच्या ह्या मित्र, मार्गदर्शक, तत्त्वज्ञ अशा गुरूचे महानिर्वाण झाले होते.''

''मी आता काय करू, कोठे जाऊ... मला कोण सल्ला देईल... कोण आदेश देईल. सगळीकडेच प्रलय झाला असे वाटले. पण पुढचं सगळं सोसलं पाहिजे. पुढाकार घेतला पाहिजे. मन तयार नाही, पाय वळत नाहीत. दादर चौपाटी... चंदनाची चिता... चितेच्या ज्वाला गगनाला भिडू लागल्या.. लाखोंचा जनसमुदाय तेथे लोटलेला.'' त्या वेळी मावळत्या सूर्याला साक्षी ठेवून दादासाहेबांची प्रतिज्ञा केली होती... '' माझ्या जीवात जीव असेपर्यंत आपल्या समाजाला मी कुणाच्याच लवा-वळचणीला (कुणाच्याच आसऱ्याला) कधी जाऊ देणार नाही.''... अश्रूंचा प्रवाह ओक्साबोक्शी वाहू लागला होता.

दादासाहेबांचं चरित्र लिहिताना किती मौलिक गोष्टी हाताशी येत होत्या. अनेक राजकीय घडामोडींमध्ये खोलवर शिरायचं होतं. तसतसे प्रश्न मनात येत होते. मार्गदर्शक हरपला... पुढे काय... हिमालयाच्या सावलीत वाढलेला हाही सह्याद्रीच होता... संयुक्त महाराष्ट्राची चळवळ, त्या निवडणुका... त्यात नाशिकहून लोकसभेवर निवडून जाणे, त्यासाठी सर्व कार्यकर्त्यांचा मेळ घालून अहोरात्र प्रचार करणे. शे.का.फे.चे त्या निवडणुकीत एकूण १७ आमदार/खासदार निवडून आले. ही दादासाहेबांनी बाबासाहेबांना वाहिलेली सक्रिय, कृतिशील अशी श्रद्धांजली होती. पुढे भूमिहिनींचा देशव्यापी मोठा सत्याग्रह. त्यात तावूनसुलाखून निघाले दादासाहेब... सत्याग्रहींनी तुरुंग ओसंडून वाहू लागले. २ महिन्यात ३ लाखांवर सत्याग्रहींना अटक करण्यात आली.

संसदेत पंतप्रधान ना. लालबहादूर शास्त्रींना ऑक्टोबर १९६४ मध्ये दादासाहेबांनी नवबौद्धांच्या सवलतींपासून ते नोकऱ्यांमध्ये त्याचे प्रमाण येथपर्यंत १० मागण्या सादर केल्या होत्या. दादासाहेबांचं एकूणच कार्य अफाट... आपल्या लोकांच्या जीवनात ज्ञानाचा प्रकाश यावा, त्यांना नोकऱ्या मिळाव्यात, राजकारणात व इतर क्षेत्रात त्यांनी पुढे यावं

म्हणून शेवटपर्यंत दादासाहेबांनी कार्य केलं.

चरित्रलेखन करताना त्या कार्याची दखल तर तपशीलवार घ्यावी लागली. तपशील मिळवायला त्रास पडत होता तपशीलातून काय घ्यायचं, काय सोडायचं ह्याबद्दल तरतमभाव बाळगावा लागत होता. त्यांना, त्यांच्या सहकाऱ्यांना सर्वश्री रा. सु. गवई, राहम, भाऊसाहेब जगताप, दादासाहेब आहेर अशा कितीतरी व्यक्तींबरोबर त्यावेळी बोललं जाई.

चरित्रलेखकावर एक महत्त्वाची जबाबदारी असते आणि ज्या व्यक्तीचं चरित्र लिहायचं, ती जर प्रत्यक्षात जिवंत असली तर ही नीरक्षीर विवेकाची जबाबदारी फारच अवघड होऊन जाते. चरित्रनायकाला देव तर मानता येत नाही. भोवतालच्यांना वाटतं हा ग्रंथ तयार होतो आहे, तेव्हा विभूतीपूजाच महत्त्वाची. ते असले-नसलेले गुण चिकटवीत असतात. अशा वेळी-विशेष म्हणजे दादासाहेबच प्रकृती अस्वास्थ्य असलं-तरी-मध्येच सांगत... "नाही.. हे असं घडलेलं नाही. हे तुम्ही टाळा, ते लिहू नका, ते बाजूस सारा... सगळ्यांची नावं प्रत्येक ठिकाणी कशी येणार... मला मध्यभागी ठेवून माझ्या जवळपास उभं राहून असे किती लोक छायाचित्रात त्या फोटोग्राफरनं घ्यायचे.." अशा मोलाच्या त्यांच्या सूचना असत.

आपल्या जन्मगावालादेखील त्यांनी मला जायला सांगितलं. तेथलं त्यांचं घर, तेथील निसर्ग... सगळं पाहून यायला सांगून छायाचित्रं घ्यायला लावली. एकेका छायाचित्राचं जणू रसग्रहणंच करून त्यांचं 'आंबे' हे दिंडोरी तालुक्यातील गाव त्यांनी डोळ्यासमोर उभं केलं.

दादासाहेबांजवळ कितीतरी घटना, प्रसंग ह्याची छायाचित्रं होती. सगळी तारीखवार लावलेली. संसदेत विचारलेले प्रश्न, तेथील त्यांची ओघवती भाषणं- मजकूर कधी कमी पडला नाही. विनोद हा स्वभावाचा स्थायीभाव असल्यानं त्यांनी कुसुमाग्रजांबरोबर औरंगाबादपर्यंत केलेल्या प्रवासात 'साहित्या' वर मारलेल्या गप्पा देखील मनमुरादपणे हसून अन् इतरांना हसवून सांगितल्या होत्या.

अशा चौफेर व्यक्तिमत्त्वाचा चरित्रग्रंथ लिहून झाला.कोठे छापावा ह्यासाठी कुसुमाग्रजांनी मार्गदर्शन केले. तो ग्रंथ प्रत्यक्षात पाहून दादासाहेबांच्या डोळ्यात अक्षरश: आनंदाश्रू आले... त्या ग्रंथाची किंमत किती ठेवायची ह्याबद्दल आधी चर्चा चालली होती. सगळा खर्च प्रतीमागे ५ रुपये आला होता (१९६८). दादासाहेब उद्गारले.. "साडेपाच रुपये किंमत ठेवायची... माझे लोक गरीब आहेत... ते कर्ज काढूनही हा विकत घेतील. आपल्याला काहीही मिळवायचं नाही. परंतु समारंभाचा पुढे येणारा खर्च इत्यादी सगळं त्यांना पटवून दिल्यावर त्यांनी फक्त आठ आण्यांचीच त्यात वाढ करून ६ रुपये किंमत ठेवायला सांगितली... ह्या हिऱ्याला एकेक पैलू पडतच होते. अशा तेजोमय रत्नाच्या चरित्रग्रंथाचा भव्य प्रकाशन सोहळा नाशिकच्या हायस्कूल ग्राऊंडवर १३ ऑक्टोबर १९६८ रोजी भारताचे तत्कालीन गृहमंत्री ना. यशवंतराव चव्हाण ह्यांच्या शुभहस्ते अन् महाराष्ट्राचे मुख्यमंत्री ना. वसंतराव नाईक ह्यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला. कुसुमग्राज स्वागताध्यक्ष होते...

ह्या चरित्रलेखनाला १९६९चा महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. कारण अस्सल सोनं होतं हे... फक्त दागिना घडवण्याची कारागिरी चरित्रकाराची होती.

# दादासाहेब गायकवाड : एका समर्पित जीवनाची परिसमाप्ती

**सोपानदेव चौधरी**

प्रिय भाऊराव गायकवाड यांना मी प्रथम पाहिले ते कपाळावर रक्ताचा टिळा लावलेला! ते रक्त त्यांचे स्वतःचे होते. पू. बाबासाहेब आंबेडकरप्रणीत मंदिर प्रवेश सत्याग्रहाचा तो दिवस होता; रामाचा जन्मदिवस. ती १९३० सालाची रामनवमी होती. त्या सत्यागृहाचे सूत्रधार श्री. भाऊराव गायकवाड हे होते. स्पृश्यास्पृश्यांचा तो लढा होता. देव हा सर्वांचा आहे. माणसाला माणसासारखे मानवी हक्काने जगू द्या, असा तो साधा देवनिर्मित सवाल होता. परंतु त्या सवालाला उत्तर म्हणून देवाच्या पुजाऱ्यांना दगडधोंड्यांचे साहाय्य घ्यावे लागले. देवाचे दरवाजे बंद असले तरी खऱ्या अर्थाने दलित म्हणून मानल्या गेलेल्या समाजाचे डोळे उघडले. दगड-धोंड्यांच्या खोचीने लागलेला हा रक्ततिलक म्हणजे भाविकाल उज्ज्वल करणारे भाऊरावांच्या भालावरचे ते भाग्य होते. जोपर्यंत जगात असत्य आहे तोपर्यंत सत्याग्रह चालूच असणार. तो कधी संपत नसतो.

सत्यागृह हा कधी न संपे, संपत असतो अत्याचार! असे असले तरी तो आग्रह सोडून सत्यसंकल्पाची वाटचाल भाऊराव करू लागले. आपल्या पराक्रमानेच आपणास हवे ते मिळवायला हवे, कुणाची भीक नको. *तुका म्हणे बळी जाता, कामा हे निधान, भिकेसाठी कोण प्राण देतो?* प. पू. बाबासाहेबाचे आशीर्वाद आणि स्वतःच ते कर्तृत्व होऊन आपल्या समाजाला जागृत करण्याचे कार्यकर्त्यांनी सुरू केले. हीच त्यांच्या सत्यसंकल्पाची आणि मुक्तिसंग्रामाची वाटचाल! दगडविटांच्या मंदिराचे दरवाजे बंद असले तरी जनता जनार्दनाचे दरवाजे खुले होते. भाळी रक्ताचा टिळा लावून आपल्या तपस्वी जीवनाला सुरुवात करणारे असे एकमेव कर्मवीर भाऊराव गायकवाड हे होते. त्यावेळी पंचवटी येथील गांधर्व महाविद्यालयाचा मी एक विद्यार्थी होतो. आमच्या विद्यालयाच्या आश्रमासमोरच काळाराम मंदिराचे महाद्वार! तो प्रसंग आठवला म्हणजे अजूनही अंगावर शहारे येतात, दृष्टीसमोर भाऊराव उभे ठाकतात. भाऊरावांना प्रत्यक्ष पाहिले ते असे; परंतु त्यांचा व माझा परिचय नव्हता.

माझे विद्यालयीन शिक्षण संपविल्यावर मी पंचवटी सोडून नाशिक शहरात आलो. त्या वर्षभरात अधूनमधून भाऊरावांची व माझी भेट होत असे तीही रस्त्यावर! कधी कधी त्यांचे सहकारी प्रा. पांडुरंग जिवाजी सबनीस यांचेकडे ते भेटत असत. कष्ट, जिव्हाळा, शालीनता

या त्रिगुणांचीच जणू भेट! त्यांना पाहिले की कुणालाही प्रसन्नता वाटावी, त्याबरोबर सहानुभूतीही वाटावी असेच ते व्यक्तिमत्त्व! मी ज्यावेळी आग्रा रोडवर वैशंपायनांच्या बंगल्यात रहायला आलो (१९३२ साली) त्यावेळी आमच्या समोरच आग्रा रोडच्या दुसऱ्या बाजूला भाऊसाहेब, (दे. ना.) टिळक त्यांच्या नुकत्याच बांधलेल्या नवीन बंगल्यात रहायला आले होते. ते एक साहित्यिक घराणे. अर्थातच त्यांचे व आमचे घरोब्याचे नाते जडले. याच वर्षी माझ्या वैवाहिक जीवनाला सुरुवात झाली होती. टिळक घराण्याशी जोडणाऱ्या माउली म्हणजे 'साहित्यलक्ष्मी' लक्ष्मीआई टिळक. त्या अधूनमधून आमच्याकडेही मुक्कामाला असत. त्यांचे अखेरी अखेरचे बरेचसे लेखन माझ्या घरी झालेले आहे. भाऊसाहेब टिळकांच्याकडेही माझी जवळ जवळ दररोज फेरी असे.

एकदा असाच त्यांच्याकडे गेलो असताना तेथे श्री. भाऊराव गायकवाडांची भेट झाली. भाऊसाहेब टिळकांशी ते दिलखुलासपणे बोलत होते. दोघांच्या बोलण्यातील जिव्हाळा दिसून येत होता. दे. ना. टिळकांची व भाऊराव गायकवाडांची इतकी दाट मैत्री असेल याची मला कल्पना नव्हती. मध्येच भाऊरावांनी टिळकांना प्रश्न केला. "आई कुठे आहे?" तेव्हा मीच म्हणालो, "माझ्याकडेच आहेत," भाऊराव तसेच उठले व माझ्याबरोबर घरी आले. त्यांनी टिळक आईंना वंदन केले. आई मला म्हणाल्या, "अरे सोपानदेव! तुझ्यासारखाच हा माझा मानसपुत्र, भाऊराया!" तो पर्यंत भाऊराव गायकवाड हे माझे वडील मानसबंधू असतील याची मला कल्पना नव्हती. मला फार समाधान वाटले. काहीतरी हरवलेले गवसावे इतका मला आनंद झाला. तेव्हापासून भाऊराव गायकवाडांना मी 'दादा' या नांवाने संबोधू लागलो.

पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे कोर्टाच्या कामासाठी नाशिक येथे अधूनमधून येत असतात. ती बातमी दादासाहेबांच्याकडून मला कळली म्हणजे त्यांची भेट घ्यावी असे वाटे, परंतु ते नाशिक रोड मुक्कामी उतरत असल्यामुळे भेट घेणे आवश्यकच होते. तरीपण आमच्या दादासाहेबांनी तीनचार वेळा त्यांच्या भेटीला मला नेले. पुढे पूज्य बाबासाहेबांनी मला मुंबईस आपल्या राजगृहामध्ये मुक्कामासाठी बोलाविले होते. प्रिय दादासाहेबांच्यामुळेच एका युगपुरुषाचे दर्शन घडले. एवढेच नव्हे, तर त्यांचा सहवासही लाभला. मागे, एका गौरव अंकात त्यांच्यासंबंधीच्या हृद्य आठवणी मला लिहिता आल्या.

पू. बाबासाहेबांचा दादासाहेबांवर फार लोभ होता; आशीर्वाद होते, हे स्पष्टपणे दिसून येत असे. आणि दादासाहेबांची या परमदैवतावर केवढी निष्ठा होती ते शब्दांत सांगणे कठीण! तरीपण एक प्रसंग सांगावासा वाटतो. दादासाहेब हे समाजकारणी तर होतेच परंतु एखादे वेळी ते आपले हृदगत असे बोलून जायचे की त्याची गणना श्रेष्ठ साहित्यातच करावी लागेल. एकदा माझ्याशी बोलताना देवासंबंधी-धर्मासंबंधी चर्चा सुरु झाली मी शाळकरी विद्यार्थी असताना श्री. प्रबोधनकार ठाकरे यांची 'दसरा' ही कविता मी वाचली होती. त्यावेळी ती माझ्या तोंडपाठ होती. आमच्या बोलण्याच्या संदर्भात त्या कवितेचे एक कडवे मी म्हटले.

*धर्मावाचुनि प्राण न जाई*
*देवाविण नच अडते ।*

*आत्मशक्ति खंबीर, तयाच्या*
*त्रिभुवन पाया पडते ।*

त्यावर बेहद्द खूष होऊन दादासाहेब उद्‌गारले, "सोपानदेव, अगदी बरोबर! देव हा मूळात निराकार, त्याला कुणी पाहिले नाही. एवढे मात्र खरे की जो जन्म देतो, जीवन देतो. असा स्वर्गातला तो देव! परंतु जन्म घेतल्यावर जो जीवनाचा मार्ग दाखवितो, जीवन घडवितो, तो या इहलोकीचा भूदेव!" आणि मग दादासाहेब गहिवरले, त्यांचे डोळे पाणावले. त्यांना दिसला इहलोकीचा देव 'परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर!'

*देव असावा असा जयाला*
*असतिल माता पिता*
*निराकार जो निर्गुण त्यांच्या*
*पाठिस का लागता?*

दादासाहेबांनी कविवर्य कुंजविहारी याची ही कविता कधीच वाचलेली नव्हती. तरीपण त्या कवितेतील संपूर्णतया हृद्‌गत गद्यरूपाने त्याच्या मुखातून बाहेर पडले. अशी ही गुरुशिष्याची जोडी! एकदा मी सहज विनोदाने म्हणालो, "दादा, तुमचे जन्मगाव आंबे आणि बाबासाहेबांचे गांव आंबवडे"- माझे वाक्य पुरे होण्याच्या आतच दादासाहेब नम्रपणे बोलले, "रायवळने हापूसची बरोबरी करू नये," मी म्हणालो, "एखाद्या रायवळची गोडीही काही कमी नसते. तुमच्या गोड स्वभावाने तुम्ही सर्वांना जिंकून टाकले आहे." दादा नुसते हसले. अंगी आलेले थोरपण झटकून टाकणे हा त्यांचा स्थायीभाव! त्यामुळे "कारे भुललासी वरलिया सोंगा," त्या सोंगाची बतावणी उभ्या जन्मात त्यांना कधी करावी लागली नाही. समाजकार्याची शक्ती आणि व्याप्ती याकडे त्यांचे लक्ष वेधलेले असे. मातोश्री लक्ष्मीआई टिळक ह्या महाराष्ट्रशाहीर कविवर्य गोविंद यांच्या मुरलीमधील ओळी गुणगुणत असत.

*किती हे फूल, फूल फुलायचे*
*चंद्र की सूर्य व्हावयाचे*
*किती हे फूल, फूल फुलायचे*
*गगन की भुवन व्हायचे*

त्यावेळी दादासाहेबांनी वरचेवर ऐकलेल्या होत्या. त्यातील मर्म त्यांना पूर्णपणे उमगलेले असावे.

संयुक्त महाराष्ट्र समितीतर्फे दादासाहेब गायकवाड पहिल्या प्रथमच लोकसभेच्या जागेसाठी उभे राहिले होते, तो सामना फारच चुरशीचा होता. निवडून आले त्यावेळी त्यांची जी मिरवणूक निघालीं ती दृष्टीसमोरून हलत नाहीं. त्या मिरवणुकीत सर्व धर्मांची, सर्व पंथांची जनता सामील झालेली होती. मिरवणुकीच्या सुरवातीलाच मतदान केंद्रावर माझ्या पत्नी (सौ. लीलादेवीने) दादासाहेबांना ओवाळले. मिरवणूक रविवार कारंजाजवळ येताच ब्राह्मण माताभगिनी त्यांना ओवाळण्यासाठी आल्या. पू. दादासाहेबांच्या भालावर कुंकुमतिलकांचे थरावर थर लागले. त्यावेळी त्यांना आपल्या त्या पंचवटीतल्या रक्ततिलकाची आठवण झाली. ओवाळणाऱ्या माताभगिनींना वंदन करता करता दादासाहेबांना हुंदका आवरेना.

रक्ताचे मनोगत आसवांना कळाले होते. ते आसू पूज्य दादासाहेबांचे थोरपण सांगायला आले होते.

एकोणीसशे तेवीस साली पू. बाबासाहेबांनी आपल्या मुक्तिसंग्रामाला प्रारंभ केला. तेव्हापासून तर बहात्तर सालापर्यंत अर्धे शतक दादासाहेबांनी अविरत समाजसेवा केली. अनंत कष्ट सोसले. ऊन, वारा, पाऊस याची क्षिती न बाळगता खेडोपाडी जाऊन दलितांसाठी त्यांनी आपले प्राण वेचले. जनमने खेचून घेणारी त्यांची वाणी प्रभावी आणि लोभस होती. एवढ्या अफाट कार्याबद्दल त्यांनी कधी स्वत:चा गाजावाजा केला नाही. सिद्धी ही प्रसिद्धीच्या पाठीमागे कधीच लागले नसते. पू. दादासाहेबांचा व माझा इतका निकट परिचय पण कुणाबद्दलही निंदेचे शब्द त्याच्या तोंडून मी ऐकले नाहीत. त्यांच्या आजारात मी त्यांना भेटायला गेलो, आपल्या स्वत:च्या दुखण्याबद्दल ते काहीच बोलले नाहीत. उलट मलाच म्हणाले "तब्येतीला सांभाळीत जा." उभ्या जन्मात दादांनी स्वत:च्या तब्येतीची कधी दखलच घेतली नाही. ती श्रीमती गीतावहिनींनाच घ्यावीं लागली. प्रकृतीबरोबरच त्यांच्या कृतीला, कार्याला साथ दिली. त्याचप्रमाणे सहकाऱ्यांनीही त्यांची काळजी घेतली. दादासाहेबांनी आपले जीवन सर्वस्व आपल्या समाजाला अर्पण केले होते. महिन्याभराने त्यांच्या निर्वाणाचे दु:खद वृत्त मी बाहेरगावी असताना वर्तमानपत्रात वाचले, आणि मी सहजपणे उद्गारलो, 'खरोखरच पू. दादासाहेब म्हणजे एक समर्पित जीवन!' त्या समर्पित जीवनाची आज परिसमाप्ती झाली.

# बाबासाहेब व दादासाहेब यांचे प्रेरणादायी स्मारक : 'कर्मवीर दादासाहेब गायकवाड सांस्कृतिक केंद्र'

**विजय जाधव**

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या महापरिनिर्वाणानंतर रिपब्लिकन पक्षाची धुरा दादासाहेब गायकवाड यांच्यावर आपोआप येऊन पडली. दादासाहेबांनीदेखील ती तितक्याच ताकदीने पेलली.

दादासाहेब गायकवाडांनी नाशिक काळाराम मंदिराचा सत्याग्रह अत्यंत धैर्याने १९३०-३५ पर्यंत लढविला. ह्या कालावधीत डॉ. बाबासाहेब आंबेडकर राउंड टेबल कॉन्फरन्सच्या कामात मग्न होते. तत्कालीन सवर्णांचा; काळाराम मंदिर प्रवेशास प्रखर विरोध होता. तत्कालीन ब्रिटिश शासनसुद्धा बहुसंख्य असलेल्या सवर्णांना दुखावण्याचा प्रयत्न करत नव्हते. या आणि अशा अनंत अडचणी असतानासुद्धा दादासाहेब गायकवाडांनी काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह यशस्वीपणे चालवून आंबेडकरी चळवळीत ऐतिहासिक काम केले.

दादासाहेब गायकवाडांनी १९५३ साली मराठवाड्यात भूमिहीनांचा सत्याग्रह यशस्वी करून दाखविला होता. तद्नंतरच्या १९५६च्या संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत दादासाहेब गायकवाडांचा सिंहाचा वाटा आहे. इतिहास त्याला साक्षी आहे. तत्कालीन संयुक्त महाराष्ट्र समितीत सर्वश्री एस. एम. जोशी, कॉ. डांगे, कॉ. नाना पाटील व आचार्य अत्रे अशांसारखे रथी-महारथी संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठी एकत्रित कार्यरत होते. आंबेडकरी चळवळीचा प्रतिनिधी म्हणून दादासाहेब गायकवाडांनी उक्त रथी-महारथींच्या तोलामोलाचे किंबहुना, त्यांच्यापेक्षा थोडेसे अधिकच कार्य केले आहे.

उक्त रथी-महारथींमध्ये दादासाहेब गायकवाडांचे व्यक्तिमत्त्व आगळेवेगळे होते. त्यांचा अस्सल मराठी ग्रामीण भाषेचा बाज, त्यांची दणकट शरीरयष्टी व ग्रामीण जनतेला आकर्षित करील असा धोतर-कोट व निळी टोपी हा पोशाख. यामुळे दादासाहेब गायकवाड साथी एस. एम. जोशी, कॉ. डांगे, कॉ. नाना पाटील, आचार्य अत्रे यांचेसमवेत व्यासपीठावर सर्वांचे लक्ष वेधून घेत असत.

कर्मवीर दादासाहेब गायकवाडांचे यापुढील महत्त्वाचे कार्य म्हणजे ६ डिसेंबर १९६४ रोजी त्यांनी उभारलेले भूमिहीन शेतमजूरांचे आंदोलन. हे आंदोलन 'न भूतो न भविष्यति' अशा स्वरूपाचे होते. भूमिहीनांचा हा सत्याग्रह सातत्याने तीन महिने चालू होता. स्वातंत्र्यानंतर

साधारणत: १५-१६ वर्षांनी दादासाहेब गायकवाडांनी भूमिहीन शेतमजुरांच्या मुक्तिसंग्रामास प्रारंभ केला होता. कारण स्वातंत्र्याच्या १५-१६ वर्षांत भूमिहीन शेतमजुरांना स्वातंत्र्याने काहीच दिले नव्हते. ग्रामीण भागातील, तळागाळातील भूमिहीन शेतमजूर जमीनदारांच्या जमिनीवर जनावरासारखे राबत होते. सबब ह्या तळागाळातील भूमिहीन शेतमजुरांचे आर्थिक व सामाजिक शोषण जगाच्या वेशीवर टांगण्याचे महनीय कार्य दादासाहेब गायकवाडांनी केलेले आहे.

कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या या ऐतिहासिक कार्यामध्ये तत्कालीन तरुण मंत्रमुग्ध होऊन काम करीत होते. या सत्याग्रहात ग्रामीण भागातील महिलासुध्दा मोठ्या प्रमाणात सहभागी झालेल्या होत्या. या सत्याग्रहाची व्याप्ती सर्व भारतभर होती. या सत्याग्रहात पंजाबपासून कन्याकुमारीपर्यंत आंबेडकरी जनता सहभागी झाली होती. या सत्याग्रहाने आंबेडकरी जनतेची अस्मिता आणि संघर्षाची प्रवृत्ती भारतीयांच्या समोर मांडली गेली होती.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड सामाजिक कार्यासाठी प्रसंग पडल्यास पायी जात. जेवणा-खाण्याची किंवा आरामाची पर्वा न करता, अविश्रांतपणे गोरगरीब आंबेडकरी जनतेच्या समस्या सोडविण्यासाठी कार्यमग्न रहात. दादासाहेब गायकवाड वैयक्तिक जीवनात स्वावलंबी होते. स्वत:ची कामे ते स्वत:च करीत. पत्रव्यवहारदेखील स्वत:च करीत. दुसऱ्या कोणावर अबलंबून राहण्याची त्यांची प्रवृत्ती नव्हती.

दादासाहेब गायकवाडांनी भूमिहीन शेतकऱ्यांच्या सत्याग्रहाच्या माध्यमातून त्यांचे संघटनकौशल्य भारतातील तत्कालीन राजकीय पुढाऱ्यांसमोर प्रकर्षाने मांडलेले होते. आंबेडकरी चळवळीत राजकीय एकी आणि बेकी हा नित्याचाच प्रकार आहे. केव्हातरी दुरुस्त-नादुरुस्त असे गट पडतात. तदनंतर अशा स्वरूपाचे वेगवेगळे विचार घेऊन रिपब्लिकन पक्षातील मंडळी वेगवेगळी होतात. दादासाहेब गायकवाडांच्या निधनानंतर दलित पॅन्थरसारखी एखादी जहाल व बलवत्तर संस्था जन्मास येते. पण त्या संघटनेतसुद्धा कालांतराने गट-तट निर्माण होतात. आंबेडकरी चळवळीतील ही आवर्तने व प्रवर्तने, हा आता नित्याचाच कार्यक्रम झालेला दिसतो.

तथापी अशा सर्व गटातटांच्या राजकारणाला विटलेला, आंबेडकरी चळवळीत सजग व सत्शील असलेला सुशिक्षितांचा एक वर्ग मात्र निश्चितपणे अस्तित्वात होता आणि आहे. हा आंबेडकरी चळवळीतील दुसऱ्या पिढीतील सुशिक्षित वर्ग, विधायक कामामध्ये गुंतलेला होता आणि आहे. दादासाहेब गायकवाडांपासून स्फूर्ती घेऊन व बाबासाहेब आंबेडकरांपासून प्रेरणा घेऊन काल आणि आज अनेक सुशिक्षित तरुणांनी आंबेडकरी विधायक कार्यामध्ये स्वत:ला बांधून घेतलेले आहे. अशात काही सुजाण, सुशिक्षित व सजग आंबेडकरी तरुणांनी एकत्र येऊन अंधेरी (प.) ह्या मुंबई उपनगरात आर.टी.ओ. कॉर्नर जवळ 'कर्मवीर दादासाहेब गायकवाड सांस्कृतिक केंद्र' या संस्थेची उभारणी केली आहे. ह्या ठिकाणी संस्थेची तीन मजली इमारत आज दिमाखात उभी आहे. कोणत्याही राजकीय व्यक्तीची किंवा पक्षाची कसलीच लाचारी न पत्करता, आंबेडकरी विचारांनी भारलेल्या सुशिक्षित अधिकारी तरुण वर्गाने निर्माण केलेल्या विधायक कार्याचा हा एक चालता-बोलता इतिहास आहे. डॉ. बाबासाहेबांचे व कर्मवीर दादासाहेब गायकवाडांचे इतके भव्य स्मारक मुंबईत अन्यत्र

कोठे असेल असे वाटत नाही. ह्या कर्मवीर दादासाहेब गायकवाड सांस्कृतिक केंद्रांमार्फत खालील समाजोपयोगी विधायक कार्यक्रम राबविले जातात.

अ) सर्वच मागासवर्गीयांच्या भारतीय प्रशासनातील सहभागासाठी केंद्रामार्फत आय.ए.एस.व आय.पी.एस.सारखे प्रशिक्षण वर्ग चालविले जातात. ह्या सुविधेचा आज अनेक तरुण विद्यार्थी लाभ घेत आहेत.

ब) सर्वच स्तरातील विद्यार्थ्यांसाठी, विशेषत: गरीब कुटुंबातील विद्यार्थ्यांच्या अभ्यासाची सोय व्हावी म्हणून उक्त केंद्राच्या वतीने, केंद्राच्या इमारतीत उचित ग्रंथालयासह अभ्यासिकेची व्यवस्था केंद्राने केलेली आहे. गरीब कुटुंबातील अनेक विद्यार्थी ह्या अभ्यासिकेचा लाभ घेत आहेत.

क) त्याचप्रमाणे केंद्रामार्फत प्रशिक्षण वर्ग, विपश्यना शिबिर, महिलांसाठी शिवणकला वर्ग, लहान मुलांसाठी चित्रकला वर्ग, योगशिक्षणाचे वर्ग, कराटे प्रशिक्षण वर्ग, नृत्यकला वर्ग व अभिनय शिक्षण वर्ग इत्यादी उपक्रम राबविले जातात.

ड) सर्वच आंबेडकरी समाजात व विशेषत: बौद्ध समाजात वधू-वर सूचक मंडळाची नितांत गरज होती. ही गरज लक्षात घेऊन केद्राने वधू-वर सूचक मंडळ चालविले असून त्याचा लाभ मुंबईतील तमाम युवक-युवती घेत आहेत.

इ) गोरगरीब समाजात अद्याप असा एक वर्ग आहे की, ज्याला स्वत:च्या उन्नतीसाठी व व्यवसायासाठी कर्जाची गरज भासते. तथापि गोरगरिबांना कमी व्याजदरात कर्ज देणाऱ्या वित्तीय संस्था कमी आहेत. ही गरज लक्षात घेऊन केंद्रांने 'कर्मवीर दादासाहेब गायकवाड सहकारी पतपेढी' स्थापन केली आहे व त्याचा लाभ गरजूंना मोठ्या प्रमाणात होतो आहे.

या केंद्राच्या उक्त इमारतीत एकंदर तीन सभागृहे आहेत. त्यातील एक वातानुकूलित आहे. या तिन्ही सभागृहात समाजजागृतीसाठी व्याख्याने, चर्चासत्रे व परिसंवादासारख्या कार्यक्रमांचे आयोजन केले जाते. कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या विचारप्रेरणेतून व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या महान कार्यातून स्फूर्ती घेऊन उक्त केंद्राची वाटचाल प्रगतिपथावर आहे.

## अनुक्रम

### कविता



### आठवणी

# गायकवाड भाऊराव कृष्णाजी

**अरुण काळे**

भिंतीचा रंग उडाला, तडे गेलेत
घराला घरपण नाही
पण तुझं नाव आहे शाबूत.
अ.नं. गायकवाड भाऊराव कृष्णराव
हत्ती पुसला गेला, नाही वाचला.

अनेक प्लेग, पटक्या, महामाऱ्यांना
पचवून वाचलेलो आम्ही
त्या दिवशी खऱ्या अर्थाने तू वाचवलंस
भीम बुडत होता मडम डोहात,
अख्खा बहिष्कृत भारतच
स्वप्नांसहित बुडत होता
पण तू होतास शिवाचा जीवा
मृत्यूवर चाल करून गेलेला
मग तू झालास त्याचा
भन्ते आनंद किंवा कॉम्रेड लेनिन,
त्याचा प्रिय भाऊराव...
तुझ्या भरवश्यावर तो लढाया आखीत गेला
आणि तू विजयाचा एकेक दगड रोवीत गेलास.

चावडी पुढचे गंजीफा खेळाडू
गावभर जोहार करीत फिरणारे
दारिद्र्यात लोळणारे
त्यांना तू केलंस सैनिक
आणि महाडला दाखवले पाणी
एकदा तुम्ही सैनिक झालात की
युद्ध पुढं ढकलण्यात अर्थ नसतो

लोकमातीतला तू अस्सल सेनापती
सैनिकांच्या आधी फ्रंट सांभाळणारा
घेऊन गेलास या सैन्याला मजल दरमजल
काळाराम, मुखेड, येवला करीत
दिक्षाभूमी पर्यंत

तू होतास सर्व आघाड्यांवरचा
रांगडा गडी, अष्टपैलू कॅप्टन
अस्खलीत इंग्रजी बोलणारा
अभ्यासू सासंद, मुत्सद्दी काळजीवाहक
सभागृहात आणि रस्त्यात
ड्यूक समोर गेलेल्या शेतकऱ्यासारखा

तुझा काळच होता भारावलेला अस्सल
एकदा तू निवडून आलास आणि
लोक आनंदाने नाचू गाऊ लागले
'नाना तऱ्हेचे रचले डाव'
निवडून आला कसा भाऊराव
कवी-कलावंत ही अस्सल होते
चळवळीच्या गाड्याला ओढणारे
तुझ्या सोबत सर्वच होते
सन्मानाची फेर वझडी खाणारे
तडजोडीची चिकन तंदुरी तुम्हाला काय माहीत?

मातीचं दुखणं जेवढं भीमाचं, तेव्हढंच तुझंही
त्याला पाहिजे होता
एकच सातबारा सर्वांचा
तू उतरलास रस्त्यात स्वप्न घेऊन
एका अभूतपूर्व इतिहासासाठी
पुढे स्वप्नाचे तीन तेरा झाले
अनेक साठेखतं झाली एकाच जमिनीची

पंतप्रधानालाही जयभीमच करणारा
तू आमचा नायक
तुझी आठवण म्हणजे
कृतीवर असणाऱ्या अलौकिक निष्ठेची
रस्त्यातल्या उन्हाची, फुफाट्याची
बंधुभावाची, समतेची, ममतेची, मुक्तीची आठवण.

खोट्या इतिहासाच्या काल....
कुणी कितीही करोत तयारी
तू आमचं सर्वंकष लढाऊ जाणूक
आमच्या रक्तामांसात समावलेलं
पिढी दर पिढी संक्रमीत होत जाणारं.

# कर्मवीर दादासाहेब गायकवाड

**फ. मुं. शिंदे**

काळ पडला मागे असे पाऊल तुझे पुढे
भीमाचा, जयभीमाचा जयजयकार घडे

धनी धावला तिकडे गेली धरणी
राबणारे तसेच उपाशी चरणी
तूच दिले मग इर्षेचे हंगामाचे धडे

बाबाचा तू घडातला की गाभा
प्रज्ञेच्या तू आदित्याची आभा
रोज तुझेही पावलात चळवळीच्या पडे

पाय कसे आज उजेडात आंधळे
दिवसाढवळ्याही अंधारच ओघळे
कानी तुझेच चौघडे आणि किल्ल्याला तडे

गावात, शेतात भीम पेरला तू
मनीमानसाच्या भीम हेरला तू
वाटेवाटेवर पाऊल गौतमाचे पुढे

# महाराष्ट्राचा देदीप्यमान तारा निखळला!

ग. त्र्यं. माडखोलकर

खुद्द डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची दादासाहेबांविषयी किती नितांत आदराची आणि विश्वासाची भावना होती, याची एक आठवण येथे देण्यासारखी आहे. १९४६च्या जुलैमध्ये मुंबई येथे संयुक्त महाराष्ट्र परिषदेची स्थापना होऊन, महाराष्ट्र एकीकरणाच्या चळवळीला सुरुवात झाल्यानंतर, तिचे सरचिटणीस श्री. माडखोलकर आणि मुंबईतील मुख्य कार्यकर्ते श्री. श्रीपादराव नवरे असे दोघे, १९४६च्या ऑगस्टमध्ये, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना भेटण्यासाठी मुद्दाम सिद्धार्थ कॉलेजमध्ये गेलेले होते. त्या वेळी काँग्रेसश्रेष्ठींकडून संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्याच्या प्रश्नाला मान्यता मिळणे अशक्यप्राय असल्याचा आपला अभिप्राय त्यांनी अत्यंत सडेतोडपणाने सांगितला; व स्वत:चे काही मतभेदही बोलून दाखविले. पण, नंतर ते श्री. माडखोलकर यांना म्हणाले, "आज तुम्ही जसे मला येथे येऊन मुद्दाम भेटलात, तसेच नाशिकला जाऊन आमच्या दादासाहेबांनाही भेटा. माझी सगळ्या बाबतीत नेहमी त्यांच्यावरच भिस्त असते. म्हणून माझ्याप्रमाणे त्यांचेही या बाबतीत मत तुम्ही समजावून घ्या. नाहीतरी श्री. भाऊसाहेब हिरे यांना भेटण्यासाठी तुम्ही वारंवार नाशिकला जाताच. त्याच वेळी दादासाहेबानांही भेटून त्यांचे सहकार्य मिळविण्याचा प्रयत्न करा." हा जो सल्ला डॉ. आंबेडकर यांनी त्या वेळी दिला. त्यात ते स्वत: आणि दादासाहेब या दोघांचे जे विलक्षण साहचर्य आणि सहकार्य सार्वजनिक बाबतीत होते, त्याचे मर्म साठवलेले आहे.

डॉक्टरसाहेबांनी १९२५ पासून १९५६ पर्यंत ज्या ज्या चळवळी हाती घेतल्या, जे जे सत्याग्रह केले, शैक्षणिक संस्थांची जी उभारणी अखिल महाराष्ट्रभर केली आणि शेवटी भारतीय समाजजीवनाला हलवून सोडणारे जे धर्मचक्र-प्रवर्तनही केले, त्या त्यांच्या सर्व कार्यातील श्री. दादासाहेब गायकवाड ही अतुल आणि अमोघ अशी शुभशक्ती होती. किंबहुना, बाबासाहेबांनी स्फूर्ती द्यावी आणि दादासाहेबांनी त्या स्फूर्तीतून चळवळीचा गदारोळ उठवावा; बाबासाहेबांनी शिक्षणसंस्था निर्माण करण्याचा संकल्प करावा आणि दादासाहेबांनी जिवाचे रान करून तो संकल्प सिद्धीला नेऊन दाखवावा, अशी जणू त्या दोघांत एक प्रकारची श्रमविभागणीच होऊन गेलेली होती. त्यामुळे, त्या दोघांचे व्यक्तित्व आणि नेतृत्व हे सर्व बाबतीत परस्परांना पोषक आणि पूरक होऊन त्यांच्या संयुक्त कर्तृत्वामुळे दलित समाजाचा तर कायापालट होऊनच गेला, पण शिवाय महाराष्ट्राच्या जीवनालाही पूर्वी

कधी नव्हे अशा प्रकारची कलाटणी मिळून गेली. गेल्या १५० वर्षांत भारतात दलित समाजाचे अनेक हितचिंतक, उद्धारकर्ते आणि आणि नेते होऊन गेले. पण महाराष्ट्रात जसे दलित समाजाच्या जागृतीचे, संघटनेचे आणि कार्यश्रमतेचे उज्ज्वल यश आज आपल्या दृष्टीस पडते, तसे ते अन्यत्र कोणत्याही प्रदेशांत दृष्टीस पडत नाही. डॉ. बाबासाहेबांच्या अलौकिक नेतृत्वाला कर्मवीर दादासाहेबांच्या नैष्ठिक कर्तृत्वाची जी साथ सदैव मिळाली, ती या यशाला बऱ्याच प्रमाणात कारण झाली, यात शंका नाही.

# वीरनेता

## एन. एस कांबळे

१९४८ साली सोलापूर शे.का.फे.चे अधिवेशन पंढरपूर तालुक्यातील काशेगावी भरविण्यात आले होते. दादासाहेब गायकवाड प्रमुख पाहुणे होते. पक्षकार्याकरिता ५०० रुपयांची देणगी दादासाहेबांना अर्पण करण्यात आली होती. परिषद चालू असतांनाच पुण्याहून प्रकाशित होणारे 'काळ' वर्तमानपत्र दादांच्या वाचण्यात आले. विजापूर जिल्ह्यातील सासनूर या गावी १३ महारांपैकी ११ महार कापले गेले होते. सबंध झोपडीलाच आग लावण्यात आली. जीव वाचविण्याकरिता ते बाहेर पडण्याचा प्रयत्न करीत होते, परंतु दरवाज्यावर यमलोक उभे होते. ११ महारांचे तुकडे तुकडे केले. बिचारे दोघेजण जखमी अवस्थेत पळाले म्हणून वाचले. मजकूर वाचताच दादांच्या डोळ्यांतून चटकन अश्रू आले. लोकांना आश्चर्य वाटले. मला जवळ बोलावून सांगितले. ताबडतोब विजापूर जिल्ह्यात गेले पाहिजे. दादाच्या आज्ञेप्रमाणे आम्ही गाडीने विजापूरला गेलो. आमची भाषा मराठी आणि तेथे कर्नाटकी. आमचे त्यांना समजणार नाही व त्यांचे आम्हाला समजणार नाही म्हणून आम्ही काका कारखानीस यांच्या वसतीगृहातील एल. एस. मुकीहार, या मॅट्रीकच्या वर्गात शिकत असलेल्या विद्यार्थ्याला बरोबर घेतले. त्याला मराठी व कर्नाटकी या दोन्ही भाषा अवगत होत्या. सासनूर या गावी जाण्यासाठी डोण नदी लागते. पावसाळी दिवस असल्याने नदी दुथडी भरून वाहत होती. पलिकडे जाण्यासाठी होडी नव्हती परंतु त्या धीरोदात्त कर्मवीरांनी कसलाही विचार न करता कपडे काढले, लंगोट आवळला आणि नदीच्या धारेत स्वत:ला झोकून दिले, त्यांच्यामागे आम्हीही उड्या टाकल्या. सासनूर गावी फक्त वृद्ध स्त्रिया व मुले होती. आम्हाला पाहिल्यावर घाबरून ते पळू लागले. परंतु आम्ही बाबासाहेबांच्या नावाचा जयजयकार करताच थांबले, दादांनी त्यांच्याकडून सविस्तर हकीकत ऐकून घेतली आणि थैलीच्या रूपाने मिळालेले ५०० रुपये त्या निराधार महिलांच्या स्वाधीन केले. पुन्हा नदीतून पोहून येऊन बागलकोट मुक्कामी देशमुख नावाचे डी.एस.पी. होते; त्यांना संपूर्ण हकीकत सांगितली. तेथून पुन्हा विजापूरला त्या जखमींची भेट घेतली. घडलेल्या अत्याचाराचा रिपोर्ट वर्तमानपत्राला दिला. हा सगळा विधी करण्याकरिता ४ दिवस गेले. हे चार दिवस आम्ही केवळ शेंगदाण्यांवर काढले. पाचव्या दिवशी दादा नाशिकला गेले. किडनी आणि न्यूमोनिया यांनी दादासाहेब सतत ३ महिने अंथरुणाला खिळून होते.

स्वत:चा जीव धोक्यात घालून समाजसेवा करणारा नेता पुन्हा लाभेल का?

# प्रेमळ दादासाहेब

**जे. डी. जाधव**

१९६१ चा एप्रिल महिना होता. मला पहिल्या आठवड्यात 'युपीएससी'चे पत्र आले. मुलाखतीसाठी दिल्लीला बोलविले होते. तिथे कुणी ओळखीचे नव्हते. कुठे राहायचे हा प्रश्न होता. मी मनाचा हिय्या करून दादासाहेब गायकवाडांना दिल्लीला पत्र पाठविले व त्यांना माझा कार्यक्रम कळविला. मी त्या दिवशी बुधवारी फ्रंटियर मेलने निघालो व दुसऱ्या दिवशी सकाळी नवी दिल्लीत पोहचलो. स्टेशनात गाडी पोहचताच मी सामान दारात घेऊन उभा राहिलो. पाहतो तो प्लॅटफॉर्मवर स्वत: दादासाहेब फेऱ्या मारताना दिसले. मला आश्चर्याचा धक्का बसला. मी उतरल्यावर त्यांना वाकून नमस्कार केला. त्यांचे पहिले वाक्य होते, पोरा, पायाला हात कशाला लावतोस. सामान काढण्यास त्यांनी मला मदत केली, ते रिक्षात टाकले व रिक्षा १५, जनपथ या त्यांच्या घरासमोर उभी राहिली. माझी ख्याली खुशाली विचारली. प्रवास कसा झाला याची चौकशी केली. इंटरव्ह्यू कधी आहे ते विचारले. आंघोळीला गरम पाणी दिले. न्याहरी दिली. गव्हाची चपाती, अंड्याची चटणी व दूध असा मेनू होता. मी येथेच्छ नास्ता केल्यावर दादासाहेबांबरोबर गप्पा मारण्यासाठी गॅलेरीत आलो. तिथे त्यांच्या भोवती दहा-बारा माणसांचा गराडा होता. त्यांची चर्चा मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या स्कॉलरशिप्ससबंधी होती. त्यांनी माझी एक-दोन लोकांशी ओळख करून दिली व लगेच मला हुकूम केला, 'तुझा उद्या इंटरव्ह्यू आहे, जाऊन अभ्यास कर' मी सरळ आत गेलो व माझ्या कामाला लागलो.

दिवसभर आमची भेट झाली नाही. ते बहुधा संसदेत गेले असावेत. संध्याकाळी बऱ्याच उशीरा म्हणजे साडेसात-आठच्या दरम्यान परतले. त्यानी कोट-टोपी काढून ठेवली व दिवाणखान्यांत बैठक मारली. त्यांनी त्यांच्या नोकराला हाक मारली. पहिला प्रश्न विचारला, वो बम्बईका जाधव लडका किधर है? मी लगेच हजर झालो व आमच्या गप्पा रंगल्या. त्यांनी मला ओझरचे आमचे काका एम.पी.जाधव यांच्याबद्दल विचारले. अर्थात मला त्यांच्याबद्दल विशेष माहिती नव्हती. नंतर त्यांनी श्री शाहू छत्रपती बोर्डींगला बाबासाहेब आल्याचा प्रसंग खुलवून सांगितला. त्यांच्या सांगण्याप्रमाणे बाबासाहेब जेव्हा होस्टेलच्या प्रांगणात आले तेव्हा ते उमद्या राजकुमारासारखे दिसत होते. त्यांच कसं स्वागत करावं, हे मला सुचेना. त्यांच्या पाया पडावे की मिठी मारावी, हा प्रश्न पडला. शेवटी त्यांनी त्यांचा हात धरला.

साडेआठनंतर अनेक लोक त्यांना भेटायला आले. त्यांची प्रत्येकाची विचारपूस केली. कोणाला पत्रे, कोणाचे निरोप दिले. नऊ सव्वानऊनंतर त्यांनी मला हाक मारली. मी त्यांच्या जेवणासाठी थांबलो म्हणून ते रागावले. नंतर टेबलावर जेवण आले. बाजरीची खरपूस भाकरी व मटण असे जेवण होते. दादासाहेब फार कमी जेवले व मला म्हणाले, 'मी जरा कागदपत्र पाहतो' असे सांगून दुसऱ्या रूममध्ये गेले व झोपायला सांगितले. ते कधी झोपले हे मला कळले नाही. सकाळी मात्र माझ्या अगोदर दादासाहेब तयार होते. ते स्वत: शहाजन भवन ('युपीएससी'चे कार्यालय) येथे मला घेऊन गेले व ते त्यांच्या कामासाठी गेले. माझा इंटरव्ह्यू दुपारी संपला. मी जरा दिल्लीत भटकून घरी गेलो. माझ्या अगोदर दादासाहेब घरी पोहचले होते. त्यांनी पहिला प्रश्न विचारला, 'पोरा, इंटरव्ह्यू कसा झाला' मी त्यांना सांगितले. पण त्यांचे समाधान झाले नाही. मी कसा बोललो, काय प्रश्न विचारले, मी कशी उत्तरे दिली. मी कसा बसलो होतो.हे सर्व सांगून झाल्यावर त्यांनी मला सांगितले की, 'तू नक्कीच पास होणार' आणि त्यांच्या आशीर्वादाने मी खरोखरच पास झालो.

# परिवर्तन लढ्याचा झुंजार सेनानी

**एम. डी. शेवाळे**

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मानवमुक्तेच्या लढ्यात स्वत:ला झोकून दिलेले जे काही कार्यकर्ते आंबेडकरी चळवळीने पाहिले, त्यामध्ये कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचा अगदी वरचा क्रमांक लावावा लागेल.

दादासाहेब गायकवाडांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी तत्त्वज्ञान व विचार सर्व थरांत पोहोचविण्याचे अतोनात मेहनतीचे महत्त्वाचे कार्य केले आहे. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी त्यांना 'कर्मवीर' उपाधीने संबोधिले आहे.

दादासाहेब गायकवाड यांची कार्याची कसोटी १९६४ सालच्या भूमिहीनांच्या सत्याग्रहाच्या रूपाने सर्व देशानी जाणली. लाखो सत्याग्रही तुरुंगात गेले. अगदी उत्स्फूर्तपणे गेले. महाराष्ट्रातील व देशातील तुरुंगात कैद्यांना राहण्यासाठी व ठेवण्यासाठी जागा शिल्लक राहिली नाही. त्यावेळचे भारतीय पंतप्रधान कै. लालबहादूर शास्त्री यांनादेखील दादासाहेबांच्या जनशक्तीच्या रेट्याची दखल घ्यावी लागली. मोर्चाच्या समोर कै. लालबहादूर शास्त्री यांना स्वत: यावे लागले व भूमिहीनांच्या बऱ्याचशा मागण्या मान्य कराव्या लागल्या.

या निमित्ताने लाल किल्ल्यावर लाखोंच्या उपस्थितीत भूमिहीनांच्या सत्याग्रहाची सांगता झाली. मी मोठा नशीबवान की, त्या मेळाव्यापुढे दोन मिनिटे मलाही बोलण्याची संधी मिळाली. मी धन्य झालो. केवळ दादासाहेबांच्या प्रेमुळेच मला ही संधी मिळाली होती. लाखोंच्या भूमिहीनांच्या यशस्वी सत्याग्रहामुळे देशातील राजकीय जनजीवन पार ढवळून निघाले व दादासाहेब गायकवाड यांची जनशक्ती या निमित्ताने देशातील सर्व नेत्यांच्या ध्यानात राहिली.

कै. लालबहादूर शास्त्रीनंतर इंदिरा गांधी पंतप्रधान झाल्या. त्यावेळी दादासाहेब राज्यसभेचे सदस्य होते. कालांतराने दादासाहेबांना अर्धांगवायूचा आजार झाला. त्यानंतर ते शरपंजरी पडल्यासारखेच होते. राज्यसभा सदस्यत्व टिकविण्यासाठी राज्यसभेत हजर राहणे आवश्यक असते. तेव्हा एकदा दादासाहेब गायकवाड व्हीलचेअर वरून राज्यसभेत उपस्थित राहण्यासाठी गेले असताना राज्यसभेत उपस्थित असलेल्या पंतप्रदान इंदिरा गांधी या स्वत: दादासाहेबांना सामोऱ्या गेल्या व त्यांना घेऊन त्यांच्या जागेपर्यंत चालत राहिल्या. इतकी महती दादासाहेब गायकवाड यांनी सर्वशक्तीमान इंदिराजींच्या मनात निर्माण केली होती. एका अर्थाने दादासाहेब गायकवाड म्हणजे परिवर्तनाच्या चळवळीतील झुंजार सेनानीच होते.

# शूरा मी वंदिले

## रूपा साळवे

हजारो वर्षे पददलित पीडित व मागासलेल्या, अस्पृश्य मानलेल्या समाजाला नवजीवन देऊन त्यांच्या मानवी हक्कांची त्यांना प्रकर्षाने जाणीव करून देणारे व तहहयात त्यांच्या भल्यासाठी झटणारे बोधिसत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर हेच आपले एकमेव नेते आहेत; असे समाजावर, त्यांचा कार्यरूपाने व त्यांनी उभारलेल्या चळवळीतून सर्व समाज संघटित करून बाबासाहेबांचे एकनिष्ठ अनुयायी बिंबवण्याचे काम, कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी केले. त्या काळी समाजातून जी कार्यकर्त्यांची फळी निर्माण झाली, त्यात आघाडीचे व सरसेनापती कर्मवीर दादासाहेब ठरले. पददलित समाजातील दैन्य, दारिद्र्य, अज्ञान, गोरगरीबांची होणारी पिळवणूक, त्यांच्या हालअपेष्टा यांचे सत्य दर्शन त्याकाळी दादासाहेबांना खेड्यातून पहावयास मिळाले. त्यातही पददलित व अस्पृश्य मानलेल्या समाजांची तर अत्यंत दैन्यावस्था होती. त्यांना अन्न, वस्त्र, निवारा यांच्यासाठी स्पृश्य मानलेल्या मनूच्या वंशावळीवर अवलंबून राहावे लागत होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी अस्पृश्य मानलेल्या समाजाच्या हक्काच्या प्राप्तीसाठी जेव्हा रणशिंग फुंकले, तेव्हा त्या रणकुंडात दादासाहेबांनी स्वत:ला झोकून दिले. (समानशीलेषु व्यसनेषु सख्यम् या उक्तीप्रमाणे) डॉ. बाबासाहेबांच्या सहवासात राहून प्रत्येक चळवळीत, प्रत्येक लढ्यात ते एकरूप झाले. त्यांनी आपले परिश्रम आपल्या दलित समाजाच्या कारणी लावले.

सतत प्रसिद्धी पराङ्मुख राहून, दलित जनतेची लहान-मोठी कामे स्वत: लक्ष घालून अहर्निश करीत असणारे समाजसेवक दादासाहेबच! १९५५ पासून ते १९७१ पर्यंत त्यांच्या जीवनाचे आणि कार्याचे मला बोर्डिंगची विद्यार्थिनी व अधिक्षिका म्हणून अत्यंत जवळून पाहण्याचा व शक्य तो सर्व सहकार्य खारीच्या वाट्याने करण्याचा योग आला.

सामाजिक कार्य करीत असताना अस्पृश्य समाजाचे खेड्यातील लोकांचे व आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील इतर समाजातील लोकांचीही कामे ते तळमळीने व पोटतिडकीने, पाठीचा कणा मोडेपर्यंत करीत. त्यांचे एकच ब्रीद वाक्य आठवते, ते हे की, मी ज्या समाजाचे नेतृत्व करतो, त्या समाजाला खायला अन्न नाही. अंगावर कपडे नाही, रहायला घर नाही. अशांचे नेतृत्व मला करायचे आहे. त्यामुळे चांगले राहण्याचा चांगले कपडे घालण्याचा मला नैतिक अधिकार काय? म्हणून ते अत्यंत साधे जीवन जगले.

१७ वर्ष खासदार असतानाही स्वत: काटकसरीचे जीवन जगून खासदारकीचा सर्व पैसा

सामाजिक, विधायक, शैक्षणिक व धार्मिक कार्य यांनाच बहाल दिला.

दादासाहेबांच्या साधेपणाबद्दल बऱ्याच लेखकांनी लिहिले आहे. परंतु त्यांचे साधेपण ढोंगी, (बगळ्यासारखे) महागडे अजिबात नव्हते. कपडे साधे, सदरा पापलीनचा. तेही त्र्यंबकराव ठाकूर यांच्याकडे. टोपी व सदरा यांनीच शिवलेला असायचा. तसेच वहाणा धाकराव गुरुजी, त्र्यंबक दरवाजा, याच्याच दुकानातील असायच्या. लंगोट आणि कोपरी मात्र मी घरच्या मशीनवर शिवून द्यायची. त्याच्या बरोबर क्रांतिसिंह नाना पाटील यांचेही लंगोट व कोपऱ्या शिवण्याचे काम माझ्याकडे येत असे. Simple Living and high thinking या इंग्रजी म्हणीपणे 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' अशी त्यांची जीवन पद्धती होती. डामडौल, शौक, ऐश यापासून ते अगदी अलिप्त होते. त्यांना कोणतेही व्यसन नव्हते. त्यामुळे ते कधी थकलेले दिसत नसत. रात्री दोनला जरी झोपले तरी पहाटे ५ ला उठलेच पाहिजे. अशा नियमीतपणामुळे ते सतत तरुणांना लाजवीत असत. असा त्यांचा तरुणांना लाजविणारा उत्साह होता. त्यामुळे पक्षाच्या कार्यकर्त्यांनाही काम करण्यास हुरुप वाटे. जेवणाच्या बाबतीत त्यांची जीभ चटावलेली नव्हती. जगण्यासाठी खावयाचे आहे, खाण्यासाठी जगावयाचे नाही. असे त्यांचे ब्रीद वाक्य होते. म्हणूनच सामाजिक कार्याच्या रगाड्यात असेल ते खाऊन मोकळे होत. त्यांनी कधी खाण्याच्या बाबतीत चव पाहिली नाही व स्वयंपाक्यांनाही कधी बोलून नाराज केले नाही. जेवणात बाजरीची भाकरी, डाळ, तोंडी लावण्यास भाजी, चटणी (बोंबलाची किंवा इतर) अशी मेजवानी असायची. दात घासायला सुद्धा त्याकाळी कोलगेट ब्रश नसायचा. त्याकाळी टुथपावडर प्रसिद्ध होती. ती सुद्धा विकत न घेता आम्ही घरीच बनवत होतो. सभेला गेल्यावर; रानशेणी, गोवऱ्या वेचून आणून त्यात इतर साहित्य घालून त्यांचे मंजन तयार केलेले. तेच मंजन ते दिल्लीला घेऊन जात.

एकदा तर गंमत झाली. दिल्लीहून त्यांना नाशिकला येण्यासाठी पहाटेची पंजाब मेल पकडायची होती. तर घाईघाईने बाथरुममध्ये गेले असता, त्यांनी मंजन समजून नीळीच्या पावडरनेच दात घासले. अंघोळ करून बाहेर आले व घाईघाईने तयारी केली. निघताना सहजच त्यांचे आरशाकडे लक्ष गेले. पाहतात तो सर्व तोंड निळीने भरलेले दिसून आले. ते पाहून त्यांचे त्यांनाच हसू आले. परत बाथरुममध्ये जाऊन मंजनने दात घासून घाईघाईने पंजाब मेल पकडली आणि नाशिकला रवाना झाले.

अधिवेशन काळात दिल्लीला जाताना जेवणाचे सर्व साहित्य, बाजरीचे पीठ, भाज्या, गोडतेल घेऊन जात. बऱ्याच वेळा क्रांतिसिंह नाना पाटील मुंबईवरून दिल्लीला जात असता अगोदर पत्राने अण्णांकडे, 'साहित्य पाठव' असे कळवित. प्रवासात कोठेही विकत घेत नसल्याने जेवायचा डबा दिल्लीला जाईपर्यंत येथूनच नेला जाई व गाडीत ओळखीचे कोणी भेटले तर त्यांनाही देत असत. उरलेला डबा बंगल्यातील लोकांनाही वाटून त्यांची चव चाखण्यास देत. कॉफीसुद्धा थर्मासमध्ये भरून दिली जाई. जास्त सामान असेल तरच हमालाची गरज भासे. नाहीतर दादासाहेब स्वत: सामान टॅक्सीत ठेवत. दिल्लीचा बंगला इतर किंमती सामानापेक्षा सजविण्यापेक्षा, माणसांनी सजवला होता. पंधरा जनपथ हा बंगला यापूर्वी स.का.पाटील, भारत सरकारचे अन्नमंत्री असताना त्यांच्या ताब्यात होता. सात आठ

खोल्यांचा हा बंगला असतानाही तीन खोल्या ताब्यात होत्या. एक खोली क्रांतिसिंह नाना पाटील यांना राहण्यास दिली होती. एका खोलीत पक्षाचे ऑफीस होते. बाकी खोल्या सर्व विदर्भातील काही कुटुंबीयांना व यूपी मधील सामाजिक कार्यकर्त्यांना राहण्यास दिल्या होत्या. त्यातील मोतीलाल हा दादासाहेबांचा पी.ए.म्हणून पक्षाचे काम पहात असे.

टॅक्सीचा खर्च वाचावा म्हणून क्रांतिसिंह नाना पाटील व ते मागच्या दाराने पायी-पायी पार्लमेंटला जात व येत. केवढी ही काटकसर! अशा तऱ्हेने १७ वर्षे खासदारकीचा पैसाही स्वत:च्या चैनीसाठी, स्वत:च्या कुटुंबासाठी न वापरता सामाजिक, विधायक, शैक्षणिक, धार्मिक व राजकीय यासाठीच त्यांनी वापर केला.

अशा तऱ्हेने आपले संपूर्ण जीवन त्यांनी समार्पित केले.

असे हे थोर विचारवंत! दूरदृष्टीचे व सामाजिक बांधिलकी असणारे कर्मवीर दादासाहेब गायकवाड पुन्हा होणे नाही त्यांच्या अष्टपैलू व्यक्तीमत्वापैकी त्यांचा साधेपणा कसा होता, हे लेखाद्वारे आपल्या पुढे मांडण्याची मला संधी मिळाली.

त्यामुळे मी धन्य झाले.

# कर्मवीर दादासाहेब गायकवाडांच्या आठवणी

**ॲड. बाजीराव कांबळे**

कर्मवीर दादासाहेब गायकवाड नाशिक येथे मुलींच्या वसतीगृहात नेहमी बसत असत. व लोकांची गाऱ्हाणी ऐकत असत. त्यांच्यासारखा व्यवहारी चतुरपणा, त्यांच्या पश्चात असलेल्या कोणत्याही तथाकथित पुढाऱ्यांमध्ये नाही, हे मी माझ्या ८१ वर्षाच्या अनुभवावरुन सांगतो आहे.

कार्यकर्त्यांची चूक झाली व होत असेल तर त्याला समजावण्याच्या पद्धती दादासाहेबांकडे फार वेगळ्या होत्या. मी, दादासाहेब गायकवाडांच्या रिपब्लिकन पार्टीमध्ये महाराष्ट्राचा अध्यक्ष होतो. त्यावेळेस नाशिक येथे मोठी सभा मुलींच्या वसतीगृहाच्या पटांगणात मंडप टाकून घेतली होती. सन १९७२-७४ चा तो काळ होता.

त्यावेळी नामदार यशवंतराव चव्हाण, नामदार बाळासाहेब देसाई, नामदार हिरे, शांताबाई दाणी, एन. एच. कुंभारे, बॅरिस्टर राजाभाऊ खोब्रागडे इत्यादी मंडळी स्टेजवर होती.

मला, पिवळा हत्ती सिगारेट ओढण्याची सवय होती. दररोज दोन पाकिटे लागत असत. दादासाहेबांच्यादेखत सुद्धा मी सिगारेट्स ओढत असे. परंतु त्यांनी मला कधी फटकारले नाही. उलट प्रेमाने, कार्यकर्त्यांना न दुखावता माझी सिगारेट ओढण्याची सवय कशी मोडली हा किस्सा सांगतो. मला त्यांचा अभिमान वाटतो.

सभा सुरू झाली. सवयीप्रमाणे यशवंतराव चव्हाण यांच्या भाषणाच्या वेळी मी स्टेजवरच सिगारेट पेटविली. दादासाहेबांच्या लक्षात आले, त्यांनी मला भाऊसाहेब म्हणून हाक मारली. वर आपण उठून स्टेजखाली आले. माझ्याबरोबर वसतिगृहाच्या ऑफिसमध्ये नेले व हळूच सांगितले, "भाऊसाहेब, मी सिगारेट ओढत नाही, स्टेजवर कुणीच ओढत नाही. तेव्हा सभेची सभ्यता पाळण्याकरिता तरी निदान तुम्ही सिगारेट ओढू नका" असे मला म्हणाले. दादासाहेब पुढे म्हणाले, 'भाऊसाहेब कधी सिगारेट नाही ओढली तर चालणार नाही का? माझे ऐका आणि सिगारेट ओढणे सोडून द्या. ज्या गोष्टीपासून स्वत:ला, समाजाला, देशाला फायदा होत नाही त्या गोष्टीपासून आपण नेहमी दूर राहावे." असा न रागावता मला उपदेश केला. भर सभेत उठून माझ्या एका सिगारेटने दादासाहेबांना स्टेजखाली यावे लागले. ही गोष्ट माझ्या मनाला लागून गेली व त्याचवेळी त्यांच्यादेखत मी खिशातील सिगारेट, डबी व काडेपेटी काढून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या फोटोसमार खाली ठेवली व दादांना मी म्हणालो, "दादा, तुमची जशी इच्छा आहे त्याप्रमाणे करीन. मी आजच

सिगारेट सोडतो आहे. आणि तेव्हापासून गेली ४० वर्षे सिगारेटला हात लावला नाही. सिगारेटवरच्या हत्तीच्या चित्राला व आपल्या प्रश्नाच्या चित्राला आपणच जाळत राहिलो, तर इतर कोणीही जाळत राहतील. आपण तसे करू नका. आपला हत्ती जाळू नका आणि तेव्हापासून आजतागायत हत्तीछाप सिगारेट नव्हे तर इतर कोणतेही सिगारेट, विडी, चिरुट तोंडात धरली नाही आणि मला 'हत्तीने', दादासाहेबांच्या कृपेनेच आमदार म्हणून विधानसभेत प्रवेश मिळवून दिला. माझे निवडणूक चिन्ह 'हत्ती' होते. आणि या 'हत्ती'मुळेच मी कर्जत, जामखेड मतदारसंघातून मंत्र्याला पाडून केवळ २४ मतांनी निवडून आलो आणि तेव्हापासून मी आजतागायत दादासाहेबांचा एक सच्चा अनुयायी ठरलो आहे.

दादासाहेब नसते, तर माझी हत्तीछाप सिगारेट सुटली नसती. केवळ त्याच्या प्रेमामुळेच मी आजपर्यंत घडत गेलो आहे व घडलो आहे. असे अनेक किस्से माझ्या जीवनाच्या पटावर दादासाहेबांनी कोरून ठेवलेले आहेत. सत्ता मिळाली तरीही त्यांना सत्तेची मस्ती आली नाही. मला आठवते, दादासाहेब गायकवाड खासदार होते. त्यांची सभा क्रांतिसिंह नाना पाटील यांच्या समवेत सातारा जिल्ह्यात कोरेगावला होती. दादासाहेब व मी रेल्वेने कोरेगाव स्टेशनवर उतरलो. दादासाहेब खासदार होते. त्यांच्याकडे फर्स्टक्लास रेल्वेपास होता. हातात एक पिशवी त्यामध्ये एक धोतर, लंगोट, शेंगदाणे, गुळाची वडी, व दाढी करण्याचे खोरे एवढेच सामान या पिशवीत होते. लहानसा पंचा पण होता. आम्ही स्टेशनवर उतरलो मी बरोबर होतो. फर्स्टक्लासच्या वेटींग रुमला कुलूप होते. पोर्टर चावी घेऊन गावात गेला होता. स्टेशनमास्तर म्हणाले, "चावी आणायला पाठवितो. आपण स्टेशनवर थांबा." दादासाहेब म्हणाले थर्डक्लासचे वेटिंग रुम दाखवा. तिथे नानापाटील व दादासाहेबांनी थर्डक्लास वेटींग रुममध्ये गर्दी पाहिली. म्हणून आम्ही स्टेशनवर आलो. जणू आम्ही एक सामान्य कार्यकर्ता होतो. 'रिपब्लिकन पार्टीचा' अशा वेळी आम्ही बाहेर लिंबाच्या झाडाखाली बसलो. दादासाहेब गायकवाड खासदार होते हे विसरले, बाकावर आपल्या पिशवीतील धोतर काढून बाकावर अंथरले आणि म्हणाले भाऊसाहेब, तुम्ही विश्रांती घ्या, मी तोपर्यंत दाढी करून नळाखाली आंघोळ करतो."

एवढे मोठे विशाल हृदयाचे खासदार आपल्या कार्यकर्त्याला आपल्या पिशवीतील स्वत:चे धोतर काढून त्यांच्यावर विश्रांती घेण्यास सांगतात. खिशात फर्स्ट क्लासचा पास असून आंबेडकरांचे नाव घेऊन पुढारीपण मिरविणाऱ्या, पुढाऱ्यांना पाहून मन विषण्ण होते. असे ते दादासाहेब गायकवाड आणि कुठे अन्य रिपब्लिकन पुढारी.

इतकेच नव्हे, तर आपल्याला राजकीय सत्ता मिळाली त्याचा उपभोग तळागाळातील कार्यकर्त्यांना सुद्धा देण्याच्या प्रवृत्तीचा पुढारी अद्यापही माझ्या पहाण्यात आलेला नाही.

दादासाहेब गायकवाड यांनी पुणे जिल्ह्यातील सर्व संरक्षण खात्यातील कामगार भरतीसाठी ॲड. बाजीराव कांबळे यांना अधिकार दिलेले आहेत. ते ज्यांची शिफारस करतील त्या सर्वांना संरक्षण खात्यातील निरनिराळ्या डेपोमध्ये कायमची नोकरी मिळवून द्यावी असे आदेश दिल्लीहून व मिलिटरीतील सर्व अधिकाऱ्यांना पाठवून देऊन माझ्या नावाची शिफारस केली'. त्यांच्या त्या दिलेल्या अधिकारपत्रावर सेंट्रल ऑर्डिनन्स एक्सप्लोझिव्ह डेपो (सी.ओ.डी.) ॲम्युनेशन फॅक्टरी, चिखलवाडी, व्हेइकल डेपो या सर्व संरक्षण

खात्यातील माझ्या अधिकारपत्रावरून नोकरीला लावले आहे. अनेक खेड्यापाड्यातील लोक आता नोकरी करून सेवानिवृत्तही झाले आहेत. असा नेता, असा पुढारी माझ्या ८१ वर्षात कोणीही आढळून आलेला नाही.

दादासाहेबांच्या अशा अनेक आठवणी माझ्या जीवनात सांगण्यासारख्या आहेत. परंतु वाचकांची मी जास्त परीक्षा घेऊ इच्छित नाही. म्हणून एवढ्याच आठवणींवर, सर्वांना पद्मश्री कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्याबद्दलही आदरपूर्वक आदरांजलीचे दोन शब्द सांगतो आहे. दादासाहेब खांद्याखाली एक व डोक्याकडील एक हे कधीच कोणाला कळले नाही. त्यांच्या हृदयात एक, डोक्यात एक यामुळे दादासाहेबांना ओळखणे सर्वांना कठीण झाले. परंतु छत्रपती शाहू महाराज, महात्मा जोतिबा फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचाराने समाजपरिवर्तनासाठी गाव व महारवाडा एक करण्याकरिता, जातीची दारे तोडून टाकण्याकरिता, यशवंतरावांनी दादासाहेबांशी सहकार्याचा हात मागितला व ७ डिसेंबर १९५६ रोजी बाबासाहेबांचे शव चैत्य भूमीवर चंदनाच्या लाकडामध्ये जळत असताना यशवंतराव चव्हाण, दादासाहेब गायकवाडांना उद्देशून बोलले, "दादासाहेब, मी पायातील काँग्रेसचे जोडे खाली सोडून वर आलो आहे. आपण मला साथ द्या. आणि त्यानंतर काँग्रेस व रिपब्लिकन पक्षाची युती होऊन महाराष्ट्रातील राजकारण, सामाजिक परिवर्तनाला नवीन वळण देण्याचे कार्य या दोन्ही पुढाऱ्यांनी प्रामाणिकपणे केले. त्या दोघांनाही माझे शतशः प्रणाम आहेत.

असाच एक प्रसंग, मद्रासचे रिपब्लिकन पार्टीचे अध्यक्ष एन. शिवराज हे दिल्लीला वारले असतानाचा! त्यावेळेस त्यांचे प्रेत घेऊन मी व दादासाहेब गायकवाड विमानाने मद्रासला गेलो. त्यावेळी दादासाहेब मला म्हणाले, 'भाऊसाहेब, बुद्धवंदना घ्या. मी बुद्धवंदनेला मध्येच सुरूवात केली. पण ती बरोबर वाटली नसल्याने दादासाहेब हळूच म्हणाले, भाऊसाहेब, आठवत नसेल तर बुद्धवंदनेचे पुस्तक नेहमी आपल्या खिशात ठेवा.''

त्यांची आठवण आजही मला येते. ज्या ज्या वेळेस मी बुद्धवंदना करतो, त्या त्या वेळेस मला त्यांचे ते शब्द आठवतात. मी त्यांचे ते शब्दवचन ही माझ्या आयुष्यभर लक्षात राहणारी गोष्ट आहे. त्यामुळे मी दादासाहेब गायकवाडांचा आयुष्यभर ऋणीच राहिलो.

# महाराष्ट्राचा एक दीपस्तंभ : कर्मवीर दादासाहेब गायकवाड

**भाई वैद्य**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यानंतर दलित समाजाची नौका कोणी धाडसाने हाकारली असेल, तर ती कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनीच! डॉ. बाबासाहेबांसारख्या ज्ञानसूर्यानंतर या कामाची जबाबदारी पत्करणे हे सोपे नव्हते. परंतु दादासाहेबांनी अत्यंत कौशल्याने हे काम पार पाडले. इतकेच नव्हे, तर आपल्या नेतृत्वाखाली दलित समाजाचा अभूतपूर्व असा लढा स्वातंत्र्यकाळात तरी अन्य कोणत्याही पक्षाने एवढ्या प्रचंड प्रमाणावर संघटित केलेला नव्हता. सुमारे साडेतीन लाख दलित कार्यकर्ते या लढ्यामध्ये सत्याग्रह करुन तुरुंगात गेले होते. हा लढा तसा देशव्यापी असला तरी त्याचा भर प्रामुख्याने महाराष्ट्रात अधिक होता. या लढ्यामध्ये दादासाहेबांचे नेतृत्व पुन्हा एकदा उजळून आले.

खरं तर दादासाहेबांची जीवनभर असेच अनेक लढे आयोजित केले होते. १९२७च्या महाडचा 'चवदार तळे' सत्याग्रहात दादासाहेब डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याबरोबर होतेच, परंतु त्यावेळी ते अत्यंत तरुण होते. या लढ्यात त्यांनी बाबासाहेबांचे संघटनकौशल्य जवळून न्याहाळले. बाबासाहेब सर्व सामान्य कार्यकर्त्यांच्या मताबाबत किती आस्था बाळगत असत, हेही त्यांनी पाहिले. मनुस्मृती दहनाचा कार्यक्रम असाच सर्वसामान्य माणसांच्या सूचनेवरुन आलेला होता. बाबासाहेबांनी लगेच त्यास मान्यता दिली व १९२८ साली प्रत्यक्ष मनुस्मृतीचे दहन करविले. यामुळे दलित समाजाच्या अंत:करणामध्ये जी चेतना निर्माण झाली, ती विलक्षण सामर्थ्यशाली होती. जातीव्यवस्था हाच आपला शत्रू आहे याचे भान भारतीय समाजाला करुन देण्याचे कार्य या कृतीने घडले. दादासाहेबांनी बाबासाहेबांपासून कृतिशील राजकारणाचे धडे घेतले. त्यातूनच पुढे त्यांनीही आयुष्यभर अनेक लढ्यांचे नेतृत्व केले.

'काळाराम मंदिराचा' सत्याग्रह हा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या पूर्वसंमतीनेच आखण्यात आला होता. बाबासाहेब प्रत्यक्ष स्वत:ही त्या काळात अनेक वेळा नाशिकला आले होते. परंतु बाबासाहेबांनीही ही गोष्ट मनोमनी ठरविली होती की, हा सत्याग्रह दादासाहेबांच्या नेतृत्वाखालीच लढविला जावा. अनेक वर्षे मंदिर प्रवेशाचा चाललेला लढा दलित समाजाच्या निर्धाराचा आणि दादासाहेबांच्या कार्यकर्तृत्वाचा निदर्शक ठरला. अस्पृश्य

समाजाने विशेषत: त्यातील सनातनी मंडळींनी जे अश्लाघ्य व माणुसकीला काळिमा फासणारे वर्तन केले, त्यात आज जर काही बदल दिसत असला तरी तो स्पृश्य समाजाच्या आंतरिक भावनेतून आलेला नसून दलित समाजातील प्रचंड  जागरण, त्यांच्या निर्धार, उद्दिष्टांसाठी सर्व हालअपेष्टा सहन करण्याची तयारी व कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्यासारख्यांचे नेतृत्व, यामुळेच हा बदल घडून आलेला आहे. गांधीजींनी १९३२ व ३३ या काळात सुमारे १० महिने आसेतुहिमाचल असा अस्पृश्यता विरोधी दौरा काढला होता. त्या काळामध्ये सर्व हिंदू सनातन्यांनी गांधीजींवर हल्ला केला नाही. अगर काळी निशाणे दाखविली नाही, असा एकही दिवस गेला नाही. गांधीजींच्या प्रयत्न स्पृश्यांचं हृदय परिवर्तन करण्याचा होता; तर बाबासाहेब व दादासाहेब हे दलितांमध्येच शक्ती संघटन करु पाहत होते. अखेर त्याचाच अधिक परिणाम झाला हे आज कबूल करावयाला लागेल.

बाबासाहेबांनी, आपल्यानंतर रिपब्लिकन पक्षाचे नेतृत्व दादासाहेबांनी स्वीकारावे असे स्वाभाविकपणे सुचविले होते. दादासाहेब भले उच्च विभूषित नसोत, परंतु त्यांच्याजवळ सर्वसामान्य लोकांना प्रेरणा देण्याचे जे अफाट सामर्थ्य होते ते बाबासाहेब स्वत: ओळखून होते. त्याचा प्रत्यय बाबासाहेबांच्यानंतर दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली जे लढे लढवले गेले त्यांवरून आलाच आहे. १९६४ साली सुमारे लाखभर लोकांचा एक विराट मोर्चा त्यांनी आयोजित केला होता. त्यावेळेला पंतप्रधान लालबहादूर शास्त्रींनाही हे सामर्थ्य दिसून आले. त्यांनी दलितांच्या मागण्यांबद्दल सहानुभूतीपूर्वक विचार करण्याचे कबूल केले. शास्त्रींच्या नंतर हे आश्वासन अर्धवट राहताच दादासाहेबांनी प्रचंड सत्याग्रहाचा दणका दिलाच होता.

श्री.यशवंतराव चव्हाणांच्या भूमिकेमुळे, दादासाहेबांनी काँग्रेसबरोबर सहकार्य करून दलित समाजाच्या मागण्या पुढे रेटण्याचा निर्णय केला. बाबासाहेबांनी आयुष्यभर काँग्रेसला विरोध केलेला असताना दलित समाजाला या युतीचे महत्त्व पटवून देणे, हे काम साधे सोपे नव्हते. दादासाहेबांसारखा जबरदस्त नेता असल्यामुळेच व त्यात त्यांचा स्वत:चा काहीही स्वार्थ नाही ही अनुयायांना खात्री असल्यामुळेच त्यांनी त्यास संमती दिली. मला आठवते, ते त्या काळात पुणे महानगरपालिकेच्यावतीने मानपत्र दिल्यानंतरच्या आपल्या भाषणात दादासाहेबांनी या युतीचा उल्लेख केला. दादासाहेब म्हणाले की,''काँग्रेसबरोबरच्या युतीमुळे मऊ होण्याइतका मी काही कच्च्या गुरुचा चेला नाही.'' दादासाहेबांच्या मनात बाबासाहेबांच्याबद्दलचा जो अपार भक्तीभाव होता तो जसा पाहण्यास मिळाला, त्याप्रमाणे बाबासाहेबांचा शिष्य त्यांच्या इतकाच कणखर असल्याचे त्यावेळी दिसून आले. संयुक्त महाराष्ट्र आंदोलनामध्ये दादासाहेबांनी जी कामगिरी केली ती सुवर्ण अक्षरांनी कोरण्यासारखी आहे. त्या काळात दादासाहेब हे महाराष्ट्रातील यच्चयावत जनतेचे अग्रणी नेते बनलेले होते.

कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांच्या जीवनाचे सार माझ्या दृष्टीने मानवी अधिकारचा लढा आणि भूमी हक्काचा संघर्ष या दोन गोष्टींमध्ये दिसते. दोन्ही गोष्टी आजही अपूर्ण आहेत. त्या पूर्ण करण्यासाठी प्रयत्नशील रहाणे,हीच त्यांना सुयोग्य अशी श्रद्धांजली ठरेल!

# अनुक्रम

## लेख



## भाषणे



## पत्रे



## परिशिष्ट

# माझे स्फूर्तिस्थान

**भाऊराव कृष्णराव गायकवाड**

सह्याद्रीच्या एका डोंगराळ भागात, महाविद्यालयासारख्या शैक्षणिक संस्थेस जन्म देताना हा रानामाळाचा डोंगराळ व आर्थिक दृष्ट्या मागासलेला प्रदेश या संस्थेच्या चालकांनी का निवडला; हा प्रश्न हे कॉलेज पाहिल्यानंतर प्रत्येकाच्या मनापुढे उभा राहतो. शिक्षणासारखे मौलिक कार्य करणाऱ्या संस्थेस ही जागा अयोग्य आहे असे वाटणे स्वाभाविक आहे. उच्च ज्ञानाचे दान करण्याकरिता ही जागा उचित नाही हे वर वर पाहणाऱ्याला खास वाटेल. असे असतानाही चालकांनी हीच जागा का निवडावी हे कदाचित कित्येकांना रहस्य वाटले.

परंतु पददलित समाजाच्या दृष्टीने ह्या जागेसारखी पवित्र जागा कोणतीच होणार नाही. हीच ती पवित्र जागा की, ज्या ठिकाणी अस्पृश्यतेच्या शृंखलेवर घाव घालण्यात आला! हीच ती जागा की, ज्या ठिकाणी वंशपरंपरेने चालत आलेल्या हिंदूधर्मातील चातुर्वर्ण्यास सुरुंग लावण्यात आला! हीच ती जागा की, ज्या ठिकाणी अस्पृश्यांस या देशात सामाजिक, राजकीय व शैक्षणिक समानता मिळावी म्हणून विषमतेच्या विरुद्ध समतेचा जयघोष करण्यात आला. हीच ती जागा की, ज्या ठिकाणी डॉ. बाबासाहेबांच्या व्यक्तिमत्वाचा प्रथम किरण स्पृश्य हिंदूंना पाहावयाला मिळाला. अशी ही पवित्र जागा! अशा या जागेचे माहात्म्य! हेच या कॉलेजचे औचित्य!

चवदार तळे नावाच्या तळ्यावर अस्पृश्य लोक सामुदायिक सत्याग्रह करणार आहेत, व या सत्याग्रहाचे नेतृत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर करणार आहेत हे मला माहीत असल्यामुळे कुत्र्या-मांजरासारखे जिणे जगण्यापेक्षा स्वबांधवांच्या उन्नतीसाठी; पेटलेल्या या रणकुंडांत आपणही भाग घ्यावा म्हणून मी माझ्या काही सवंगड्यांसह या सत्याग्रहात भाग घेण्याकरिता आलो होतो; आणि याच वेळी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली त्या विराट व भव्य सभेत प्रथमच मला माझे मत मांडण्याची संधी मिळाली होती. त्या सभेमुळे माझ्या मनावर जर कोणता परिणाम झाला असेल तर तो हा की, अन्यायापुढे – मग तो सामाजिक असो, अथवा शैक्षणिक असो अथवा राजकीय असो – मान तुकवायची नाही. या सत्याग्रहाचे लोण बरोबर घेऊन आम्ही आमच्या जिल्ह्यातील ज्या ज्या गावी अस्पृश्यांना लोकल बोर्डांनी बांधलेल्या विहिरी असूनही पिण्याकरिता पाणी मिळत नव्हते; त्या विहिरीवर सत्याग्रह करून त्या खुल्या केल्या. महाड येथील चवदार तळ्याच्या सत्याग्रहाने आम्हाला दिलेली ही स्फूर्ती होय. आमच्या सामाजिक चळवळीचा इतिहास लिहिणाऱ्याला **'महाड'** या गावापासूनच

सुरूवात करावी लागेल. म्हणून महाड गावाचे माहात्म्य इतके थोर आणि स्फूर्तिदायक आहे.

आज या सत्याग्रहाला ३५ वर्षे झाली आहेत. पण ती स्फूर्ती माझ्या मन:चक्षूंपुढे मी ज्या ज्या वेळी महाडला येत असतो, त्या त्या वेळी येत असते. त्यावेळी जमलेला तो अफाट जनसमुदाय! ती विराट सभा! आणि त्यानंतर डॉ. बाबासाहेब, कमलकांत चित्रे, सुरबा टिपणीस इत्यादी सत्याग्रहींसह, त्या चवदार तळ्याचे चाखलेले ते चवदार पाणी! हे सारे प्रसंग आजही मला चांगले आठवतात. ३५ वर्षांपूर्वी मला जी स्फूर्ती या गावात त्या सत्याग्रहातून मिळाली, तिच्या साहाय्याने मी आज वाटचाल करीत आहे आणि मला वाटते की, आतापर्यंत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली आम्ही सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक व राजकीय बाबींत या कालात जी प्रगती केली आहे, ती होण्याला जर काही कारण असेल तर ते हे की, आमच्या गुरुने अन्यायाविरुद्ध झगडा करण्याचा महामंत्र याच गावात आम्हाला दिला आहे. झगडा! झगडा! अन्यायाविरुद्ध झगडा! हा मंत्र आजही आम्ही जपत आहोत!

*(महाड कॉलेज मॅगझीन, मार्च १९६३)*

# क्रांतिकारक जोतिबा फुले

**भाऊराव कृष्णराव गायकवाड**

पेशवाईचा अंत झाल्यानंतर अवघ्या ९ वर्षांनंतर म्हणजेच इ. स. १८२७ साली म. जोतिबा फुले यांचा पुणे शहरात माळी जातीत जन्म झाला. त्याकाळी दुय्यम शिक्षणासाठी सरकारी शाळा नव्हत्या. इ. स. १८२४ मध्ये मिशनऱ्यांनी पहिली दुय्यम शाळा सुरू केली होती. म. ज्योतिबा फुले त्या शाळेत जाऊ लागले. त्यांनी ती शाळा १८४८ साली सोडली. त्याकाळी शिकल्यासवरलेल्या लोकांची फारच उणीव असे त्यामुळे सरकारने नोकरीसाठी म. जोतिबास बोलविले होते. परंतु सुरुवातीपासूनच म. फुले यांचे विचार इंग्रज सरकारविरुद्ध व राष्ट्रीय वृत्तीचे असल्याने आपण सरकारी नोकरीत अडकलो गेलो, तर असंख्य लोकांच्या जीवनात क्रांती घडविण्याचे कार्य आपणास करता येणार नाही, या भावनेने त्यांनी सरकारी नोकरी नाकारली.

म. जोतिबांच्या जीवनात एक घटना अशी घडली की, त्यामुळे म. जोतिबा फुले मोठे क्रांतिकारी समाजसुधारक झाले. एका ब्राह्मण मित्राच्या खास आमंत्रणावरून ते त्या ब्राह्मण मित्राच्या लग्नास गेले. लग्नाचे मिरवणुकीत इतर ब्राह्मण लोकांबरोबर चालले असता पुण्याच्या ब्राह्मणांनी, कृष्णवर्णांना ब्राह्मणाबरोबर चालता येणार नाही व त्यांनी आपल्या पायरीने व धर्माने वागावे असे बजावून त्यांना मागे चालण्याची आज्ञा करून, त्यांचा उपमर्द व उपहास केला. त्यांच्या मानी स्वभावाला तो अपमान असह्य झाला. ते तडक त्या लग्नाच्या मिरवणुकीतून परत घरी आले. आपल्या वडिलांना त्यांनी सर्व वृत्तान्त कथन करून ब्राह्मणांनी माझा फार अपमान केला केला आहे, म्हणून कळवळून सांगू लागले. म. जोतिबा यांचे वडील जुन्या वळणाचे असल्याने त्यांनी मुलास हिन्दू धर्माच्या चालीरीती व रुढी समजावून सांगितल्या. आपल्या धर्माप्रमाणे वागावे. त्यातच आपले कल्याण आहे, असा उपदेश केला व आपण धर्मबाह्य कृत्ये करू नये म्हणून बजावलेही! धर्मबाह्य कृत्ये केल्यामुळेच तेथे असलेल्या गोलटेकडीजवळ महार-मांगाना फाशी दिले. वडिलांनी केलेले विवरण म. जोतिबा फुले यांना पटले नाही. म. जोतिबांना फुले यांनी कै. लहुजी मांग यांचेकडे दांडपट्टा, बंदुकीचा नेम मारणे इत्यादी शारीरिक शिक्षण घेतले.

आतापर्यंत म. जोतिबा फुले यांच्या डोक्यात राजकीय वेड होते. देश इंग्रजाच्या मगरमिठीतून सोडविणे असल्यास, प्रथम राजकारणच केले पाहिजे अशी ठाम भूमिका होती. ब्राह्मणांबरोबर चालण्याचाही धर्माने आपणास अधिकार ठेवला नाही, ही बोचणी त्यांच्या

जिव्हारी शल्यासारखी सलू लागली. राजकारणाअगोदर बहुजन वर्गाची सामाजिक व धार्मिक गुलामगिरीतून सुटका करावयाची असल्यास प्रथम धार्मिक व सामाजिक अन्यायाविरुद्ध बंड केले पाहिजे, धर्माच्या नावाखाली चाललेली गुलामगिरी उखडून काढली पाहिजे, सामाजिक व धार्मिक विषमतेच्या शृंखला तडातड तोडून समाजाला सत्यज्ञान दिले पाहिजे, हा निर्धार त्यांनी केला.

लोकशिक्षणासाठी प्रथम आपल्या स्वत:च्या घरी शाळा सुरू केली. परंतु मागासजातीच्या मुलांना शिक्षण देणे व घेणे मनुने व इतर धर्ममार्तंडांनी निषिद्ध मानले असल्याने, काढलेली शाळा लोकांच्या विरोधामुळे चालेना. मुलींना शिकविण्यासाठी शिक्षकांची फार अडचण भासू लागली. त्यांनी आपल्या पत्नीस, सौ. सावित्रीबाईस शिकवून त्यांना शिक्षिका म्हणून सदर शाळेवर नेमले. त्यावेळी त्या शाळेत जात असताना समाजकंटकांनी व गुंडानी त्यांचा फार छळ केला. अचकट विचकट बोलणे तर सोडाच पण त्यांच्या छातीवर खडे मारण्यापर्यंत त्यांची मजल गेली होती.

म. जोतिबांनी काढलेल्या या शाळेस पुण्यातील धर्ममार्तंड; गुंडांच्या साहाय्याने पराकोटीचा विरोध करीत होते. सदर बोर्डाने महत्मा जोतिबा फुल्यांच्या कार्यास गव्हर्नरने प्रोत्साहन द्यावे म्हणून कळविण्यात आले होते. त्यावरूनच विश्रामबागेत त्या वेळेच्या मुंबईच्या गव्हर्नरने दरबार भरवून २०० रुपयांची शाल म. जोतिबास भेट देऊन त्यांचा गौरव केला होता.

पुण्यातील भोकरवाडी या मागासलेल्या लोकांच्या भागांत महार-मागांच्या मुलांसाठी म. जोतिबांनी इ. स. १८५१ साली शाळा काढली. आजही त्या जागी मागासलेल्या जातींच्या विद्यार्थ्यांनी उच्च शिक्षण घ्यावे म्हणून वसतिगृह आहे. म. जोतिबा हायस्कूल विद्यमान आहे.

म. जोतिबा फुले यांच्या कार्यास प्रखरतेने विरोध करण्यासाठी पुण्याच्या विष्णुशास्त्री नावाच्या ब्राह्मणाने पुढाकार घेऊन काही ब्रम्हवृदाचे व गुंडांचे घोळके निर्माण करून नाना तऱ्हेने म. जोतिबांचा छळ केला. एवढेच नव्हे, तर खुद्द म. जोतिबा फुले यांच्या वडिलांच्या डोक्यात 'ब्राह्मणी धर्माचा सैतान' घुसवला व खुद्द म. ज्योतिबा फुल्यांच्या वडिलांना त्यांच्याविरुद्ध उठवून त्यांच्याकडून म. ज्योतिबा व त्यांच्या सुशील पत्नीस घराबाहेर हाकलले. पुणे शहरात मिशनरी मंडळींनी मागासलेल्या लोकांत शिक्षण प्रसाराचे अभिनंदनीय कार्य सुरू केले होते. रेव्हरंड मिचल हे पुणे येथे मुलींचे एक बोर्डिंग चालवीत असत. त्या बोर्डिंगवर सुपरिंटेडेंट म्हणून सावित्रीबाईची त्यांनी नेमणूक केली. म. जोतिबा फुले हे भोकरवाडीतील महार-मांगांच्या मुलांसाठी काढलेली शाळा चालवीत. याच दरम्यान आणखी दोन तीन शाळा वेगवेगळ्या ठिकाणी त्यांनी महार-मांग जातींच्या मुलांसाठी पुण्याच्या वेगवेगळ्या भागात काढल्या.

इ. स. १८६० मध्ये म. ज्योतिबा फुले यांचे वडील निवर्तले. ब्राह्मणांच्या चिथावणीने वडिलांनी अनेक वर्षे घराबाहेर हाकललेले म. ज्योतिबा फुले, परत आपल्या घरी आले. घरी आल्याबरोबर त्यांनी आपल्या घरातील हौद महार-मांग जातींच्या लोकांना पाणी भरण्यासाठी मोकळा केला.

उच्चवर्गीय म्हणविणाऱ्या व विशेषत: ब्राह्मणवर्गात, अकाली दुर्दैवाची कुऱ्हाड ज्या ज्या

महिलांच्या माथी पडून वैधव्य प्राप्त होई, त्यांचे हाल व छळ अमर्याद होत. बाल-विवाहाची पद्धती हिंदू लोकात त्या काळी रूढ असल्याने आठ, दहा वर्षाच्या मुला-मुलींची लग्ने होत. जर बालवयातच या उच्च म्हणविणाऱ्या धर्ममार्तंडाच्या लेकी-बाळी, आया-बहिणी, विधवा झाल्या तर त्यांना सर्व आयुष्य इच्छा नसताही वैरागिनी म्हणून काळ कंठावा लागे. या उलट साठ-सत्तर वर्षांच्या थेरड्यांना बारा वर्षांच्या मुलींबरोबर विवाहासाठी बोहल्यावर चढण्यास लाज वाटत नसे. विषमतेच्या तत्वावर रूढ झालेल्या या असल्या अनेक रुढ्यांविरुद्ध अनेक विधवा भगिनी जळफळत. पण करणार काय?

पुरुषांप्रमाणे पुनर्विवाहाचा हक्क भगिनीवर्गाला सुद्धा असावा, असा नवा विचार अनेक विचारवंतांच्या मनात येई. पण माजरांच्या गळ्यात घंटा बांधण्यास कोणीच धजत नसे. त्या गोष्टींसारख्याही सामाजिक सुधारणा करण्यास कोणासच धीर होत नसे. म. जोतिबा फुल्यांनी त्याबाबत बंड उभारले. लोकजागृती केली आणि याच दरम्यान यमुनाबाई व रघुनाथ यांचा पुनर्विवाह लावला. यमुनाबाई या ब्राह्मण विधवा होत्या.

आज जागोजाग अनाथ बालकाश्रम आपण पाहतो. पण पूर्वी अकाली वैधव्य प्राप्त झाले असता व पुनर्विवाहाची बंदी असता ज्या मुलींना राक्षसी वृत्तीला बळी पडावे लागले व त्यामुळे अनेक ठिकाणी गर्भपात, तर बऱ्याच ठिकाणी जन्मलेली मुले आमच्या नाशिकच्या गोदारीवरीच्या रामकुंडात टाकलेली नाहीत, तर गटारांत फेकलेली आढळत असत. असले प्रकार सर्वत्र चालू होते.

त्याविरुद्ध म. जोतिबा फुल्यांनी आवाज उठविला. इ. स. १८३४ मध्ये पोरक्या मुलांसाठी अनाथाश्रम काढला. त्यांनी आपल्या घराच्या आवारात एक पाळणा टांगला होता. ज्यांना उघडपणे पैदा झालेली मुले आणून देता येणार नाहीत, त्यांनी गुप्तपणे असल्या पोरक्या अर्भकांचा गळा न दाबता, अगर गटारात न फेकता त्या पाळण्यात आणून ठेवावीत, असे जाहीर केले.

ज्या विष्णूशास्त्री भटांनी म. जोतिबांचा सर्व आयुष्यभर छळ केला, त्याच विष्णूशास्त्रींची पुतणी काशीबाई दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडून वैधव्यात मुलास जन्म देती झाली. त्यावेळी म. ज्योतिबा फुल्यांनी काशीबाईस आसरा दिला. सर्व तऱ्हेने मदत केली. काशीबाईस झालेले मूल सांभाळले. एवढेच नव्हे तर त्यास उच्च शिक्षण देऊन डॉक्टर बनविले आणि त्याच मुलास म. जोतिबांनी आपला दत्तक मुलगा म्हणून मानले.

बहुजनसमाज अज्ञानामुळे अंधारात खितपत पडला होता. त्यास जागृत करून त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून द्यावयाची होती. त्यासाठी त्यांनी पुणे येथे ता. २३ सप्टेंबर १८७३ रोजी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. त्याकाळी सत्यशोधक समाजाने केलेली कामगिरी बहुजनसमाजातील विचारवंत विसरणे शक्य नाही. जोतिबा फुल्यांनी बहुजन समाजामध्ये त्यावेळी जागृतीची जी फळे आणली, ती उपभोगणारे बरेच जण म. जोतिबा फुल्यास विसरलेले दिसतात. म. जोतिबांचे उपकार महाराष्ट्रातील बहुजनसमाजाने तरी विसरता कामा नये.

देशात उन्नतीसाठी औद्योगिक शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही याची जाणीव, म. जोतिबांना होती, औद्योगिक शिक्षणासाठी पुण्यात एक केंद्र उघडणे जरुरीचें भासल्याने त्यासाठी एक

जागा सरकारकडे मागितली व सरकारनेही ती दिली. परंतु त्या ठिकाणी मुदतीत ती शाळा बांधू न शकल्याने सरकारने ती जागा डि. लो. बोर्डास इ. स. १८८० साली दिली.

अनेक शेतकऱ्यांच्या जमिनी सावकाराकडे या ना त्या कारणाने गेल्या. होत्या त्यासाठी इ. स. १८७६ साली त्यांनी बरीच लोक जागृति केली; व शेतकऱ्यांच्या जमिनी ऐतखाऊ सावकाराकडे जाऊ नये म्हणून महाराष्ट्रभर चळवळ केली.

सार्वजनिक कार्य जरी म्हटले तरी कार्यकर्त्यांकडे पैसे असल्याशिवाय अत्यंत प्रभावी असे कार्य करता येत नाही आणि म्हणून म. जोतिबा फुल्यांनी पुणे कमर्शियल कॉन्ट्रक्टिंग कंपनी काढली. सदर कंपनीने खडकी व घोरपडी मिलिटरी बॅरॅक बांधल्या. येरवडा पूल, कात्रजला बोगदा इत्यादी कामे करून दोन पैसे मिळविले. सदर कंपनीचे नाव होते, 'रामशेट उखणे व शिमाप्पा कंपनी'.

इ. स. १८७७ मध्ये महाराष्ट्रात भयंकर दुष्काळ पडला होता. काही गरीब लोकांनी पोटची मुले मारून खाल्ल्याच्या कथा आहेत. वर उल्लेख केलेली कॉन्ट्रॅक्टची कामे करून म. जोतिबा यांनी पैसा जमविला होता. स्वत:च्या त्या पैशांतून धनकवडी कँप, पुणे येथे काढून, दुष्काळ असेपर्यंत दर मुलाला एक भाकरी अशा एक हजार भाकरी गरीबांच्या मुलास वाटून, त्यांना दुष्काळात त्यांनी जगविले होते.

वृत्तपत्राशिवाय लोक जागृती शक्य नाही, याची जाणीव त्यांना झाली. आपल्या विचारांचा व मतांचा प्रसार व प्रचार करण्यासाठी पुणे येथे त्यांनी 'दीनबंधु' नावाचे साप्ताहिक सुरू करून चांगलीच लोकजागृती त्या पत्राद्वारे केली.

इ. स. १८७९ मध्ये गिरणी कामगारांचा पहिला भारतीय संघ काढून गिरणीत काम करणाऱ्या कामगारांच्या अनेक मागण्या मिळवून देऊन, कष्ट करणाऱ्या कामगारांचे जीवन सुखी करण्यासाठी म. जोतिबांनी आपल्या आयुष्यातील काही वर्षे झिजवली.

पूर्वकाली स्थानिक स्वराज्य संस्थेत जसे लोक प्रतिनिधी म्हणून निवडून येत, तसेच सरकारचे हितसंबंध राखण्यासाठी सरकार काही लोकांना नॉमिनेट करीत असत. महात्मा जोतिबा फुले यांची पुणे म्युनिसिपालिटीत सरकारनियुक्त सभासद म्हणून नेमणूक झालेली होती. महात्मा जोतिबा फुले कसे राष्ट्रीय बाण्याचे होते, लोकहित दक्ष होते, स्पष्टवक्ते होते, हे खालील गोष्टीवरून स्पष्ट होते- पुणे म्युनिसिपालिटीने इ. स. १८८० साली व्हाईसरॉय स्वागताप्रीत्यर्थ एक हजार रुपये मंजूर करावे म्हणून ठराव आला असता, म. जोतिबा फुले यांनी त्या ठरावास जोराचा विरोध केला. लोककल्याणाच्या कारणासाठी लोकांकडून कराच्या रूपाने घेतलेला पैसा, असा विनाकारण खर्च करू नये असे सांगून विरोध केला.

इ. स. १८८२ साली आगरकर व टिळक यांचेवर राजद्रोहाच्या आरोपाखाली खटला भरण्यात आला होता. सदर खटल्यात टिळक, आगरकरांना जामीन मिळण्यास अडचण भासली असता जोतिबा फुले यांनी आपले परम स्नेही व कॉन्ट्रॅक्टमधील एके काळचे भागीदार श्री. रामजी शेठ उखणे यांना भेटून त्यांना जामीन दिले होते.

इ. स. १८८७ मध्ये भालोजीराव गोसावी यांचे जावई श्रीहरी रावजी चिपळूणकर, सोमवारपेठ, पुणे यांनी, ड्युक ऑफ कॅनॉट भारतात आले असता, पुण्याच्या त्यांच्या भेटीत 'ॲट होम पार्टी' दिली होती. सदर समारंभास असलेली मंडळी मोठ्या थाटामाटाने

अवतरली होती. परंतु म. जोतिबा फुले हे पायांत फाटक्या चपला, गुडघ्यापर्यंतचे धोतर, फाटका अंगरखा व खांद्यावर घोंगडी या पेहेरावांत सदर पार्टीला जात असता दरवाजावर असलेल्या पोलीसांनी त्यांना आत जाण्यास बंदी केली. एवढेच नव्हे तर तेथून त्यांना ते हाकलून लावू लागले. म. जोतिबांनी आपणास आलेले सदर समारंभाचे निमंत्रण दाखविले. परंतु दरवाज्यावरील पोलीस यांना सोडीत नव्हते. अशा वेळी श्री. चिपळूणकर; समारंभाचे निमंत्रण पालकच तेथे आले व म. ज्योतिबास घेऊन आत गेले. ड्यूक ऑफ कॅनॉटला; या देशात बहुसंख्य लोक अज्ञानी, दारिद्र्यात शतकानुशतके पिचत पडलेले आहेत, त्यांचा हा पोशाख, ही राहणी आपण समजावून घ्यावी व जर काही आपणास करता येत असले तर आमच्या सरकारने या वर्गाच्या उद्धाराच्या खऱ्या योजना आखाव्या हे आपण त्यांना कळवा, असे सांगितले.

ता. ११ मे १८८८ मध्ये कोळीवाडा हॉलमध्ये अखिल भारतीय नागरिकांच्या सभेने म. जोतिबा फुले यांच्या लोकसेवेचा विचार करून त्यांना 'महात्मा' हा किताब देऊन गौरव केला.

म. जोतिबांचा, एके काळी ब्राह्मणांच्या चिथावणीने मारेकरी बनलेला धोंडीराम कुंभार, पुढे सत्यस्थिती कळताच ज्योतिबाचा कट्टर अनुयायी बनला व पुढे आयुष्यभर त्यांच्या अनुयायापैकी एक ठरला. म. जोतिबानी त्यांस संस्कृत व हिंदूधर्म ग्रंथाच्या अभ्यासासाठी काशीस पाठविले. विद्यार्जन करून धोंडीराम कुंभार मोठा पंडित होऊन आला. इ. स. १८९५ मध्ये श्रृंगेरी मठाच्या शंकराचार्यासमोर ब्राह्मण पंडितांनी हिंदू धर्मातील जातीभेद हा ईश्वर निर्मित आहे मानवनिर्मित नाही; म्हणून श्री. धोंडिराम कुंभार यांस चर्चेचे आव्हान दिले. ते त्यांनी स्वीकारून चर्चा सुरू केली. चर्चा काही दिवस चालून शेवटी श्री. धोंडीराम कुमार यांनी हिंदू धर्मातील जातीभेद मानव निर्मित आहे; ईश्वर निर्मित नाही, हे अनेक ग्रंथाचे आधार दाखवून सिद्ध केले व शंकराचार्याकडून 'अंजिक्य' म्हणून ताम्रपट मिळविला. त्यांनी मोठमोठ्या धर्मपंडितांचा धर्मचर्चेत पराभव केला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना, जगातील सात विद्वानापैकी एक, असे परदेशी पंडित मानीत असत. डॉ. बाबासाहेबांनी भगवान गौतम बुद्ध, महात्मा कबीर व महात्मा फुले अशा तिघांना गुरू मानले होते. अनेक प्रसंगी म. जोतिबा फुलें बाबत बोलताना मी ऐकले आहे कि, बाबासाहेब अभिमानाने उद्‌गारायचे, "म. जोतिबा फुले हे अलौकिक व असामान्य असे क्रांतिकारक होऊन गेले."

ज्या पुण्यात पेशवाईने थैमान घातले, त्या पेशवाईचा जरी अंत झाला असला तरी त्याचे भूत समूळ गाडले गेले नव्हते. त्या काळात वर्णभेद, जातीभेद, श्रेष्ठ कनिष्ठता, उच्च-नीचता यांना ऊत आला होता. त्याकाळी म. जोतिबा पुण्यात जन्मास येऊन या सर्व गोष्टीविरुद्ध यशस्वी बंड करते झाले. आजच्या 'मी मी' म्हणणाऱ्या समाज सुधारकांना ज्या ज्या गोष्टी बोलण्याचे व करण्याचे धाडस होत नाही त्या त्या गोष्टीविरुद्ध शंभर वर्षापूर्वी बोलणे नव्हे तर प्रत्यक्ष कृती केली, ते म. जोतिबा फुले अलौकिक व असाधारण नव्हते असे कोण म्हणेल?

दुसरा मोठा आरोप म. जोतिबांवर केला जातो, तो हा की, ते ब्राह्मण द्वेष्टे होते. खरे

पाहता म. जोतिबा फुले ब्राह्मणद्वेष्टे नव्हते. विधवाविवाह व्हावेत, विधवाचे केश वपन करू नये, वाकडे पाऊल पडले असता कुमारिकांनी अगर विधवांनी जन्म दिलेल्या बालकांची हत्या न करता त्यांच्यासाठी अनाथालये काढणे, या सर्व गोष्टी समाजातील पुढारलेल्या व विशेषत: ब्राह्मणांसाठीच होत्या. ज्या विष्णूशास्त्रींनी म. जोतिबांचा आयुष्यभर नाना तऱ्हेने छळ केला, त्या विष्णूशास्त्रींच्या पुतणीवर-काशीबाईवर-दुर्धर प्रसंग आला असता तिला आसरा देऊन तिच्या मुलास दत्तक घेऊन डॉक्टर बनवायचा, या गोष्टी काय ब्राह्मण द्वेष्ट्या आहेत?

विशेषत: या महाराष्ट्रात बहुजनसमाजात जी जागृती दिसते तिचे सर्व श्रेय म. जोतिबा फुले यांनाच आहे.

म. जोतिबा फुले इ. स. १८९० साली वयाच्या त्रेसष्टाव्या वर्षी निवर्तले. सर्व आयुष्यभर खडतर असे व्रत अंगिकारून अनेकविध कार्ये आपल्या आयुष्यात त्यांनी केली आणि महात्मापद प्राप्त केले.

जर ते जन्मालाच आले नसते, तर इतर राज्यासारखीच स्थिती, याही महाराष्ट्रात बहुजनसमाजाची झाली असती. म. जोतिबा फुल्यांनी आयुष्यात खडतर हाल सोसून सर्व क्षेत्रांत जी समानता प्रस्थापनेची अलौकिक क्रांती केली, त्यास तोड नाही. या प्रसंगी त्यांच्या पुण्यस्मृतीस आदरपूर्वक श्रद्धांजली नम्रभावे वाहतो.

*पूर्व प्रसिद्धी महात्मा फुले 'गौरव ग्रंथ'*
*जागृती प्रकाशन, शिरसपेठ-नागपूर १९६९*

# जागृतीचे श्रेय आंबेडकरांनाच!

**भाऊराव कृष्णराव गायकवाड**

१९२७ साली झालेल्या महाड सत्याग्रहापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची व माझी फारशी ओळख नव्हती. महाड सारख्या कोकणी भागात, चवदार तळ्यावर समानतेनें पाणी भरण्याचा आपला हक्क बजावण्यासाठी जमलेल्या त्या १५ हजार सत्याग्रहींची, चारचारच्या रांगांनी शिस्तीने महाडच्या गावातून चाललेली ती मिरवणूक अजून माझ्या स्मृतीपटावरून बुजली नाही. सामुदायिकरीत्या समानतेचे हक्क मिळवण्याची अशी ही पहिलीच चळवळ आमचे समाजात झाली असावी, असे वाटते. १९२७ पर्यंत फार झाले तर आमच्यातील पुढारी वर्गांनी सभेत भाषणे करण्यापलीकडे काही केले नव्हते. परंतु महाडच्या सत्याग्रहापासून सक्रीय कार्यास सुरवात झाली असे म्हणण्यास मला मुळींच संकोच वाटत नाही. महाड येथे जमलेला अफाट जनसमूह, हा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली होणाऱ्या चळवळींमुळेच जमला होता. स्पृश्यवर्गीय लोकांच्या जुलमाला वैतागलेल्या लोकांना या चळवळीमुळे सुरूवातीस थोडाफार अधिक जुलूम सोसावा लागला. परंतु या जुलमामुळे विस्कळीत असलेला अस्पृश्य समाज सुसंघटित होऊन येणाऱ्या स्थितीस तोंड देण्यास सिद्ध झाला. वाईटातून चांगले निघते म्हणतात. त्यातलाच हा प्रकार झाला आहे.

त्यानंतर १९३० च्या मार्च महिन्याच्या २ तारखेस नाशिक येथे श्रीकाळाराम मंदिरात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली मंदिरप्रवेश सत्याग्रहाची मोहीम सुरू झाली. याही प्रसंगी १ मैल लांबीची, सुमारे १५००० हजार सत्याग्रहींची मिरवणूक राममंदिरावर अत्यंत शांततेने व शिस्तीने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या आज्ञेप्रमाणे जाऊन, तिने राममंदिर प्रवेश सत्याग्रह चळवळीचे निशाण फडकविले. तेव्हापासून तो आतापर्यंत ही चळवळ सारखी फोफावत आहे. या चळवळीत १९३० साली चैत्र शु. ११ चे दिवशी रथाचे मिरवणुकीचे बाबतीत वाद उत्पन्न होऊन शेवटीं स्पृश्यास्पृश्यांमध्ये असे ठरले की, रथाचे मिरवणुकीत रथ स्पृश्यास्पृश्यांनी मिळून ओढावा. परंतु यात स्पृश्य सनातन्यांचा दुष्ट डाव होता. व तो असा की, अस्पृश्य मानलेल्या लोकांना रथ ओढण्यास परवानगी द्यावी व रथ मंदिरापासून दूर होताच अस्पृश्य सत्याग्रहींस व डॉ. आंबेडकरास चांगले बडवावे. यांच्या या दुष्ट डावाचा स्फोट थोडा अगोदरच झाला होता. त्यावरून आम्ही काही मंडळींनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना महारवाड्यात सुरक्षित ठिकाणी जाणेविषयी विनंती केली. परंतु आमच्या या विनंतीला अमान्यता दाखवून त्यांनी स्पष्ट सांगितले की "काय, या ठिकाणी

दंगा होणार आहे. म्हणून मी तुम्हा सर्वांना येथे सोडून महारवाड्यासारख्या सुरक्षित ठिकाणी निघून जाऊ?' येथे राहून या दंग्यात जर मला मरण आले, तर ते मरण मला येथून पळून जाऊन नामर्दपणाने जीव जगवून जगात पुष्कळ वर्षे जिवंत राहण्यापेक्षा जास्त अभिनंदनीय नाही का ठरणार? आणि आज या ठिकाणी अत्यंत लहानातल्या लहान सत्याग्रहीच्या जिवाचे जे मोल आहे, त्यापेक्षा माझ्या जिवाचे मोल काडीभरही अधिक नाही. असे असता येथून कायमचे कलंकित करण्याचा बदसल्ला तुम्ही मला का व कसे देता? आजच्या या प्रसंगांतून मी येथून मुळीच हलणार नाही.'' असे उत्तर डॉ. बाबासाहेबांकडून मिळाल्यानंतर पुढे कोण बोलू धजणार? सर्व मंडळी विचारात पडली. थोड्याच वेळात सनातन्यांनी रथ राममंदिराच्या पूर्व दरवाजावर आणला. डॉ. बाबासाहेबांनी आपले निवडक सत्याग्रही रथ ओढण्यास निवडून, त्यांना रथ ओढण्यास फर्माविले. रथ थोडे पुढे जातात न जातात तोच सनातन्यांनी रथ ओढणाऱ्या सत्याग्रहींवर हल्ला चढवून मारण्याचा सपाटा चालविला. रथाची मिरवणूक ज्या रस्त्यांनी चालली होती तो रस्ता अत्यंत अरुंद असून रस्त्याचे दोन्हीं बाजूस तारेची कुंपणे होती. व रथाचे मागें डॉ. बाबासाहेब आंबेडकर आपल्या साथीदारांसह चालले होते. रस्त्याचे बाजूस असलेल्या मोकळ्या जागेतील स्पृश्यवर्गीय सनातन्यांनी डॉ. बाबासाहेबांवर दगडांचा नुसता पाऊस शेजारच्या शेतातून ओतला. परंतु त्यांच्या बऱ्याच मित्रांजवळ छत्र्या असल्याने त्यांनी आपल्या जिवाची पर्वा न करता एका - एकाने डॉ. बाबासाहेबांना वाचविण्यासाठी छत्री उघडून त्यांच्यावर धरावी व ती छत्री मोडली म्हणजे दुसरी छत्री दुसऱ्या मित्राने धरावी. या दंगलीत खुद्द डॉ. बाबासाहेबांना बऱ्याच दुखापती झाल्या होत्या. पण त्यांच्या पुष्कळ मित्रांना तर बऱ्याच गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या होत्या. जनता पत्राचे हल्लीचे संपादक श्रीयुत भास्करराव कद्रेकर यांच्या डोक्यात तर एका दगडाने चांगलीच खोच पडून त्यांना रक्तबंबाळ व मूर्छित केले होते. कित्येक मित्रांनी तर डॉ. बाबासाहेबांवर येणारे दगड स्वत: अंगावर घेऊन त्यांना वाचविण्याची सीमाच केली होती. इतिहासातील, आपण वाचीत असलेल्या शिवकालीन गोष्टींची सत्यताच या ठिकाणी अनुभवास आली होती. पोलिसांनी दंगा शांत केल्यानंतर डॉ. बाबासाहेबांनी आपल्या जखमांबद्दल बेफिकीर राहून जखमी व घायाळ झालेल्या सत्याग्रहींना आधी हॉस्पिटलमध्ये पाठविण्याची त्वरा केली. रथाची मिरवणूक सरकारने बंद करून रथ आपल्या ताब्यात घेतला व नंतर सर्व सत्याग्रहींना व्यवस्थितपणे आपल्या कँपांत पाठविले. घायाळ व जखमी लोकांच्या चौकशीसाठी खुद्द डॉ. बाबासाहेब हॉस्पिटलमध्ये गेले. वरील प्रसंगाने डॉ. बाबासाहेब हे निर्भय वृत्तीचे, करारी बाण्याचे व आपल्या अनुयायांना आत्मिक भावनेने पाहणारे व वागविणारे खरेखुरे पुढारी आहेत, हे वाचकांच्या चटकन लक्षात येईल.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे खरेखुरे अस्पृश्यता निवारक आहेत. 'खरेखुरे' म्हणण्याचा अर्थ इतकाच की, बरेच अस्पृश्यता निवारणाचा भाव आणणारे सदगृहस्थ; स्पृश्यास्पृश्य भेद कायम मानून व्याख्यानबाजीच्या वेळी मात्र अस्पृश्यता निवारणावर सुंदर भाषण करू शकतात. असल्या माणसांचा भरणा स्पृश्यास्पृश्य मानलेल्या दोन्ही वर्गांत आहे. परंतु डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे तसे नाही. ते येथे नाशिकास आले असता येथील मेघवाळ (भंगी) मंडळीने त्यांना दोन तीन वेळा मेजवानी दिली आहे. एकदा डॉ. बाबासाहेब आंबेडकर

त्रिंबकेश्वरी सभेसाठी आले असता त्यांनी नाशिकच्या भंगी मंडळीचे जेवणाचे निमंत्रण स्वीकारले. परंतु त्रिंबकहून येण्यास त्यांना बराच वेळ लागला व त्यामुळे जेवण करून गेल्यास स्टेशनवर वेळेवर न पोहोचता गाडी चुकेल हे निश्चित दिसू लागते. आता काय करावे, हा प्रश्न त्यांच्या डोळ्यापुढे दिसू लागला. जेवण करू गेल्यास गाडी चुकल्यानें उद्याची सर्व कामे अडून पडतील. तसेच जेवण न घेता जावे तर भंगी मंडळीनी आदराने केलेले जेवण न घेतल्याने त्यांच्या मनादरास व अविश्वासास पात्र होऊ. या दुहेरी पेचांतून सुटण्यासाठी डॉ. बाबासाहेबांनी एक सुंदरशी तोड काढली व ती अशी की, भंगी मंडळींनी तयार केलेले सर्व जेवण मोटार गाडीत घ्यावे व मोटार गाडीतच सर्वांनी एकत्र जेवण करावे. डॉ. बाबासाहेबांच्या आज्ञेप्रमाणे स्वयंपाकाची सर्व ताटे मोटारमध्ये ठेवली व सर्वांनी (मांग, महार, भंगी वगैरे मंडळीनी) सहभोजन केले.

**मोटार सहभोजन**

भंग्यांच्या पंक्तीला जेवण्यास भीत असलेल्या काही मंडळींस यामुळे चांगला धडा मिळाला. कारण या जेवणात दरेकाच्या ताटात वेगवेगळे वाढले नसून एकाच ताटातून सर्वांनी खावयाचे होते. या प्रकारामुळें डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भंगी मंडळींची मने जिंकली व आपल्यापेक्षा हलके मानलेल्या जातीबरोबर जेवण्यात कमीपणा नाही हा धडा, इतर लोकांनाही त्यांनी घालून दिला.

समाज हा अनुकरणप्रिय असतो. आपले पुढारी अगर समाजनेते जसे वागत असतील तसे तो वागत असतो. पौराणिक काळच्या वर्णिलेल्या श्रीकृष्णाच्या गोपाळकाल्याची आठवण हे मोटार भोजन करून देत होते.

काही अहंमन्य लोक, डॉ. बाबासाहेब आंबेडकराबद्दल बोलतांना सांगतात की, डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे विद्वान आहेत खरे. परंतु त्यांचा स्वभाव मग्रूर असून इतरांना ते आपल्यापेक्षा हीन समाजात व तुच्छतेने वागवितात, हे बरे नाही. असल्या निंदकांना मी इतकेच सांगू शकेन की, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांबद्दल तुम्हांस जे काही वाटते, ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे दोष नसून तुमच्यातील दोषांचे ते प्रतिबिंब आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांबद्दल तर माझा अनुभव अत्यंत सरळ आहे. ते अत्यंत साधेसुधे, विनोदी व मनमिळाऊ असे गृहस्थ आहेत. सत्याग्रह मोहिमेच्या दरम्यान व इतरही प्रसंगी ते जेव्हा जेव्हा नाशिक जिल्ह्यात आले होते व तीनही ठिकाणी त्यांच्याबद्दल मला जो अनुभव आला आहे तो असा की, ते जेव्हा इतर जनतेत मिसळतात तेव्हा मी अमूक असून, इतका गाढा विद्वान आहे ही गोष्ट त्यांच्या ध्यानीमनीही रहात नाहीं. इतर सोयी असताही ते साध्या घोंगडीवर झोपतात. त्यांच्याकरिता जेवणाची सुंदरशी सोय असताही तिचा त्याग करून इतर सर्व मंडळींबरोबर जे काही जाडे-भरडे मिळेल तेच ते खातात व आपली मित्र मंडळी बसून कधी गप्पागोष्टी चालल्या असता त्यांच्यांत पुष्कळ वेळा विनोदही करतात.

**''मास्तरय''चा**

त्यांचा विनोद तर कोणासही पोट दुखेपर्यंत हसावयास लावीत असतो. अशा शेकडोशे

गोष्टी आहेत की, ज्यांचे वर्णन स्थलाभावी येथे करता येणे शक्य नाहीं. या सर्व गोष्टी विचारात घेता लोकांच्या ठिकाणी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांबद्दल आदर, प्रेम, अभिमान व आपुलकीची भावना उत्पन्न होणे स्वाभाविक आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे विद्वान आहेत म्हणून लोक त्यांच्याबद्दल आदर, प्रेम, अभिमान व आपुलकीची भावना बाळगीत आहेत असे नाही, तर डॉ. बाबासाहेबांचे ठिकाणी ज्या इतर गुणांनी स्थान पटकाविले आहे; त्या गुणांमुळेच लोकादरास ते पात्र झाले आहेत. आज दिसत असलेले गुण जर त्यांच्या ठिकाणी नसते, तर ते ज्या लोकादरास पात्र झाले आहेत, त्यास ते पात्र न होता; जनता नुसत्या विद्वत्तेमुळे त्यांच्या सावलीसही उभी राहिली नसती.

सर्वसाधारणत: साधारण शिकलेले लोक, तसेच सधन असलेले लोक इतरांपेक्षा आपल्याच गोरगरीब व अशिक्षित जनतेस आपल्यापेक्षा हीन लेखून त्यांच्यापासून फटकून वागण्यातच आपली श्रीमंती व खरे शिक्षण मानीत असतात. याच दुर्गुणांमुळे नामधारी कार्यकर्त्यांची व जनता जनार्दनरूपी जनतेची बहुधा फारकत झालेली असते. असल्या अहंमन्य कार्यकर्त्यांपासून जनताही फटकूनच वागत असते. यामुळे यापूर्वी जी जागृती अस्पृश्य मानलेल्या समाजात व्हावयास पाहिजे होती, ती होऊ शकली नाहीं. परंतु डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कारकीर्दीस सुरूवात होताच हा मनू पार पालटला व जनतेचा त्यांच्या ठायीं अढळ विश्वास बसला. इतकी पूर्व भूमिका तयार झाल्यानंतर डॉ. बाबासाहेबांचे हाकेस 'ओ' देणारी जनता आपले बलिदान देण्यास तयार झाली, हे आतापर्यंतच्या चळवळीवरून वाचकांच्या ध्यानी येईल. अस्पृश्य मानलेल्या समाजात आपल्या उन्नतीविषयी माणुसकीच्या व स्वाभिमानाच्या ज्या भावना आज दिसत आहेत, त्या सर्वांचे जनकत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनाच दिले पाहिजे. आज जर डॉ. बाबासाहेबांसारखा कर्तबगार पुरुष अस्पृश्य मानलेल्या समाजात निर्माण झाला असता, तर आज आपल्या डोळ्यांना अस्पृश्य मानलेल्या वर्गात जी जागृती झालेली दिसत आहे, ती खास झालेली दिसली नसती असे माझे प्रामाणिक मत आहे, व म्हणून अस्पृश्य मानलेल्या जनतेत आपल्या माणुसकीबद्दलच्या जागृतीचे सर्व श्रेय डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनाच देणे योग्य आहे.

*(जनता खास अंक १९३३)*

# सत्याग्रही डॉ. आंबेडकर

**भाऊराव कृष्णराव गायकवाड**

अनेक वर्षांपासून स्पृश्य हिंदूंच्या छळाने पीडलेल्या व दडपलेल्या अस्पृश्य मानलेल्या समाजात, नवीन विचारांचे वारे सळसळावयास लावून आपल्या नागरिकत्वाच्या हक्कांसाठी स्पृश्य हिंदूविरुद्ध झगडण्यास अस्पृश्य मानलेल्या समाजाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीच प्रथम गदगदा हालवून आगें केले. जो समाज स्पृश्य मानलेल्या हिंदूंच्या नजरेस नजर भिडविण्यास चळचळा कापत असे त्या स्पृश्य मानलेल्या हिंदूविरुद्ध अस्पृश्य समाजाने अनेक ठिकाणी आपल्या हक्क प्रस्थापनेच्या झगड्यास तोंड पाडून अनेक आघाड्या निर्माण केल्या. त्यापैकी पहिली व मुख्य म्हणजे,

**महाड : चवदार तळ्याचा सत्याग्रह**

ही होय. हा सत्याग्रह इ. स. १९२७ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या जबाबदारीवर सुरू केला. या चवदार तळ्याची थोडक्यात माहिती अशी की, महाड या गावी म्युनिसिपालिटीच्या खर्चाने सार्वजनिक उपयोगासाठी चवदार नावाचे तळे बांधलेले आहे. या तळ्यावर अस्पृश्य मानलेल्या जाती सोडून हिंदू, मुसलमान, गाढवे, कुत्री, डुकरे, इत्यादी सर्वांना तळ्याच्या पाण्याचा उपभोग घेता येत असे. ही विषमता, हा भेदभाव एकट्या महाड येथेच मानला जात नसून भारतभूच्या पाठीवर असलेल्या सर्व सार्वजनिक ठिकाणी हीच परंपरा चालू होती. या असल्या परंपरेस लाथेच्या ठोकरीने उडवून आपल्या नागरिकत्वाच्या हक्कांवर गदा आणणाऱ्यांविरुद्ध झगडण्याची पहिली मोहीम, या महाड येथील चवदार तळ्याच्या सत्याग्रहाने सुरू केली. या वेळी एकच गोष्ट डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी या अस्पृश्य मानलेल्या समाजाच्या झोपलेल्या सिंहाच्या छाव्याच्या मनावर बिंबविली की, सार्वजनिक असलेल्या सर्व ठिकाणांचा, सर्व मानवांसारखाच अस्पृश्य मानलेल्या जातीलाही उपभोग घेण्याचा कायद्याने हक्क आहे. ह्या हक्कावर कोणी गदा आणू पाहील तर त्या विरुद्ध झगडून आपला हक्क प्रस्थापित करा!

इ. स. १९२७ साली महाडच्या चवदार तळ्यावर, ज्यावेळी पाणी भरण्याच्या सत्याग्रहासाठी, सर्व प्रांतांतून पंधरावीस हजार निवडक सत्याग्रही वीरांचा मेळावा सनातनी वृत्तीच्या हिंदूंनी पाहिला; तेव्हा नेहमीसारखा उठल्यासुटल्या अस्पृश्य मानलेल्या लोकांवर हात टाकण्यास सोकावलेल्या सनातनी हिंदूंचा तो हात लटलट कापू लागून, कासोटा फिटण्याचा प्रसंग

आला असता तो सावरण्यास व सरकारी अधिकाऱ्यांचे पाय धरण्यास त्या हातांचा उपयोग होऊ लागला! चवदार तळे हे सार्वजनिक नसून खाजगी आहे आणि म्हणून अस्पृश्य मानलेल्या समाजाला यावेळी पाणी भरू देऊन अनेक पिढ्यांपासून जतन करून ठेवलेल्या व आमच्या बापजाद्यांपासून वंशपरंपरेने चालत आलेल्या आमच्या

**धार्मिक भावनेस**

भ्रष्ट होऊ देऊ नका. जर का यावेळी या आंबेडकरी लोकांनी या चवदार तळ्यावर पाणी भरले, तर अनेक वर्षांपासून स्वर्गात आसन ठोकून बसलेल्या आमच्या बापजाद्यांची इंद्राच्या स्वर्गातून नरकात बदली होण्याचे हुकूम सुटतील! त्यांच्या या कोलाहलामुळे तेथील जिल्हाधिकारीही काही काळ गांगरले. त्यावेळी शांततेचा भंग होऊ नये व चवदार तळे सार्वजनिक की खासगी हा वाद निर्माण झाल्याने त्या वेळेपुरती ती चळवळ जरी स्थगित करावी लागली असली, तरी पुढे लवकरच या चवदार तळ्याचा वाद दिवाणी कोर्टात चालून ते शेवटी सार्वजनिक ठरले, व डॉ. बाबासाहेब आंबेडकर या झगड्यात यशस्वी झाले. ज्या अस्पृश्य मानलेल्या समाजाला या सार्वजनिक ठिकाणी मानीव स्पृश्यांनी बंदी केली होती, ती उठली व आता तेथे सर्व मानीव स्पृश्यास्पृश्य सरमिसळ पाणी भरतात.

"मला कसे सांगता? तुम्हा सत्याग्रहींच्या जीवापेक्षा याक्षणी माझा जीव मुळीच अधिक मोलाचा नाही. जे काही तुमचे होईल तेच माझे. तुमचा पुढारी नामर्दासारखा सत्याग्रह संग्रामातून पळाला म्हणून कोणी तुम्हास हिणविले तर तुम्हाला काय वाटेल? पळपुटा म्हणून होणाऱ्या बदनामीपेक्षा या धारातीर्थी हा देह पडला, तर मी स्वतःला भाग्यवान समजेन. तुम्ही सारे संघटित रहा. भागुबाईसारखे घाबरू नका. येणाऱ्या प्रसंगास धैर्यानें तोंड द्या. वेळ पडल्यास आपण कोण आहोत याचीही चुणूक मानीव स्पृश्यांना दाखवा. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या या भाषणानें सत्याग्रही वीरांत जोम संचारला व समानतेनें रथ ओढण्याच्या तडजोडीस अनुसरून मोजके सत्याग्रही रथ ओढण्यास लागले. स्पृश्य मानलेल्यांच्या पूर्व योजनेनुसार ठराविक जागेत रथ येण्याच्या अगोदरच, स्पृश्य गुंडांनी अस्पृश्य मानलेल्या सत्याग्रहींना रथ ओढीत असता पायात चाट मारून खाली पाडणे, धक्के व गुद्दे देणे वगैरे प्रकारास सुरवात केली. रस्त्याच्या बाजूस असलेल्या शेतांत दगडांचे अगोदरच ढीग जमवून, तेथे दंग्यास सुरूवात होण्याची वाट पहात मानीव स्पृश्य गुंड तयार होते. एकदाची दंग्यास सुरूवात झाली. आजुबाजूंनी ज्या स्थळी डॉ. बाबासाहेब उभे होते, त्या ठिकाणी दगडांचा वर्षाव होऊ लागला. अनेक सत्याग्रही रक्तबंबाळ होऊन घायाळ झाले. सत्याग्रहींजवळ असलेल्या छत्र्या उघडून डॉ. बाबासाहेबांवर धरण्यात आल्या. त्या सर्व मोडल्या. सत्याग्रहींनी डॉ. बाबासाहेबांभोवती आपल्या शरीरांचा कोट केला. असे असताही डॉ. बाबासाहेबांना त्या हल्ल्यांत जखमा झाल्या. ते पाहून खवळलेल्या सत्याग्रहींनी आपल्यावर झालेल्या हल्ल्यातील दगडांचा उपयोग शत्रू पक्षाचा हल्ला परतविण्याकडे केला. सर्व सत्याग्रही डॉ. बाबासाहेबांभोवती जमून त्यांचे संरक्षण करीत असल्याने, डॉ. बाबासाहेबांचा त्या दंगलींत खून करण्याची मानीव स्पृश्यांची मनीषा जागच्या जागी राहिली. पुढे पोलिसांनी येऊन शांतता केली. स्वतः जखमी झाले असताही डॉ. बाबासाहेब सरकारी हॉस्पिटलमध्ये न जाता इतर जखमी

सत्याग्रहींना त्यांनी हॉस्पिटलमध्ये अगोदर पोचविले.

कोणत्या अनुयायांत; डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे पुढारी म्हणून हे धीरोदात्त वर्तन, आदर, प्रेम, भक्ति व विश्वास उत्पन्न करणार नाही? डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या वर्तनाने व कर्तृत्वाने माणुसकीस, स्वाभिमानास व स्वावलंबनास पारखा असलेला समाज जागृत करून, एका दिलाने आपल्या या सामुदायिक चळवळीच्या आखाड्यात उतरविला व अत्यंत अल्पकाळात हे लढे लढविण्यास समर्थ केला.

या मंदिरप्रवेश सत्याग्रहाच्या चळवळीचा शेवट १९३५ च्या ऑक्टोबर महिन्यात येवल्यास भरलेल्या परिषदेत धर्मांतराची घोषणा करण्यात झाला.

येवले येथे केलेल्या धर्मांतराची घोषणा ही जागोजाग व नाशिक येथे सतत साडेपाच वर्षे चाललेल्या मंदिर प्रवेश सत्याग्रह चळवळीचा परिपाक आहे. या घोषणेस हिंदूधर्मियांना दिलेली धमकी असे कोणी म्हणतो, तर कोणी हा राजकीय स्टंट आहे असें म्हणतो. ही घोषणा होऊन आज सुमारे साडेसहा वर्षे झाली आहेत आणि ज्या अर्थी अजून म्हणावे तसे लोक धर्मांतर करून दुसऱ्या धर्मांत गेलेले दिसत नाहीत, त्या अर्थी ही नुसती हुलकावणी होती, असा आरोप अनेकांकडून केला जात आहे. मला याबाबत असे सांगावयाचे आहे की, धर्मांतराची घोषणा ही हुलकावणी अगर धमकी नसून ती आचरणात आणलेली सत्य अशी गोष्ट आहे. मी स्वत: धर्मांतरवादी आहे. माझ्या घरात असलेल्या हिंदू धर्माच्या पोथ्या, पुराणे वगैरे सर्व जाळून टाकून देवाधर्माच्या मूर्तींचा नि:पात केला आहे. हिंदूंचा कोणताही सण अगर उपासतापास अगर व्रते वैकल्ये काही आचरीत नसून, धर्म ही भोळ्याभाबड्या जीवांना गुंगी आणणारी अफू आहे अशी माझी ठाम समजूत आहे. उलट हिंदू धर्माचा मी द्वेष्टा आहे. असे असताही मी हिंदू आहे असे म्हणणे, या सारखा नादानपणा दुसरा कोणता असेल! मला जरी हिंदूधर्म मान्य नसला तरीपण मी दुसरा धर्म जोपर्यंत पत्करला नाही; तोपर्यंत मी हिंदू नाही असे कसे म्हणता येईल? हिंदूधर्म मानण्याचे सोडून जर एखादा दुसऱ्या कोणत्याही धर्मात न जाता निधर्मी बनला तर ते धर्मांतर म्हणून का मानू नये? निधर्मी बनणे हे जर धर्मांतर मानले; तर आज अस्पृश्य समाजांतील लाखो लोकांनी धर्मांतर केल्याचे विचारी लोकांस आढळून येईल.

### जादा जुडीविरुद्ध लढा

अस्पृश्य मानलेल्या लोकांत बहुसंख्य लोक सरकारी वतनदार कामगार आहोत. गेल्या दहा बारा वर्षांपासून या वतनदार महार, मांग, वेठिया लोकांच्या इनाम जमिनीवर जादा जुडी (पट्टी) वाढविण्याचा क्रम सरकारने सुरू केला. त्याबाबत व आणखीही वतनदारांच्या कामाबाबत काढलेल्या सरकारी ठरावाचा व इतर होणाऱ्या अन्यायाचा विचार करण्यासाठी इ. स. १९३९ मध्ये हरेगांव जि. नगर येथे सुमारे ३० हजार लोकांची जंगी इलाखा परिषद डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे अध्यक्षतेखाली भरली असता सदर परिषदेत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सरकारास स्पष्टपणे कळविले की, महार, मांग, वेठिया वगैरे वतनदारांच्या इनाम जमिनीवर वाढलेली जादा जुडी व सरकारी ठरावाने वाजवीपेक्षा अधिक लादलेली कामे, या बाबत जर सरकार ताबडतोब विचार करणार नसले तर सरकारच्या या अन्यायाविरुद्ध

सर्व महारांकरवीं संप पुकारून कोणतेही सरकारी काम महारांकडून केले न जाईल असा सत्याग्रह करू. प्रथम डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची वरील घोषणा सरकारने विचारात घेतली नाही. योग्य काळपर्यंत वाट पाहून आपल्या मागणीचा विचार न करता दरसाल अनेक गावांतील महार, मांग, वेठिया वगैरे लोकांच्या इनाम जमिनीवर सरकार सारखी पट्टी वाढवीत आहे, हे पहाताच १९४१ च्या जून महिन्यात - निर्वाणीचा खलिता मुंबईच्या ना. गव्हर्नरांकडे पाठवून, वाढवीत असलेल्या जादा जुडीचा अन्याय ताबडतोब थांबविण्याची बाबासाहेबांनी मागणी केली. सरकारच्या नेहमींच्या दिरंगाईच्या कारभारामुळें या अखेरच्या खलित्याचा व्हावा तसा परिणाम सरकारवर न झाल्याने; सिन्नर येथें १९४१ च्या ऑगस्ट महिन्यांत भरलेल्या सभेत डॉ. बाबासाहेबांनी जादा जुडी न भरण्याचा सत्याग्रह पुकारला. यावेळी शेतसारा वसुलीचे वर्ष संपले असून फक्त सिन्नर या एकाच गावची वाढलेली जादा जुडी भरण्याचे राहिले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जाहीर केलेल्या सिन्नरच्या सत्याग्रहास तोंड लागल्यास आपण द्रव्यबळ व माणूसबळ पुरवू म्हणून इतर पुढाऱ्यांकडून पत्र व्यवहार सुरू झाला. या झगड्याच्या निकालाकडे सर्वांचे डोळे लागून राहिले. सिन्नरच्या महार इनाम जमिनी, वाढलेली जादा जुडी न दिल्यामुळे सरकारने खालसा केल्या. परंतु महारांनी इनाम जमिनींचा कब्जा सोडला नाही. उलट त्यांत पिके केली, सोंगली व सारे उत्पन्न खाल्ले.

शेवटी डिसेंबर १९४१ मध्ये सरकारने सरकारी पत्रकाद्वारे वाढलेल्या जादा जुडीचा अन्याय डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मागणीनुसार तहकूब केला असल्याचे जाहीर केले. डॉ. बाबासाहेबांच्या घोषणेचा विजय झाला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या या सत्याग्रहामुळे गोरगरीब अस्पृश्य मानलेल्या लोकांचे, हजारो रुपये वाचले व ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना दुवा देऊ लागले. वर उल्लेखिलेल्या दुसऱ्या अनेक लहानसहान सत्याग्रही चळवळी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केल्या आहेत. स्थलाभावी त्या साऱ्यांचा उल्लेख येथे करणे शक्य असल्यामुळे अत्यंत थोडक्यात थोड्याशा सत्याग्रही चळवळीचे थोडक्यात वरीलप्रमाणे वर्णन केले आहे.

या सत्याग्रही चळवळीमुळेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर सर्व साधारण जनतेत कल्पनातीत जागृती करू शकले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केलेल्या जागृतीमुळेच साऱ्यांच्या पायाखाली दडपलेला अस्पृश्य मानलेला समाज, अत्यंत अल्पकाळात खडबडून जागा झाला व आपल्या हक्कासाठी झगडू शकला. या साऱ्या चळवळीचे व त्यात मिळालेल्या यशाचे सर्व श्रेय डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनाच आहे. त्यांच्या ५० व्या वाढदिवसाच्या निमित्ताने निघत असलेल्या या अंकाचे प्रसंगी, त्यांना आयुरारोग्य लाभून आमच्या पददलित समाजाचा संपूर्ण उद्धार त्यांच्याच हातून होवो, अशी शुभेच्छा प्रगट करतो.

*(जनता खास अंक १९४२)*

# मुखेड सत्याग्रह

भाऊराव कृष्णराव गायकवाड

इ. स. १९३२ साली मुखेड, ता. येवला येथे सार्वजनिक रस्त्यावरून पांडवप्रताप ग्रंथाच्या पोथीची मिरवणूक सार्वजनिक रस्त्यांनी वाजत गाजत गावांतून नेत असता गावच्या स्पृश्य मानेल्या लोकांनी मिरवणूक अडविली असता, त्यावेळी तेथे जमलेल्या लोकांनी जो सत्याग्रह केला, त्यास पुढे ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाल्याने त्याचा थोडक्यात वृत्तान्त देत आहे.

ता. २ मार्च १९३० रोजी प्रसिद्ध असलेला नाशिकचा श्रीकाळाराम मंदिरप्रवेश सत्याग्रह सुरू झाला होता. सदर सत्याग्रहाचे पुढारीपण डॉ. बाबासाहेब आंबेडकरांकडेच होते. दर शनिवारी व रविवारी व जरूर भासल्यास मध्यंतरीसुद्धा डॉ. बाबासाहेब आंबेडकर नाशिकास धावून येत असत.

त्याच दरम्यान हिंदुस्थानला द्यावयाच्या स्वराज्याचा विचार विनिमय करण्यासाठी इंग्रजांनी लंडन शहरी हिंदुस्थानांतील प्रमुख पुढाऱ्यांची एक गोलमेज परिषद बोलाविली होती. अस्पृश्य मानलेल्या वर्गाच्या वतीने पुढारी म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर व मद्रासचे रावबहादूर श्रीनिवास यांना बोलविले होते. पहिल्या गोलमेज परिषदेमध्ये म. गांधींनी भाग घेतला नव्हता. पहिल्या गोलमेज परिषदेमध्ये स्वराज्याबद्दल प्राथमिक स्वरुपाची चर्चा होऊन परिषदेचे काम काही दिवसासाठी तहकूब ठेवण्यात आले होते.

इ. स. १९३२ साली दुसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये म. गांधींनी स्वत: भाग घेतला. त्यांना काँग्रेसच्या वतीने बोलावण्यात आले होते.

दुसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये अस्पृश्य मानलेल्या लोकांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधित्व द्यावे, अशी मागणी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केली असता त्यास गांधीजींनी जोराचा विरोध केला. अस्पृश्य मानलेले लोक हे हिंदूधर्मीय असून त्यांचे पुढारीपण हिंदुस्थानातील काँग्रेस व तिचा नेता म्हणून मी (गांधी) करीत असतो. तेव्हा त्यांना वेगळे अधिकार देण्याची मुळीच गरज नाही.

या विषयावर बरीच भवती न भवती होऊन चर्चा झाली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी, अल्पसंख्याक जमातीच्या संरक्षणासाठी काय तजवीज करावी याबाबत विचारविनिमय करण्यासाठी नेमलेल्या कमिटीपुढे आपले म्हणणे निर्भीडपणे मांडले. अनेक इंग्रज मुत्सद्यांची त्या विषयावर खात्री पटविली.

शेवटी गांधी व हिंदुस्थानातील पुढारी अस्पृश्य मानलेल्या लोकांना राजकारणात खास

हक्क देण्यास मोठ्या कष्टाने कबूल झाले परंतु अस्पृश्य मानलेल्या वर्गाच्या प्रतिनिधींची निवड कशी करायची म्हणून प्रश्न निर्माण झाला असता, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी अस्पृश्य मानलेल्या वर्गांच्या प्रतिनिधींची निवड ही ज्याप्रमाणे अल्पसंख्याक मुसलमान अगर अँग्लो इंडियन्स अगर ख्रिश्चन यांच्या प्रतिनिधीची निवड जशी स्वतंत्र मतदार संघातर्फे होणार; तशीच व्हावी म्हणून आग्रह धरला. यावेळी गींधीजींचे असे म्हणणे पडले की, अस्पृश्य वर्ग हा हिंदूंचाच एक भाग असल्याने त्यांच्या प्रतिनिधीची निवड स्पृश्यास्पृश्य हिंदूंच्या संयुक्त मतदार संघाद्वारेच व्हावी असा हट्ट धरला. यावेळी तर गांधीजींच्या सद्सदविवेक बुद्धीचा तोल सुटून हिंदुस्थानांतील अस्पृश्य वर्गाचा मीच एकटा पुढारी आहे; डॉक्टर आंबेडकर हा महाराचा पोर, इंग्रजांनी आम्हाला विरोध करण्यासाठी मुद्दाम आणला आहे असले हीन उद्‌गार काढण्यापर्यंत गांधीजींची मजल गेली. त्यावेळी उभयपक्षी आमचा पुढारी कोण म्हणून शेकडो तारांचा वर्षाव, इंग्रज मुत्सद्यांवर व मंत्र्यांवर देशांतील लोकांनी केला. त्याच सुमारास मुखेड, ता. येवला, जि. नाशिक येथे जो सत्याग्रह झाला, त्याचा थोडक्यात वृत्तान्त देऊन त्याचे परिणाम गोलमेज परिषदेवर काय झाले याचे वर्णन डॉ. बाबासाहेबांच्याच शब्दांत आजच्या प्रसंगी करण्याचे योजिले आहे.

वीस-पंचवीस वर्षांपूर्वी शहरांतून व खेड्यापाड्यांतून रहात असलेला अस्पृश्य मानलेला वर्ग हिंदूधर्माच्या मगरमिठीत करकचून आवळला गेला होता. दरसाल श्रावण महिन्यांत गावोगाव अस्पृश्य मानलेले लोक हिंदूधर्मांच्या ग्रंथांची पारायणे करीत असत. कोणी पांडव प्रताप ग्रंथाचे पारायण लावी, तर कोणी रामविजय लावी, तर कोणी शिवलीलामृताचे पारायण करी. ग्रंथाचें वाचन संपले म्हणजे समाप्ती म्हणून एक दिवस अगोदर साजरा करीत. आसपासचे लोक जमवून दिंडी, भजन गात. ग्रंथाची समाप्ती करीत. समाप्तीस आलेल्या सर्व लोकांना सुग्रास जेवण दिले जाई. त्या वहिवाटीप्रमाणे मुखेड गांवी १९३२ साली पांडवप्रताप ग्रंथाच्या पोथीचे तेथील महार मंडळीने पारायण लावले होते. समाप्तीसाठी बरीच मंडळी बोलावली होती. त्याच दरम्यान नाशिकास श्रीकाळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह चालला होता, सत्याग्रहातील पुढारी म्हणून श्री. अमृतराव रणखांबे, टी. बी. काळे, सावळेरामजी दाणी, रामभाऊ पालजी मारू व प्रस्तुत लेखक वगैरे मंडळी, मुद्दाम मुखेडला नाशिक सत्याग्रहाचे लोण पोचविण्यासाठी गेली होती.

सायंकाळी सुमारे ४ वाजता सजविलेल्या पालखीत 'पांडव प्रताप' ग्रंथाची पोथी, सनई वाद्ये लावून जयघोष करीत आलेल्या पाहुण्यांनी, गांवच्या महार लोकांच्या आग्रहावरून मुखेड गावच्या राजरस्त्यांनी मिरवणूक काढली. मिरवणूक वेशीत जाताच गावच्या स्पृश्य मानलेल्या लोकांनी मिरवणूक अडविली. महारांच्या पांडवप्रताप ग्रंथाची मिरवणूक आणि आमच्या गावातून हमरस्त्यांनी मुळीच जाऊ देणार नाही. सार्वजनिक रस्त्यांची मिरवणूक अडविणे हा गुन्हा आहे म्हणून परोपरीने त्यांना समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. पण उपयोग झाला नाही. स्पृश्य गावकरी आपली पांडवप्रताप ग्रंथाची मिरवणूक गोडी गुलाबीने, राजरस्त्यानी जाऊ देत नाहीत असे दिसताच मिरवणूकवाल्यांनी रस्त्यावरच बैठा सत्याग्रह सुरू केला. श्री. अमृतराव रणखांबे यांना येवल्यास त्यांच्या मोटारने पोलीस सबइन्स्पेक्टर व मामलेदार यांना हे वृत्त कळविण्यास पाठविले. सायंकाळच्या ४ वाजेपासून तो रात्रौ

८ वाजेपर्यंत मिरवणूकवाले पांडवप्रताप ग्रंथाची पोथी पालखीत ठेवून जागेच जागी बसून राहिले होते. अग्रभागी पुढे श्री. विठ्ठलराव रणखांबे, सावळेरामजी दाणी, रुपाजी वस्ताद पहिलवान व प्रस्तुत लेखक ही मंडळी बसली होती. स्पृश्य गावकरी लोकांना वाटले होते की, महार मंडळी घटका दोन घटका बसून कंटाळून उठून परत जातील. परंतु चार तास झालें तरी सत्याग्रही ढळत नाहीत, हे पाहून सत्याग्रही मंडळींना सतावण्याचा गावच्या गुंडांनी प्रारंभ केला. रस्त्यावरची माती भरभरून सत्याग्रहीच्या तोंडावर व अंगावर उडविण्याचा क्रम सुरू केला. तरी सत्याग्रही बसल्या जागेवरून हलत नाहीत हे पाहिल्यानंतर मग बराच केरकचरा जमवून बसलेल्या सत्याग्रहींच्या तोंडापुढे, अग्रभागी मोठी होळी पेटविली. आगीच्या ज्वालांचे चटके बसत असताही सत्याग्रहींनी जागा सोडली नाही. शेवटी रागावून 'महात्मा गांधीकी जय, भारतमाता की जय, शिवाजी महाराज की जय' अशा घोषणा करीत पेटत असलेल्या त्या होळीची आग सत्याग्रहींच्या अंगावर उधळण्यास सुरूवात केली. तरी सत्याग्रहींनी आपली शांती ढळू दिली नाही. एवढे करीत असताही ज्या अर्थी सत्याग्रही आपला हेका सोडीत नाहीत व मिरवणूक परत नेत नाहीत, हे पाहून गांवच्या स्पृश्यवर्गीय आडदांड लोकांनी सरपणाच्या ढिगातून लांबलांब लाकडे उपसली व बसलेल्या सत्याग्रही लोकांवर जोराचा हल्ला चढविला. मिरवणुकीच्या मागच्या बाजूस बसलेले सत्याग्रही कंटाळून पेंगले होते. परंतु गावच्या स्पृश्य लोकांनी मारामारीस सुरवात केल्याचा कल्लोळ ऐकून व मार खात खात त्यांनी पळ काढला. श्री. विठ्ठलराव रणखांबे यांचे डोक्यांत दोन इंच खोल व २ इंच रुंद अशी खोच पडून ते रक्तबंबाळ झाले होते. प्रस्तुत लेखकाच्या गालावर बाभळीच्या खनपुटाने मोठी खोच पडून सबंध तोंड सुजले होते. प्रस्तुत लेखकास घेरी आली असता दुसऱ्या मित्रांनीच त्यास उचलून मराठवाड्यात नेले होते. सत्याग्रही लोकांना मारीत मारीत थेट मराठवाड्यात गावच्या स्पृश्य मानलेल्यांनी नेले. अनेकांना अनेक जखमा झाल्या. आपण फार मोठा पराक्रम केला असे गावकरी लोकांना वाटून ते पांडवप्रताप ग्रंथाच्या पालखी जवळ आले. त्या पांडवप्रताप - ग्रंथावर व पालखीवर घासलेट टाकून त्यास आग लावण्यात आली. हे सर्व प्रकार चालू असता स्पृश्य गावकरी 'महात्मा गांधी की जय, भारतमाता की जय' इत्यादी घोषणा करीत होते.

श्री. अमृतराव रणखांबे येवल्यावरून येणार याची वार्ता, गावच्या स्पृश्यवर्गीय लोकांना कळली होती. तेव्हा येवल्याच्या वाटेवर एक गुंडाची टोळी घासलेट तेलाचा डबा भरून तो अमृतरावांच्या मोटारावर ओतून त्यांना मोटारीसह जाळण्याचा घाट घातला होता. परंतु श्री. अमृतरावांबरोबर पोलीस सबइन्स्पेक्टर व पोलीस पार्टी तसेच येवल्याचे मामलेदार इ. लोक असल्याने गुंडांचा तो बेत फसला. झालेल्या प्रकाराबद्दल चौकशी झाली.

आमच्या नाशिकच्या 'स्वराज्य' पत्राच्या संपादकांनी या जुलमाचा धिक्कार केला होता. इतरही पत्रांतून या अन्यायास वाचा फुटली होती. परंतु विशेष आनंदाची बातमी ही की, इंग्लंडमधील लंडन टाइम्सने आपल्या मुखपृष्ठावर मुखेड सत्याग्रहांवरील मारहाणीची, पांडव प्रताप ग्रंथाच्या होळीची व सार्वजनिक रस्त्यावरून अस्पृश्य मानलेल्या लोकांना हिंदुस्थानात कसे जाऊ दिले जात नाही, याचे सत्य कथन केले होते. तसेच ज्या वेळी गरीब अस्पृश्य मानलेल्या सत्याग्रहींवर स्पृश्य मानलेल्या लोकांनी हल्ला केला, लोकांना रक्तबंबाळ

केले, पांडव प्रताप ग्रंथाची घासलेट टाकून होळी केली; त्यावेळी लोक म. गांधी की जय, भारत माता की जय या घोषणा करीत होते, याचे वर्णन केले होते.

त्या दिवशी सकाळी डॉ. बाबासाहेबांनी हे वृत्त वाचले. त्यांना आपल्या लोकांवर होत असलेल्या जुलमाबद्दल दु:खही झाले. पण 'दु:खात सुख' या म्हणीप्रमाणे आजच्या गोलमेज परिषदेच्या बैठकीत आपल्या मागणीस हे किती व कसे पाठिंबा देईल, याबद्दल एक प्रकारचे समाधान झाले. त्याच दरम्यान गोलमेज परिषदेत अस्पृश्यांचे पुढारी महात्मा गांधी, की डॉ. बाबासाहेब आंबेडकर? अस्पृश्य मानलेल्या लोकांना आपले प्रतिनिधी स्वतंत्र मतदार संघांद्वारे निवडण्याचा अधिकार द्यावयाचा की, संयुक्त मतदार संघाद्वारे द्यावयाचा! अस्पृश्य मानलेले लोक हे हिंदू धर्माचाच एक घटक असून, आम्ही एक आहोत म्हणून गांधी ते खरे की, ख्रिश्चन मुसलमानांपेक्षा हिंदूंना अस्पृश्य मानलेले हिंदू व दूरचे शत्रूसमान वाटतात म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणत ते खरे! या चाललेल्या चर्चेला मुखेडच्या सत्याग्रहाने समर्पक उत्तर दिले. सदर लंडन टाइम्सच्या प्रती डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी त्या दिवशी विकत घेतल्या व गोलमेज परिषदेचे कामास सुरूवात होताच सर्व सभासदांना त्या प्रती वाटल्या.

लंडन टाइम्सची जवळ असलेली शेवटची प्रत गांधींच्या अंगावर भिरकावून देऊन डॉ. बाबासाहेब म्हणाले की, ज्या गांधींच्या अनुयायांनी 'गांधी की जय', 'भारतमाता की जय' म्हणून घोषणा करीत माझ्या लोकांना रस्त्याने जाण्यास बंदी करावी; पांडव प्रताप ग्रंथ हा हिंदूधर्माचा जरी ग्रंथ असला, तरी तो माझ्या लोकांजवळ आहे म्हणून हिंदूनीच त्यावर घासलेट टाकून त्याची होळी करावी व माझे लोक हिंदूधर्माच्या पांडवप्रताप ग्रंथांची मिरवणूक काढतात म्हणून त्यांना रक्तबंबाळ होईपर्यंत मारायचे! हे आहे भारताचे गांधीप्रणीत स्वराज्य! या मार्गाने आमचा हे लोक उद्धार करणार आहेत! त्या दिवशी जेवढी घेता येईल तेवढी हजेरी, डॉ. बाबासाहेबांनी, गांधींची घेतली.

### मुखेड सत्याग्रह

लंडनवरून प्रस्तुत लेखकास डॉ. बाबासाहेबांनी पाठविलेल्या पत्रात म्हटले होते की, 'अस्पृश्य मानलेल्या वर्गाच्या मागण्यांचा प्रश्न मुखेड सत्यागृहाने सोडविला त्याबद्दल मला आनंद वाटतो. लोकांनी खाल्लेल्या माराचे चीज झाले म्हणून तुम्हा सर्वांचे मी मन:पूर्वक अभिनंदन करतो, इत्यादी इत्यादी.'

अस्पृश्य मानलेल्या लोकांच्या चळवळीच्या इतिहासात सत्याग्रहास फार मोलाचे स्थान आहे. आणि म्हणून त्याची जनतेला कल्पना यावी, यासाठी त्याची धावती कल्पना या लेखात देण्याचा मी प्रयत्न केला.

*(प्रबुद्ध भारत जयंती विशेषांक, १४ एप्रिल १९५८)*

# डॉ. बाबासाहेब दूरदर्शी होते!

## भाऊराव कृष्णराव गायकवाड

**प्रश्न :** डॉ. बाबासाहेबांचे आणि आपले संबंध केव्हा आणि कसे आले?

**उत्तर :** १९२६ सालापासून माझे व डॉ. बाबासाहेबांचे संबंध आले. ते त्यावेळी नामांकित बॅरिस्टर होते. मी नाशिक येथील शाहू छत्रपती बोर्डिंगचा सुपरिन्टेन्डेंट होतो. बाबासाहेब नेहमी वकिलीच्या कामानिमित्ताने नाशिकला येत असत. त्यामुळे वरचेवर भेटी होत. अशा रीतीने सहवास वाढत गेला.

**प्रश्न :** आपण बाबासाहेबांकडे कसे आकर्षित झालात?

**उत्तर :** डॉ. बाबासाहेबांचे महार जमातीत जास्त वजन असल्याने मी त्यांच्याकडे आकर्षित झालो; त्याकाळी आमच्या जातीत बॅरिस्टर होणे ही अतिशय दुर्मिळ अशी गोष्ट होती.

**प्रश्न :** १९२७ साली महाड येथे चवदार तळ्याचा सत्याग्रह झाला. त्यापूर्वी असा एखादा सत्याग्रह आपल्या जमातीतील लोकांनी केला होता काय?

**उत्तर :** १९२७ साली महाड येथील चवदार तळ्याचा सत्याग्रह, हाच आमच्या जमातीतील लोकांनी केलेला पहिला सत्याग्रह. त्यापूर्वी अशा प्रकारचा सत्याग्रह झाला नव्हता.

**प्रश्न :** या चवदार चळ्याच्या सत्याग्रहात आपण भाग घेतला होता. त्यातील काही रोमांचकारी अनुभव सांगता?

**उत्तर :** १९२७ साली झालेल्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात मी भाग घेतला. कारण हा सत्याग्रह अस्पृश्यांनी पाणी मिळण्यासाठी केलेला होता. एक का दोन घटना सांगू? तसे पाहिले तर अस्पृश्यांनी स्पृश्यांच्या विरुद्ध हा लढा देणे, हीच एक अपूर्व व रोमांचकारी घटना होती. माझ्या दृष्टीने हा सत्याग्रह आणखी एक कारणाकरिता संस्मरणीय ठरला.

**प्रश्न :** कोणते कारण?

**उत्तर :** ह्या सत्याग्रहाच्या सुरुवातीसच मला डॉ. बाबासाहेबांना विरोध करण्याचा पवित्रा घ्यावा लागला.

**प्रश्न :** हा सत्याग्रह यशस्वी करण्याच्या इराद्याने आपण ह्या सत्याग्रहात सामील झाला होतात असे असताना डॉ. बाबासाहेबांना विरोध करण्यास आपण सिद्ध व्हावे असे काय घडले होते?

**उत्तर :** ह्या सत्याग्रहाचे नेतृत्व डॉ. बाबासाहेब करीत होते. ते दूरदर्शी होते. दूरवरचा पेच समजून होते. त्यांनी खाजगीरीत्या आपले असे मत व्यक्त केले की, अस्पृश्यांनी हा सत्याग्रह

मागे घ्यावा.

**प्रश्न :** डॉ. बाबासाहेबांनी असे मत का व्यक्त केले? त्या पाठीमागे त्यांची विचारप्रणाली काय होती?

**उत्तर :** डॉ. बाबासाहेबांनी असे आम्हा सर्वांच्या विचारांना धक्का देणारे मत व्यक्त केले त्याचे कारण त्यांनी स्पष्ट केले ते असे की, ह्या सत्याग्रहाला ब्रिटिश सरकारचा पाठिंबा नव्हता.

**प्रश्न :** परंतु हा लढा जर अस्पृश्यांचा; स्पृश्यांविरुद्ध होता तर ब्रिटिश सरकारची पर्वा करण्याची काय आवश्यकता होती?

**उत्तर :** ही केवळ ब्रिटिश सरकारची पर्वा करण्याचीच बाब नव्हती. तो काळ असा होता की, एकीकडे ब्रिटिश सरकारचा रोष व दुसरीकडे, बहुसंख्याक स्पृश्यांचा विरोध ह्या दोन्ही गोष्टींना एकाच वेळी तोंड देणे अल्पसंख्याक अस्पृश्यांना शक्य नव्हते.

**प्रश्न :** परंतु आपली तशी समजूत पटली होती काय?

**उत्तर :** डॉ. बाबासाहेबांच्या दूरदर्शी व तर्कशुद्ध विचारसरणीने माझी समजूत पटली होती.

**प्रश्न :** हा लढा येथेच थांबला काय?

**उत्तर :** नाही. महाड येथील चवदार तळे हे सार्वजनिक आहे हे प्रस्थापित करण्याबद्दलचा खटला ठाणे कोर्टात (तेव्हा डिस्ट्रिक्ट कोर्ट अलिबागला नव्हते.) दाखल केला गेला. डॉ. बाबासाहेबांनी ह्या खटल्यात वकील म्हणून काम केले. निर्णय आमच्या बाजूने झाला व चवदार तळे सार्वजनिक ठरले.

**प्रश्न :** कोर्टाचा हा निर्णय स्पृश्यांनी बिनविरोध मानला काय? चवदार तळ्यावर पाणी भरण्यास अस्पृश्यांना मान्यता दिली काय?

**उत्तर :** नाही. स्पृश्यांनी हा निर्णय बिनविरोध मानणे शक्यच नव्हते. त्यामुळे कोर्टात निर्णय आमच्या बाजूने लागूनही प्रत्यक्षात मात्र, चवदार तळ्यावर आमच्या जमातीला पाणी भरण्यास मुभा दिली गेली नव्हती.

**प्रश्न :** डॉक्टर बाबासाहेबांनी एकामागून एक सत्याग्रह का केला? त्यामुळे सवर्ण हिंदूची सहानुभूती. दलितांना गमावली असे आपणास वाटत नाही काय?

**उत्तर :** डॉक्टर बाबासाहेबांनी एकामागून एक सत्याग्रह करण्याचे कारण असे की, अस्पृश्य समाजाला आपल्या हक्कांची जाणीव व्हावी, त्यांच्यात चळवळीची लाट उसळावी अशी त्यांची इच्छा होती. त्यांनी स्वसमाज-जागृतीच्या हेतूने केलेल्या सत्याग्रहामुळे दलितांनी सवर्ण हिंदूची सहानुभूती गमावली, हे पूर्ण सत्य आहे असे मला वाटत नाही. कारण सवर्ण हिंदूंतही जे पुरोगामी व प्रगत विचारांचे लोक होते त्यांची दलित समाजाबद्दलची सहानुभूती यत्किंचितही कमी झाली नाही. उलट त्यांपैकी काहीनी आम्हाला सक्रिय सहानुभूती दाखवली. सवर्ण हिंदूंतील केवळ सनातनी व कर्मठ हिंदूंची मात्र ह्या सत्याग्रहांमुळे दलित समाजाबद्दल सहानुभूती राहिली नव्हती. परंतु तरीही माणुसकीच्या हक्कांना वंचित झालेल्या दलितांनी तो हक्क मिळविण्याचा प्रयत्न करताना सवर्ण सनातनी हिंदूंच्या सहानुभूतीची कधीच पर्वा केली नाही.

**नाशिकचा काळाराम मंदिर सत्याग्रह**

**प्रश्न :** नाशिकच्या काळाराम मंदिराचा सत्याग्रह अनेक कारणांनी गाजला तो घडवून आणण्यासाठी आपण कष्ट घेतले. हा सत्याग्रह यशस्वी करण्यासाठी आपण कोणत्या गोष्टींचा अवलंब केला होता? ह्या सत्याग्रहाला डॉ. बाबासाहेबांचे मार्गदर्शन लाभते असेल त्याचे स्वरूप कसे होते?

**उत्तर :** नाशिकच्या काळाराम मंदिराचा सत्याग्रह प्रामुख्याने डॉक्टर बाबासाहेबांनी घडवून आणला. ह्या सत्याग्रहाचे स्वरूप त्रिविध होते. राममंदिरात प्रवेश करणे, रामाचा रथ ओढणे व रामकुंडात स्नान करणे. बाबासाहेबांचा एक सहकारी म्हणून मी ह्या सत्याग्रहात सामील झालो होतो व त्यांच्या आदेशाचे पालन करीत होतो.

राम हे हिंदूंचे आराध्य दैवत व राममंदिर हे त्यांचे पवित्र स्थान. त्यामुळे ह्या मंदिरात प्रवेश मिळविण्यासाठी अस्पृश्यांनी सत्याग्रह करावा ही एक अलौकिक घटना होती. हा सत्याग्रह यशस्वी व्हावा म्हणून अस्पृश्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. १९३५ पर्यंत म्हणजे जवळजवळ सहा वर्षे हा सत्याग्रह चालू होता. ह्या अवधीत केवळ मंदिरप्रवेशच नव्हे तर रथोत्सवाच्या दिवशी रथ ओढण्याचाही प्रयत्न केला गेला.

**प्रश्न :** सत्याग्रहींनी मंदिर प्रवेश केला होता? त्यावर सवर्ण हिंदूंच्या प्रतिक्रिया काय होत्या?

**उत्तर :** सत्याग्रही मंदिर प्रवेश करू शकले नाहीत. एका रथोत्सवाच्या दिवशी डॉक्टर बाबासाहेब व सवर्ण हिंदू पुढारी यांच्यात एक समझोता झाला. स्पृश्यांबरोबरच अस्पृश्यांनाही रथ ओढावयास मिळावा. एकोप्याने व सामोपचाराने वागून दोन्ही पक्षांनी रथ ओढावा अशी तडजोड झाली. पण ती अंमलात मात्र आली नाही.

**प्रश्न :** का?

**उत्तर :** झालेल्या तडजोडीनुसार अस्पृश्य रथ ओढावयास गेले, पण हिंदूंनी असा डाव रचला होता की, अस्पृश्यांनी रथ ओढण्याचा प्रयत्न करताच त्यांच्यावर दगडफेक करून त्यांना नामोहरम करण्याचा प्रयत्न करावयाचा. इतकेच नव्हे तर आमच्या कानावर असेही आले की, डॉक्टर बाबासाहेबांना जीवे मारण्याचीही हिंदूंचा इरादा होता. मी हे सर्व डॉक्टर बाबासाहेबांच्या कानावर घातले व त्यांनी अशा परिस्थितीत सत्याग्रहस्थळी थांबू नये असेही सुचविले.

**प्रश्न :** डॉक्टर बाबासाहेबांनी काय निर्णय घेतला?

**उत्तर :** डॉ. बाबासाहेबांसारख्या धीरगंभीर नेत्याला माझी सूचना पटणे शक्यच नव्हते. त्यांनी स्पष्ट शब्दांत आम्हा सर्वांना सांगितले, ''मी ह्या चळवळीचा पुढाकार घेतलेला आहे. माझ्यावर जर स्पृश्यांचा इतका डोळा असेल व ते मला नामशेष करू पहात असतील तर ते त्यांना शक्य नाही. त्यांनी जरूर ते प्रयत्न करावेत. मी तसूभरही मागे हटणार नाही. मी सुभेदाराचा मुलगा आहे. हाती घेतलेल्या कार्यातून असा पळ काढणे मला शोभणारे नाही.'

डॉ. बाबासाहेबांचे हे वीरोचित उद्गार ऐकल्यावर आम्हा सर्व सत्याग्रहींना जणू एक आव्हानच मिळाले. आमच्यात अधिक जोम संचारला व त्या आवेशात, आम्ही रथ ओढावयास गेलो तर चिंचवनाच्या बाजूने एका उंच ठिकाणावरून आमच्यावर दगडांचा वर्षाव सुरू झाला. डॉ. बाबासाहेबांचे दगडापासून रक्षण करण्याकरता काही सत्याग्रहींनी छत्र्या उघडून

धरल्या, पण काही उपयोग झाला नाही. दगडांचा मारा इतका जबरदस्त होता की, छत्र्या तर मोडल्याच पण पुष्कळ सत्याग्रहींही जखमांनी घायाळ झाले. स्वत: डॉ. बाबासाहेबांना जखमा झाल्या होत्या. शेवटी पोलिसांनी गणेशवाडीमार्गे जखमी सत्याग्रहींना मोठ्या शिकस्तीने मोठ्या महारवाड्यात पोचवले. परंतु एवढे झाले तरी बाकीचे सत्याग्रही निरुत्साही - निराश झाले नाहीत.

**प्रश्न :** आपण सांगितलेल्या तिसऱ्या हेतूबाबत काय घडले?

**उत्तर :** आमचा तिसरा हेतू काही अंशी सफल झाला. व्यक्तिश: मला ह्या प्रयत्नात पोलिसांची साखळी मोडली म्हणून तीन रुपये दंड झाला होता. तर मंदिर प्रवेशाच्या बाबतीत मला दोन महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली होती. माझ्याबरोबर अमृतराव रणखांबे, सावळाराम दाणी, लळीणकर, हरिभाऊ जाधव इ. सहा-सातशे लोक तुरुंगात गेले होते.

**धर्मांतराची घोषणा**

**प्रश्न :** ह्या सत्याग्रहाची फलश्रुती काय?

**उत्तर :** ह्या सत्याग्रहाची फलश्रुती धर्मांतर परिषदेत झाली.

**प्रश्न :** ह्या सत्याग्रहाच्या बाबतीत ब्रिटिश सरकारची भूमिका काय होती?

**उत्तर :** पूर्ण तटस्थतेची. ना अनुकूल ना प्रतिकूल.

**प्रश्न :** आपण आता उल्लेखिलेली धर्मांतर परिषद केव्हा, कोठे व का भरविण्यात आली? डॉ. बाबासाहेबांनी ह्या परिषदेत आपली भूमिका कशा प्रकारे प्रकट केली?

**उत्तर :** १९३५ पर्यंत आमचे सत्याग्रही नेटाने प्रयत्न करीत होते. टाळ, मृदंग घेऊन मंदिराच्या दाराशी धरणे धरून बसत. पण त्यांच्यासाठी दरवाजे उघडले जाण्याचे लक्षण दिसेना! शेवटी १९३५ मध्ये येवला येथे एक परिषद बोलावण्यात आली. ह्या परिषदेतच डॉ. बाबासाहेबांनी आपल्या धर्मांतराची जगप्रसिद्ध घोषणा केली होती की, ''मी हिंदू म्हणून जन्माला आलो असलो, तरी हिंदू म्हणून मरणार मात्र नाही.''

**प्रश्न :** धर्मांतर करण्यात डॉ. बाबासाहेबांचा मुख्य उद्देश काय होता?

**उत्तर :** धर्मांतर परिषदेत केलेल्या प्रतिज्ञेतच ह्या प्रश्नाचे उत्तर नाही काय?

**प्रश्न :** घोषणेनंतर आणि प्रत्यक्ष धर्मांतरनंतर डॉक्टर बाबासाहेबांवर हिंदूंनी अनेक आरोप केले होते. त्याबद्दल आपणास काय वाटते?

**उत्तर :** माझ्या दृष्टीने त्या आरोपात काहीही तथ्य नव्हते.

**प्रश्न :** डॉक्टर बाबासाहेबांनी १९३५ साली धर्मांतराची घोषणा केली आणि प्रत्यक्षात धर्मांतर मात्र १९५६ साली केले. हा मधला २०-२१ वर्षांचा कालखंड अधिक होता असे आपणास वाटत नाही काय?

**उत्तर :** मला तसे वाटत नाही. कारण ह्या बाबतीत सर्व धर्मांचा अभ्यास करून, शहानिशा करून निर्णय घेण्यास काही कालावधी जाणे आवश्यकच होते. पूर्ण विचारांती घेतलेला निर्णयच शेवटी फायदेशीर ठरणार होता. डॉक्टर बाबासाहेबांनी सर्व धर्मांचे परिशीलन करून बौद्ध धर्माची निवड केली.

**प्रश्न :** डॉक्टर बाबासाहेबांनी ह्यापूर्वीच धर्मांतर केले असते तर बौद्धजनांचा अधिका फायदा

झाला नसता काय?

**उत्तर :** मला तसे वाटत नाही.

**प्रश्न :** धर्मांतरानंतरही अस्पृश्यांना मिळणाऱ्या सवलती मागत राहण्यात कमीपणा नाही काय?

**उत्तर :** मुळीच नाही. आर्थिकदृष्ट्या मागासलेल्यांनी सवलती मागण्यात कमीपणा वाटण्याचे काहीच कारण नाही. उलट अशा सवलती मिळविण्याविषयी तातडी करणे अधिक अनिवार्य आहे.

**प्रश्न :** शिक्षणाने बौद्धजनांची प्रगती होत आहे हे खरे. पण त्याबरोबरच बौद्ध समाजात एक दरी निर्माण झाली आहे. जी पूर्वी सवर्णांमध्ये व अस्पृश्यांमध्ये होती. याबद्दल आपणाला काय वाटते?

**उत्तर :** त्या अर्थाने अशी दरी बौद्ध समाजात निर्माण झाली आहे, असे मला वाटत नाही. कारण प्रगत-शिक्षित बौद्ध, अप्रगत अशिक्षित-बौद्धांपासून स्वत:ला दूर ठेवीत नाहीतच. उलट त्यांच्या उन्नतीच्या दृष्टीने कार्य करीत आहेत. 'सर्व समाजाचे कल्याण हेच अंतिम साध्य...' :

**प्रश्न :** आपले खास असे काही जीवनाचे तत्त्वज्ञान आहे काय?

**उत्तर :** माझ्यापुरते वेगळे असे तत्त्वज्ञान काही नाही. सर्व समाजाचे कल्याण हेच अंतिम साध्य मी मानतो. ते साधण्यासाठी वाटेल तो त्याग करण्यास मी सिद्ध आहे. बहुजनहित साधणे हे मी माझे पवित्र कर्तव्य मानतो. बौद्ध धर्मातील व अन्य धर्मातील लोकांचे, विशेषत: दलितांचे, हित साधणे, शैक्षणिकदृष्ट्या योग्य तो विकास साधणे हे मी माझे कार्य मानले आहे व माझ्या शक्तीप्रमाणे मी ते करीत आहे.

*(मुलाखत : प्रा. कु. उषा पुरोहित)*

*(पूर्वप्रसिद्धी बाबासाहेबांच्या सहवासातील सुवर्ण क्षण, संपादक प्रा. शि. ना. रामटेके, प्रा. झुंबरलाल कांबळे, प्रा. संजीत तारदाळकर, मुक्तिसंग्राम प्रकाशन, महाड)*

# समाजकार्य अव्याहत चालून ते चिरकाल टिकले पाहिजे

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर**

**एका सन्माननीय व्यक्तीच्या अभिनंदनाची सभा, मानपत्रातील भाषेत अतिशयोक्ती नाही, एकतर परमेश्वरी कृपेशिवाय प्रगती शक्य नव्हती, दुसरे म्हणजे भाऊराव गायकवाडांसारखे सहकारी मिळाले नसते तर परमेश्वरी कृपाही काही करू शकली नसती, माझ्या कामगिरीचे ८०टक्के श्रेय गायकवाडांना, कॉंग्रेस भांडवलदाराची म्हणून स्व. म. पक्ष, भाऊराव ५००नी पडले हे चुकीचे, स्व. म. पक्षाविषयी शंका दूर करीन.**

"आजच्या प्रसंगी, या समारंभाला मला हजर राहता आले याबद्दल मी स्वत:ला धन्य समजतो आणि म्हणून हा समारंभ घडवून आणल्याबद्दल मी येथील चालक मंडळीचा फार आभारी आहे. आपण नेहमी चळवळीची ज्योत पाजळण्यासाठी ज्या कामचलाऊ सभा करतो, तशा प्रकारची ही सभा नाही. एका सन्माननीय अशा व्यक्तीच्या अभिनंदनाची ही सभा असून तिचे महत्त्व तितकेच मोठे आहे. श्री. भाऊराव यांचा दर्जा किती मोठा आहे, हे नव्याने सांगावयास नको. आजच्या मानपत्रातील भाषा, त्यांना अतिशयोक्ती वाटते. पण माझ्यामते, उलट ती पाण्यासारखी पातळ आहे. त्या मानाने भाऊरावांची कामगिरी अधिक अमोल अशी आहे. मला यावेळी वाईट वाटते ते हे की, हा मानपत्र अर्पण समारंभ वडाळा येथील सर्व रहिवाशांतर्फे न होता, काही लोकांतर्फेच तो होतो आहे; आणि दुसरे, हा समारंभ सर्व मुंबई इलाख्यातर्फे, निदान मुंबई शहरातर्फे तरी व्हावयास पाहिजे होता. असो! तरीपण या गोडप्रसंगी अध्यक्षपद स्वीकारण्याविषयीच्या विनंतीला मला नाही म्हणता येईना.

गेल्या १० वर्षांच्या आपल्या समाजाच्या प्रगतीचा जेव्हा मी शांतपणे विचार करतो, त्यावेळी माझ्या मनात वारंवार दोन विचार घोळत असतात. एक: परमेश्वराच्या कृपेशिवाय गेल्या १९ वर्षात आपल्या समाजाची इतकी कल्पनातीत प्रगती झालेली नाही. गांधींजीसारख्या पुरुषाबरोबर झगडण्यात यश मिळून आम्हास राजकीय हक्क मिळाले आणि आपणाला राजकारणात समानतेचा दर्जा मिळाला. ब्राह्मण, क्षत्रिय यांच्या मांडीला मांडी लावून कायदेमंडळात बसण्याची, त्यांच्याबरोबर विचारविनिमय करण्याची संधी ही केवळ ईश्वरी कृपा नव्हे काय? हे सारे मिळवून घेण्याला मी फक्त निमित्तमात्र झालो आहे, असे मला वाटते. दुसरी गोष्ट, श्री. भाऊराव गायकवाडासारख्यांचे साहाय्य मिळाले नसते, तर एकटी परमेश्वरी कृपाही काही करू शकली नसती. आज जनतेकडून माझ्या कामगिरीबद्दल जे मला धन्यवाद मिळत

आहेत, त्यापैकी शेकडा ८० टक्के भाग श्री. गायवाड यांचा आहे, हे येथे नमूद करावयाला मला मुळीच दिक्कत वाटत नाही. असा या सर्वतोपरी लायक पुढाऱ्याचा आज जो येथे मानपत्र देऊन सन्मान करण्यात येत आहे, तो माझ्यादृष्टीने योग्य व अपूर्व असा आहे.

आता याप्रसंगी आपल्या चळवलीसंबंधी दोन गोष्टी सांगण्यास काही हरकत नाही. या हिंदुस्थान देशात राष्ट्रीय काँग्रेस ही मोठी प्रबळ संस्था मानण्यात येते. असे असूनही मी स्वतंत्र मजूर पक्षाचा सवतासुभा का निर्माण केला? याचे कारण एकच की, काँग्रेसमध्ये ज्या भांडवलदार वर्गाचा अधिक भरणा आहे, आपले ते हित करावयाचे सोडून गोरगरीब, कामगार व शेतकरी वर्गाचे खरे हित कधीही करणार नाहीत. तसेच दुसरा एक पक्ष कामगार वर्गात निर्माण झालेला आहे. या लाल बावट्याच्या चळवळीने श्रमजीवी वर्गाचे आजच्या परिस्थितीत हित होईल किंवा नाही, याची मला शंका वाटते आणि म्हणून या नवीन स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना आपणाला करावी लागली आहे. आपल्या पक्षाच्या वतीने गेल्या मुंबई प्रांतिक असेंब्लीच्या निवडणुकीत, नाशिक जिल्ह्यातर्फे श्री. भाऊराव गायकवाड यांची आपल्या पक्षातर्फे उमेदवार म्हणून निवड केली होती; आणि काँग्रेसबरोबर सामना दिला. या निवडणुकीचा जेव्हा निकाल लागला तेव्हा काँग्रेस पक्षाचा उमेदवार पहिला येऊन त्याला १६९०० मते तर श्री. भाऊरावांना १६६५० मते पडली. अवघ्या २५० मताचे अंतर या उभय उमेदवारांत पडले खरे! पण माझ्यामते हा हिशेब चुकीचा आहे. कारण आमच्यातील एक इसम आयत्यावेळी विरुद्ध उठला. त्याचे नाव घेणेही याप्रसंगी योग्य वाटत नाही. त्याला ४ हजार मते पडली ही मते विभागली गेली नसती, तर श्री. भाऊराव गायकवाडांनी काँग्रेसच्या उमेदवाराला ३७५० मतांनी मारला असता. यावरून श्री. भाऊरावांची लायकी किती आहे याची सहज खात्री पटेल. मला सांगावयास आनंद वाटतो, की, कायदेमंडळात निवडून आलेली सर्व माणसे लायक आहेत; आणि ज्या माणसाविषयी कायदे कौन्सिलमध्ये लोकांना आदर वाटतो; त्यापैकी श्री. भाऊराव हे एक आहेत.

आपण स्थापन केलेल्या स्वतंत्र मजूर पक्षाचे हरेक स्त्री-पुरुषाने सभासद झाले पाहिजे. मी आपणास आव्हान देऊन सांगतो की, मी या सर्व राजकारणाच्या बाबतीत चांगला अभ्यास केला आहे आणि या अभ्यासानुसार स्वतंत्र मजूर पक्षाचा कार्यक्रम आखला आहे. ज्यांना या कार्यक्रमाविषयी शंका वाटत असेल त्याने माझ्याकडे यावे त्यांची संशयनिवृत्ती मी करीन; परंतु असे न करता लोकांची दिशाभूल करणारा मनुष्य खास लुच्चाच असला पाहिजे. असो! काँग्रेस ही विश्वमित्राची माया आहे. मायेविषयी मुक्तेश्वराने जे वर्णन केले आहे, त्यात मुंगूस-सापाची मैत्री होती; उंदीर-मांजरीचे दूध पीत आहे! सिंह व हत्ती बंधूप्रेमाने राहात होते वगैरे गोष्टी आहेत. या गोष्टी सत्यसृष्टीत किंवा व्यवहारात कितपत पटतील? तीच काँग्रेसची गोष्ट आहे. समाजाची अशी घटना झाली पाहिजे की तिचे प्रमुख पुढारी निघून गेले-दिवंगत झाले तरी समाजकार्य अव्याहत चालून ते चिरकाल टिकले पाहिजे; आणि अशाच प्रकारच्या कार्याची योजना झाली तरच तो पक्ष किंवा समाज जगात वैभवशाली ठरेल.

***२० नोव्हेंबर १९३७ - श्री. भाऊराव गायकवाड यांना मानपत्र देण्याच्या समारंभाच्या प्रसंगी वडाळा, मुंबई, येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी केलेले भाषण.***

*जनता २७.११.१९३७*

# मुंबई इलाखा वतनदार, महार, मांग वेठिया परिषद स्वागताध्यक्षीय भाषण

**भाऊराव कृष्णाराव गायकवाड**

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर व इतर बंधू भगिनींनो!

आजच्या वतनदार परिषदेसाठी आमच्या निमंत्रणास मान देऊन आपण दूरदूरच्या जिल्ह्यांतून व गावाहून येऊन आपला अमूल्य वेळ व पैसा खर्चून व आपल्या संसारिक अडचणी दूर सारून येथे आला; याबद्दल येथील स्वागतमंडळातर्फे व स्थानिक मंडळीतर्फे आपले ज्या तऱ्हेने स्वागत व्हावयास हवे तसे आम्हास करता न आल्याने वाईट वाटून आपल्या स्वागतांत पडणाऱ्या उणीवेबद्दल आपण आम्हास आपल्या स्वागतात पडणाऱ्या उणीवेबद्दल आपण आम्हास माफ कराल, असा दृढ भरंवसा आहे.

आजची ही परिषद का बोलवावी लागली, यांचे थोडक्यात विवेचन आपणास पाठविलेल्या निमंत्रणांत केले असल्याने आपणांस हि त्याची कल्पना आली असेलच.

**वतनदार**

अस्पृश्य मानलेल्या वर्गातील बहुसंख्यांख असा वर्ग स्वत:ला वतनदार म्हणून म्हणवीत आहे. त्या वतनाची हालत काय आहे. हे फारच थोडे लोक जाणतात. या वतनाच्या फंदांत गुरफटलेल्यांची सर्व तऱ्हेने कशी अवनती झाली आहे, हे उदाहरणे न देताही सहज समजण्यासारखे आहे. ज्या वतनाचा आपण कल्पनेबाहेर अभिमान बाळगता ते वतन काय आहे, त्यांत अडचणी काय आहेत, काय केले असता त्या अडचणी दूर होतील व आपली उन्नती करण्यास त्यायोगे मदत होईल, याचा आजवर व्हावा तसा विचारच अजून झाला नाहीं. याच बाबीचा विचार करण्यासाठी मुंबईस पाच-सहा वर्षांपूर्वी एक वतनदार महार परिषद होऊ शकली नाही. तथापि अस्पृश्य मानलेल्या वर्गातील बहुसंख्यांक लोकांच्या जीवनाशीं निगडीत असलेल्या या वतनाचा आपण सर्वांनी एकत्र जमून विचार करावयास हवा आहे, आणि म्हणूनच आजची ही परिषद बोलवावी लागली आहे.

**वतन बिल**

आपलें एकमेव परमपूज्य पुढारी व आजच्या सभेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर

यांनी इ. स. १९२८ साली मुंबई कायदेमंडळांत महार वतन दुरुस्ती बिल मांडले असता त्या वेळी त्यांनी जागोजाग सभा भरवून व वर्तमानपत्राद्वारे या वतनाचा पोकळपणा आपल्या निदर्शनास आणला असल्याने त्या गोष्टींचा पुनरुच्चार करून आपला अमोल वेळ घेऊ इच्छित नाही. तथापी या वतनात अलीकडे उद्भवलेल्या अडचणी व खाचखळगे आपल्यापुढे मांडून त्याबाबत विचार करा, असे मला आपणांस नम्रभावे सुचवावयाचे आहे.

**पोकळ अभिमान**

वतनदार घराण्यांतील दरेक माणसास आपल्या वतनाबद्दल अभिमान वाटत असतो. महार, मांग, वेठिया वगैरे वतनदाराखेरीज इतरही अनेक जातींत वतनदार आहेत. परंतु त्यांच्या वतनाशी महार, मांग, वेठिया यांच्या वतनाची तुलना केल्यास, त्यांत जमीन अस्मानाइतके अंतर दिसेल. एकीकडे इतर वतनदार आपल्या वतनाच्या जिवावर मानसन्मानाचे व खाऊन पिऊन सुखी असे जीवन कंठतात; तर त्याच्या उलट अपमानाने गडगंज भरलेले व सदा दारिद्र्याच्या खोलखोल गर्तेत आम्हास लोळण्यास लावीत असलेले आमचे हे वतन दुसरीकडे; आपल्या त्या वतनाची यापेक्षा दुसरी काय थोरवी वर्णावी?

**प्रमाणिकपणास तोड नाही**

या वतनाकरिता आपण भोगीत असलेले कष्ट, सोशीत असलेल्या आपदा व जगाच्या इतिहासांत तोड न मिळणारा असा आपण दाखवीत असलेला प्रामाणिकपणा ही अवर्णनीय आहेत. आज दरेक गांवचा वतनदार महार अगर मांग अगर वेठिया म्हणाल, तर कोणते दृश्य आपल्या दृष्टीसमोर उभें राहतें? हातांत काठी व अनवाणी भटकणारा माणूस पाहिला की, हा वतनदार बच्चा असावा अशी कोणासही सहज कल्पना येते. सर्वस्वीं वतनावर अवलंबून असलेल्या वतनदार महार मांग व वेठिया यांचे हे वर्णन आहे. त्यांची वस्ती जर पाहाल तर गांवाच्या पूर्व बाजूस अगर गैरसोईच्या ठिकाणी अशी सर्वसाधारणपणे असायची. घरातला संसार म्हटला म्हणजे थोडी गाडगी-मडकी व सकाळी जेवला तर संध्याकाळी मिळेल कीं नाही. याची पंचाईत. अशा कठीणावस्थेत दिवस कंठीत असताही हजारो रुपयांचा सरकारी वसूल बिनबोभाट सरकारी तिजोरीत नेऊन भरणारा महार, मांग, वेठिया यांच्या प्रमाणिकपणास जगाच्या इतिहासांत तोड मिळणार नाही. हे सर्व काम करताना -

**मी सरकारी नौकर आहे**

असा अभिमान हा गरीब बापडा बाळगीत असतो. स्वत:ला कधी वतनदार तर कधी सरकारी नौकर म्हणून घेऊन हा स्वत:चे समाधान मानीत असतो. परंतु मला त्याबाबत असा प्रश्न करावयाचा आहे की, जगाच्या पाठीवर वतनदार महार, मांग अगर वेठिया यांच्याइतका कंगाल, सर्वांनी लाथेखालीं तुडविलेला असा इतर जातीतील एकतरी वतनदार सांपडेल काय? सांपडणार नसल्यास का नाही याचा कधी आपण विचार केला आहे काय? दुसरे असे की, आपण स्वत:ला सरकारी नौकर म्हणून म्हणवितो व सरकारही आपणास खालच्या दर्जाचे नोकर म्हणाविते, या बाबतही मला असा प्रश्न विचारावयाचा आहे की, सरकारी

झाडून सारे नोकर घेतले तर गावकामगार महार, मांग वेठिया यांच्यापेक्षां निकृष्टावस्थेत असलेला व सर्व तऱ्हेने गांजलेला असा एकतरी सरकारी नोकर सापडेल काय? जर तसा सांपडणार नसेल तर या नोकरीची इतकी मातब्बरी कां? ज्या सरकारची आपण आजवर इमानेइतबारे नोकरी केली त्यांनी आपणास,

"माझी म्हणून रहा।
व भीक मागून खा"

या म्हणीपेक्षा वेगळ्या तऱ्हेने मुळीच वागविले नाही. या सर्व गोष्टींचा आपण विचार करावयास हवा आहे.

वर वर्णन केलेल्या परिस्थितीत जीवन कंठीत असलेल्या वतनदार महार, मांग, वेठिया वगैरे लोकांचे नष्टचर्य संपले नसल्यामुळेच की काय, सरकारनी अशा असाह्य स्थितीत त्यांना अधिक पिळण्याचा क्रम सुरू केला.

**गांवकामगारांची वतन रजिस्टरी नोंद**

आजवर दरेक गावच्या वतन रजिस्टरी गांवच्या सर्व प्रमुख असलेल्या महार लोकांची नोंद असे. ही संख्या काही गावांत चार तर काही गावात आठ तर काही गावात बारा तर काही सोळा तर कांही गावांत बत्तीस अगर त्याहूनही अधिक नोंदलेली दिसेल. वतन रजिस्टरी गावकामगार महार म्हणून जरी ही मोठी संख्या नोंदलेली असली, तरी नेहमी कामाच्या गरजेप्रमाणे कित्येक गावी एक, तर कित्येक गांवी दोन तर कित्येक गांवी जास्तीत जास्त चार महारच नेहमी सर्व सरकारी कामे करीत. मात्र वरिष्ठ अधिकारी फिरतीवर आले म्हणजे वतन रजिस्टरी नोंद असलेले व नसलेले असे सर्व महार हजर राहून काम करीत.

**पालटलेला मनू**

परंतु डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी निद्राधीन असलेल्या अस्पृश्य मानलेल्या समाजात नवचैतन्य व अवर्णनीय अशी जागृती, अत्यंत अल्प काळात निर्माण करून, जागोजाग माणुसकीसाठी लढे निर्माण केले. महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह, नाशिकचा काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह, रामकुंड सत्याग्रह, मुखेडची सार्वजनिक रस्त्याची मिरवणूक व जागोजाग सार्वजनिक विहिरींवर समानतेने पाणी भरण्याचे लढे, वगैरे चळवळींनी स्पृश्य मानलेल्या समाजाचे पित्त खवळले. ज्या ज्या भागांत या चळवळी झाल्या त्या त्या भागातील अस्पृश्य मानलेल्या जनेतत त्यांनी **दे माय धरणी ठाय** अशी स्थिती या समाजाची केली असतांही तो डगमगत नाही; असे पहातांच सरकारी नोकरीत असलेल्या कारस्थानी स्पृश्यवर्गीय लोकांनी या गरीब लोकांना सरकारी कायद्याच्या कचाट्यात पकडून छळण्यास सुरुवात केली. ज्या गांवच्या वतन रजिस्टरी जितके महार नोंदले असतील, त्या सर्वांनी सकाळपासून संध्याकाळपर्यंत गावच्या चावडीवर बसावे म्हणून बजावले जाऊन, जर का त्यात एखाद्याकडून हजर रहाण्यांत कसूर झाली की वरिष्ठाकडे रिपोर्ट. सरकारी अधिकारी गांवी आले असतां गांवकामगार महारांना पाठव घोड्याला घास आणण्यास, अगर जा आण खातेदाराला बोलावून, अशी कामे पाटील तलाठ्यांनी सांगून, शेवटी महारांवर चरफडत असलेल्या

पाटील तलाठ्यांनी अधिकाऱ्यांचे कान, महारांविरुद्ध चहाड्या सांगून भरवावेत "रावसाहेब येथील महार फारच मगरूर आहेत. गावातील सरकारी काम कधीच करीत नाहीत. आजसुद्धा तुम्ही येणार हे त्यांना कळविले असताही ते आज येथे आले नाहीत." वगैरे वगैरे. रावसाहेब बनलेल्यास एवढे पुरे. त्यांनी लगेच तालुक्याचे ठिकाणी जाताच महारांना दंड केला असल्याचा हुकूम गावी पाठवावा. दारिद्र्याच्या पंकांत पडलेल्या महारांकडून त्यांची मडकी-गाडगी अगर मोट्या कष्टाने कच्चाबच्चांना खाऊ घालण्यासाठी जमा करून ठेवलेला चंदा लिलावानें विकून दंड वसूल करण्याची वेळ वाट पाहत बसलेले पाटील तलाठी, चुकवीत नाहीत.

अशा शेकडो महारांनी सरकारी कामे केली नाहीत म्हणून हजारो रुपये दंड गेल्या १० वर्षांच्या अमदानीत सरकारने केला. नाशिक जिल्ह्यात तर विल्होळी, त्रिंबक वगैरे गांवची महारवतने खालसा करून त्यांच्या इनाम जमिनी काही वर्षे दुसऱ्यास दिल्या. याबाबत प्रत्यक्ष चौकशी करतां त्रिंबकच्या कामगार महारांकडून असे कळले कीं, ज्यावेळी नाशिक प्रांतसाहेब गांवी आले त्यावेळीं महारांनी सर्व तऱ्हेने त्यांची सरबराई केली. त्यामुळे प्रांतसाहेबांनी संतुष्ट होऊन त्या महारांस चांगले काम केल्याबद्दल रु. २ बक्षीस दिले. असे असताही प्रांतसाहेब महारांचे वतन खालसा करतांना म्हणतात की, ज्यावेळी त्रिंबकगांवी भेट दिली त्यावेळीं एकही महार तेथे हजर नव्हता. तेथील महार सरकारी कामे करीत नाहीत. म्हणून त्यांची इनाम जमीन खालसा केली आहे. परंतु प्रांताचा मुक्काम त्रिंबकास असता महारांनी त्यांच्याकरिता केलेल्या कामाबद्दल त्यांनी रु. २ बक्षीस दिले असूनही महार तेथें हजरच नव्हता असे का म्हणता, म्हणून प्रांतसाहेबास विचारता त्यांनी सांगितले की, ज्याला रु. २ मी बक्षीस दिले तो महार नव्हता, असें पाटील तलाठी वगैरे लोक म्हणत होते. मला महार कोण हे कसे समजणार? परंतु ज्या महारास रु. २ बक्षीस दिले होते त्यांसच समक्ष प्रांतसाहेबांपुढे उभे करतांच त्यांचा भ्रमनिरास झाला व खेद प्रदर्शित करून दुसऱ्या वर्षापासून खालसा केलेलं वतन महारास परत दिले. असल्या तऱ्हेच्या चुका गांवकामगार महारांच्या बाबतीत सरकारी अधिकाऱ्यांकडून वारंवार होत असतात.

### वाढणारी जादा जुडी

वर वर्णन केलेला छळ अपुरा वाटूनच कीं काय, सरकारी अधिकाऱ्यांनी दरिद्री असलेल्या वतनदार महारांच्या इनाम जमिनींवर जादा पट्टी ऊर्फ जुडी वाढविण्याचा उपक्रम सुरू केला. ज्या सरकारी म्हणून गणल्या गेलेल्या गांवकामगार महारांचा चरितार्थ सरकारी वतन म्हणून असलेल्या इनाम जमिनीच्या व इतर उत्पन्नावर धड होईना, म्हणून दररोज गावात कुटके मागून जीवन कंठणारा व सर्व शेतसाऱ्याच्या रकमेची तालुक्याच्या ठिकाणीं ने-आण करणारा हा इमानी मनुष्य आपल्या जमिनीस असलेली जुडी पट्टी देण्यासही जेथे नेहमी असमर्थ असतो. अशा या सरकारी पण दरिद्री असलेल्या नोकराच्या इनाम जमिनीवर जादा जुडी वाढविण्याचा सरकारने सपाटा सुरू करावा हे आश्चर्य आहे.

### सरकारी कारवाई

महार इनाम जमिनीवर जादा पट्टी वाढविताना ती निवडक तालुक्यांतील निवडक अशा

दहाबारा गावांवर दरसाल बसविण्यात येऊ लागली. जर सर्व गावांवर जादा पट्टी एकदम वाढविली जाईल तर त्यामुळे लोकक्षोभाचा डोंब उसळेल या भावनेने सरकारनी वरील धोरण आखले असल्याने गेल्या दोन चार वर्षात नाशिक जिल्ह्यातील खालील गावांवर खालीलप्रमाणे जादा पट्टी वाढविली असून त्या गांवच्या वतनदार महारांना अधिक दारिद्र्याच्या खाईत गाडले आहे.

| अ. नं. | गांव | तालुका | वसविलेली जादा जुडी | जुडी वाढविण्याचे कारण | जुडी वाढविल्यामुळे महाराची संख्या कमी केली काय? |
|---|---|---|---|---|---|
| १ | कांचनगांव | इगतपुरी | २०.८-६ | कामगार महारांची संख्या कमी केल्यामुळे. | नाही. |
| २. | कसबे मुकेणे | निफाड | ४८.०-० | ,, | नाही. |
| ३. | ओझर | निफाड | १५४.८-० | ,, | नाही. |
| ४. | सोनेवाडी | निफाड | १२.१५-० | ,, | नाही. |
| ५. | वेसनगांव | निफाड | १७.०-० | ,, | नाही. |
| ६. | पिंपळस | निफाड | ११२.०-० | ,, | नाही. |
| ७. | करंजगांव | निफाड | ८.०-० | ,, | नाही. |
| ८. | खेडलेझुंगे | निफाड | २५.०-० | ,, | नाही. |
| ९. | नांदूरमध्यमेश्वर | निफाड | २१.८-० | ,, | नाही. |
| १०. | वाकेद | निफाड | १६.१२-० | ,, | नाही. |
| ११. | शिरवाडेवाकेद | निफाड | ३२.१०-० | ,, | नाही. |
| १२. | कुरंदगांव | निफाड | २३.८-० | ,, | नाही. |
| १३. | सोकोरा | निफाड | ६३.४-० | ,, | नाही. |
| १४. | रवळस | निफाड | १०.०-० | ,, | नाही. |
| १५. | म्हाळसाकोरे | निफाड | ९८.२-४ | ,, | नाही. |
| १६. | देवळाली | नाशिक | ९४.७-११ | ,, | नाही. |
| १७. | आडगांव | नाशिक | ७७.०-० | ,, | नाही. |
| १८. | कांबटवाडे | नाशिक | ७.१४-० | ,, | नाही. |
| १९. | चाडेगांव | नाशिक | १५.३-० | ,, | नाही. |
| २०. | चेहडी बुदुक | नाशिक | ३१.१५-० | ,, | नाही. |
| २१. | मखमलाबाद | नाशिक | ६६.३-० | ,, | नाही. |
| २२. | म्हसरुळ | नाशिक | ६७.४-० | ,, | नाही. |
| २३. | सामनगांव | नाशिक | १६.१०-६ | ,, | नाही. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २४. | कोटमगाव | नाशिक | २३.०-० | ,, | नाही. |
| २५. | चांदुशी | नाशिक | ४६.१४-० | ,, | नाही. |
| २६. | पळसे | नाशिक | १२.७-६ | ,, | नाही. |
| २७. | लाखलगांव | नाशिक | २९.१-० | ,, | नाही. |
| २८. | शिंदे | नाशिक | २३.१-० | ,, | नाही. |
| २९. | आंबाड बु॥ | नाशिक | ७.७-० | ,, | नाही. |
| ३०. | दुगांव | नाशिक | ७१.७-० | ,, | नाही. |
| ३१. | ब्राह्मणवाडे | नाशिक | १८.०-६ | ,, | नाही. |
| ३२. | नाशिक | नाशिक | १७९.११-० | ,, | नाही. |
| ३३. | लखमापूर | दिंडोरी | ११.९-० | ,, | नाही. |
| ३४. | उंब्राळे बु॥ | दिंडोरी | ६.०-० | ,, | नाही. |
| ३५. | बडणेर | चांदवड | १५६.१-० | ,, | नाही. |
| ३६. | कोल्हापूर | कळवण | ७.४-० | ,, | नाही. |
| ३७. | मुखेड | येवला | २८.१२-० | ,, | नाही. |
| ३८. | उंदीरवाडी | येवला | ११.४-० | ,, | नाही. |
| ३९. | मनमाड | नांदगांव | १५.७-० | ,, | पूर्वी जे टपाल महाराकरवी पाठविले जात होते ते आता पोस्टानें पाठविले जात आहे. |
| दरसाल वरील गांवच्या महारांना द्यावी लागत असलेली वाढलेली जुडी पट्टी. | | रक्कम रु. | १८११.८-३ | ,, | |

त्याचप्रमाणें इनाम जमिनीचे मिळणारे उत्पन्न अल्प असल्यानें दरसाल ठराविक मुशाहिरा (पगार) सरकारातून मिळत होता, तो नाशिक जिल्ह्यातील खालील गावांचा बंद केला आहे.

| अ. नं. | गांव | तालुका | गावकामगार महाराचे बंद केलेले वार्षिक वेतन रु. |
|---|---|---|---|
| १. | करंजगांव | निफाड | १० |
| २. | पिंपळस | निफाड | ५ |
| ३. | म्हाळसाकोरे | निफाड | ६ |
| ४. | रवळस | निफाड | ५ |
| ५. | वसनगांव | निफाड | ७ |
| ६. | नांदूरमध्यमेश्वर | निफाड | ६ |
| ७. | टाकळी विंचूर | निफाड | ७ |
| ८. | देवळाली | नाशिक | १० |
| ९. | भगूर | नाशिक | १० |
| १० | चेहडी | नाशिक | ६ |
| ११. | मखमलाबाद | नाशिक | ८ |
| १२. | म्हसरूळ | नाशिक | ७ |

| | | | |
|---|---|---|---|
| १३. | गंगापूर | नाशिक | ७ |
| १४. | पळसे | नाशिक | ८ |
| १५. | लाखलगांव | नाशिक | ५ |
| १६. | शिंदे | नाशिक | ७ |
| १७. | अंजनेरी | नाशिक | ७ |
| १८. | त्रिंबक | नाशिक | ११-४-८ |
| १९. | उंब्राळेबु।। | दिंडोरी | १०-०-० |
| २०. | बालखेड | दिंडोरी | १५-०-० |
| २१. | वडणेर | चांदवड | १४-०-० |
| २२. | दहिवड | चांदवड | ६-०-० |
| २३. | उंदीरवाडी | येवला | १-८-० |
| | | गांवकामगार महारांचा एकूण दरसालचा बंद केलेला पगार | १७८-१२-८ |

तसेच सार्वजनिक कार्यासाठी महारांच्या इनाम जमिनी सरकारनें कायद्यानें घेतल्या असतां त्या जमिनीबद्दल नुकसान भरपाई सरकारच्या ज्या त्या खात्याकडून आली ती सर्व सरकारनें सरकारी तिजोरींत ठेवली आहे. त्या रकमेवरील फक्त व्याज महारांना दिलें जातें. त्या व्याजापैकीं नाशिक जिल्ह्यांतील खालील गावांना मिळत असलेले व्याज सरकारनें देण्याचे बंद करून ती रक्कम सरकारजमा करण्याचा अन्याय चालविला आहे.

| | गांव | सरकार, महारांची जप्त करीत असलेली रक्कम |
|---|---|---|
| १ | देवळाली | २२-०-० |
| २ | भगूर | १७५-०-० |
| | **एकूण रुपये** | **१९७-०-०** |

तेव्हां एकट्या नाशिक जिल्ह्यांतील वतनदार महारांची पिळणूक करून दरसाल खालील रक्कम सरकार आपल्या तिजोरींत आज कोंबीत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| रक्कम | रुपये | १८९१-८-३ | वाढलेल्या जुडी पट्टी द्वारे. |
| ” | ” | १७८-२-८ | मिळणारा वार्षिक पगार बंद करून. |
| ” | ” | १९७-०-० | इनाम जमिनीच्या रकमेवरील |
| **एकूण रु.** | | **२२६७-४.११** | व्याज सरकारजमा करून. |

एकूण एकट्या नाशिक जिल्ह्यांतील ४० गावांच्या वतनदार महारांना पिळून सरकार दरसाल एकंदर रक्कम रुपये २.६७-४-११ जादा भुर्दंड महारांना भरण्यास भाग पाडीत आहे. गांवकामगार महार हे मूळचेच कंगाल असून अंगास अंगभर वस्त्र नाहीं तर पोटास दोनवेळा जेमतेम मिळण्याची मारामार. गावांत तुकडे मागून आपल्या आयुष्याचे कष्टतर दिवस कंठणाऱ्या गोरगरीब व प्रामाणिक असलेल्या महारांची पिळणूक व गांजणूक करून सरकारनीं आपली तुंबडी भरण्याचा आखलेला हा नवा उपक्रम.

**जुलमी व अन्यायी**
नाही असे कोण म्हणेल? नाशिक जिल्ह्याखेरीज इतरही जिल्ह्यात हा जुलूम चालू आहे. महारांच्या कुटुंबांतील हिंडू फिरू लागलेल्या पोरांपासून तो म्हाताऱ्यांपर्यंत सर्वांनी कष्ट करकर करावे, तरी पोटास धड मिळण्याची मारामार असलेल्या लोकांचे रक्तशोषण करून त्यांना हालहाल करून मारण्याचा सरकारचा हा प्रयत्न नाही का?

**जुलमाचा प्रतिकार करा**
या जुलूमाचा प्रतिकार आम्ही शक्य त्या तऱ्हेने केलाच पाहिजे. कारण एक म्हण आहे कीं, The last straw breaks the camels back ओझे वाहाणाऱ्या उंटासारख्या प्राण्यावरसुद्धा जितके ओझे ठेवावयास हवे त्यापेक्षा एक गवताची काडीसुद्धा त्याचे कंबरडें मोडू शकते. त्याचप्रमाणे आम्हा वतनदारांचे आर्थिकदृष्ट्या उत्पन्न वाढवून अंगभर वस्त्र वं पोटभर अन्न मिळेल यासाठीं आम्ही मागणी करीत असतां सरकारने आमच्या वतनावर जादा पट्टी वाढविण्याचा उपक्रम सुरु करून आमचे कंबरडे मोडण्याचा घाट घातलेला दिसतो. यासाठीं याचा आम्ही वेळीच प्रतिकार केला पाहिजे.

**जुडी का वाढविली जात आहे**
जुडी वाढविण्याची खालील कारणे सरकारकडून दिली जातात.
(१) कामगार महारांची संख्या कमी केल्यामुळें जुडी वाढविली जात आहे.
(२) ज्या ठिकाणी महार इनाम जमीन वाजवीपेक्षा अधीक आहे त्या ठिकाणी जुडी वाढविली जात आहे.
आता आपण सरकार देत असलेले पहिले कारण पहा. 'कामगार महारांची संख्या कमी केल्यामुळें जुडी वाढविली जात आहे!' आपणास माहीत आहे की दरेक गावचे महार, मांग वेठिया वगैरे लोक आपली नावे वतन रजिस्टरी नमूद करण्यांत भूषण मानीत. त्यामुळें कोठे आठ तर कोठे बारा, तर कोठे सोळा तर कोठें बत्तीस अशी संख्या वतन रजिस्टरी नमूद असें. परंतु हे सर्वच लोक सरकारीकामे करीत असे नसून त्यांच्यापैकी फक्त कामाच्या गरजेप्रमाणे कोठे एक तर कोठे दोन तर कोठे चार असे पाळीपाळीने कामासाठी महार दिले जात. ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. परंतु, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे नेतृत्वाखाली खडबडून जागा झालेला हा समाज समानतेचे लढे लढतो; त्याची कंबरमोड करण्याच्या इराद्यानें काढलेली ही क्लृप्ती आहे. जितके महार सरकारी काम नेहमी करीत, तितकेच महार नेमण्याच्या नावाखाली व जे कामास नव्हतेच त्यांना कमांतून मोकळे केल्याच्या सबबीखाली हा बनाव सरकार घडवून आणीत आहे. तेव्हा ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली आहे की, सरकारनी जुडी वाढविलेल्या गांवी कामगार महारांची संख्या मुळीच कमी केली नसून, जितके महार पूर्वी सरकारी काम करीत तितकेच आज करीत आहेत. दुसरे असें कीं,

**कामे कमी केली काय?**
सरकारकडून असें सांगण्यात येते की, सरकारने दयाळू होऊन कामगार महारांची संख्या

कमी करून, कमी केलेल्या महारांना स्वतंत्र धंदा करण्यास मोकळे केलें आहे; व त्याबद्दल त्यांच्या इनाम जमिनीवर मामुली जुडी वाढविली आहे. यावर आमचे असे म्हणणे आहे कीं, सरकार म्हणतें त्याप्रमाणे घटकाभर आपण मानूं की ज्या गांवी कामगार महारांची मोठी संख्या वतन रजिस्टरी असून ते सर्व काम करीत होते. त्यांच्यापैकी पुष्कळांना आता नोकरीतून मुक्त केले आहे. म्हणजेच जेथें ८ अगर १२ अगर १६ अगर ३२ असें गांवकामगार महार असतील तेथे १ अगर २ अगर ४ असे महार, सरकार सध्या नेमते व त्यामुळें महार इनाम जमिनीवर जुडी वाढविते. तर आता असा प्रश्न उद्भवतो की, ज्या वेळी गांवकामगार महारांची मोठी संख्या, सरकार म्हणते त्याप्रमाणें कामास होती त्या वेळी जे सरकारी काम ते करीत त्या कामापैकी महारांची संख्या कमी करण्यानें त्यांची किती कामे कमी केली आहेत? त्यावर सांगण्यांत येते की एकही काम कमी केलेलें नाही. तर मग जी कामे कामगार महारांच्या मोठ्या संख्येकडून पूर्वी करवून घेतली जात, तीच जर लहान संख्येकडून म्हणजेच थोड्या लोकांकडून करवून घ्यावयाची असतील तर त्या नेमलेल्या थोड्या कामगारमहारांवर कामाचा जादा बोजा पडणार नाहीं काय? थोड्या महारांवर कामाचा जादा बोजा पडणार असल्यास त्यांना सरकार जादा पगार अगर वेतन देते काय? या प्रश्नांची सरकारी उत्तरे अशी की, 'नेमलेल्या थोड्या महारांवर कामाचा जादा बोजा पडेल व त्याचा मोबदला सरकार त्यांना कांही जादा वेतन देत नाहीं.'' हे जर खरे तर सरकारचा, हा गरीब कामगारमहारांवर धडधडीत जुलूमच नाहीं काय? जे सरकार मोठ्या उजळ माथ्याने सांगते की, कामगार महारांची संख्या कमी केल्यामुळें जादा जुडी वाढविली आहे, त्या सरकारास असे विचारावयास हवे की ज्या नेमलेल्या थोड्या कामगार महारांवर कामाचा जादा बोजा पडत आहे, त्यांना जादा वेतन का देण्यात येत नाही? या प्रश्नास सरकार जवळ उत्तर नाही. म्हणजेच आमचे म्हणणे असे की, सरकारला गांवकामगार महारांच्या इनाम जमिनीवर कामगारमहारांची संख्या कमी करण्याच्या ढोंगाखाली जादा जुडी मुळी वाढविताच येत नाही.

दुसरे कारण सरकारकडून सांगितले जाते की, ज्या गांवी महारांना वाजवीपेक्षा अधिक इनाम जमीन आहे, त्या गांवीच इनाम जमिनीवर जादा जुडी वाढविली जात आहे. त्या दृष्टीनें विचार करता महारांच्या इनाम जमिनी ह्या ज्या त्या गांवच्या सर्व महारांत त्यांच्या आणेवारी प्रमाणे सुरवातीपासून विभागल्या गेल्या आहेत. या विभागलेल्या जमिनींवर आज एकही महार कुटुंब सुखाने कालक्रमण करिताना दिसावयाचे नाही. उलट जो या वतनावर अवलंबून बसतो, तोच सर्वात कंगाल असतो अशी स्थिती आज आहे. अशा स्थितीत इनाम जमीन अधिक उत्पन्नाची असल्याने त्यांवर जादा पट्टी वाढविण्याचे जे कारण सरकार सांगते, ते गैरसमज पसरविणारे व खोटे आहे.

**वाढलेल्या जुडीमुळें महारांचे हाल**

ज्या ज्या गांवच्या महार इनाम जमिनीवर जादा जुडी वाढली आहे ती देता देता महारांचे कसे व किती हाल होतात याची कल्पना केलेलीच बरी. ज्या लोकांना असलेली जुडी पट्टी देता देता नाकी नऊ येतात, त्यांनी वाढलेली जुडी पट्टी कशी द्यावी? नांदूरमध्यमेश्वर ता. निफाड जि. नाशिक या गांवच्या २६ महारांवर जप्तीची वारंटे काढून त्या इनाम

जमिनीवर वाढलेली जादापट्टी रक्कम रुपये २१६-८-० त्यांची मडकी-गाडकी व भांडीकुंडी जप्त करून ती जाहीर लिलावानें विकून त्यांना अन्नाला मोताद करून वसूल केली आहे. अशाच तऱ्हेने वाढलेली जुडी दरेक गावांतून वसूल केली जात आहे. सरकारच्या या कृत्यांचा संताप न येणारा मनुष्य विरळा!

**माजी ना. खेरांकडे तक्रार**

या विषयीं माजी ना. खेराकडे पत्राने तक्रार केली असता त्यांच्या डे. सेक्रेटरी टु दी गव्हर्नरमेंट रेव्हन्यू डिपार्टमेंट, मुंबई यांचेकडून नं. L.A. २६ इ ता. ११-११-१९३८ अन्वये उत्तर आले आहे की, 'सरकार महारांच्या हिताकरितांच हें सर्व करीत आहे. इतकेच नव्हे, तर एका गांवकामगार महारांस रु. १० ते २० पर्यंत शेतसारा पडेल एवढीच जमीन सरकारी कामासाठी त्यांजकडे ठेवून बाकी जमिनीवर पूर्ण आकार बसविला जाईल.' म्हणजेच सरकार आपली सर्व कामे महारांकडून पूर्ववत करवून घेऊन शिवाय ही जादा जुडीही महारांकडून वसूल करीत आहे.

यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, आज सरकारने ज्या काही थोड्या गांवच्या इनाम जमिनीवर जादा जुडी वाढविली आहे. तेवढ्याने झाले असें नाही. त्याची झळ दरेक गावास आज ना उद्या कमी अधिक प्रमाणांत लागणार आहे. यावरून ज्या गावांवर या भस्मासुराचा हात पडला नसेल, ती गावें जर म्हणतील कीं, 'मला काय त्याचे?' ज्या गावावर जुडी वाढावयाची ती वाढली, आपले गाव त्यांतून शिरसलामत सुटले अशी जर कोणी भोळी भाबडी समज करील तर तो गैरसमज ठरेल. कारण सरकार ही जुडीपट्टी एकदम एकाच वर्षांत सर्व गावांतील महार इनाम जमिनीवर वाढविणार नसून, दरवर्षी दहाबारा गांवे पसंत करून त्यांच्यावर ही जादा जुडी वाढवीत आहे. त्यामुळे एकदम लोकक्षोभाचा डोंब उसळू नये व आस्ते आस्ते आज एकास तर उद्या दुसऱ्यांस अशा तऱ्हेने शेवटी आपल्या प्रांतातील सर्वच गावांना या वाढणाऱ्या जुडीद्वारें पिळले जाणार आहे. यासाठी वेळीच आपण सर्वांनी आपसांतील किरकोळ मतभेद विसरून या भस्मानुरास गाडण्याचा प्रयत्न वेळींच करावयास हवा आहे. ही चळवळ, स्वत:ची होत असलेली नागवणूक थांबवा म्हणून सांगणारी असून आमचे जीवन अधिक कष्टमय व कंगाल करू नका म्हणून सरकारास सुचवीत आहे. मिळणारी मीठ भाकरी खाऊन जगत असता ती आमची हिसकावून अन्नान्न करीत आम्हास मारू नका हे सांगणे, हा दरेक जगू पहाणाऱ्याचा जन्मसिद्ध हक्क आहे. तो आपण आजवर जरी बजावला नसला तरी आता बजावण्याचा दांडगा प्रयत्न केलाच पाहिजे. या प्रकरणीं सनदशीर म्हणून ज्याला म्हणतात, अशा सनदशीर मार्गानें खूप प्रयत्न झाला आहे. सरकारकडे अर्ज विनंत्या झाल्या. आपल्या लोकांचें हिताहित पहाणेंसाठीं 'सरकारनें' नेमलेल्या बॅकवर्ड क्लास बोर्डात ठराव पास करून सरकारास विनविलें. परंतु या बाबतीत स्वकीय म्हणून मिरविणाऱ्या सरकारनेही परकीय सरकारचीच 'री' ओढण्यापलीकडे काही केले नाही. शेवटी ही बाब सर्वांनी एकत्रित जमून विचार करण्यासारखी महत्त्वाची असल्याने या प्रसंगीं आपण विचार करावा अशी नम्र विनंती आहे.

**महारांनीं करावयाची कामे**

महारांनीं करावयाची सरकारी कामे आजवर कोठेच नमूद केली नसल्याने महारांनीं जरी सर्व सरकारी कामे केली तरी स्पृश्य गांवकरी व महार यांच्यात वाकडे आल्यास उठल्या सुटल्या पाटील तलाठ्यांनी महाराविरूद्ध रिपोर्ट करून व वरिष्ठांच्या कानाशीं लागून, त्यांचे कान भरवून त्यांच्याकडून महारांना दंड करविण्याचा दंडक गेल्या कांहीं वर्षांपासून सर्वत्र आचरला जात आहे. यासाठीं आम्ही इ. स. १९३४ साली सरकारकडे तक्रार करून असें कळविलें की, गांव कामगार महार सरकारी सर्व कामें करीत असताही पाटील तलाठी वाकड्याच्या पोटीं कामगार महारांविरूद्ध खोटेनाटे आरोप करतात व त्यामुळें महारांस वरिष्ठांकडून अनेक वेळां दंड होत आहे. यासाठीं जसें दरेक सरकारी ऑफिसात मुद्दाम बुक **(Local Dispatch Book)** असते, तसे मुद्दाम बुक दरेक खेडेगावातील कामगार पाटील-तलाठ्यांजवळ देण्यांत यावें व त्यांत कोणते सरकारी काम कोणी केले त्यांचा उल्लेख असूं द्यावा. म्हणजे कोणते सरकारी काम महारांनीं केले नाही, हे सहज कळेल. परंतू त्यांवर सरकारने कळविले कीं, अनेक गावचे पाटील हे आंगठेबहाद्दर असल्या मुद्दाम बुकात त्यांना काही लिहिता यावयाचे नाही, म्हणून सरकारी पत्रक नं. R. D. ८०९२/२८ ता. ९/१/१९३२ अन्वयें विनंती मान्य करता येत नाही. सरकारचे हे उत्तर अत्यंत विस्मयकारक आहे. कारण ज्या पाटलास लिहिता वाचता येत नसेल तर तो कोणताही रिपोर्ट अगर सरकारी काम दुसऱ्या गावी नेण्यास महारांस कसा सांगू शकेल? आणि दुसरे असे की, पाटलाच्या अडाणीपणाबद्दल जर कोणास शिक्षा भोगावी लागत असेल तर ती आम्हा वतनदार महारांना. तेव्हा याबाबत सरकारी धोरण अत्यंत अन्यायाचे आहे. गावकामगार महार सरकारी कामे करीत नाहीत म्हणून कर त्यांना दंड, महारांची संख्या कमी करण्याच्या ढोंगाखाली, लादलेल्या महारांच्या इनाम जमिनीवर जादा जुडी. महारांच्या वतनी जमिनी सार्वजनिक कार्यासाठी घेतल्या असल्यास त्याबद्दल मिळणाऱ्या नुकसान भरपाईच्या रकमेवरील व्याजावर मार डल्ला! सरकारी कामे करीत असताही त्यांना मिळणारे वार्षिक वेतन कर बंद. अशा कृत्यांनी वतनदार महारांवर होत असलेल्या जुलूमांस तोंड फुटावे म्हणून आम्ही मुंबई कायदे मंडळाच्या बैठकीत प्रश्न विचारून मुंबई इलाख्यात किती गावातील इनाम जमिनीवर जादा जुडी सरकारने वाढविली आहे? महार सरकारी काम करीत नसल्याबद्दल कोणास किती दंड झाला आहे? जुडी वाढविण्यास कारणे काय वगैरे बाबत प्रश्न विचारले असता त्या प्रश्नांना माजी ना. मुरारजीनी दिलेल्या उत्तरावर पुढील प्रश्नोत्तरे झाली. ती सर्व ता. १२-१-३८च्या असेंब्ली डिबेटच्या रिपोर्टात छापली आहेत.

प्र. : गावकामगार महारांना नाशिक जिल्ह्यांत झालेला दंड हा नाशिक मंदिर प्रवेश सत्याग्रहाच्या दरम्यान खेड्यापाड्यांतून त्यांच्यावर स्पृश्य मानलेल्या गावकऱ्यांकडून बहिष्कार पुकारला असता गावकामगार महारांनी जन्ममृत्यूची बातमी न दिल्यामुळेच झाला असल्याची बाब सरकारास माहीत आहे काय?

उ. : हीच बाब असल्याचे मला माहीत नाही.

प्र. : ही बाब जर नसेल, तर मग नाशिक जिल्ह्यांतील गावकामगार महारांना इतका दंड का करण्यात आला आहे?

उ. : अनेक सरकारी कामे न केल्याबद्दल दंड करण्यात आला आहे?

प्र. : अशी कोणती सरकारी कामे महारांनी केली नाहीत? त्या कामाचे स्वरूप अगर कल्पना द्याल काय?

उ. : नक्की कोणत्या कामासाठी दंड करण्यात आला. आहे त्याची मी चौकशी केली नाही.

प्र. : ना. मंत्री त्याची चौकशी करतील काय?

उ. : मी या प्रकरणी चौकशी करून महारांची कामे काय हेही ठरवून ती तशी जाहीर करू इच्छितो.

प्र. महारांची संख्या कमी केल्यामुळे त्यांच्या इनाम जमिनीवरील जादा जुडी वाढवली असल्याचे सरकार म्हणते. परंतु महारांनी करावयाच्या कामांपैकी काही कामे कमी केली आहेत काय?

उ. सन्माननीय सभासदांस सांगितले आहे की, मी लवकरच महारांनी कमीत कमी करावयाची कामे जाहीर करणार आहे.

वरील प्रश्नोत्तरे मुंबई कायदेमंडळाच्या कामकाजाच्या रिपोर्टातील पाने नं. १५३, १५४ व १५५ वर आपणांस आढळतील. वरील प्रश्न विचारण्याचा मुख्य हेतू एवढाच की, गावकामगार महारांनी जरी सर्व सरकारी कामे इमानेइतबारे केली; परंतु जर का त्यांचे व गावच्या स्पृश्य जनतेचे कोणत्याही कारणाने वाकडे आले; तर स्पृश्य गांवकरी, पाटील तलाठ्याकरवी खोटेनाटे रिपोर्ट करून महारांना दंड करवितात, ही बाब सरकारच्या व जनतेच्या निदर्शनांस आणावयाची होती.

**''महारांच्या १९ कामांचा जन्म''**

ना. मुरारजीनी वर दिलेल्या उत्तरानुसार सरकारी ठराव नं. ने ७४२०/३३ ता. १३ सप्टेंबर १९३८ चा अन्वयें गावकामगार लोकांची कर्तव्ये नमूद करणारा, जन्मास घातला. सदर ठराव प्रसिद्ध झाल्याबरोबर बॅकवर्ड क्लास बोर्डाच्या ता. २९/१०/३८च्या सभेत आम्ही खालील ठराव मांडला.

सरकारी ठराव नं. ७४२०/३३ ता. १३/९/३८ अन्वये गाव कामगार महारांची जी कामे सरकारने निश्चित केली आहेत, त्यात अनेक अव्यवहार्य कामे असल्याने ती कमी करावीत, असे हे बोर्ड, सरकारास शिफारस करते.

वरील ठराव बॅकवर्ड क्लास बोर्डावर चर्चेस आला असता ना. खेर, अध्यक्ष बॅकवर्ड क्लास बोर्ड यांनी सदर सभेत असा खुलासा केला की, 'सरकारने प्रसिद्ध केलेला ठराव अजून गावकामगार लोकांना कळविलासुद्धा नाही. तो लवकरच कळविला जाईल. तो तसा कळविल्यानंतर मग गावकामगार महारांकडून तशा तक्रारी आल्यास आपण या विषयाचा विचार करू.' वरील खुलाशामुळे आमचा ठराव तहकूब राहिला. सरकारी ठराव छापून प्रसिद्ध होण्यास काही अवधी लागणार आहे. त्यामुळे ज्यांच्या जिव्हाळ्याच्या वतनाच्या कामाचा सरकारनी केलेला ठराव त्यांना कळविणे हे आमदार या दृष्टीने आमचे कर्तव्य होते. त्याप्रमाणे आम्ही सदर कामांची यादी प्रसिद्ध करून लोकांत त्याचा प्रसार केला. ते करताना

स्पष्ट म्हटले होते की, सरकारने सरकारी ठरावाद्वारे प्रसिद्ध केलेल्या कामात अनेक फालतू कामांचा समावेश झाला आहे. असे असतानाही स्वतंत्र मजूरपक्षाचे वावडे असलेल्या काही मूठभर वावदुकांनी त्या प्रकर्णी कोल्हेकुई करण्यास सुरवात केली. हे सर्व करण्यापूर्वी त्यांची अशी समज झाली असावी की, आपण आता काँग्रेसच्या जांघेत शिरलो असल्याने आपण म्हणू ती पूर्व दिशा काँग्रेस मंत्रीमंडळ करील; व मग स्वतंत्र मजूर पक्षावर प्रचंड विजय मिळविल्याची शेखी सबंध प्रांतभर मारू; व सवंग वाटत असलेली लोकप्रीती संपादू; परंतु प्रत्यक्ष अनुभव वेगळाच आल्याने अलीकडे तर या प्रकणी तोंडास कुलपें ठोकण्यापलीकडे त्यांना मार्गच राहिलेला दिसत नाही.

टीकाकारांचा पहिला मुद्दा असा की, "आपण आजवर जी काही कामे करीत असू ती निश्चित नसल्याने केली न केली तरी सरकारी अधिकारी काही करीत नसत. परंतु गायकवाडने प्रश्न विचारून खाजवून खरूज निर्माण केली आहे. आता ही सर्व १९ कामे पाटील-तलाठी गावकामगार महारांकडून हक्काने करून घेईल."

या मुद्याबाबत मला एकच बाब आपणा सर्वांच्या नजरेस आणावयाची आहे की, आजवर सरकारी कामे निश्चित नसल्याने ती केली केली न केली तर कोणी काही करीत नव्हते, हे जर खरें असले तर मग शेकडो गावच्या गावकामगार महारांना नाशिक जिल्ह्यांत व इतरत्रही शेकडो रुपये दंड गेल्या १० वर्षात का झाला? २) महार लोकांच्या इनाम जमिनीवर हजारो रुपयांची जादा पट्टी सरकारने अलीकडेच का लादली? ३) महारांना मिळणारे वार्षिक वेतन सरकारने अनेक गावी का बंद केले? ४) आपल्या इनाम जमिनी सार्वजनिक कार्यासाठी घेतल्या असता त्यांच्या रकमेवरील मिळणारे कायदेशीर व्याज सरकारने अनेक गावी देण्याचे का बंद केले? ५) विल्होळी, त्रिंबक ता. नाशिक सारख्या अनेक गावची वतने काही वर्षे तरी सरकारने खालसा का केली होती? अशी एक नाही, शेकडो उदाहरणे सांगता येतील की, सरकारी अधिकाऱ्यांनी हा जोर जुलूम महार सरकारी कामे करीत नाहीत म्हणून आलेल्या तक्रारीवरूनच केला आहे ना? मग पूर्वी सरकारी कामे केली केली न केली तरी सरकारी काही करीत नव्हते, या म्हणण्यात काही अर्थ आहे काय?

टीकाकारांचा दुसरा मुद्दा असा की, "सरकारी ठराव नं. ७४२०/३३ ता. १३ सप्टेंबर १९३८ हा मुंबई कायदेमंडळाच्या बैठकीत चर्चा होऊन पास झाला आहे. या ठरावास स्वतंत्र मजूर पक्षाच्या लोकांनी मान्यता दिली आहे. म्हणजेच १९ कामांची घोरपड या स्वतंत्र मजूरपक्षाच्या लोकांनी आपल्या गळ्यात अडकविली आहे" याबाबत आमच्या टीकाकारांची आम्ही कीव कीव करतो. कारण, खात्याच्या सोईसाठी ज्या त्या खात्याच्या मंत्र्याला आपल्या सेक्रेटरीमार्फत जरूर तो सरकारी ठराव प्रसिद्ध करून जनतेवर लादता येतो; याचे ज्ञान त्यांना नाही. त्या बिचाऱ्यांची अशी अजागळ समज झालेली दिसते की, जे जे सरकारी म्हणून ठराव सरकार प्रसिद्ध करिते ते ते सर्व कायदेमंडळाच्या सल्ल्यानेच करिते, माझे टीकाकार याबाबत इतके अजाण अगर अभोळ असल्यास मला त्यांना काही म्हणावयाचे नाही. परंतु माझ्या अपेक्षेप्रमाणे ते अजाण अगर अभोळ नसल्यास ते करीत असलेला या बाबतचा प्रचार हा खोडसाळपणाचा, अस्पृश्य मानलेल्या समाजाची डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे झेंड्याखाली झालेली संघटना विस्कळीत करण्याचा, नादानपणाचा, आपमतलबी, स्वार्थी व

अनेक अस्पृश्य मानलेल्या स्वाभिमानी बंधूभगिनीस, काँग्रेसच्या दावणीत बांधणेचा प्रयत्न होता. सुदैवाने माजी ना. मुरारजीनी त्यांचा तो डाव लाथाडला हे एका अर्थी बरे झाले. आपणांस या बाबत मला एवढेच कळवावयाचे आहे की, ज्यां एखाद्या गोष्टीस स्वतंत्र मजूर पक्षाच्या सभासदांनी मान्यता दिली असेल त्या गोष्टी विरुद्ध त्यांना बोलता येईल कां? जर महारांनी करावयाच्या १९ कामांच्या ठरावास आम्ही मान्यता दिली असती तर बॅकवर्ड क्लास बोर्डाच्या सभेत त्या विरुद्ध ठराव मांडता आला असता काय? किंवा सरकारी ठरावान्वये प्रसिद्ध झालेल्या कामांत फालतू कामांचा समावेश झाला आहे म्हणून म्हणता आले असते काय? आमचे टीकाकार स्वत:सारखेच इतर सर्वांना बेजबाबदार व निर्बुद्ध समजतात काय? या १९ कामांबाबत आमचे टीकाकारांनी उठवलेली वावटळ उठविण्याअगोदर आम्ही मालेगाव, चांदवड, नांदगांव, सटाणा, कळवण, नाशिक, दिंडोशी वगैरे तालुक्यांच्या भागांत सभा भरवून, या कामांत जी कामे आपणांस अव्यहार्य व त्रासाची वाटतील त्याविरुद्ध कामांचा सरकारी ठराव तुमच्या हातांत सरकारमार्फत पडताच सरकारकडे तक्रारी करा असा प्रचार आम्ही केला आहे. परंतु आम्ही प्रसिद्ध केलेल्या हँडबिलांत महारांनी या कामांच्या विरुद्ध काहूर माजवावे असे स्पष्ट का म्हटले नाही, म्हणून शेवटचा आरोप आमचे टीकाकार आम्हांवर करतात. त्याबाबत मला सांगावयाचे आहे की, जर आम्ही प्रसिद्ध केलेल्या हँडबिलांत तसे स्पष्ट म्हटले असते तर निमित्त शोधून आमच्या सनदशीर मागण्या फेटाळणाऱ्या काँग्रेसच्या निमताळ्या सरकारांस याबाबतची आमची मागणी फेटाळण्यास एक संधी मिळाली असती. इतकेच नव्हे, तर आमच्याच हँडबिलाचा आधार घेऊन आम्ही लोकांच्या बनावट तक्रारी निर्माण केल्या म्हणून आमच्यावरच त्यांनी कुरघोडी करण्यास कमी केले नसते. तेव्हा थोड्या दूरदृष्टीने आम्ही प्रसिद्ध केलेल्या हँडबिलामध्ये वापरलेल्या भाषेचा, राईचा पर्वत करून जो धिंगाणा आमच्या टीकाकारांनी काही काळ घातला; त्याची धूळ काही लोकांच्या डोळ्यांत गेल्याशिवाय राहिली नाही.

शेवटी, नाशिकच्या काँग्रेस कार्यकर्त्यांमार्फत काही आशाळभुतांचे एक शिष्टमंडळ ता. २०-४-३९ रोजी माजी ना. मुरारजींकडे या १९कामातून काहीतरी कामे कमी करा व आमची समाजातील गेली पत पुन्हा वाढीस लावा. आम्ही त्यायोगे अनेकजण देशभक्त ऊर्फ संधीसाधू काँग्रेसवाले बनू म्हणून देवाण-घेवाण या पद्धतीनुसार सौदा पटविण्यास गेले. परंतु याच कामाबाबत आमचे मित्र मे. दौलतराव जाधव एम. एल. ए. यांनी प्रश्न विचारले असता त्यांची उत्तरे माजी ना. मुरारजींनी शिष्टमंडळ मुंबईस येण्याअगोदर म्हणजेच ता. १९-४-३९ रोजी दिली असून या कामापैकी एकही काम कमी करता येत नाही म्हणून ठासून सांगितले. तथापी, आमच्या एका पुरवणी प्रश्नास उत्तर देताना माजी ना. मंत्र्यांनी सांगितले की, या १९ कामांपैकी जी कामे गावकामगार महार पूर्वी करीत नसतील; ती कामे त्यांनी यापुढेही करू नयेत. (असेंब्ली डिबेट पान नं. ३११७ पहा) ता. २०-४-३९ रोजी ना. महसूल खात्याच्या मंत्र्यांच्या भेटीची वारी करण्यास आलेल्या शिष्टमंडळांस नेहमीच्या स्वभावानुसार ना. मुरारजींनी चांगलेच ठणकावले म्हणतात; आणि शेवटी जे उत्तर आदल्या दिवशी आमचे प्रश्नास दिले, तेच उत्तर देऊन आलेल्या शिष्टमंडळाची बोळवण करण्यात आली. झालेल्या बोळवणीने शिष्टमंडळही संतुष्ट झाले नव्हते. परंतु आता करणार काय?

काँग्रेस मंत्र्याला शिष्टमंडळामार्फत भेटून यंव् करतो नि त्यंव् करितो म्हणून जागोजाग सभा भरल्या असता तेथे केलेल्या वल्गना, हरघडी रंगपालट करीत असूनही फलद्रूप होत नाहीत असे पाहून आंबट तोंड करीत जरी शिष्टमंडळ परत फिरले तरी आता गुप्तस्थळी झालेला घाव 'दाखवता न मिरविता' या म्हणीप्रमाणे तेरी भी चूप मेरी भी चूप म्हणून शिष्टमंडळ स्वस्थ बसले; परंतु तसे स्वस्थ बसण्याने आपली अधिक पत जाईल या भीतीने पण जरा भीतभीत "पडलो तरी नाक वर" या न्यायाने शिष्टमंडळ काँग्रेस सरकारास भेटले असता त्यांनी महारांच्या प्रसिद्ध झालेल्या १९ कामांपैकी जी कामे महार पूर्वी करीत नसतील, ती त्यापुढे करू नयेत म्हणून उत्तर दिले आहे, अशा अर्थाचे काढ हँडबिल नी हिंड वाटीत या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे याही वेळी अनेक हँडबिलवाटे, हँडबिलाचा प्रचार करून या विषयी अखेर आपल्या चळवळीचे ताबूत थंडे केले. कोल्हा काकडीला राजी या न्यायाने कोणी कसाही राजी झाला असला तरी आपण या कामाच्या प्रकरणी अधिक विचार केलाच पाहिजे व आपणांस जे हवे ते हक्काने मागितले पाहिजे, व नको असलेले ठोकरीने उडविले पाहिजे.

आता चर्चेसाठी उदाहरणादाखल या १९ कामांपैकी काही कामे घेऊ. वेळेअभावी सर्वांवर चर्चा करणे शक्य नाही. आजवर वहिवाटीने "सरकारी टपाल तालुक्याच्या व इतर ठिकाणी पोचते करणे,' हे काम गावकामगार महार करीत आले आहेत. परंतु याबाबत एक गोष्ट आपल्या नजरेत आणू इच्छितो. मुंबई सरकारने ३४ वर्षांपूर्वी एक सरकारी ठराव G.R.R.D. नं. ४८४९ ता. १४ जून १९०५ चा काढून सर्व सरकारी अधिकाऱ्यांना कळविले आहे की, जे गाव तालुक्याचे ठिकाणापासून २० मैल अगर दूर असेल व तेथे पोस्टाची सोय असेल तर तेथील सरकारी टपाल, सरकारी खर्चाने तालुक्याच्या ठिकाणी पाठवावे, या सरकारी ठरावात गेल्या ३० वर्षांपूर्वी सरकारने दुरुस्ती सुचविणारा दुसरा ठराव G.R.R.D. नं. ६७९ ता. २२ जानेवारी १९०९ ने २० मैलाची मर्यादा १० मैलाची केली; व ज्या गावांना पोस्टाची सोय असेल अगर पोस्टाची सोय असलेलं गाव जवळपास असेल; तेथील सरकारी टपाल १० मैल अगर दूर असलेल्या तालुक्याच्या ठिकाणी अगर अन्य गावी समक्ष न नेता ते पोस्टामार्फत सरकारी खर्चाने पाठवावे' असे वरील ठरावाने सर्व सरकारी अधिकाऱ्यांना कळविले आहे; परंतु आपले हितशत्रू असलेल्या हिंदू जातीच्या व हिंदूच्या संगतीने हिंदुळलेल्या सरकारी अधिकाऱ्यांनी सदर ठराव जन्मास आले तसेच दडवून ठेवून आजपर्यंत कोठच्याही गावचे टपाल सरकारी खर्चाने पाठविले नाही. या अन्यायास आम्ही प्रश्नाद्वारे मुंबई कायदे मंडळात तोंड पाडले असता मागील सरकारी अधिकाऱ्यांनी केलेल्या चुकाबद्दल आम्ही जबाबदार नाही, असे म्हणून पदर झटकून माजी ना. मुरारजी देसाई यांनी आपली सोडवणूक करून घेतली.

**तुम्ही तरी काय दिवे लावले?**

परंतु सत्य, अहिंसा वगैरे उदात्त तत्वांच्या नावांचा उदोउदो करणारे माजी काँग्रेस सरकार यांना; तुम्ही तरी या बाबत काय दिवे लावले आहेत म्हणून आपण त्यांना प्रश्न विचारावयास हवा आहे. गावकामगारांनी करावयाच्या कामांचा जो सरकारी ठराव काँग्रेस सरकारच्या

आमदानीत जन्मास आला आहे; त्यांच परकीय म्हणून गणल्या गेलेल्या सरकारपेक्षा स्वकीय म्हणून मिरविणाऱ्या कॉंग्रेस सरकारनें काही वेगळे केले आहे काय? पूर्वीच्या सरकारचेच धोरण डोळ्यांपुढे ठेवून ज्या गांवी पोस्ट असेल, तेथील सरकारी टपाल पोस्टाने पाठविले जावे. म्हणजेच जेथे पोस्टाची सोय नसेल तेथे महाराकरवी ते टपाल पाठविले जावे असे ठरवून ते काम पुन्हा महारांच्या गळ्यांत विनावेतन अडकविले आहे. ज्यांच्या गावी पोस्टाची सोय असेल तेथील टपाल जर सरकारी खर्चाने पाठविण्यास सरकार मान्यता देते तर मग ज्यांच्या गावी पोस्ट नाही; त्या गावच्या महारांनी सरकारी टपाल तालुक्याच्या ठिकाणी अगर इतरत्र नेले तर त्याबद्दल सरकार काही मोबदला देते काय? या प्रश्नाचे उत्तर; सरकार काही मोबदला देत नाही असे आहे. सरकार काही मोबदला देत नाही तर मग आपल्या गावात पोस्टाची सोय नाही म्हणून सरकारी टपाल ने आण करण्याची घोरपड सरकारने त्यांच्या-गळ्यात, सरकारी ठराव करून बांधणे हा अन्याय नाही काय? पोस्टाची सोय त्यांच्या गावी नसणे हा त्यांचा दोष नाही. आणि दुसरे असे की, पोस्टाची सोय अशी किती गावांना असते? आमच्या नाशिक जिल्ह्यांत सुमारे १७०० खेडी आहेत. त्यापैकी फक्त ७५ गावांना पोस्टाची सोय आहे. म्हणजेच १६२५ गांवांना पोस्टाची सोय नाही. या सर्व गावच्या महारांना सरकारी टपालाची ने-आण विनावेतन नाही का करावी लागणार? हीच स्थिती इतरही जिल्ह्यांत आहे.

सरकार महार, मांग, वेठिया वगैरे लोकांना सरकारी नौकर म्हणून म्हणते. आता गावकामगार महार वगैरे लोक हे जर सरकारी नौकर आहेत; तर मग इतर सर्व सरकारी नौकरांना (पट्टेवाल्यापासून तो इलाखाधिपती असलेल्या ना. गव्हर्नरादी अधिकाऱ्यांना) फिरतीवर गेले असतानाचा त्यांच्या दर्जाप्रमाणे दररोज भत्ता मिळत असतो, तसा भत्ता महार, मांग, वेठिया वगैरे लोकांना का देण्यांत येत नाही? झाडून साऱ्या सरकारी व निमसरकारी नौकरांनी फिरतीवर गेले असता भत्ता घ्यावा व गरीब महाराकडून मात्र नेहमीचे फिरतीचे काम विनावेतन करवून घ्यावे हा अन्याय नाही काय? इतर सर्व सरकारी अधिकारी वर्षाचे काही महिने फिरतीवर जातात तर या गरीब महारांना बाराही महिने वाटेल तेव्हा सरकारी काम असो अगर बिनसरकारी असो, गावचे पाटील-तलाठी व इतर अधिकारी यांना फिरतीवर दामटीत असतात. या अन्यायाविरुद्ध आम्ही झगडले पाहिजे. गावकामगार महारांना सरकारी कामासाठी कोठेही बाहेरगावी पाठविणे झाल्यास त्यास दररोज ८ आठ आण्याप्रमाणे भत्ता देण्यात यावा म्हणून आपण मागणी केली पाहिजे. बॅकवर्ड क्लास बोर्डनेही याबाबत एक ठराव माजी ना. खेर मुंबईच्या कॉंग्रेस सरकारचे मुख्य प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली पास केला आहे. सदर ठरावान्वये मुंबई सरकारास विनंती केली की "गावकामगार महार, मांग, वेठिया वगैरे लोकांना आपले गाव सोडून बाहेर गावी सरकारी कामानिमित्त जावे लागल्यास त्यास भत्याप्रीत्यर्थ द्याव्या लागणाऱ्या रकमेची तरतूद करून तशी तजवीज करावी."

तथापी ना. खेरांच्या सरकारने त्या ठरावास केराची टोपली दाखविली. आता आपणच तो ठराव सरकारकडून अंमलात आणविणेसाठी झगडले पाहिजे.

दुसरे असे की, गावकामगार महारांना सरकारी कामासाठी बाहेरगावी पाठविण्याबद्दल भत्ता देण्यात येऊ लागल्यास फक्त सरकारी टपाल ने-आण करण्याच्या कामापुरताच त्यांचा

उपयोग केला जाईल. पाटील तलाठी यांना हरघडी महार वापरावयास मिळणार नाही. कारण महारास बाहेरगावी पाठविल्याबद्दल सरकारी तिजोरीतून त्यांच्या भत्त्याप्रीत्यर्थ रक्कम खर्ची पडणार असल्याने पाटील तलाठ्यांस अगर इतर सरकारी नोकरांना महारांकडून खाजगी कामे करवून घेता येणार नाहीत.
वहिवाटीने करीत असलेल्या कामांत जन्म मृत्यूची बातमी पुरविणे, हे काम आजपर्यंत महारा-, करवी करवून घेतले जात आहे. ज्या गावी महार लोक हे काम करून शकत नसतील, त्यांना दंड करण्यात येत आहे. हे काम महाराकडून का झाले नाही, याची विचारपूस करण्यास सरकारी अधिकाऱ्यास फुरसतच नसते.

नाशिक जिल्ह्यात झालेल्या काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह, रामकुंड सत्याग्रह, मुखेडच्या सार्वजनिक रस्त्यांनी मिरवणूक नेण्याच्या सत्याग्रह, सार्वजनिक विहिरीवर पाणी भरण्याचे सत्याग्रह वगैरे चळवळी गेल्या १० वर्षापासून सुरु आहेत. या चळवळी स्पृश्य मानलेल्या हिंदूंच्या इच्छेविरुद्ध असल्यामुळे स्वाभाविकपणेच ज्या गावचे महार लोक या चळवळीत भाग घेत त्यांच्यावर त्यांच्या गावच्या स्पृश्य मानलेल्या हिंदूकडून कडकडीत बहिष्कार पुकारला जाई. महार लोकांवरील बहिष्कार म्हणजे त्यांना गावांत हिंडण्याफिरण्यास मनाई करणे, तेल, मीठ बंद करणे, गावांतील कोणाही स्पृश्य जातीच्या माणसाने त्याचेशी कोणताही संबंध न ठेवणे, इतकेच नव्हे, तर कित्येक ठिकाणी महाराबरोबर बोलल्यामुळे त्या गावच्या स्पृश्य जातीच्या इसमास दंड करविणे; असल्यास कडकडीत बहिष्कारांत गावांत झालेल्या जन्माची बातमी महारास देण्यास सांगणे; या सारखा जुलूम दुसरा कोणता असेल? फिरतीवर आलेले सरकारी अधिकारी वरील परिस्थितीचा मुळीच विचार न करता पाटील तलाठ्याच्या व स्पृश्य मानलेल्या धेंडांच्या चुगलखोरीस बळी पडून गावांतील जन्माची बातमी गावकामगार महार देऊ न शकल्याने शेकडो महारांना दंड केले आहेत. फिरतीवर गेलेल्या अधिकाऱ्यांची, गावांत किती मुले जन्मास आली या बाबतची माहिती महारास विचारण्याची तऱ्हा तर फारच तऱ्हेवाईक आहे. ज्या गावी महार हे काम करीत असल्यास अधिकारी त्यांना, गेल्या महिन्यात किती जन्म झाले सांग म्हणून विचारतो. त्यांनी ती माहिती सांगितल्यास त्याच्या मागच्या महिन्यांत किती मुले जन्मास आली म्हणून विचारले जाते. कित्येक ठिकाणी तर संबंध वर्षाची माहिती विचारली जाते. ती सर्व माहिती महिनावर सांगण्यास महार चुकला की, महार कामे करीत नाहीत या सबबीवर दे महारांना शिव्या व कर महारांना दंड असले प्रकार नेहमी चाललेले असतात. महार करीत असलेले काम व त्यांचा दर्जा लक्षांत घेता कोणत्याही तऱ्हेचे लेखी आपल्या जवळ नसताना कैक महिन्यांतील जन्माची बातमी महारांनी महिनावार कशी सांगावी?

या बाबत इ. सन १९३४ साली आम्ही नाशिकच्या कलेक्टरकडे एक शिष्टमंडळ नेऊन आपली अनेक गाऱ्हाणी, या गाऱ्हाण्यासह मांडली असता त्यांनी आपल्या जा. नं. W.T.N.D. २९ ता. ३१.७.३९ अन्वये कळविले की, या जन्ममृत्यूच्या बाबत तर कायदा करूनच हे काम महारांकडून काढावे लागेल. त्यास अनुसरून आम्ही बॅकवर्ड क्लास बोर्डाच्या ता. २८-१ ३८ च्या सभेत खालील ठराव पास करून हे काम महारांकडून काढावे म्हणून शिफारस केली.

"हे बोर्ड या ठरावान्वये सरकारला अशी शिफारस करते की जन्ममृत्यूची माहिती न दिल्याबद्दल खेड्यांतील हलक्या नोकरवर्गास दंड करू नये. तसेच खेड्यातील हलक्या दर्जाच्या नोकरांच्या कर्तव्याची फेर-तपासणी करते वेळी सदरहू काम वगळण्यांत यावे."

याहीवेळी माजी. ना. बाळासाहेब खेर, बॅकवर्ड क्लास बोर्डाचे अध्यक्ष होते. त्यांच्या अध्यक्षतेखाली पास झालेल्या वरील ठरावानंतर ८ महिन्यांनी काँग्रेस मंत्र्यांनी प्रसिद्ध केलेल्या गावकामगार लोकांच्या कामांचा सरकारी ठराव नं. ७४२०-३३ ता. १३ सप्टेंबर १९३८ यांत पुन्हा जन्ममृत्यूची बातमी देण्याच्या कामाचे लफडे महारांच्या गळ्यांत पूर्ववत अडकविले आहे. या कामाविरुद्ध तक्रार करता अधिकाऱ्याकडून नेहमी विचारले जाते की, जन्ममृत्यूची बातमी देण्याचे काम तुम्ही आजवर कसे केले? आजवर दरेक गावांत येसकर भाकरी मागे व त्यामुळे दरेक घराशी त्याचा संबंध येई. त्यामुळे त्यास ही बातमी कळे व ती तो पाटलास सांगे. परंतु आज अनेक कारणामुळे जेथे येसकर गावांत भाकरी मागत नाहीत, अगर बहिष्कारामुळे जेथे महार गावात फिरू शकत नाहीत अशा परिस्थितीत कोणत्या घरात कोण, केव्हा, कोठे व कशी गरोदर राहिली व कोठे, केव्हा व कशी बाळंत झाली ही; बातमी गावात फिरण्याची बंदी असलेल्या महारास कशी कळावी? फिरतीवर आलेल्या अधिकाऱ्यांना आमचा गाव बंद आहे, म्हणून मला जन्माची बातमी देता येत नाही असे महार परोपरीने सांगत असताही तुम्ही सरकारी काम करीत नाही. महार लोक फार चढले आहेत; वगैरे गुरगुरत अधिकारी महारांना दंड करतात हे आश्चर्य नाही काय? गेल्या खानेसुमारीच्या वेळस काँग्रेस खानेसुमारीच्या कामावर बहिष्कार पुकारला असता, त्यावेळी त्या कामासाठी नेमलेल्या नोकरांना काम नीट न करता आल्याने सरकारने त्यांना काही दंड का नाही ठोठावला? मग महारावर बहिष्कार पडला असता, त्याला जन्माची बातमी मिळत नसल्यास त्याला दंड का करावा?

याबाबत ज्याप्रमाणे म्युनिसिपालिट्या असलेल्या शहरी जन्ममृत्यूची बातमी देण्याची जबाबदारी ज्या घरी जन्म अगर मृत्यू झाला असेल, त्या घरांतील कर्त्यासवरत्या माणसावर पडते तर मग त्याचप्रमाणे खेड्यांतील जन्ममृत्यूची बातमी पाटलास पुरविण्याची जबाबदारी ज्या त्या घरांतील कर्त्यासवरत्या माणसांवर का लादण्यात येऊ नये? जी गोष्ट सरकार शहरांत करू शकते; ती गोष्ट खेड्यात करण्यास सरकारास काय अडचण असते?

**नरम लागले म्हणून कोपराने उकरतात**

सरकारला गावकामगार महार, मांग वेठिया वगैरे लोक फारच नरम भासत असल्याने त्यांनी त्याचा पुरेपूर फायदा घेऊन आपल्या लोकांच्या बाबत सापडले तेथे कोपराने उकरण्याचा सपाटा लावला आहे.

आतापर्यत ज्या लोकांना वतनी जमिनी आहेत, त्यांना आपल्या वतनी जमिनीसाठी कसे हाल सोसावे लागतात व ते सर्व हाल त्या जमिनीकडे पाहून आपले लोक कसे सोसतात. याचे विवेचन झाले.परंतु आपल्या या मुंबई प्रांतात अशी हजारो गावे आहेत की, या गावच्या गावकामगार महारांना वतनी जमीन एक टीचभरही नसताना सरकारी सर्व कामे व सरकारी अधिकाऱ्यांचा व गावकऱ्यांचा जाच जुलूम वतनी जमिनी असलेल्या महारांइतकाच

सोसावा लागत आहे. अशा लोकांनी सरकारी कामे विनावेतन का करावीत, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कर्नाटकमधील खालील जिल्ह्यात, पुढीलप्रमाणे गावे आहेत की जेथे गावकामगार महारांना सरकारी कामासाठी कोणत्याही तऱ्हेचा मोबदला दिला जात नाही.

सरकारी कामे करणाऱ्या महारांना वतनी जामीनी नसताही सरकार, त्यांचेकडून सरकारी कामे बिनावेतन करून घेते अशा गावांची संख्या

जिल्हा १ बेळगाव ३१७ गावे

जिल्हा २ विजापूर ५४३ गावे

जिल्हा ३ धारवाड ५७२ गावे

वरील गावांना जर कोणते उत्पन्न असेल तर फक्त रयतेकडून मिळणारा बलुता होय. आणि रयतेने दिलेल्या बलुत्याबद्दल महारांना रयतेची सर्व कामे करावी लागत असून शिवाय सरकारही सर्व कामे विनावेतन महाराकडून करवून घेत आहे. विजापूर जिल्ह्यांत शिवाय ५१३ गावे आहेत की, जेथे महारांना वर्षाकाठी रक्कम रुपये १६७५ पोटगी म्हणून देण्यात येते. ही पोटगी दरगावामध्ये विभागली असता दरसाल दरगावच्या सर्व कामगार महारांना रु. १५ पेक्षा अधिक वेतन खास मिळत नाही. त्याचप्रमाणे दरेक जिल्ह्यात अशी शेकडो गावे आहेत की, ज्या गावांना वतनी जमिनी अगर नक्त नेमणूक काही नसता या गरीब लोकांकडून न्यायी म्हणून म्हणविणाऱ्या इंग्रजाने व सत्य, अहिंसेचे ढोंग करणाऱ्या काँग्रेस सरकारने सरकारी सर्व कामे विनावेतन करून घेतली आहेत. ही संतापजनक गुलामगिरी आपण कशाचीही वाट न पाहता ताबडतोब सोडून देण्यास हवी आहे. आमच्याकडे अशा अनेक तक्रारी आल्या आहेत की ज्या गावी महारांना इनाम जमिनी नाहीत अगर दुसराही नक्त पगार नाही. अशा गावच्या महारांनी सरकारी कामे करण्याचे नाकारताच त्यांना इतर सरकारी अधिकाऱ्याकडून व कामगारांकडून अनेक तऱ्हेच्या तंब्या मिळतात व त्यांना बळजबरीने कामास नेले जाते. परंतु त्याबाबत जिल्ह्याधिकाऱ्याकडे तक्रार केल्यास हा जुलूम सहज दूर केला जातो. कारण महारांनी सरकारी काम करण्याचे नाकारताच महारांना असे कोणतेच वेतन सरकार देत नसल्याने, कायद्याच्या दृष्टीने महरांचे सरकार काही करू शकत नाही. परंतु दमदाट्या देऊन आपल्या अज्ञानाचा सर्वांनीच पुरेपुर फायदा लुटला असल्याने आता आपण सर्वांनी खडबडून जागे झाले पाहिजे. ज्या ज्या गावी सरकारी कामासाठी वतनी जमिनी नाहीत अगर अन्य मार्गाने सरकार काही वेतनही देत नाही अशा गावच्या सर्व कामगार महारांनी सर्व सरकारी कामे करण्याचे ताबडतोब बंद करावे असे आमचे मत आहे. आपणास काय हवे आहे ते आपण मागितल्याशिवाय जोपर्यंत आपले सरकार नाही, तोपर्यंत आपणास मिळणार नाही. आपल्या समाजाचे वरपांगी दाइत्व पत्करलेल्या काँग्रेसच्या सरकारने आपल्या लोकांच्या वतनाबाबतच्या न्याय्य मागण्या वेळोवेळी लाथाडून आपले निष्ठूर दाइत्व सिद्ध केले आहे. गरीबाचा कोणीच वाली नाही. न्यायी म्हणून मिरविणाऱ्या इंग्रजांनीही वतनदार महाराबाबत कसा अन्याय केल आहे, हे वरील विवेचना वरून सिद्ध झाले आहेच. या जगात गरीबाचा कोणीच वाली नाही. गरीब म्हणून जगण्याचे दिवस आता राहिले नाहीत. बापडे म्हणून कोणी चोपडीत नाही. यासाठी बंधूनो उठा, जागे व्हा; संघटना करा, व आपल्या न्याय्य हक्कासाठी वेळ पडल्यास कशाचीही पर्वा न करिता अन्यायाचा

प्रतिकार करण्यास सिद्ध व्हा. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या झेंड्याखाली जमा. डॉ. बाबासाहेबांनी आपल्या समाजाचे पुढारीपण पत्करून समाजात घडवून आणलेली अवर्णनीय जागृती अनेक दिवाभीतांना सहन न होऊन आपल्या संघटनेची विसंघटना करण्याचा त्यांनी चंग बांधला. त्याला आपल्यांतील संधीसाधूंनी व लाळघोट्यांनी, कॉंग्रेस अधिकारावर येताच लाळघोटीत त्यांच्या वहाणा चाटण्याचा व त्यांचे स्तुतीपाठक भाट बनण्याचा धंदा पत्करला. परंतु आपण जर बारकाईने आजच्या या भाडोत्री भाटांचे पूर्वायुष्य पहाल तर हे; कॉंग्रेस अधिकारावर येण्यापूर्वी तिची टवाळी करणारे टवाळखोर होते. असले हे संधीसाधू लोक नानातऱ्हेच्या वेशांत नानातऱ्हेने तुमच्यात फंदफितुरी करू पाहत आहेत. त्यांची ही फंदफितुरी बोकाळू देण्यास आपण कोणत्याही तऱ्हेने मदत न करितां त्यांनी चालविलेली ही फंदफितुरी व समाजघात थांबविण्याचा वेळीच प्रयत्न करावयास हवा आहे. आपल्या बऱ्याची कोणतीही चळवळ आपण सुरू केली की, समाजात बुद्धीभेद करण्याचा धंदा पत्करलेला व विरोधी गटात शिरून जिकडे घुगऱ्या तिकडे उदोउदो करणाऱ्या; या घुगऱ्यासाठी लाळ घोटणाऱ्यांपासून आपण सावध असावयास हवे आहे.

आपल्यावर अन्याय करणारा कोणीही असो. त्याजकडून होणाऱ्या अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ती दरेक जीवमात्राच्या नसानसांत खेळत असता तुम्हीच त्याला अपवाद कसे बनता? मुंगीसारख्या लहानश्या जिवाला कोणी चिरडू पाहील तर मरता मरता त्याला सडकून चावा घेतल्याशिवाय ती रहात नाही. मग तुम्ही काय आपल्यावर होणारा जाच, जुलूम व अन्याय निमूटपणे सोसमोर की त्याचा प्रतिकार करून या जगांत मानासन्माने जगण्यासाठी लढत रहाणार? बोला, आपण काय करणार ते! या जगांत कोणत्याही समाजाचे कल्याण आपोआप झालेले नाही. ते त्या समाजास करून घेण्याआधी जीवापाड श्रम पडले आहेत, कल्पनेबाहेर हाल अपेष्टा भोगाव्या लागल्या आहेत, अभिनंदनीय असा त्याग करावा लागला आहे. हे जर खरे, तर मग आम्हीच आमच्या हिताच्या गोष्टी आपोआप होतील, अशी नादानपणाची आशा कां बाळगावी?

आपल्या झालेल्या सर्वांगीण ऱ्हासाचे खापर आता या पुढे, दुसऱ्याच्या माथ्यावर फोडण्यापेक्षा ते आता आपण आपल्याच माथी फोडून घेऊन आमच्या आजवरच्या अवनतीस आम्हीच कारण आहोत; आजवरची आमची निष्क्रिय वृत्तीच या सर्वांस कारण आहे, अशा पश्चातापाने होरपळून, झाले ते गेले त्याचा अधिक विचार न करता यापुढे आमचा ऱ्हास व अनवती आम्हीच थांबविली पाहिजे. दुसरा कोणी येईल व तो आमचे बरे करील ही परधार्जिणी वृत्ती साफ सोडून दिली पाहिजे. या वृत्तीनेच आपली ही अवकळा केली आहे. मग यापुढे आपल्या हिताचे लढे आपण स्वत: आपल्या पायावर उभे राहून स्वाभिमानाने व स्वावलंबनाने लढविणार की दुसऱ्याच्या तोंडाकडे केविलवाण्या मुद्रेने त्याची दया भाकून लढविणार?

'देग बाई, जोगवा' म्हणून आजवर कोणास काहीच मिळालेले नाही. आपणास जे हवे ते, आपणच स्वकष्टाने, स्वत:च्या हिंमतीने मिळविले पाहिजे. आपण अल्पसंख्याक आहोत. आपण काही करू शकत नाही. ही सबब पोकळ आणि निराधार आहे. आपल्या या देशात आपल्या समाजाइतकाच लोक संख्येने अल्पसंख्याक असलेला मुसलमान समाज घ्या.

त्यांनी आपल्या संघटनेच्या बळावर आपला दर्जा वाढवून इतरही बाबतीत आपणास जे हवे ते सहज मिळविले आहे. हे सर्व मिळविताना त्यांना प्रसंगी रक्ताचे सडे शिंपडावे लागले आहेत. तसलेच प्रसंग आपला दर्जा वाढविण्यासाठी व आपणास जे हवे ते मिळविण्यासाठी येऊ लागल्यास आपण काय करणार! आजवर जिवंत मुडद्यासारखे जे रहात आलो तसेच वागून अवदसेच्या फेऱ्यांत सतत फिरणार की, माणसासारखी माणसे म्हणून जगण्याच्या झगड्यांत मुडदे होऊन आनंदाचे मानणार? जीवन कशासाठी आहे याचा विचार करा. माझे भाषण बरेच लांबत असल्याने त्या बाबत अधिक विवेचन करण्यास सवड नाही, याबद्दल वाईट वाटते. तथापी आपले परमपूज्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मुंबईच्या गेल्या अधिवेशनात काढलेले उद्गार दरेकांनी ध्यानात ठेवण्यासारखे आहेत.

"ज्या वेळी माझ्यापुढे राष्ट्रहित की माझे स्वहित असा प्रश्न उद्भवेल, त्यावेळी मी माझ्या स्वहितापेक्षा राष्ट्रहिताला अधीक महत्त्व देऊन राष्ट्रहितासाठी माझे काहीही अहित झाले तरी मी ते आनंदाने साहीन. परंतु ज्यावेळी ज्या पददलित जातीत मी जन्मास आलो आहे अशा जातीच्या हिताशी, राष्ट्रहिताची तुलना करण्याची वेळ आली; तर मी राष्ट्रहितापेक्षा सर्वांनी लाथेखाली तुडविलेल्या या समाजाच्या हिताला अधिक महत्त्व देऊन. आणि माझ्या शरीरांत रक्ताचा शेवटचा थेंब असेपर्यंत या समाजाच्या हितासाठी मी झगडेन."

समाजहिताची इतकी कळकळ असणारे पुढारी आपल्याला सुदैवाने लाभले असता आपला भाग्योदय आता दूर नाही अशी आशा, कोणता आशावादी करणार नाही? परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या वरील उद्गारावरून कोणी त्यांना जातिनिष्ठ म्हणतात, तर कोणी काय म्हणतात! परंतु त्या अकलेच्या कांद्यांना कळत नाही की, राष्ट्रहित म्हणजे काय राष्ट्रांतील दगडमातीचे हित की झाडाझुडपांचे हित? राष्ट्रहित म्हणजे त्या राष्ट्रांत रहाणाऱ्या मनुष्य मात्राचे हित: ही गोष्ट जर त्यांना पटत असेल, तर प्रथम सर्व राष्ट्रांने आपल्या टाचेखाली चेंगरलेल्या समाजाच्या हितात खरे-खुरे राष्ट्रहित नाही काय? असो.

बकवा करणारे वाटेल तो बकवा खुशाल करीत. आपण सर्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या पुढारीपणाखाली एकत्र जमून आपल्यावरील जोर-जुलुमांच्या निवारण्याचे झगडे संघटनेने, स्वाभिमानाने, स्वावलंबाने दुसऱ्यांच्या टाटाखालीच मांजरे न बनतां निर्भयतेने झगडूया येवढीच आपणास शेवटी कळकळीची विनंती करावयाची आहे.

**(ही परिषद १६ डिसेंबर १९३९ रोजी हरेगाव जि. अहमदनगर येथे झाली. अध्यक्षस्थानी डॉ. बाबासाहेब आंबेडकर होते.)**

# रिपब्लिकन पक्षाच्या ५व्या अधिवेशनातील अध्यक्षीय भाषण

**भाऊराव कृष्णराव गायकवाड**

अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षाचे प्रतिनिधी, सभ्य स्त्री-पुरुष हो –

आरंभी आमचे नेते रावबहादूर एन. शिवराज यांच्या दु:खदायक निधनाबद्दल आम्ही आमच्या अंत:करणाला वाटणारे तीव्र दु:ख व्यक्त करतो. अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षाच्या ता. १-१०-६४ रोजी लोकसभेसमोर होणाऱ्या निदर्शनाचा तयारी करून त्यात भाग घेण्यासाठी ते दिल्लीस आले होते. त्यांच्या मृत्यूमुळे अ. भा. रिपब्लिकन पक्षाची फार मोठी हानी झाली आहे. रावबहादूर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे कट्टे शिष्य व अनुयायी होते. या महापरिनिर्वाणगत नेत्याला मी सादर प्रणाम करतो.

अ. भा. रि. पक्ष; पददलित व पिळले गेलेल्या निर्धनाचा पक्ष आहे. ही जनता देशाचा एक अत्यंत दुर्बल असा भाग आहे. या पददलित जमतेच्या हक्कांसाठी लढणे आणि त्यांचा आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक आणि राजकीय दर्जा वाढवत त्यांना इतरांबरोबर समानतेचा दर्जा मिळवून देणे, ही कार्ये करण्यास अ.भा.रि.प. बद्धपरिपक्व असून, तसा पक्षाने निश्चय केलेला आहे.

बेघरांना घरे देणे, भुकेलेल्यांना अन्न देणे आणि वस्त्रहीनांना वस्त्रे देणे ही कार्ये सरकार अवश्य करील असे वचन भारतीय घटनेने दिले आहे. परंतु, स्वातंत्र्याप्राप्तीनंतर या जनतेची, या बाबतीत मुळीच सुधारणा झालेली नाही असे मला मोठ्या दु:खाने म्हणावे लागते.

राष्ट्राला एक अद्भुत घटना तयार करून दिल्याबद्दल घटना समितीच्या सभासदांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे अभिनंदन केले. त्यावेळी त्यांना उत्तर देताना बाबासाहेब म्हणाले, "चांगली घटना असणे, एवढ्यानेच भागत नाही. घटना राबवणे हे अधिक महत्त्वाचे आहे, आणि ती जबाबदारी राज्यकर्त्या पक्षाची आहे. जर घटना योग्य व न्याय्य रीतीने राबवली गेली तरच जनतेला तिचे फायदे मिळतील. जर ती तशी राबवली गेली नाही तर तिचा काहीही उपयोग होणार नाही. गोरगरिबांची परिस्थिती सुधारली नाही ही वस्तुस्थिती लक्षात घेतल्यास राज्यकर्त्या पक्षाने घटना योग्यरीतीने राबवली नाही असेच म्हणावे लागले."

देशातल्या दुर्बल जनतेच्या दयनीय परिस्थितीत सुधारणा करण्याकरिता, अखिल भारतीय

रिपब्लिकन पक्षाने सनदशीर मार्गांनी शक्य ते सर्व प्रयत्न केले. परंतु, दुर्दैवाने सरकारने या जनतेच्या गाऱ्हाण्यांकडे मुळीच लक्ष दिले नाही.

देशाला अन्नधान्याच्या बाबतीत दुष्काळी परिस्थितीला तोंड द्यावे लागत आहे. सरकार परदेशातून अन्नधान्याची आयात करीत आहे व त्यासाठी परकीय चलनाच्या अमोल गंगाजळीतून करोडो रुपयांचे चलन खर्च करीत आहे. भारतात उपलब्ध असलेली सर्व पडित जमीन जर लागवडीखाली आणली तर अन्नधान्याचे उत्पादन वाढून परकीय चलनाला लागलेली ही गळती थांबवता येईल. देशात सरकारी पडित जमीन मुबलक प्रमाणात उपलब्ध आहे आणि लक्षावधी बेकार भूमिहीन ती जमीन कसून अन्नधान्याचे अधिक उत्पादन करण्यास तयार आहेत. जर ही पडित जमीन भूमिहिन मजुरांना दिली तर अन्नधान्याच्या टंचाईचा व बेकारीचा हे दोन्ही प्रश्न काही प्रमाणात सुटतील. पण ही पडित जमिनीची मागणी सरकार नेहमी फेटाळून लावत आलेले आहे. पडित जमिनीच्या मागणीला नकार देण्याचे कारण; त्यात हितसंबंध असलेल्या जमीनदारांचा विरोध याशिवाय दुसरे काहीही नाही. जर भूमिहीन मजुरांना या पडित जमिनी दिल्या तर आपल्याला अल्पमजुरीत मजूर मिळणार नाहीत एवढ्याच एका कारणाकरिता जमीनदार या मागणीला विरोध करतात. येत्या सार्वत्रिक निवडणुकीत सत्ताधारी पक्षाला जमीनदारांची मदत मिळावी म्हणून जमीनदारांच्या या विरोधाला सत्ताधिष्ठित पक्षाकडून पाठिंबाच मिळत आलेला आहे.

## सत्याग्रहाची चळवळ

जेव्हा महाराष्ट्राच्या कायदेमंडळात भूमिहीनांना सरकारी पडित जमिनी लागवडीस देण्याचा प्रश्न मांडला गेला, तेव्हा भूमिहीनांना लागवडीस देण्यासारखी एक तसूभरही जमीन उपलब्ध नाही असे संबंधित मंत्र्यांकडून या प्रश्नाला उत्तर देण्यात आले. म्हणून अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षाला १९५९ साली महाराष्ट्रात जमीन-सत्याग्रहाचे आंदोलन करणे भाग पडले. दोन महिन्याच्या अवधीतच ३५००० पेक्षा अधिक सत्याग्रहींना सरकारने कैद करून तुरुंगात डांबले. अखेरीस महाराष्ट्र राज्य रिपब्लिकन पक्षाच्या नेत्यांना बोलावून त्यांच्या चौदाही मागण्या सरकारने मान्य केल्या. दुसऱ्याच वर्षी महाराष्ट्र सरकारने कित्येक लाख एकर जमीन भूमिहीनांना वाटून दिली.

सर्व देशात करोडो एकर जमीन पडिक पडलेली आहे. अ.भा. रिपब्लिकन पक्षाने ही वस्तुस्थिती सर्व राज्य सरकारांसमोर मांडली. ही जमीन भूमिहीनांना देण्यात यावी अशी त्यांना विनंती करण्यात आली. परंतु या विनंतीकडे पूर्ण दुर्लक्ष करण्यात आले. रिपब्लिकन पक्षाने या व इतर प्रश्नांकडे भारत सरकारचे लक्ष वेधण्याचे ठरवले. तो हेतू मनात ठेवूनच, ऑक्टोबर १९६४ च्या पहिल्या तारखेला दिल्लीत रिपब्लिकन पक्षाने एक निदर्शन संघटित केले. लोकसभेसमोर केलेल्या या निदर्शनात एक लाखांपेक्षा अधिक लोकांनी भाग घेऊन त्यावेळचे पंतप्रधान श्री. लालबहादूर शास्त्री यांना दहा मागण्यांचा एक खलिता सादर केला. एक महिन्यानंतर, बॅरिस्टर खोबरागडे, पक्षाचे सरचिटणीस श्री. भय्यासाहेब आंबेडकर आणि मी अशा तिघांच्या शिष्टमंडळाने मुंबईत पंतप्रधान श्री. लालबाहूदर शास्त्री यांची भेट घेतली, आणि मागण्यांच्या खलित्यातील पक्षाच्या मागण्या मान्य करण्यास त्यांनी विनंती

केली. आमच्या त्या मागण्या म्हणजे एक क्षुल्लक बाब आहे असे समजून तो प्रश्न कालावधीवर टाकण्याच्या विचारात शास्त्रीजी आहेत असे मला आढळून आले तेव्हा, सर्व परिस्थिती समजून सांगून, आमच्या मागण्या मान्य करून पूर्ण केल्या गेल्या नाहीत तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या महापरिनिर्वाणदिनी, म्हणजे सहा डिसेंबरला, रिपब्लिकन पक्षाला सत्याग्रह सुरू करावा लागेल या गोष्टीकडे त्यांचे लक्ष वेधणे आम्हाला भाग पडले.

या सर्व प्रकरणाचा विचार करण्याकरिता रिपब्लिकन पक्षाच्या कार्यकारिणीची सभा घेण्यात आली. कार्यकारिणीने ६ डिसेंबर १९६४ रोजी देशव्यापी सत्याग्रहाची चळवळ सुरू करावी असा ठराव मंजूर केला. त्याप्रमाणे रिपब्लिकन पक्षाच्या सर्व शाखांनी देशभर जमीन सत्याग्रहाची चळवळ सुरू केली. ही चळवळ दोन महिने चालू होती. या दोन महिन्यांत सुमारे तीन लाख लोकांनी या सत्याग्रहात भाग घेतला आणि तुरुंगवास पत्करला. तेव्हा त्यावेळचे पंतप्रधान श्री. लालबहादुर शास्त्री यांनी या सर्व प्रकरणाची सहानुभूतिपूर्वक चर्चा करून निकाल करण्याकरिता, पक्षाच्या नेत्यांना पाचारण केले. त्याप्रमाणे बॅ. बी. डी. खोब्रागडे, श्री. अरुमुघम, ॲड. श्री. ए. बी. निळे आणि मी ३० जानेवारी १९६५ रोजी श्री. शास्त्री यांना भेटलो. त्यावेळी संरक्षणमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण व गृहमंत्री श्री. गुलझारीलाल नंदा हेही उपस्थित होते. आम्ही सर्वांनी तासभर चर्चा केली आणि आमच्या मागण्या तत्त्वतः मान्य करण्यात आल्या. सरकारकडून काही मागण्या तत्काल अंमलात आणल्या जातील व काही मागण्या पुढे सोयीस्कर वेळी अंमलात आणल्या जातील, असे पंतप्रधान श्री. शास्त्री यांनी आम्हाला आश्वासन दिले.

दुर्दैवाने भारत-पाक युद्ध सुरू झाले, आणि पाकिस्तानी आक्रमणापासून देशाचे संरक्षण करण्याचे कार्य सरकारला प्रथम हाती घ्यावे लागले. पाकिस्तानी आक्रमणापासून देशाचे परिणामकारक संरक्षण करण्याच्या कार्यात सरकारला मदत करण्याच्या दृष्टीने त्या प्रकरणाचा अधिक पाठपुरावा करण्याचे रिपब्लिकन पक्षाचे स्थगित केले, आणि संरक्षणाच्या सरकारी प्रयत्नाशी पूर्ण सहकार्य केले. युद्ध संपताच ते प्रकरण भारत सरकारसमोर रिपब्लिकन पक्षाने पुन्हा ठेवले. सर्व राज्य सरकारांना मशागतीस योग्य असलेली सर्व पडित जमीन भूमिहीन श्रमिकांना द्यावी असे आदेश भारत सरकारने दिले, हे येथे नमूद करण्यास मला मोठा आनंद वाटतो. राज्य सरकारेही भारत सरकारच्या आदेशाचे पालन करून पडित जमिनी भूमिहीन श्रमिकांना वाटून देत आहोत हे पाहून आम्हाला मोठे समाधान वाटत आहे. काही राज्य सरकारांनी बैल व शेतीची अवजारे विकत घेण्यास भूमिहीनांना आर्थिक मदतही केलेली आहे.

जमीनधारणेवर मर्यादा घालणारे कायदे काही राज्यांनी मंजूर केले आहेत. राज्यकर्त्या पक्षाचे, म्हणजेच काँग्रेसचे हे जाहीर धोरण असताही काही राज्यांनी या धोरणाचा अवलंब केला नाही ही वस्तुस्थिती खेदजनक आहे. ज्या राज्यांनी असे कायदे केले आहेत त्यांनीसुद्धा या कायद्याचे काळजीपूर्वक परिपालन केलेले आढळत नाही. मर्यादा घालण्याचा कायदा अंमलात येण्यापूर्वीच सर्व मोठ्या जमीनदारांनी आपली जमीन आपल्या नातलगात वाटून दिली होती. त्यामुळे जमीनधारणेवर मर्यादा घालूनही भूमिहीन श्रमिकांना वाटण्यासाठी अधिक जमीन सरकारला उपलब्ध करून घेता आली नाही. राज्य सरकारची असली धोरणे आणि कालहरणाचे डावपेच लक्षात घेऊन रिपब्लिकन पक्षाने १९५९ मध्ये औरंगाबाद

येथील अधिवेशनात जमिनीचे राष्ट्रीयीकरण करण्याच्या मागणीचा ठराव मंजूर केला आहे.

देशातल्या जमिनीचे राष्ट्रीयीकरण केल्याखेरीज भूमिहीन श्रमिकांचे व अन्नधान्याच्या तुटवड्याचे प्रश्न सुटणे अशक्य आहे, असे माझे मत आहे.

**अन्नधान्याचा प्रश्न**

गेली कित्येक वर्षे देशाला अन्नधान्याच्या टंचाईला तोंड द्यावे लागत आहे आणि म्हणून जनतेला अत्यंत कष्ट भोगावे लागत आहेत. मंत्र्यांनी खूप आश्वासने दिली तरी दरवर्षी अन्नधान्याची परिस्थिती अधिकाधिक बिघडत चालली आहे. चालू वर्षी तर अन्नधान्याची तीव्र टंचाई भासू लागली आहे आणि जनतेवर प्रत्यक्ष उपाशी मरण्याची पाळी आलेली आहे. वृत्तपत्रांतील बातम्यांवरून काही माणसे उपासमारीने मेल्याचेही कळते. मोठ्या शहरातील परिस्थितीच्या मानाने खेड्यापाड्यातील परिस्थिती अधिकच बिकट झाली आहे. स्थूलमानाने बोलावयाचे झाल्यास शहरातील लोकांची परिस्थिती अधिक चांगली आहे. त्यांच्या संघटितपणामुळे, त्यांना मजुरी चांगली मिळते व अन्नधान्यही खेडेविभागापेक्षा बरे मिळते. शहरातल्या लोकांना सरकार अन्नधान्य अधिक प्रमाणात पुरवीत आहे. काही मोठ्या शहरात सरकारने रेशनिंग सुरू केले आहे. याचाच अर्थ असा की, शहरातल्या लोकांना पुरेशा प्रमाणात अन्नधान्य पुरविण्याची जबाबदारी सरकारने पत्करली आहे. पण खेडुत जनतेचे काय व्हायचे? खेड्यापाड्यात राहणाऱ्या लोकांकडे सरकारने संपूर्णतया दुर्लक्ष केलेले आहे. वस्तुस्थिती अशी आहे की, शेतावर राबून अन्नधान्य उत्पादन करणाऱ्या लोकांनाच उपाशी मरावे लागत आहे. अशा परिस्थितीत खेडुतांना भरपूर प्रमाणात अन्नधान्य पुरवून त्यांना उपासमारीपासून वाचवणे ही सरकारची जबाबदारी आहे. त्यासाठी खेड्यापाड्यांतही रेशनिंग सुरू करणे हे सरकारचे कर्तव्य आहे.

माझ्या मते, अन्नधान्याचा प्रश्न तीव्रतर करण्याची जबाबदारी साठेबाज, व्यापारी आणि मोठे जमीनदार यांच्यावरही पडते. उपलब्ध अन्नधान्याचे साठे दडपून ठेवून, त्यांनी अन्नधान्याची कृत्रिम टंचाई निर्माण केली आहे आणि किंमतींचे प्रमाण भरमसाट वाढवले आहे. जनतेची ही पिळवणूक थांबवण्याकरिता सरकारने कडक उपाययोजना केली पाहिजे. केवळ अन्नधान्याचे उत्पादन करून भागणार नाही. उपलब्ध अन्नधान्याचे न्याय्य प्रमाणात वाटप हेही तितकेच महत्त्वाचे आहे. जोपर्यंत अन्नधान्याचा घाऊक व्यापार खाजगी माणसांच्या हातात आहे, तोपर्यंत व्यापाऱ्यांच्या भरमसाट फायदा मिळविण्याच्या प्रवृत्तीला आळा घालता येणार नाही आणि अन्नधान्याचे न्याय्य प्रमाणात वाटपही करता येणार नाही. म्हणून अन्नधान्याचा व्यापार सरकारने आपल्या हातात घ्यावा, असे मी सुचवतो.

**झोपडपट्टीत राहणारी जनता**

काही राजकीय पक्षांचे लक्ष वेधून घेणारा एक महत्त्वाचा ज्वलन्त प्रश्न देशासमोर उभा आहे. झोपडपट्टीत राहणाऱ्या जनतेचा प्रश्न, हाच तो प्रश्न होय. १८ वर्षे देशावर राज्य करूनही सर्व नागरिकांना आश्रयस्थाने उपलब्ध करून देण्याचे कार्य काँग्रेसला करता आलेले नाही.

देशातल्या आणि विशेषत: खेडुत प्रदेशातल्या बेकारीमुळे खेड्यापाड्यातले हजारो लोक शहरांकडे धाव घेत आहेत. ते शहरात जातात आणि अनेक कष्ट करून व अडचणी सोसून आपल्या पोटाची खळगी कशीबशी भरतात. त्यांना राहण्यासाठी किंवा घरे बांधण्यासाठी योग्य जागा मिळत नसल्याने, साहजिकपणे जेथे नाक दाबून धरल्याशिवाय लोकांना क्षणभरसुद्धा उभे राहवणार नाही, अशा संडासाजवळच्या किंवा घाणीने व दुर्गंधीने भरलेल्या गटारांजवळच्या मोकळ्या जागेत ते लहान लहान झोपड्या बांधतात. मुंबई, कलकत्ता, मद्रास, दिल्ली, कानपूर इत्यादी उद्योगप्रधान शहरात लक्षावधी कुटुंबे असले दैन्यपूर्ण जीवन घालवत आहेत. अनेकदा सरकार पोलिसांच्या मदतीनें त्यांच्या झोपडपट्ट्यांवर हल्ला चढवते, त्यांच्या झोपड्यांचा नाश करते आणि त्यांना रस्त्यांवर फेकून देते. हे दृश्य अत्यंत कारुण्यपूर्ण असते. वृद्ध, दुखणेकरी, कोवळी, दुर्बल अर्भके, पुरुष आणि स्त्रिया असहाय्य स्थितीत आपल्या कष्टी जीवनाबद्दल कपाळावर हात मारून रस्त्याच्या कडेने रडत बसलेली आढळतात. या झोपड्या, त्या जागेत अनधिकृतपणे बांधलेल्या असल्यामुळे त्यांचा नाश करण्यात आला असे सरकारचे ठरलेले उत्तर असते. त्या लोकांना त्या जागेत झोपड्या बांधण्याचा मुळीच हक्क नाही असा सरकारचा नेहमीच दावा असतो.

मुंबईत, रिपब्लिकन झोपडी संघ पहिल्याने रिपब्लिकन पक्षाने स्थापन केला व त्या संघामार्फत झोपडपट्टीत राहणाऱ्यांची गाऱ्हाणी वेशीवर टांगण्यात आली. आता इतर पक्षांनीही आपापले झोपडी संघ स्थापन केले आहेत.

झोपडपट्टीत राहणाऱ्या लोकांना दुसरी एखादी जागा दिल्याशिवाय, असलेल्या झोपड्यांचा नाश करू नये ही आमच्या मागण्यांच्या खलित्यातील १० मागण्यांपैकी, एक मागणी होती. झोपडपट्टीत राहणारे लोकही भारताचेच नागरिक असल्यामुळे त्यांना शहरात काम व घरे देणे ही एक सरकारची जिम्मेदारी आहे. ते गरीब व दुर्दैवी लोक आपापली घरेदारे सोडून शहरात काम शोधण्यासाठी येतात हा काही त्यांना दोष नाही. त्यांना घरे व कामे दिली पाहिजेत. जेव्हा पूर्व व पश्चिम पाकिस्तानातून निर्वासित भारतात येतात, तेव्हा आमचे सरकार त्यांचे पुनर्वसन करण्याकरिता प्रचंड रकमा खर्च करते. जेव्हा ब्रह्मदेश व तिबेटमधून लोक भारता आश्रयार्थ येतात, तेव्हा त्यांची सर्वप्रकारची व्यवस्था करण्यास आमचे सरकार नेहमी एका पायावर तयार असते. सरकार इतरांना फार दयाळूपणे वागवते. परंतु या देशाचे जे खरेखुरे मालक आहेत, त्यांच्या बाबतीत क्रूरपणा करते. या विचित्र वर्तनाची कारणे त्यांची त्यांनाच माहीत! सामान्यत: झोपडपट्टीत राहणारे लोक अनुसूचित जमातींपैकी व मागासलेल्या वर्गांपैकी असतात. हेच लोक भारताचे मूळ रहिवासी आहेत; आणि म्हणूनच मी त्यांना देशाचे धनी म्हणतो. घरे बांधण्यासाठी त्यांना दुसरी जागा दिली जाईपर्यंत १९६२ सालापूर्वी बांधलेल्या झोपड्या उद्ध्वस्त करण्यात येणार नाहीत, असे अभिवचन मध्यवर्ती सरकारतर्फे त्या काळचे पंतप्रधान लालबहादुर शास्त्री यांनी दिले आहे.

घरे बांधण्यासाठी दुसऱ्या जागा द्यायच्याआधीच आपल्या झोपड्या उद्ध्वस्त केल्या जात आहेत, अशा त्यांच्या अनेक तक्रारी अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षाकडे आल्या आहेत. ते जर खरे असेल तर माझ्या मते सरकारने दिलेल्या वचनाचा हा भंग आहे. सरकारने या गोष्टीची कृपया दखल घ्यावी आणि झोपड्यात राहणाऱ्या गरीब लोकांवर अन्याय केला

जाणार नाही, अशी कृपेने खबरदारी घ्यावी. त्यांच्या झोपड्या उद्ध्वस्त केल्या जाण्यापूर्वी त्यांना दुसऱ्या सोयीच्या व योग्य जागा दिल्या पाहिजेत. झोपड्यात राहणाऱ्या लोकांना अनेकदा त्यांच्या कामाच्या जागेपासून फार दूर असलेल्या जागा दिल्या जातात आणि म्हणून अशा जागा ताब्यात घेताना त्यांना विचार पडतो. म्हणून सरकारने या प्रश्नाकडे सहानुभूतीने पाहून, त्यांना जागा देण्यापूर्वी त्यांच्या सोयींचाही विचार करावा.

**समाजवाद**

समाजवादाविषयी बोलणे ही आजकाल एक फॅशन होऊन बसली आहे. भारतात समाजवाद प्रस्थापित करावयाचा आहे, असे बहुतेक जो उठतो तो बोलत सुटतो. समाजवादी पद्धतीचा समाज स्थापन करण्याबाबत खुद्द काँग्रेसनेही एक ठराव मंजूर केला आहे. लोकशाही समाजवादाची व्याख्या करण्यासच काँग्रेसने जवळजवळ दहा वर्षे घेतली, म्हणून समाजवादी धोरण अमलात आणण्यास आणखी कित्येक दशके लागतील. समाजवादाची व्याख्या जो तो आपापल्या सोयीप्रमाणे करीत असल्यामळे, समाजवादाची व्याख्या वेगवेगळ्या लोकांची वेगवेगळी असते. माझ्या मते माणसाने माणसाची, एका जातीने दुसऱ्या जातीची, एका वर्गाने दुसऱ्या वर्गाची पिळवणूक करण्याचे बंद करणे, हा समाजवादाचा अर्थ आहे. जाती, पंथ व धर्म इत्यादी भेद लक्षात न घेता सर्वांना समान संधी देणे हा समाजवादाचा अर्थ आहे. समाजवादाचा अर्थ केवळ आर्थिक समता हाच नसून सामाजिक समता असाही त्याचा अर्थ आहे. केवळ आर्थिक समानता म्हणजेच समाजवाद असे बहुतेक लोक समजतात. परंतु सामाजिक समानता असल्याशिवाय समाजवाद किंवा आर्थिक समानता प्रस्थापित व्हावयाची नाही, असे पूर्ण विचाराअंती माझे ठाम मत बनलेले आहे. भारतात सामाजिक समानता नाही. समाजातली पददलित जनता गुलामाचे जिणे जगत आहे. दक्षिण आफ्रिका किंवा अमेरिका देशातील निग्रो लोकांच्या गुलामगिरीविषयी भारतातील लोकांना नेहमी चिंता वाटत असते. परंतु आपल्या स्वतःच्या पायाखाली काय जळत आहे याची त्यांना दखल नसते. भारतातील पददलित जातींपेक्षा निग्रोंची परिस्थिती अधिक चांगली आहे, असे मी निर्धाराने म्हणू शकतो. घटनेने अस्पृश्यता रद्द केली असली तरी देशभर वेगळ्या प्रकारांनी तिचे आचरण चालूच आहे. आजही काही ठिकाणी पददलित जनतेला सार्वजनिक रस्त्यांनी जाण्याची मनाई आहे. आजही सार्वजनिक विहिरींतून किंवा तळ्यांतून पददलितांना पाणी घेऊ दिले जात नाही. आजही लग्नाच्या मिरवणुका पददलितांना सार्वजनिक रस्त्यांनी नेऊ दिल्या जात नाहीत. खेड्यातल्या ठाकूर व जमीनदार लोकांसमोर पददलितांना चारपायीवर बसण्याची मनाई आहे. तथाकथित उच्चवर्णीयांच्या वसतीच्या पश्चिमेला घरे बांधण्यासाठी जागा घेण्याची पददलितांना मनाई आहे. तथाकथित उच्चवर्णीयांची घाणेरडी कामे नेहमी पददलितांना करणे भाग पडते. सभ्य पोषाख घालण्याची पददलितांना मनाई आहे. आपल्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीत सुधारणा करण्यास पददलितांना प्रतिबंध आहे. सरकारने त्यांना शेतजमिनी दिल्यास सवर्ण हिंदू त्यांच्या पिकांचा नाश करतात.

जेथे माणसांना इतक्या अमानुषपणे वागविले जाते असा पृथ्वीच्या पाठीवर एकतरी दुसरा देश आहे काय? असा रोख ठोक सवाल मला भारताच्या राज्यकर्त्यांना विचारावयाचा आहे.

## भावनैक्य

हिंदु समाज अनेक जातींनी व उपजातींनी पोखरला गेला आहे. हा जातीयवाद सर्व देशाचा विध्वंस करीत आहे. प्रत्येकजण राष्ट्रीय व सामाजिक भावनैक्याविषयी बोलत असला, तरी जातीभेदाची प्रथा नष्ट करून एकसंघ व भावनैक्यपूर्ण समाज स्थापन करण्याकरिता कोणीही काहीही करत नही हे अत्यंत विचित्र दिसते. जातिभेदाच्या प्रथेवर टीकेची झोड उठविणाऱ्या, परंतु त्याचवेळी स्वत:च्या जतीबद्दल निरतिशय अभिमान बाळगणाऱ्या अनेक व्यक्तींच्या प्रवृत्तीत प्रखर स्वविरोध आढळून येतो. जातिभेदाची दुष्प्रथा समूळ उखडून टाकण्याचा हा मार्ग नाही. त्यासाठी लोकांनी आपल्या जाती विसरण्यास आणि टाकून देण्यास तयार झाले पाहिजे. जातींचा त्याग करूनच सामाजिक समता प्रस्थापित करता येईल.

## अनुसूचित जमाती

अनुसूचित जाती व जमाती यांच्या परिस्थितीत कोणतीही सुधारणा झाली नाही हे येथे नमूद करण्यास मला फार खेद होतो. सरकार त्यांच्या परिस्थितीची सुधारणा करण्याकरिता काहीही करत नाही, परंतु फक्त बोलण्यात सहानुभूती मात्र व्यक्त करते. या पददलित समाजामध्ये घोर निराशा पसरली आहे. अलिकडेच घडलेले बस्तर प्रकरण; या वर्गाची आर्थिक व सामाजिक परिस्थिती सुधारण्यात सरकारला पूर्ण अपयश आले आहे याचाच भक्कम पुरावा असून, या वर्गाकडे पाहण्याची सरकारची अमानुष व अन्याय्य प्रवृत्ती ही त्यावरून स्पष्टपणे दिसून येते. बस्तर प्रदेशातील जमातीवर मध्यप्रदेश सरकारने केलेल्या या अत्याचाराचा मी तीव्र निषेध करतो.

## सरकारी नोकऱ्या

अनुसूचित जाती व जमाती यांच्यासाठी भारतीय घटनेने सरकारी नोकऱ्यात राखीव जागा ठेवल्या आहेत. परंतु घटना अंमलात येऊन सोळा वर्षे झाली असली तरी या जमातींना योग्य प्रमाणात सरकारी नोकऱ्या मिळाल्या नाहीत. जेव्हा जेव्हा लोकसभेत यासंबंधी प्रश्न विचारला जातो, तेव्हा मला योग्य उमेदवार उपलब्ध झाले नाहीत हे ठराविक उत्तर दिले जाते, पण हे विधान पूर्णतया असत्य आहे. अनुसूचित जातीतील व जमातीतील अनेक कार्यक्षम व लायक उमेदवार उपलब्ध आहेत. ते घालून दिलेल्या कमीत कमी अटी पूर्ण करू शकतात. परंतु, तरीही सरकारी नोकऱ्यांसाठी त्यांची निवड केली जात नाही. अनुसूचित जाती व जमाती त्यांच्याकरिता राखून ठेवलेल्या जागा लायक उमेदवार उपलब्ध नाहीत या सबबीवर, राखीव जागा बिनराखीव म्हणून समजल्या जातात आणि इतर जातींच्या उमेदवारांची निवड करून त्या भरल्या जातात. अशा तरतुदी असल्यामुळे, अनुसूचित जाती व जमातीतले उमेदवारांची सरकारी नोकऱ्यांत, योग्य शेकडेवारी असलेली आढळून येत नाही त्याचे मुख्य कारण हेच आहे.

योग्य निवड करून बढतीने भरावयाच्या वरच्या श्रेणीच्या नोकऱ्यातही राखीव जागा असाव्यात, असे धोरण १९५५ मध्ये सरकारने स्वीकारले. वरिष्ठ न्यायालयानेही हे धोरण

न्याय्य ठरवले. परंतु या धोरणाचा अवलंब सरकारनें केला नाही हे अत्यंत विलक्षण आहे. सरकारचा उपदेश व आचरण यांमधील असलेल्या अफाट फरकाच्या अनेक उदाहरणांपैकी हे एक उदाहरण आहे. प्रथम व द्वितीय श्रेणींच्या जागा बढतीने भरण्याच्या वेळी सरकारने आपले उपरोक्त धोरण अमलात आणावे आणि अनुसूचित जाती व जमातींकरिता राखीव जागा ठेवाव्यात. सवर्ण हिंदू अधिकारी एकत्र जमून, पददलित जमातीतील अधिकाऱ्यांचा छळ करण्याचा कट करतात, अशी अनेक उदाहरणे दृष्टोत्पत्तीस आली आहेत. पददलित जातीतील अधिकाऱ्यांविषयींच्या गुप्त ठेवावयाच्या नोंदी सवर्ण हिंदू वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून जाणून बुजून दूषित केल्या जातात. त्यामुळे पददलित वर्गातील अधिकाऱ्यांच्या बढतीच्या वेळी त्यांच्यापेक्षाही कमी दर्जाच्या सवर्ण हिंदू अधिकाऱ्यांना ती बढतीची जागा दिली जाते, अशी अनेक प्रकरणे माझ्या नजरेस आली आहेत. अशा रीतीने पददलित वर्गातील अधिकाऱ्यांवर मोठा अन्याय केला जातो. आणि त्यांची मने निराशेने भरली जातात. पददलित वर्गातील लोकांना हे जे सापत्न भावनेने वागवले जाते, ते सरकारने एकदम बंद करण्याची निकडची वेळ आता आली आहे. पददलित वर्गांना खास सवलती देऊन आणि ती धोरणे विश्वासाने अमलात आणून त्या दुर्बल वर्गांना इतर वर्गांच्या पातळीत आणण्यासाठी सरकारनें तात्काळ परिणामकारक उपाययोजना करणे अगत्याचे आहे.

## डी. आय. आर.

भारत संरक्षण कायद्याखाली अटकेत असलेले लोक अद्यापी तुरुंगात खितपत पडले आहेत, मुख्यमंत्र्यांच्या परिषदेत आणीबाणीचा ठराव मागे घेण्यास व भारत संरक्षण कायदा रद्द करण्यास बहुतेक मुख्यमंत्र्यांना विरोध होता. मुख्यमंत्र्यांच्या विरोधापुढे गृहमंत्री नंदाजींनी नमेत घेतले हे अत्यंक खेदजनक आहे. भारत संरक्षण कायद्याचा उपयोग फारच जपून करण्याचा आदेश नंदाजींनी दिला आहे हे खरे. परंतु आणीबाणीची परिस्थिती चालू ठेवणे हे लोकशाहीविरुद्ध आहे. दीर्घकाळपर्यंत जनतेचे मूलभूत व पायाभूत हक्क गुंडाळून ठेवणे. आणीबाणीची परिस्थिती चालू ठेवणे सद्य: परिस्थितीकडे लक्ष देता संयुक्त वाटत नाही. याशिवाय सत्ताधिष्ठित पक्षाचे हितसंबंध वृद्धिंगत करण्याकरिताही भारत संरक्षण कायद्याचा उपयोग केला जातो ते वेगळेच! निवडणूक समितीने जाहीर केल्याप्रमाणे १९६७ च्या फेब्रुवारी महिन्यात सार्वत्रिक निवडणुका व्हावयाच्या आहेत. या निवडणुका मुक्त व न्याय्य वातावरणात होणे अगत्याचे आहे. "**स्वतंत्र व न्याय्य वातावरणात होणारी निवडणूक प्रतिनिधिक लोकशाहीला आधारभूत असलेला दुसरा खांब आहे**" असे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी म्हटले आहे. जोपर्यंत आणीबाणीची परिस्थिती चालू असेल व भारत संरक्षण कायदा जारी असेल, तोपर्यंत स्वतंत्र व न्याय्य वातावरणात निवडणुका होणे शक्य नाही; म्हणून आणीबाणीचा हुकूम परत घेणें, भारत संरक्षण कायदा रद्दबातल करणें आणि सर्व राजकीय बंदिस्तांना तात्काळ मुक्त करणे, या गोष्टींचा मी आग्रह धरतो.

## ताश्कंद करार

जेव्हा ताश्कंद करारावर सह्या करण्यात आल्या तेव्हा भारत व पाकिस्तान यांच्यामध्ये

मैत्री, सद्भाव सहकार्य यांचे एक नवे युग सुरू होईल अशी आशा वाटत होती. केवळ या आशेनेच हाजीपीर प्रदेशातून आलेले सैन्य मागे हाटविण्यास भारत सरकार तयार झाले. भारताने विश्वासपूर्वक ताश्कंद करार पाळला आणि आपले सैन्य मागे घेतले. परंतु अलीकडे पाकिस्तानच्या प्रवृत्तीत बदल झालेला आढळून येत आहे. ताश्कंद कराराचा आत्मा दूषित करणारी भारतविद्वेषाची मोहीम पाकिस्तानने पुन्हा सुरू केली आहे. चीन व पाकिस्तान हे दोन देश जवळ आले आहेत. आणि त्या दोन देशांकडून भारतावर आक्रमण होण्याची भीती निर्माण झाली आहे. म्हणून भारताला आत्मसंतुष्ट राहणे शक्य नाही. आम्ही आमची संरक्षणशक्ती वृद्धिंगत करण्याचे कार्य चालू ठेवले पाहिजे. आणि कोणत्याही दिशेने आक्रमण झाल्यास त्याला तोंड देण्यास पूर्ण तयार असले पाहिजे. चीन देशाबरोबर पुन्हा बोलणी सुरु करावी असे केव्हा केव्हा सुचविले जाते. परंतु चीनशी बोलणी सुरू करून सध्याच्या परिस्थितीत काही उपयोग होईल असे मला वाटत नाही. आणि म्हणून चीनशी बोलणी सुरू करू नयेत असे मला वाटते.

**निवडणुकीचे धोरण**

सार्वत्रिक निवडणुकी १९६७ च्या फेब्रुवारीत घेण्यात येणार आहेत. रिपब्लिकन पक्षाला सार्वत्रिक निवडणुकीच्या तयारीस आतापासून लागले पाहिजे. लोकसभेसाठी १०० उमेदवार आणि विधानसभांसाठी ५०० उमेदवार उभे करण्याची रिपब्लिकन पक्षाला उमेद आहे. येत्या सार्वत्रिक निवडणुकांच्या दृष्टीने इतर राजकीय पक्षांशी सख्य करण्याच्या बाबतीत रिपब्लिकन पक्षाचे धोरण काय असेल असा प्रश्न विचारला जात आहे. आमचे सन्माननीय नेते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी त्या बाबतीत कोणते मार्गदर्शन केले होते, त्याकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. एक पक्ष व एक नेता यांच्या मार्गदर्शनाखाली संयुक्त व बलवान होण्याचा व इतर पक्षांशी सहकार्य करण्याचा डॉ. बाबासाहेबांनी आपल्या अनुयायांना उपदेश केला आहे. कानपूर येथे दि. २९ जानेवारी १९४४ रोजी भाषण करताना डॉ. आंबेडकर म्हणाले-

"देशाच्या भावी राज्यकारभारातले तुमचे न्याय्य हक्क प्राप्त करून घेण्यासाठी, तुम्हाला यशस्वी रीतीने लढा दिला पाहिजे. पण त्यासाठी तुम्ही एक भरीव व अभेद्य संघटना स्थापन केली पाहिजे. तरच तुम्हाला राजकीय सत्तेचे वाटेकरी होता येईल. कागदी संघटना आणि कागदी पक्ष यांच्यावर विश्वास ठेवणारे अनेक नेते असणे मुळीच उपयोगी नाही, ही सूचना मी तुम्हास करतो."

मुंबईला केलेल्या दुसऱ्या एका भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले.

"पददलित जातींनी राजकीय अलगपणा सोडून देऊन, नुकतेच मिळविलेले स्वातंत्र्य दृढमूल करण्यासाठी इतर समाजांशी सहकार्य केले पाहिजे, पण असे सहकार्य करतांना शेड्यूल्ड कास्टस् फेडरेशनचे स्वतंत्र अस्तित्व अबाधित राखले पाहिजे. आतापर्यंत काँग्रेसचे व आमचे संबंध विरोधाचे होते. राजकीय क्षेत्रात आम्ही एकमेकांचे शत्रू होतो. आता आम्ही आमचे स्वातंत्र्य मिळविले असल्यामुळे आमच्या समाजाचे हितसंबंध दृष्टीसमोर ठेवून आम्ही आमचा दृष्टीकोन पूर्णपणे बदलला पाहिजे. इतरांशी सहकार्य केले पाहिजे आणि आमचे

नुकतेच मिळालेले स्वातंत्र्य संघटित करण्यास मदत केली पाहिजे.

"फेडरेशनने आपला अलगपणा सोडून दिला पाहिजे. आमचा समाज लहान आहे. म्हणून आमचे स्थान आम्हांला कायम टिकवून धरावयाचे झाल्यास येत्या निवडणुकीत आम्ही इतर पक्षांशी सहकार्य केले पाहिजे."

ता. २५ एप्रिल १९४८ रोजी लखनौ येथे भरलेल्या अखिल भारतीय शे.का. फेडरेशनच्या परिषदेत भाषण करताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले -

"राजकीय सत्ता ही सर्व प्रगतीची गुरुकिल्ली आहे आणि आपला एक तिसरा पक्ष संघटित करून व प्रतिस्पर्धी राजकीय पक्षांमधल्या समतोलपणाच्या तराजूची दांडी आपल्या हातात ठेवून शे.का. फेडरेशनने सत्ता काबीज केली, तरच आपण आपली मुक्ती मिळवू शकू. मी काँग्रेस मंत्रीमंडळास सहकार्य केल्याने पददलित समाजाचा पुष्कळ गोंधळ उडालेला आहे आणि त्यांच्या शंकांचे व संशयांचे निरसन मला करावयाचे आहे. सतत २५ वर्षे काँग्रेसविरुद्ध लढा दिल्यानंतर अशा आणीबाणीच्यावेळी मी मौन का पत्करले असे मला विचारण्यात येते, खरे पाहता सतत लढा देत राहणे ही काही सर्वोत्तम युद्धीनीती नाही. आम्हाला इतर नीतीचाही अवलंब करणे अगत्याचे आहे. आम्ही मैत्रीचा हात पुढे करून पाहिला व त्याता आम्हाला बरेचशे यशही आले. काँग्रेसशी विरोधाची भूमिका घेण्याची ही वेळ नाही. काँग्रेसशी सख्य व सहकार्य करून जेवढे पदरात पाडून घेता येईल, तेवढे पाडून घेतले पाहिजे. मी केंद्र सरकारात सामील झालो आहे. परंतु मी काँग्रेसचा सभासद झालेलो नाही. केंद्र सरकारात सामील होण्याचे काँग्रेसने मला आमंत्रण दिले आणि मी कोणतीही अट न घालता सामील झालो. तेथे राहणे निर्थक आहे असे मला ज्यावेळी वाटेल, त्यावेळी मी तेथून बाहेर पडेन. आमची परिस्थिती अशी आहे की कारभारी नियंत्रणेत आमची माणसे असणे आवश्यक आहे. माझे हेतू जाहीर केल्यानंतरच मी काँग्रेसला मिळेन. जर तसे करण्याने पददलित जमातींचे कल्याण होणार असेल, तरच तसे करण्याचा सल्ला मी तुम्हांस देईन. एक पक्ष एक नेता व एक कार्यक्रम ठरवून तुम्हाला संघटित झाले पाहिजे."

१९४८ च्या लखनौ परिषदेनंतर वृत्तपत्रीय निवेदनात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या परिस्थितीचे पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण केले. "मी काँग्रेसचा विरोधक आणि टीकाकार होतो हे खरे आहे, परंतु विरोधाकरिता विरोध या तत्त्वावर माझा विश्वास नाही हेही तितकेच खरे आहे. सहकार्याने जर आमचा लाभ होत असेल तर आम्ही सहकार्य केले पाहिजे. काँग्रेसशी एकसारखे लढत राहणे काही उपयोगाचे नाही असे मला वाटले म्हणून मी काँग्रेसशी सहकार्य करण्याचे ठरवले, आणि सहकार्यानेच घटनेत काही संरक्षक तरतुदींची कलमे मला प्रविष्ट करून घेता आली नसती."

या सर्व विधानांवरून असे दिसून येईल की, प्रगतीपथावर असलेल्या कोणत्याही इतर पक्षाशी - त्यात काँग्रेसचाही अंतर्भाव होतो - सहकार्य करण्यास डॉ. बाबासाहेबांची काही हरकत नव्हती. संरक्षण मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण व महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक यांनी पददलित जनतेच्या प्रश्नात बरेच लक्ष घातले आहे आणि या प्रश्नांपैकी काहींची सोडवणूक करण्यास मदत केली आहे. प्रथमत: एक प्रकारची सक्तीची गुलामगिरीच असलेली व पिढ्यान् पिढ्या चालत आलेली महार वतने महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री

असताना श्री. यशवंतराव चव्हाणांनी रद्द केली. ही वतने रद्द करून घेण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पुष्कळ प्रयत्न केले होते. दुसरे असे की, महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री असताना श्री. यशवंतराव चव्हाणांनी धर्मांतराने बौद्ध झालेल्या जनतेला प्रचलित असलेल्या सर्व शैक्षणिक व आर्थिक सवलती उपलब्ध करून दिल्या. तिसरे असे की, नागपुरातल्या ज्या १४ एकर जागेत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी बौद्ध धर्माचा स्वीकार केला, आणि आपल्या ६ लाख अनुयायांना धर्मदीक्षा दिली, ती जागा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे योग्य स्मारक उभारण्याकरिता, डॉ. बाबासाहेबांच्या अनुयायांनी सरकारकडे मागितली होती. दुसऱ्या काही सरकारी कामाकरिता ती जागा सरकारला हवी होती हे मला माहीत आहे. तथापी ती जागा श्री. यशवंतराव चव्हाणांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या स्मारकासाठी दिली दीक्षा मैदान हे आता जगातील सर्व बौद्धांचे पवित्र क्षेत्र झाले आहे. चौथे असे की, रिपब्लिकन पक्षाच्या मागणीवरून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा जन्मदिवस, ता. १४ एप्रिल, हा महाराष्ट्र राज्यात सरकारमान्य सुटीचा दिवस म्हणून श्री. यशवंतराव चव्हाणांनी जाहीर केला. पाचवे असे की इतर राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या छायाचित्रांबरोबरच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे छायाचित्रही राष्ट्रीय पुरुष म्हणून महाराष्ट्र राज्यात सर्व सरकारी कचेऱ्यांमध्ये लावण्याचे महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक यांनी मान्य केले. सहावे असे की, रिपब्लिकन पक्षाच्या मागणीवरून, महाराष्ट्र राज्यात सर्व पडित जमिन भूमिहीन श्रमिकांमध्ये वाटून दिली जात आहे. सातवे असे की, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या ७५व्या जयंतीच्या दिवशी त्यांच्या स्मरणार्थ पोस्टाची तिकीटे काढण्यास श्री. यशवंतराव चव्हाणांनी पुढाकार घेऊन केंद्र सरकारास प्रवृत्त केले. ती पोस्टांची तिकिटे १४ एप्रिल १९६६ रोजी यथाक्रम काढण्यात आली. दि. १४ एप्रिल १९६६ च्या सार्वजनिक सभेत श्री. यशवंतराव चव्हाणांनी अभिवचन दिल्याप्रमाणे, भारतातल्या सर्व धर्मांतर केलेल्या बौद्धांना शैक्षणिक व आर्थिक सवलती मिळवून देण्याच्या कामी श्री. चव्हाण स्वत: लक्ष घालीत आहेत आणि लवकरच बौद्धांना त्या सवलती मिळतील. सरतेशेवटी सांगावयाचे असे की, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मोठे तैलचित्र लोकसभेच्या मध्यवर्ती दिवाणखान्यात लावण्याबद्दल श्री. यशवंतराव चव्हाण यांनी पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी व लोकसभेचे स्पीकर यांच्याशी बोलणी सुरू केली आहेत. या कामीही श्री. यशवंतराव यथाकाल निश्चित यशस्वी होतील असा मला भरवसा वाटतो. या सर्व गोष्टींवरून असे स्पष्ट दिसून येते की, काँग्रेसमध्ये थोडे प्रागतिक लोक असून, ते दीनदुबळ्या जनतेच्या प्रश्नांकडे सहानुभूतीपूर्वक लक्ष देत असतात. काँग्रेसमधल्या असल्या प्रागतिक लोकांशी निवडणुकीपुरते सख्य जोडायला मी कचरणार नाही. पददलित जनतेच्या कल्याणाची हे लोक खात्रीने हमी घेतील.

भारतात अनेक राजकीय पक्ष आहेत. काही राजकीय पक्षांची धोरणे प्रागतिक आहेत. तर काही पक्ष प्रगतिविरोधी धोरणांचा अवलंब करीत आहेत. तथापी, पददलित जनतेचा आणि देशातील दुर्बल समाजाचा आर्थिक व सामाजिक उद्धार करण्याविषयी रिपब्लिकन पक्षाचा एक निश्चित कार्यक्रम आहे. पददलित व पिळवणूक केली जाणाऱ्या जनतेच्या कल्याणाला रिपब्लिकन पक्ष अधिक महत्त्व देतो. कार्यक्रम अंमलात आणण्यास व ज्याविषयी रिपब्लिकन पक्षाला अभिमान वाटतो; अशा जनतेचे दीनदुबळ्या कल्याण करण्याची जबाबदारी आपल्या

शिरावर घेण्यास तयार होऊन जो पक्ष आम्हास तशी हमी देईल, त्याच्याशी सख्य करण्यास मी कचरणार नाही. तथापी जनसंघ व स्वतंत्र पक्ष यांसारख्या पक्षांशी सख्य करण्यास रिपब्लिकन पक्ष कधीही तयार होणार नाही. तरीही रिपब्लिकन पक्षाच्या पार्लमेंटरी (निवडणूक मंडळ) बोर्डाचा सल्ला घेऊन जनसंघ व स्वतंत्र पक्षासारख्या पक्षांशी स्थानिक जुळवाजुळवीची व्यवस्था पक्ष करू शकेल.

**मजूर संघ**

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यापासून उद्योगधंद्यांची फार झपाट्याने वाढ झालेली आहे. देशासमोर असलेल्या बेकारीच्या तीव्र प्रश्नाच्या दृष्टीने, सरकारने अथवा खासगी मालकांनी चालवलेल्या उद्योगधंद्यात काम मिळण्याचे प्रयत्न अखिल भारतातल्या पददलित जनतेने केले आहेत. देशातल्या विविध राजकीय पक्षांनी आपापले मजूर संघ (ट्रेड युनियन्स) स्थापन केले आहेत. उद्योगपती, पददलित जनतेतील मजुरांचे हितसंबंध सुरक्षित ठेवत नाहीत, ही काही नवीन गोष्ट नाही. वेगवेगळ्या राजकीय पक्षांच्या मजूर संघांकडून मजुरांची गाऱ्हाणी दूर करण्याचे प्रयत्न करण्यात येतात, यात काही शंका नाही. पददलित समाजांच्या मजुरांना जातिप्रथेच्या, दैनंदिन अत्याचारांच्या, अन्यायांच्या व कलंकादी प्रश्नाला तोंड द्यावे लागते. मी वर सांगितल्याप्रमाणे वेगवेगळ्या राजकीय पक्षांचे मजूर संघ मजुरांच्या तक्रारी कामी करण्याचे शिकस्तीचे प्रयत्न करीत असतात, परंतु जातिप्रथेवर आधारलेले मजुरांमजुरांमधले भेद नाहीसे करण्यात त्यांना अपयश आले आहे. मजूर संघाच्या दैनंदिन कामात, अस्पृश्यता व भेदाभेद पाळले जातात, आणि त्यामुळे मालकांना किंवा संघांना पददलित जातीतील मजुरांना फायदा करून देता येत नाही, असल्या प्रकारच्या काही तक्रारी माझ्याकडे आल्या आहेत. रिपब्लिकन पक्षाने पददलित जातीतील मजुरांचे प्रश्न सोडविण्याचे कार्य हाती घ्यावे अशा कित्येक सूचना रिपब्लिकन पक्षाच्या काही प्रमुख कार्यकर्त्यांनी मला केल्या आहते. जागोजागी कार्यकर्त्यांनी असे प्रयत्न करण्यास सुरुवात केली आहे, हे येथे नमूद करण्यास मला आनंद वाटतो. सर्व भारतभर स्वतंत्र्यरीत्या पददलित जनतेतील मजुरांच्या हितसंबंधाच्या दृष्टीने एकसंघ धोरण आखून रिपब्लिकन पक्षाने मजूर संघ स्थापन करणे, अत्यंत अगत्याचे आहे असे मला वाटते.

सरते, शेवटी रिपब्लिकन पक्षाच्या निशाणाखाली संघटित व बलवान होण्याची आणि पददलित जनता व दुर्बल जनविभाग यांची परिस्थिती सुधारण्याकरिता अविश्रांत श्रम करण्याची मी आपणाला विनंती करतो. जयभीम !

**(कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षाच्या दिल्ली येथे १ मे १९६६ रोजी भरलेल्या ५व्या अधिवेशनप्रसंगी केलेले अध्यक्षीय भाषण)**

# टीकाकारांच्या आरोपांचे खंडण

## भाऊराव कृष्णराव गायकवाड

दादासाहेबांनी सुरुवातीला दौऱ्याचा उद्देश स्पष्ट केला. गेल्या दीड वर्षात 'दुरुस्त', मित्रांनी जो धिंगाणा घातला आहे, त्याला उत्तर देणे हाच या दौऱ्याचा मुख्य उद्देश आहे. असे त्यांनी सांगितले. ते पुढे म्हणाले, "आमचे हे उत्तर संरक्षणात्मक किंवा प्रतिकात्मक स्वरुपाचे आहे. प्रतिपक्षावर हल्ला चढविणे आम्हालाही साधते, पण तो हल्ला आम्ही तूर्त करणार नाही. पुढे त्याची वेळ आलीच तर आम्ही जरूर प्रतिपक्षावर हल्ला चढवू. जर प्रतिपक्षाकडे बॉंब असले, तर आमच्याजवळ नक्कीच हैड्रोजन बॉंब आहेत. पण तूर्त त्याचा वापर न करता, फक्त त्यांनी केलेल्या प्रचाराला उत्तर देण्यावरच आम्ही समाधान मानणार आहो, आणि याचसाठी आम्ही महाराष्ट्रात दौरा काढणार आहो. "आम्ही डॉ. बाबासाहेबांच्या तत्वज्ञानाला हरताळ फासला, असा आमच्यावर 'दुरुस्त',. मित्रांचा एक आरोप आहे. मी म्हातारा म्हणून माझ्यावर या आरोपाचा अधिक बोजा टाकलेला आहे. या आरोपाचा बोजा मी त्याच्या ओझ्यासह सहन करायला तयार आहे."

"१९२७ साली नाशिक जिल्ह्यातील नांदगाव गावी वतनदारांची परिषद भरली होती. त्या परिषदेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब होते. त्यावेळी डॉ. बाबासाहेबांनी वतनदारांच्या प्रश्नांवर चार अग्रलेख लिहिले होते. त्याचे पुस्तकही प्रसिद्ध झालेले आहे. या पुस्तकात वरील परिषदेतील ठराव नं. २ दिलेला आहे. त्यात वतनदार महारांना पगार द्या, अशा मागणी केलेली आहे. त्यानंतर मधला काळ जरी सोडला तरी १९५५ साली कनिष्ट गावकामगार असोशिएशन स्थापन झाल्यानंतर डॉ. बाबासाहेबांनी एक निवेदन काढले होते. त्या निवेदनावर सेक्रेटरी म्हणून श्री. बी. सी. कांबळे यांचीही सही आहे. या निवेदनात वतनदारांना म्हणजे कनिष्ठ गावकामगारांनी जमिनीची मालकी मिळावी, कायम पगार मिळावा, कामाचे तास नियमित असावेत अशा मागण्या केलेल्या आहेत. वतनदार महारांची मागणी व या कनिष्ठ गावकामगारांच्या मागण्या यांचा विचार केल्यास, कोतवालीच्या रूपाने निराळे काय झाले? मला समजत नाही. हल्लीचा कोतवाल हा पूर्वीचा वतनदार महार नाही काय? १९५५ साली वतनदारांना पगार मिळावा अशी मागणी करणाऱ्या श्री. कांबळे यांना आता कोतवालीस म्हणजे पूर्वीच्या कनिष्ठ गावकामगारांस २८ रुपये पगार मिळतो, ही बाब आक्षेपार्ह कशी काय वाटते? की, श्री कांबळेना ४ वर्षांपूर्वीची आठवण नाही? या तरुण माणसाला ४ वर्षापूर्वीची आठवण रहात नाही याला काय म्हणावे? आणि आता ते

कोतवालीला कोणत्या तोंडाने विरोध करतात? त्यांना जर विरोधच करावयाचा होता, तर १९५५ साली, ज्यावेळी डॉ. बाबासाहेबांनी ते निवेदन लिहिले. त्यावेळी विरोध का केला नाही? त्यांनी मुकाट्याने त्या निवेदनावर सही का केली? तरीही जे जे घरचे संपन्न आहेत किंवा ज्यांची इच्छा नाही, त्यांनी कोतवाली स्वीकारावी असे आमचे सांगणे नाही. आर्थिकदृष्ट्या जे मागासलेले आहेत, ज्यांना उपजीविकेचे दुसरे साधन नाही, त्यांनी स्वीकारल्यास आम्ही हरकत का करावी?''

**अडाणीपणाचा आरोप :** ''माझ्यावर अडाणीपणाचाही एक आरोप केला जातो. पण मी विद्वान आहे असा दावा कधीच केलेला नाही. मी निर्बुद्ध असल्याचेच आतांपर्यंत सर्वांना सांगत आलो आहे. मग माझ्यावर हा आरोप का? विद्वतेचा टेंभा मिरविणाऱ्या मंबाजीने शेवटपर्यंत, तुकारामाची अडाणी म्हणून थट्टा केली. पण शेवटी काय झाले? दुसरे उदाहरण महात्मा जोतीबा फुले यांचे. टिळक, आगरकरांनी जोतीबांची अशीच गांवढळ म्हणून टवाळी केली. पण त्यामुळे जोतीबांचे कार्य थांबले नाही. **हीच विद्येची घमेंड 'दुरुस्त' मित्रांना असावी असे वाटते. पण लोकसेवेशिवाय त्यांच्या विद्येची काहीच किंमत नाही.** लोकसेवा करून लोकांचा विश्वास संपादन करणे, ही महत्वाची बाब आहे. हे त्यांनी लक्षात घ्यावे व विद्येचा पोकळ अभिमान सोडून द्यावा.''

**फंडाचे हिशेब :** ''डॉ. बाबासाहेबांचे वारसदार आम्ही, हे पैशाचे वारसदार! असे 'दुरुस्त, मित्रांचे म्हणणे आहे. या संबंधी सविस्तर अहवाल चालू प्रबुद्ध भारतात प्रसिद्ध झाला आहे. इमारत फंड व कनिष्ट गावकामगार असोशिएशन निधी या दोन्ही फंडांचा निधी बँकेत सुरक्षित आहे. डॉ. बाबासाहेबांच्या हयातीतच नंतर फार तर ४००/- ५००/- रु. खर्च झाला असेल, तेव्हा इमारत फंड व कनिष्ठ गावकामगार असोशिएशन यांच्या हिशोबाबद्दल कोणीही निष्कारण गैरसमज करून घेऊ नये. ज्यांना शंका असेल त्यांनी या दोन्ही फंडांचे खजिनदार श्री. उपशाम गुरुजी यांचेकडे येऊन शंका निरसन करून घ्यावी.

**भूमिहीन सत्याग्रह :** भूमिहीन सत्याग्रहाला आमच्या नागपुरच्या मित्राने विरोध केला होता. त्याच्या पावलावर पाऊल ठेवून आमच्या इतर दुरुस्त मित्रांनीही विरोध केला होता. पण ह्या सुज्ञ मंडळींना महाडचा सत्याग्रह, नाशिक काळाराम सत्याग्रह, पुण्याचा कौन्सिल हॉलवरील सत्याग्रह, औरंगाबादचा जमिनीचा सत्याग्रह, हे डॉ. बाबासाहेबांनी केलेले सत्याग्रह दिसत नव्हते काय? नेहरूंसारखा मनुष्य डॉ. बाबासाहेबांना सर्वश्रेष्ठ बंडखोर नेता, असे म्हणतो. मग डॉ. बाबासाहेब घरी बसून का बंडखोर नेते झाले? सत्याग्रहाचे चढाईचे राजकारण त्यांनी केले नसते, तर त्यांना ही पदवी मिळाली असती का? घरी बसून जर त्यांनी कागदपत्रांचे नरमाईचे राजकारण केले असते, तर त्यांना इतकी प्रचंड संघटना उभारता आली असती कां? तेव्हां डॉ. बाबासाहेबांच्या राजकारणाचा वारसा सांगणारी मंडळी, डॉ. साहेबांचे हे लढाऊ राजकारण का विसरतात ते कळत नाही.''

**ॲडवायझरी कमिटीवर निवड म्हणून विरोध :** ''लोकसभेत माझी ॲडवायझरी कमिटीवर निवड झाली म्हणून काही लोकांच्या पोटात दुखले की, काय समजत नाही. त्या कमिटीवर असताना 'पंत, बरोबर माझा फोटो घेतला गेला. म्हणून मी काँग्रेसमध्ये गेल्याचा माझ्यावर आरोप केलेला आहे. आता या आरोपाला काय म्हणावे, आणि याला उत्तर तरी

काय द्यावे? मात्र या कमिटीवर असताना मी बौद्धांच्या सवलती, विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती, याच्यासंबंधी ठराव पास करून घेतले, हे मला आपणाला अभिमानाने सांगावेसे वाटते. बाकीही माझ्यावर केलेल्या आरोपात काहीच अर्थ नाही. **मी काँग्रेसमध्ये जाईन ही गोष्ट या जन्मी तरी शक्य नाही.** याची आपणालाही खात्री पटेल.''

''**कम्युनिष्टधार्जिण्याचा आरोप** : ''आम्ही बुद्धाकडे, दादा, नाना पाटलाकडे, असे एक 'दुरुस्त', मित्राचे पालुपद आहे. याबद्दल मला हे स्पष्टपणे सांगावयाचे आहे की, कोणाच्या आहारी जाऊन पक्षाचा घात करण्याचे ह्या गायकवाडांचे ब्रीद नाही. मी एकवेळ कम्युनिस्टांना पचवीन, पण कम्युनिस्ट मला पचवू शकणार नाहीत. नाना पाटील प्रत्येक सभेत बौद्धांच्या संरक्षणाची हमी देत असतात. ते नेहमी म्हणतात, मला जरी कम्युनिस्टांचे कुंकू लागलेले असले तरी, मला खरा जिव्हाळा बौद्ध जनतेबद्दल वाटतो. मग ते एकत्र आल्याने काय बिघडले? डॉ. बाबासाहेबांनी स्वत: समितीशी करार केलेला होता. हा करार काही मी, भंडारे किंवा खोब्रागडे यांनी केलेला नाही. या करारामुळे खासदार, आमदार निवडून गेले. 'दुरुस्त' मंडळी स्वत: कम्युनिस्टांच्या मतावर निवडून गेली आहेत. मुंबईचा डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड, पुण्याच्या पुतळा, बौद्धांच्या सवलती, भूमिहीनांचा सत्याग्रह, मुंबई विधान सभेचे विरोधी पक्षाचे नेतेपद, मुंबईचे मेयरपद, या सर्व गोष्टी समितीशी संबंध आल्यामुळेच घडल्या आहेत. जो स्वत:ला विद्वान म्हणवितो, त्याने जी घटना बनविली तिच्यात रिपब्लिकन पक्षाचे सभासदत्व फक्त बौद्धानांच, असे होते. म्हणजे यात ७ कोटीचे कंत्राट सोडून हा विद्वान गृहस्थ आम्हाला फक्त १॥ कोटीचे कंत्राट घ्यायला सांगतो, याला काय म्हणावे? आणि ही विद्वत्ता तरी कोणती? मग पूर्वीचा शेड्युल्ड कास्ट पक्ष सोडून रिपब्लिकन पक्ष स्थापन करण्याचा उपद्व्याप तरी का केला?''

**झेंड्याचा प्रश्न :** चांदताऱ्यांच्या झेंड्याबद्दल माझी सही आहे, असे हे 'दुरुस्त'वाले सांगतात. कोणत्याही सभेत अगोदर सही केली जाते व मागाहून सभेचे कामकाज चालते असा रिवाज आहे. अशी सही जर मी केली असेन तर त्याचा काय उपयोग? मी या झेंड्याला कधीच मान्यता दिलेली नाही. अशोक चक्रासारखा सुंदर झेंडा सोडून चांदताऱ्यांचा पोकळ झेंडा मी कशाला स्वीकारीन? दुसरा मुद्दा असा मांडला जातो की, हे राष्ट्राचे निशाण आपण घेणे बेकायदेशीर आहे. सरकार त्याला हरकत घेईल. मग सरकारने आम्हाला आतापर्यंत या बाबतीत का अडविले नाही? की सरकारला कायदा कळतच नाही?''

''मी तमाशा करतो, अशीही टीका माझ्यावर होते. बरोबर आहे. माझा तमाशा होता. मी त्यात सरदाराचे काम करीत होतो. पण तो तमाशा गेले १॥ वर्षे बंद आहे. कारण या तमाशातील नाच्या पोऱ्या व एक दोन धारकरी पळून गेले आहेत. (टाळ्या)''.

शेवटी एकीच्या प्रश्नाकडे वळून दादासाहेब गायकवाड म्हणाले, ''मला एकीची इतरांपेक्षाही अधिक जरुरी आहे. पण प्रत्येक वेळी आवळेचा प्रश्न आडवा येतो. त्याला काय करावे? आवळेंनी बॅ. राजाभाऊ खोब्रागडे यांच्याविरुद्ध निवडणूक लढविली. याची कबुली स्वत: आवळेंनी दिली आहे. ही आपल्या पक्षात घडलेली अत्यंत शरमेची गोष्ट आहे. किरकोळ चुका विसरता येतील पण ही चूक विसरता येणे शक्य नाही. म्हणून जोपर्यंत आवळे, झाल्या प्रकारांबद्दल जाहीरपणे माफी मागत नाहीत तोपर्यंत त्यांना पक्षात घेता येणार नाही.

कारण हा पक्षाच्या इभ्रतीचा व प्रतिष्ठेचा प्रश्न आहे. मग त्यांना पक्षात कसे घेता येईल व एकी कशी व्हावी?"

शेवटी दादासाहेबांनी 'सैतानाने जसा बायबलाचा हवाला द्यावा, तसे दुरुस्त मित्रांनी भगवान बुद्ध व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे नाव घ्यावे, असे मला वाटते" असे सांगून आपले भाषण टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटात संपविले.

**(भीम चौपाटीच्या विराट सभेत कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांनी १५ मे १९६० रोजी केलेले भाषण)**

*(प्रबुद्ध भारत, २१ मे १९६०)*

# दादासाहेबांनी बाबासाहेबांना पाठविलेली चार पत्रे

श्री शाहू छत्रपती बोर्डिंग
नाशिक
ता. ३० नोव्हेंबर १९२८

परमप्रिय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरण सेवेशी साष्टांग दंडवत वि.वि.

आजच सकाळी ९ वाजता आपल्यास अपिलासाठी कोणती तारीख सोईची पडेल ते कृपेने उलट तारेने कळविणे, म्हणून रिप्लाय तार केली. व उत्तरासाठी लागणारे पैसे ही भरले. परंतु आज सायंकाळी ५वाजेपर्यत काहीच उत्तर नसल्याने मुद्दाम पत्र पाठवीत आहे. त्याचप्रमाणे हेवळे ता. कळवण येथील भरणार असलेली वतनहार महार परिषद जि. नाशिक ता. ९-१२-१९२८ रोजी भरविणे विषयी सर्वकाही ठरले असून हँडबिले छापण्यास टाकली आहेत. फक्त आपण कळविणार असलेली तारीख, कंपोज केलेल्या हँडबिलात टाकण्याचाच अवकाश होता. परंतु आपलेकडून काहीच उत्तर न आल्याने हँडबिले काढण्यात तूर्त तहकूब करावें किंवा कसे हे आपले उत्तरावर अवलंबून आहे. हेवळेकर मंडळी आपण सांगाल त्या तारखेस सभा बोलावण्यास तयार आहेत. तरी उलट टपाली पत्राचे उत्तर पाठविण्यास कृपा करावी, व आपणास आपिलांसाठी सोईची तारीख व सभेसाठी कोणती तारीख ठरवायाची आहे, ते कृपेने कळविणे. कळावे सेवेसी श्रुत होय.

आपला आज्ञाधारक
भा. कृ. गायकवाड

आर्य समाज मंदिर
पंचवटी, नाशिक
ता. २३.२.३०

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरण सेवेशी कृ.सा.न.वि.वि.

काल सकाळचे गाडीवर आपली वाट पाहिल्यानंतर आपण येत नाही - असे वाटल्या वरून व आपण सिन्नर येथे झालेल्या सभेस जर आला नसतात तर त्या योगे सत्याग्रहावर लोकदुराग्रहाचे होणारे अनिष्ट परिणाम डोळ्यापुढें दिसू लागून मन भयभीत होऊन कसेही करून आपणास सिन्नरच्या सभेसच संध्याकाळपर्यंत घेऊन येतो, असा निश्चय करुन निघालो. आपली कल्याणहून केलेली. तार वेळेवर मिळू शकली नाही. त्यामुळे मुंबईस जाणें भाग पडले. आपण पार्सल गाडीने याल अशी स्वप्नात कल्पनासुध्दा नव्हती. कारण पार्सल गाडीस फक्त इगतपुरीपासून पॅसेंजर लोकांसाठी डबे लावले जातात. व म्हणून पार्सल गाडीनें आपले येणे आम्हाला असंभवनीय वाटले. असो.

आम्ही रात्री १२ वाजता सुखरूप येऊन पोहचलो. काळजी नसावी.

सिन्नरच्या सभेस आपल्या येण्याने ता. २-३-३० च्या होणाऱ्या सत्याग्रहास अपूर्व मदत झाली आहे. या बद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. आपण ता. १-३-३० शनिवार रोजी सकाळी नाशिकास येण्याची कृपा केल्यास इतर कार्यक्रम पार पाडण्यासाठी व ठरविण्यास फारच चांगले होईल. तसे कृपेने कळविणे हीच चरणी प्रार्थना.

आ. न. सेवक
भाऊ

सत्याग्रहाश्रम पंचवटी
नाशिक
ता. २८-३-१९३०

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरण सेवेशी शिर सा. न. वि.

सत्याग्रह पूर्ण शांततेने व सुरळीत चालला आहे.परंतु सनातन्यांच्या खाजगी सभा भरत असून नुकत्याच भरलेल्या एक सभेत, राममंदिराचे दरवाजे वर्षप्रतिपदेपासून (ता. ३१.३.१९३०सोमवार) अगर त्यापूर्वी एका दिवसाच्या दरम्यान उघडे करावयाचे असून त्यावर पहारा करणेसाठी भय्ये ठेवण्याचे घाटत असल्याचे समजते. असे झाल्यास पाचव्या दरवाजावर आपणास सत्याग्रह करावा लागेल. साठी, शक्य झाल्यास येत्या शनिवारी अगर रविवारी येऊन जाण्याची कृपा केल्यास सत्याग्रह कमेटी आपली फार आभारी होईल.

गव्हर्नर साहेबाकडून आपल्या पत्रास काही उत्तर आले किंवा नाही, आले असल्यास तेही कृपेने कळविणे. तसेच गव्हर्नर साहेबास आपण केलेल्या तारेचे उत्तर म्हणून आलेले पत्र, आपण ता. २३-३-३० रोजी नाशिकास आले असता नेले आहे. आपले काम झाले असल्यास ते पत्र फाईल करणेसाठी पाठविण्याची कृपा करावी. चरणी श्रुत होय.

आपला नम्र सेवक
भा. कृ. गायकवाड

सत्याग्रहाश्रम पंचवटी
नाशिक
ता. १३-६-१९३०

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे चरण सेवेशी कृ.सा.न.वि.वि.

नम्र विनंती की ठरल्याप्रमाणे काल ता. १२-६-३०रोजी डॉ. मुंजे यांनी प्रमुख शहरनिवासीयांची सभा बोलावून, त्यांत ठरल्याप्रमाणे ठराव पास झाला आहे. तसेच गावातून किराणामालाची दुकाने मिळवून देण्यासाठी व मंदिर प्रवेशात लोकमत अनुकूल करणेसाठी बहिष्कृत सहाय्यक मंडळ स्थापन करण्यांत आले असून त्याचे अध्यक्ष श्री. नि.पां.पाटणकर व उपाध्यक्ष श्री.ज.पा.अभ्यंकर व कार्यवाहक इतर मंडळी निवडली असून कार्यास लवकरच सुरुवात होईल.

काल दुपारी १२ वाजता श्री गोविंदराव देशपांडे यास अटक करण्यात आली आहे. तसेंच काल खाजगीसभेत ठरलेली विनंती आजच्या सायंकाळच्या वसंत व्याख्यान मालेच्या-तर्फे होणाऱ्या व्याख्यानात जाहीर करण्यात येणार आहे. आता आपण काय करावयास हवे ते कृपेने कळविण्याची कृपा करावी. सत्याग्रह तूर्त बंद ठेवणे असल्यास जनरल मीटिंग बोलावून ठरवावे किंवा कसे, तेही कृपेने कळविणे.

आपण हॉस्पिटलमध्ये गेलात किंवा कसे, तेही कळविण्याची कृपा करावी.

चरणी श्रुत होय,

आपला नम्र सेवक,
भा. कृ. गायकवाड

# बाबासाहेबांनी दादासाहेबांना पाठविलेली दोन पत्रे

भीमराव रामजी आंबेडकर
दामोदर हॉल, परळ
मुंबई - ४०० ०१२
ता. २७.२.१९२८

प्रिय भाऊराव,

आपले पत्र पोहोचले. जाधवासाठी मी जे केले ते माझे कर्तव्य म्हणून मी केले. त्याबद्दल माझे आभार मानण्याचे काही प्रयोजन नाही. विशेष मजकूर हा की त्र्यंबकला ठरल्याप्रमाणे गावोगावची प्रेस फंडाची वर्गणी गोळा करण्याकरिता विनंतीपत्रे व पावती बुके छापून तयार झाली आहेत. हे काम आपण व रणखांबे यांनी अंगावर घ्यावे अशी माझी इच्छा आहे. तरी याबाबतीत आपणास काय करता येईल ते कळविणे. आपल्याला एक दिवसाकरिता मुंबईस येता आले तर अवश्य येऊन जाणे. दुसऱ्या काही गोष्टी आपल्याजवळ बोलावयाच्या आहेत. अवश्य येणे.

आपला कृ.
भीमराव आंबेडकर

भीमराव रामजी आंबेडकर
दामोदर हॉल, परळ,
मुंबई- ४०० ०१२.
ता. १२.१०.१९२९

प्रिय भाऊराव,

आपले पत्र पोहोचले. मी पुण्यास कौन्सिल करता गेलो असल्याने ते काल माझ्या हाती पडले.

ता. १० रोजी कमीशन येणार होते. परंतु काही अपरिहार्य कारणामुळे येणे झाले नाही. पुढची तारीख १६ किंवा १७ अशी ठरली आहे. तरी पत्र पाहताच डॉ. कुर्तकोटी याना त्या दिवशी त्यांचा मुक्काम कोठे असणार याचा खुलासा करून मला उलट टपाली झाल्यास तारेने कळवा. मी नाशकास १९ ला आहे. शक्य झाल्यास आधी येईन.

आपल कृ.
भीमराव

# कर्मवीर, खासदार, पद्मश्री दादासाहेब गायकवाड सत्कार समिती, नाशिक

## मानपत्र

कर्मवीर, खासदार, पद्मश्री, दादासाहेब गायकवाड यांचे सेवेसी...

आपल्या तेजस्वी आयुष्याचा रविवार दि. १३ ऑक्टोबर १९६८ हा दिवस भारतीय लोकजीवनाच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा आहे. आतापर्यंत अनेक सत्कार झाले आहेत व आपणास अनेक मानपत्रे मिळाली आहेत. परंतु या सत्काराचे आणि या मानपत्राचे महत्त्व काही आगळेच आहे. अस्पृश्यांच्या, दलितांच्या व गरीबांच्या उद्धारासाठी आपण जन्मभर काबाडकष्ट केले, संकटे सोसली, प्रत्येक संकटाचा धैर्याने प्रतिकार केला. स्वत:च्या सुखाचा मनाला स्पर्शदेखील होऊ दिला नाही. प. पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या खांद्याला खांदा लावून महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह, वा नाशिकच्या काळाराम मंदिर प्रवेशाचा सत्याग्रह, या ऐतिहासिक लढ्यांचे आपण सेनापतित्व केले. त्यानंतर पुढे स्वत:च्या हिंमतीवर आपण आमच्या येवले तालुक्यात मुखेडचा लढा गाजविला आणि सार्वजनिक रस्त्यावर मिरवणूक काढण्याचा अस्पृश्यांचा हक्क प्रस्थापित केला. १९५९ मध्ये भूमिहीनांच्या सत्याग्रहाची आपण तुतारी फुंकली आणि सरकारकडून भूमिहीनांचा जमिनीचा हक्क मान्य करून घेतला. हा हक्क मिळवून देताना केवळ अस्पृश्य भूमिहीनांपुरतीच आपण आपली दृष्टी संकुचित ठेवली नाही. त्यामुळे जातिधर्मनिरपेक्ष अशा अखिल भूमिहीनांचा आपण या लढ्यात पाठिंबा मिळविला. भूमिहीनांच्या सत्याग्रहामुळे आपण समाजाला श्रेष्ठ कोटीच्या मानवतेची ओळख करून दिली.

काही निवडक घटनांचाच फक्त या ठिकाणी उल्लेख करीत आहे. आपल्या जीवनग्रंथातील सर्व घटना आणि सर्वांच्या आठवणी सांगायचे मनात आणले, तर समाजसेवा या विषयाचा एक अग्रगण्य ज्ञानकोश निर्माण होईल. प. पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या निर्वाणानंतर निर्माण झालेली पोकळी भरून काढण्यासाठी डॉ. बाबासाहेबांच्या चितेला साक्ष ठेवून प्रतिज्ञा घेण्यासाठी आपण पुढे सरसावला नसता, तर खरोखरच अस्पृश्यांच्या व दलितांच्या दु:खाला कोणी वाली राहिला नसता. आपल्या या सत्काराचा हा सोहळा पाहण्यासाठी वन्दनीय डॉ. बाबासाहेब आज हयात असते तर त्यांच्या हृदयसागराला आनंदाची अपार भरती आली असती. समाज हे आपले कूळ आणि समाजसेवा हा आपला कुळाचार, हे व्रत

अंगी बाणवून अत्यंत प्रखरपणाने जनसेवा आणि समाजसुधारणा करण्यात महाराष्ट्र, भारताच्या इतिहासात अग्रस्थानी होता. समाजसेवकांचा हा दैदीप्यमान इतिहास दुर्दैवाने आज लोपत चालला आहे. अशावेळी महात्मा फुले, लोकहितवादी, न्यायमूर्ती रानडे, देशभक्त आगरकर, महर्षी कर्वे, प. पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकर, दीनबंधू विठ्ठल रामजी शिंदे आणि कर्मवीर भाऊराव पाटील यांनी जतन करून ठेवलेली समाजसुधारणेची मशाल नव्या पिढीच्या स्वाधीन करण्यासाठी, शेवटचा आदर्श आज आपल्या रूपाने महाराष्ट्रासमोर उभा आहे. राजकारणापेक्षा समाजसुधारणेचे व्रत फार कठीण असते. राजकीय क्रांती घडवून आणणाऱ्या लोकसेवकांपेक्षा सामाजिक क्रांती घडवून आणणाऱ्या लोकसेवकांचा समाजाने फार निर्दयपणाने छळ केला. याला प्रत्येक देशाचा इतिहास साक्ष आहे. तरीसुद्धा अस्पृश्यांची गुलामगिरीतून मुक्तता करण्याचे कार्य, आपण धैर्याने पुढे नेले आहे. अस्पृश्यांची गुलामगिरी नष्ट झाली आहे, असे नव्हे. परंतु या दिशेने देशाची प्रगती वेगाने पुढे नेण्याचा इतिहास आज आपण निर्माण केला आहे. हे श्रेय आपल्या कर्तृत्वाला देताना कोणाचेही दुमत होईल, असे वाटत नाही. प. पू. डॉ. बाबासाहेबांना, भारताचे अब्राहम लिंकन म्हणतात, त्याच तुलनेने विसाव्या शतकाचा, भविष्यकाळात जेव्हा इतिहास लिहिला जाईल, तेव्हा भारताच्या इतिहासातील 'मार्टिन ल्युथर किंग' अशीच आपली नोंद इतिहासाला करावी लागेल.

काळाच्या प्रवाहाला अनुसरून स्वातंत्र्यानंतर आपण पार्लमेंटच्या क्षेत्रात पदार्पण केले आणि तेथे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भारतीय घटनेमध्ये अस्पृश्यांच्या कपाळावरचा गुलामगिरीचा डाग पुसून टाकण्यासाठी जी तत्वे घालून दिली होती; ती आपण सरकारला साकार करायला लावली. भारताच्या हजारो वर्षांच्या इतिहासात अस्पृश्यांना व दलितांना जो दिवस सनातनी आर्यांनी दिसू दिला नाही, त्या दिवसाचा प्रकाश या विसाव्या शतकात प्रत्येक दलितांच्या दाराशी आणून देण्याची, या वयातही चालू असलेली आपली धडपड पाहून धन्यता वाटते. भारतीय समाज अनेक पिढ्यांच्या पापातून मुक्त होण्याच्या मार्गाला आहे. याबद्दल देशाने मनापासून आनंद मानणे आणि प्रसन्न मनाने या संक्रमणाचे स्वागत करणे, हा या मानपत्राचा अर्थ आहे. या कार्यातील आपले नवे पाऊल म्हणजे काँग्रेस व रिपब्लिकन पक्षाची युती हे होय. आपल्या या ध्येयधोरणाचा सूक्ष्म व योग्य अर्थ अस्पृश्यांनी व इतरांनी शक्य तितक्या लवकर देशहिताच्या दृष्टीने आपल्या मनाशी समजून घ्यावा. अशा आणिबाणीच्या क्षणी आम्ही आपला हा सत्कार करीत आहोत. भारताच्या एकात्मतेच्या ध्येयसिद्धीसाठी स्पृश्य व अस्पृश्य, हिंदू व मुसलमान अशा अनेक जातीजमातींनी ऐक्य भावनेने ज्या झेंड्याखाली उभे रहावे, असा झेंडा हातात घेऊन आज आपण देशाच्या इतिहासासमोर उभे आहात. या कामी प्रामाणिकपणाने माननीय यशवंतरावजी चव्हाण आणि आमचे मुख्यमंत्री श्री. वसंतरावजी नाईक यांनी आपले सहकार्याचे हात आपल्या हातात देऊन देशात खराखुरा समाजवाद आणण्याच्या कामी प्रयत्नांची पराकाष्ठा केली आहे. त्यांनी देशहिताची दिशा योग्य दृष्टीने ओळखली, हा देखील या मानपत्राचा व सत्काराचा आम्ही अर्थ समजतो. महात्मा गांधींची सत्यप्रियता आणि प. पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची न्यायप्रियता या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. काळाने थोपवून धरलेली ही युती आज आपल्या कर्तृत्वाने साकार होत आहे, हे देशाच्या भवितव्याचे शुभचिन्ह होय. राष्ट्रीय

एकात्मतेचा हा नवा इतिहास या मार्गाने घडण्यात स्वत:चे व देशाचे कल्याण आहे. हे ओळखण्याची सद्बुद्धी स्पृश्यास्पृश्य जनतेला व अन्य नागरिकांना प्राप्त होवो आणि आपण उचललेले नवे पाऊल पुढे पुढे टाकण्यात आपणांस मनासारखे यश लाभो व या कार्यात लागणारे दीर्घायुष्य व आरोग्य आपणास व मातुश्री सौ. जिजाईस लाभो, हीच प्रार्थना.

आपले नम्र

अध्यक्ष

**पंडित धर्माजी पाटील**

स्वागताध्यक्ष

**वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)**

उपाध्यक्ष

**द. शं. पोतनीस** — **शांतारामबापू वावरे** — **मुळचंद गोठी**

**अशोक बापूराव निळे** — **आर. एस. गवई** — **बाबुराव काळे**

**बॅ. बी. डी. खोब्रागडे**

कार्याध्यक्ष

**सौ. भावना भार्गवे**

कोषाध्यक्ष

**कु. शांताबाई दाणी**

कार्यवाह

| | | |
|---|---|---|
| **जितलम छाजेड** | **लालजी दौलत पाटील** | **कृ. द. बेदरकर** |
| **वसंत नारायण नाईक** | **शंकरराव ग. चवरे** | **भा. रा. कवडे** |
| **आर. जी. गुंजाळ** | **सिताराम सयाजी भोये** | **झां. म. कहांडोळ** |
| **दत्ताजी भिकाजी पाटील** | **सौ. रूक्मिणीबाई वि. वाजे** | **वि. चिं. पवार** |
| **बाळासाहेब देशमुख** | **ल. रा. आवड** | **दुलाजी सि. पाटील** |
| **माधवराव त्रिं. पाटील** | **माधवराव लिमये** | **फरीदोद्दीन का. कोकणी** |

१५ ऑक्टोबर १९५८

नाशिक

# कर्मवीरांचा जीवनपट

**नाव** - **भाऊराव कृष्णराव गायकवाड**

**जन्म** - १५ ऑक्टोबर १९०२ रोजी आंबे (जानोरी) ता. दिंडोरी, जि. नाशिक. नाशिकपासून आंबे १२ मैल अंतरावर आहे.

एप्रिल १९१२ - विवाह सीताबाई, श्री. रखमाजी बापू दाणी, नाशिक यांची कन्या.

१९१८ - टपाल खात्यात नोकरी

१९१९ - ब्रिटिश सरकारच्या अबकारी खात्यात नोकरी

१९१९ - आईचे निधन

१९२० - नोकरीचा राजीनामा

१९२१ - द्वितीय विवाह–गीताबाई, श्री. रखमाजी बापू दाणी यांची द्वितीय कन्या.

१९२४ - सुपरिण्टेण्डेट श्रीशाहू छत्रपती बोर्डिंग, नाशिक.

१९२६ - कार्यकारी मंडळावर, नाशिक सार्वजनिक वाचनालय.

१९२६ - रामभाऊ पाला मारू या मेघवाल समाजाच्या गृहस्थाच्या घरी दूध प्यायल्याने सामाजिक बहिष्कार

१९२६ - सरकार नियुक्त सभासद, नाशिक शहर नगरपालिका.

१९२६ - श्रीशाहू छत्रपती बोर्डिंग नाशिक येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर कोर्टाच्या कामाकरिता आले असता प्रथम भेट

१ जानेवारी १९२७ - कोरेगाव रणस्तंभ (भीमा कोरेगाव पुणे-नगर रस्ता) पुण्यापासून १६ मैल अंतर असलेल्या गावी डॉ. बाबासाहेब आंबेडकर समवेत मानवंदना व भाषण

२० मार्च १९२७ - महाड चवदार तळे सत्याग्रह, एका तुकडीचे नेतृत्व.

१९२८ - सरकारतर्फे नाशिक जिल्हा लोकलबोर्डावर नियुक्ती.

| | | | |
|---|---|---|---|
| | १९२८ | - | मेहेत्र्यांनी (महार समाजातील न्यायनिवाडा करणारे प्रमुख) जेवणाच्या पत्त्कींतून उठविले. तळेगाव ता. दिंडोरी, जि. नाशिक. |
| | १९२८ | - | चितेगाव ता. निफाड जि. नाशिक येथे स्वाभिमान संरक्षण परिषद आयोजित केली. महारवतनासंबंधी लोकमत जागृती. |
| | १९२९ | - | उमराळे ता. दिंडोरी, जि. नाशिक येथे विहिरीवर पाणी भरण्याचा सत्याग्रह. |
| | १९२९ | - | सोनजांब ता. चांदवड जि. नाशिक येथे विहिरीवर पाणी भरण्याचा सत्याग्रह |
| | १९२९ | - | सायमन कमिशन प्रसंगी मोर्चाचे नेतृत्व |
| १ ऑगस्ट | १९२९ | - | श्रीशाहू छत्रपती बोर्डिंगच्या सुपरिण्टेण्डेट पदाचा राजीनामा |
| २ मार्च | १९३० | - | नाशिक येथे काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह सुरू व सत्याग्रह कमिटीचे सेक्रेटरी. हा सत्याग्रह सतत ५ वर्ष चालू राहिला. येवल्याला धर्मांतरची घोषणा १३ ऑक्टोबर १९३५ डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी केली त्या वेळी त्यांच्याच आदेशावरून बंद करण्यात आला. दीर्घकाळ सत्याग्रह करूनही सनातन्यांनी अस्पृश्यांना मंदिरात प्रवेश दिला नाही. |
| २५ जून | १९३० | - | मुळेगांव ता. नाशिक, जि. नाशिक येथे विहिरीवर पाणी भरण्याचा सत्याग्रह |
| १७ फेब्रुवारी | १९३१ | - | टाइम्स ऑफ इंडियात मं. गांधींना सत्याग्रहाला पाठिंबा देण्याकरिता पत्र |
| फेब्रुवारी | १९३१ | - | पतितपावन मंदिराचे उद्‌घाटन. रत्नागिरी इथे भेट. |
| २३ मार्च | १९३१ | - | बॅ. सावरकरांचे भाऊरावांना पत्र. |
| २३ सप्टेंबर | १९३१ | | मुखेड ता. येवला, जि. नाशिक येथे गावातून पांडवप्रताप ग्रंथाची पालखी नेण्यास स्पृश्यांनी विरोध केला, म्हणून कर्मवीर दादासाहेब गायकवाड, अमृतराव रणखांबे आदींनी बैठा सत्याग्रह सुरू केला. त्या वेळी गावकऱ्यांनी त्यांच्यावर हल्ला करून त्यांना रक्तबंबाळ केले, एवढेच नव्हे तर पालखीमध्ये ठेवलेला धार्मिक ग्रंथ जाळला. 'मं. गांधी की जय', 'भारतमाता की जय' अशा स्पृश्यांनी घोषणा दिल्या. या प्रसंगाची छायाचित्रे अध्यक्ष व पंतप्रधान रॅम्से मॅक्डोनॉल्ड यांना दादासाहेबांनी पाठविली. याचा परिणाम म्हणून अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ (कम्युनल अॅवॉर्ड) देण्यात आला. |

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दादासाहेबांना पत्र पाठवून या घटनेचा उल्लेख केला व अभिनंदन केले.

| | | | |
|---|---|---|---|
| १९ | नोव्हेंबर | १९३१ - | काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीचा पाठिंबा देण्यासंबंधी ठराव व श्री.स.का. पाटील यांचे पत्र. |
| २ | मार्च | १९३२ - | वडील किसनभाऊ - कृष्णराव यांचे आंबे येथे निधन. |
| १ | एप्रिल | १९३२ - | झाडूवाल्यांच्या जागेवर ब्राह्मणाची भरती करावी असा ठराव. |
| | | १९३२ - | नाशिक जिल्हा शिक्षण प्रसारक मंडळाच्या वतीने डॉ. आंबेडकर विद्यार्थी आश्रम मनमाड, जिल्हा नाशिक येथे दलित विद्यार्थ्यांकरिता वसतिगृहाची स्थापना |
| १५ | एप्रिल | १९३२ - | काळाराम मंदिर प्रवेशाच्या प्रसंगी ३ महिने धुळ्यांच्या तुरुंगात शिक्षा, दादासाहेब गायकवाड यांच्यासमवेत त्यांची पत्नी व आई यांनादेखील शिक्षा झाली. |
| १ | जानेवारी | १९३७ - | नाशिक नगरपालिकेत पब्लिक वर्क्सचे चेअरमन म्हणून निवड. |
| १६ | जानेवारी | १९३७ - | इगतपुरी जि. नाशिक येथे विधानसभा निवडणुकीत दादासाहेब गायकवाड यांच्या प्रचारात सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण. |
| १७ | फेब्रुवारी | १९३७ - | स्वतंत्र मजूर पक्षाच्या वतीने नाशिक विधानसभा मतदारसंघातून विधानसभेवर प्रचंड बहुमताने राखीव जागेवर विजयी. |
| १२ | एप्रिल | १९३७ - | मातोश्री पवळाआईचे (सावत्र) निधन |
| १४ | एप्रिल | १९३७ - | येवले जि. नाशिक येथील सभेत डॉ. बाबासाहेबांचे दादासाहेबांच्या गौरवपर भाषणात माझ्या चळवळीतील 'शंभर नंबरी सोने' म्हणून गौरव. |
| १५ | मे | १९३७ - | अमरावती (विदर्भ) येथील विद्यार्थी संमेलनाचे अध्यक्षपद. |
| २० | नोव्हेंबर | १९३७ - | विधानसभेवर निवड झाल्याने वडाळा येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार व मानपत्र अर्पण. 'मला एवढे मोठेपण प्राप्त झाले आहे, यात ८० टक्के सहभाग गायकवाड यांचा आहे' असा उल्लेख. |
| १९ | डिसेंबर | १९३७ - | अंतुर्ली-जवखेड, ता. शिरपूर जि. धुळे यांच्याकडून मानपत्र. |
| २२ | जानेवारी | १९३७ - | विधानसभेत गावपंचायत बिलावर चर्चा करताना काँग्रेस पक्षाने अस्पृश्यांचा हरिजन असा उल्लेख केला त्यावर आक्षेप घेताना अस्पृश्य जर देवाची लेकरे तर स्पृश्य कोण राक्षसाचे लोक काय? असा प्रश्न विचारला. शिवाय हा शब्द काँग्रेस |

| | | |
|---|---|---|
| | | पक्षाने मागे न घेतल्याने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसह सर्व पक्षातील सभासदांचा सभात्याग. |
| २६ ऑगस्ट | १९३७ - | विधानसभेत 'उत्कृष्ट वक्ता' म्हणून सभापती मावळणकर यांच्याकडून गौरव. |
| १६ डिसेंबर | १९३९ - | वतनदार महार, मांग, वेठिया परिषद, हरेगाव जि. अहमदनगर स्वागताध्यक्षीय भाषण. त्या परिषदेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर होते. |
| | १९४० - | नाशिक येथे अस्पृश्यांची कॉलनी तयार करून डॉ. बाबासाहेबांचे चिरंतन स्मारक व्हावे म्हणून १० एकर ९ गुंठे जागा मिळवून 'डॉ. आंबेडकर नगर' हौसिंग सोसायटीची स्थापना केली. शिवाय भव्य सभागृह बांधले. |
| १३ मे | १९४१ - | नळवाडी ता. दिंडोरी. जि. नाशिक या परिसरात जनतेकडून मानपत्र. |
| | १९४१ - | अध्यक्ष नाशिक जिल्हा स्कूल बोर्ड. |
| २६ जानेवारी | १९४२ - | वतनी जमिनीवर जादा कराची (जादाजुडी) थांबविण्याच्या आंदोलनाचा विजय. |
| | १९४२ - | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्थापन केलेल्या शेड्युल्ड कास्ट्स फेडरेशनचे मुंबई प्रांताचे अध्यक्ष. |
| २३ मे | १९४२ - | 'अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ का पाहिजे' या विषयावर वसंत व्याख्यानमाला नाशिक येथे व्याख्यान. |
| | १९४४ - | मातोश्री रमाबाई आंबेडकर वसतिगृह नाशिकला सुरू केले. |
| | १९४५ - | विमानतळ अधिकारी पदाचा राजीनामा. |
| ७ जुलै | १९४६ - | १९४६च्या निवडणुकीमध्ये अस्पृश्यांनी मतदान करून एकही अस्पृश्य उमेदवार निवडून आला नाही यावरून अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांवर गदा आली आहे. संयुक्त मतदार संघाऐवजी स्वतंत्र मतदारसंघ आम्हाला हवा आणि १९३२ साली म. गांधी यांनी आमरण उपोषण करून पुणे करार केला तो रद्द व्हावा म्हणून मुंबईच्या कावसजी जहांगीर हॉलमध्ये भरलेल्या अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या बैठकीत म. गांधी यांना ९ प्रश्न विचारले. |
| १५ जुलै | १९४६ - | पुणे करार रद्द होऊन अस्पृश्यांच्या मतावर निवडून आलेला अस्पृश्य उमेदवार हवा. तो खरा अस्पृश्यांचा प्रतिनिधी होऊ शकतो. त्याकरिता २७ जुलै १९४६ पर्यंत म्हणजे बारा |

दिवस विधानसभेवर (पुणे) सत्याग्रह केला. एकूण ११५० सत्याग्रहींनी भाग घेतला. त्यात १६८ महिला होत्या. १५ दिवसांपासून ३ महिन्यापर्यंत शिक्षा झाल्या. आर. आर. भोळे, आर. डी. भंडारे, वराळे, शांतबाई दाणी. इत्यादींनी भाग घेतला. नेतृत्व अर्थात दादासाहेबांकडे होते.

८ ऑगस्ट १९४६ - वर्धा येथे भरलेल्या अखिल भारतीय काँग्रेस महासमितीच्या बैठकीपुढे काळी निशाणे दाखवून निदर्शने केली.

१८ ऑक्टोबर १९४७ - रखमाजी बापू दाणी (सासरे) यांचे नाशिक येथे निधन.

२६ नोव्हेंबर १९४७ कुरूक्षेत्र व जालंदर या ठिकाणी निर्वासित अधिकारी. फाळणी झाल्यावर पाकिस्तानमध्ये अस्पृश्यांवर अनन्वित अत्याचार होऊ लागले. त्यांना सुखरूप भारतात आणणे जरुरीचे होते. डॉ. बाबासाहेबांनी अनुभवी व कार्याची जाण असलेले दादासाहेब यांची निर्वासित अधिकारी म्हणून भारत सरकारकडे शिफारस केली. त्याचप्रमाणे त्यांची नेमणूक झाली.

२३ एप्रिल १९४८ - निर्वासित अधिकारी म्हणून राजीनामा.

एप्रिल १९४८ - उत्तरप्रदेशच्या गर्व्हरनर श्रीमती सरोजिनी नायडू यांचे भोजनाचे आमंत्रण.

१९४८ - डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी स्थापन केलेल्या पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या कार्यकारी मंडळावर सल्लागार व समिती सदस्य मुंबई.

१९४८ - ऑल इंडिया शेड्युल कास्ट्स फेडरेशनचे पदाधिकारी.

२५ मे १९४८ - अस्पृश्यांना काय हवे? या विषयावर वसंत व्याखानमाला नाशिक येथे व्याख्यान.

७ मार्च १९५० - दादांच्या अध्यक्षतेखाली नाशिक येथे प्रबोधनकार ठाकरे यांचे व्याख्यान.

१९५० - पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या वतीने पंढरपूर, नाशिक, मनमाड व अहमदनगर येथील वसतिगृहावर सुपरवायझर म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी नेमणूक केली. हे काम पूर्णत: ऑनररी होते.

१७ नोव्हेबर १९५१ - डॉ. आंबेडकर विद्यार्थी आश्रम या इमारतीचे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते उद्घाटन. अध्यक्ष : दादासाहेब गायकवाड.

| | | | |
|---|---|---|---|
| | | १९५३ - | पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या औरंगाबाद महाविद्यालयाचे कार्यवाह. |
| | | १९५४ - | मराठवाड्यातील भूमीवाटप आंदोलनाचे नेतृत्व. या सत्याग्रहात १० हजार सत्याग्रहींनी भाग घेतला. २ हजारांना अटक व १६०० सत्याग्रहींना कारावास. |
| ३१ | ऑगस्ट | १९५५ - | उपाध्यक्ष : मुंबई राज्य कनिष्ठ गावकामगार असोसिएशन, मुंबई अध्यक्ष : डॉ. बाबासाहेब आंबेडकर. |
| १९ | मार्च | १९५६ - | विश्वस्त, शेड्युल्ड कास्ट्स इंप्रुव्हमेंट ट्रस्ट, मुंबई. अस्पृश्य समाजाच्या वतीने मुंबईमध्ये आपल्या स्वतःच्या मालकीची एक इमारत बांधण्याचा संकल्प डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १९३८ साली केला. तेथे ऑफिस, प्रेस, लग्नकार्याकरिता हॉल, सभागृह इत्यादी शिवाय परप्रांतातून आलेल्या प्रतिनिधींची मोफत राहण्याची व्यवस्था इत्यादी. व्यवस्था असलेली एक अद्ययावत इमारत बांधणे या 'इमारत फंड' या नावानेही ही संस्था प्रसिद्ध आहे. |
| १४ | ऑक्टोबर | १९५६ - | नागपूर येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्ते बुद्धधम्माचा स्वीकार. |
| ७ | डिसेंबर | १९५६ - | डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या शवास (चैत्यभूमी मुंबई) साक्ष ठेवून लक्षावधींना धम्मदीक्षा. |
| ९ | डिसेंबर | १९५६ - | शिवाजी पार्क, दादर, मुंबई येथे नागरिक संघाने आयोजित केलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर श्रद्धांजली सभेत प्रभावी भाषण. |
| १४ | एप्रिल | १९५७ - | दिल्लीच्या आंबेडकर भवनाच्या समोर डॉ. बाबासाहेबांच्या पुतळ्याचे अनावरण. |
| | | १९५७ - | संयुक्त महाराष्ट्र समितीच्या स्थापनेत सहभाग. |
| | | १९५७ - | तक्षशिला विद्यालय व गौतम छात्रालय नाशिक येथे सुरू केले. |
| | | १९५७ - | नाशिक लोकसभा मतदारसंघातून सं.म.स.च्या पाठिंब्यावर काँग्रेसचे गोविंद हरी देशपांडे यांचा पराभव करून प्रचंड मताधिक्याने विजयी. |
| ३० | मे | १९५८ - | सय्यद पिंपरी. जि. नाशिक स्तूपाचे अनावरण. |
| | | १९५८ - | महाराष्ट्रव्यापी भूमिहीनांच्या सत्याग्रहाचे नेतृत्व. ३५ हजार सत्याग्रहींना कारावास. १९३०चा सत्याग्राह धार्मिक हक्कासाठी |

होता आणि हा सत्याग्रह आर्थिक मागासलेपण दूर करण्यासाठी आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| जून | १९५८ | - | दिंडोरी तालुका शिक्षण प्रसारक मंडळाच्या वसतिगृहाचे उद्‌घाटन. या वसतिगृहाचे नाव आता कर्मवीर दादासाहेब गायकवाड विद्यार्थी वसतिगृह असे ठेवण्यात आले आहे. |
| १२ जून | १९५९ | - | मानपत्र-नांदगाव नगरपालिका - नाशिक |
| | १९५९ | - | कार्याध्यक्ष; संयुक्त महाराष्ट्र समितीचे अधिवेशन शिवाजी पार्क, दादर. |
| ३ मार्च | १९६० | - | मानपत्र, कँप मूर्तिजापूर जि. अकोला-विदर्भ. |
| ४ मार्च | १९६० | - | लोकसभेत मनुस्मृती फाडली. |
| १६ ऑक्टोबर | १९६० | - | अध्यक्षीय भाषण, संयुक्त महाराष्ट्र समिती, दुसरे अधिवेशनः शिवाजी पार्क, मुंबई वक्तेः आ. प्र. के. अत्रे, कॉ. डांगे, एस्. एम्. जोशी, आर. डी. भंडारे, माधवराव बागल इत्यादी |
| ७ मार्च | १९६२ | - | चैत्यभूमी दादर, कोनशिला समारंभ दादासाहेबांच्या हस्ते. |
| २९ मार्च | १९६२ | - | राज्यसभेवर निवड. |
| १ जून | १९६२ | - | अध्यक्ष : मुंबई विद्यापीठ विरोधी परिषद, नरे पार्क मैदान, मुंबई. |
| २ एप्रिल | १९६३ | - | मानपत्र, हीरक महोत्सव समिती, नासिक रोड, नासिक |
| १२ जून | १९६३ | | मानपत्र. हिंगणघाट नगरपालिका. |
| २० नोव्हेंबर | १९६३ | - | मानपत्र. आंबेडकर युवक सेवा समिती, नवी दिल्ली. |
| १५ जून | १९६४ | - | मानपत्र. पुणे महानगरपालिका. |
| १ ऑक्टोबर | १९६४ | - | रिपब्लिकन पक्षाचे अध्यक्ष एन्. शिवराज यांच्या निधनानंतर दिल्ली येथे पक्षाचे अध्यक्ष. |
| २१ ऑक्टोबर | १९६४ | - | लोकसभेवर भूमिहीनांचा विराट मोर्चा. पंतप्रधान लालबहादूर शास्त्री यांना १० मागण्याचे निवेदन सादर. १ लाखावर समुदाय होता. मागण्या मान्य झाल्या नाहीत तर ६ डिसेंबरपासून देशव्यापी सत्याग्रह करू, असे बजावले. |
| ६ डिसेंबर | १९६४ | - | भूमिहीन देशव्यापी सत्याग्रह. ३ लक्ष ४० हजार सत्याग्रहींना अटक. देशातील सर्व तुरुंग भरले. या सत्याग्रहात सर्व जातिधर्मांच्या भूमिहीनांनी भाग घेतला. |
| | १९६५ | - | शिरसगाव (दलित स्त्रियांची नग्न मिरवणुका काढण्याच्या |

संदर्भात) संघशक्ती मंडळ औरंगाबाद येथे प्रक्षोभक भाषण.

| | | |
|---|---|---|
| १ मे | १९६६ - | अध्यक्षीय भाषण, रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडिया ५वे अधिवेशन, दिल्ली. |
| | १९६७ - | अस्पृश्यांच्या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक समस्यांचे आकलन करण्यासाठी भारत सरकारने नियुक्त केलेल्या पेरूमल समितीचे उपाध्यक्ष. या समितीने भारतभर दौरा केला. |
| २ एप्रिल | १९६७ - | राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन यांच्या हस्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १६ फुटी पूर्णाकृती पुतळ्याचे अनावरण. मा. यशवंतराव चव्हाण यांच्या सहकार्याने दादासाहेबांनी या कार्यक्रमाचे आयोजन केले. पार्लमेंट हाऊसच्या हिरवळीवर जागा निश्चित केली. पुतळा उभारला. |
| १३ जानेवारी | १९६८ - | प्रथम पत्नी सीताबाईचे निधन. मुंबई |
| ३ फेब्रुवारी | १९६८ - | मानपत्र. बार्शी नगरपालिका, सोलापूर |
| १६ एप्रिल | १९६८ - | राष्ट्रपती झाकीर हुसेन यांच्या हस्ते भारत सरकारने दिलेला पद्मश्री हा बहुमान |
| ९ जून | १९६८ - | मानपत्र. नांदगाव नगरपालिका परिषद, नाशिक. |
| १ सप्टेंबर | १९६८ - | खासदारांच्या शिष्टमंडळासमवेत नेपाळला प्रयाण. |
| १५ ऑक्टोबर | १९६८ - | ६७व्या वाढदिवसानिमित्त नाशिक येथे जाहीर सत्कार अध्यक्ष: यशवंतराव चव्हाण व मानपत्र प्रदान. |
| | १९६९ - | डॉ. आंबेडकर वाणिज्य महाविद्यालय औरंगाबाद वार्षिक स्नेहसंमेलनाचे प्रमुख अतिथी. |
| १ मार्च | १९६९ - | पक्षघाताने आजारी. |
| १३ फेब्रुवारी | १९७१ - | अध्यक्ष-सर्वधर्मपरिषद औरंगाबाद. |
| २९ डिसेंबर | १९७१ - | विलिंग्डन रुग्णालय, नवी दिल्ली, येथे निधन. |
| ३१ डिसेंबर | १९७१ - | नाशिक येथे गोदातीरी गंगाघाटावर अंत्यविधी. |

# लेखकांचे पत्ते

१. **डॉ. निर्मलकुमार फडकुले**
विवेक, १० विद्यानगर,
उत्तर सदरबाजार,
सोलापूर - ४१३ ००३

२. **अर्जुन डांगळे**
४/७०३, हेमा पार्क
भांडूप (पूर्व), मुंबई - ४०० ०४२
E-mail-arjundangle@roltanet.com

३. **रमेश शिंदे**
४०/३२१, मोतीलाल नगर नं.१,
गोरेगाव (प.), मुंबई - ४०० १०४

४. **डॉ. मा. प. मंगुडकर**
१९९०, सदाशिव पेठ,
माडीवाले कॉलनी,
प्रसन्न मंगुडकर पथ,
पुणे - ४११ ०३०

५. **वि. द. घाटे**
—

६. **यदुनाथ थत्ते**
—

७. **केशव मेश्राम**
अ/२/३०/, गुरुवर्य अर्जुनराव
गृह. सहकारी संस्था,
गीतांजली नगर, माहीम (पूर्व),
मुंबई - ४०० ०८०

८. **उत्तम कांबळे**
चार्वाकाशय, पटनी इस्टेट,
टी. बी. सॅनेटोरियगम जवळ,
दिंडोरी रोड, म्हसरूळ, नाशिक

९. **प्रा. इंदिरा आठवले**
विशाखा अपार्टमेंट,
ब्लॉक क्र. १०,
कॅनडा कॉर्नर, नाशिक

१०. **विठ्ठलराव हांडे**
३ अ, मुरकुटे कॉलनी,
गंगापूर रोड,
नाशिक - ४२२ ००२

११. **कॉ. गोविंद पानसरे**
रेड फ्लॅग, बिंदू चौक,
कोल्हापूर

१२. **डॉ. गंगाधर पानतावणे**
श्रावस्ती,
मिलिंद महाविद्यालयासमोर,
छावणी,
औरंगाबाद - ४३१ ००२

१३. **डॉ. प्रल्हाद जोगदंड**
समाजशास्त्र विभाग,
मुंबई विद्यापीठ,
विद्यानगरी, कालिना,
मुंबई - ४०० ०९८

१४. **यादवराव कांबळे-तासगांवकर**
सेवानिवृत्त उपसचिव
डी-४५, खोली क्रमांक ४१४,
एम.आय.जी. कॉलनी,
निनाद गॅस सेंटर जवळ,
वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१
yadavraot@hotmail.com

१५. **वसंतराव पवार**
सुकुरा हॉस्पिटल,
गंगापूर रोड, नाशिक

१६. **रा. सु. गवई**
९०२, पूर्णा, पोचखानवाला रोड,
वरळी, मुंबई - ४०० ०२५

१७. **आर. जी. रुके**
६६९, आदर्शनगर,
लिंक रोड, जोगेश्वरी (प.)
मुंबई - ४०० १०२

१८. **अविनाश महातेकर**
१५२/५१११, भीमलाईट,
नेहरू नगर, कुर्ला (पूर्व),
मुंबई - ४०० ०२४
avinashmahatekar@rediffmail.com

१९. **प्रा. ग. प्र. प्रधान**
९२६, सदाशिव पेठ
पुणे - ४११ ०३०

२०. **कॉ. माधवराव गायकवाड**
मु. पो. मनमाड
ता. नांदगाव, जि. नाशिक

२१. **डॉ. भाऊ लोखंडे**
वैशाली बन, मॉडेल टाऊन
कामठी रोड, नागपूर - १४

२२. **डॉ. म. ल. शहारे**
१८१, झाकीरबाग,
सूर्या हॉटेलसमोर,
नवी दिल्ली ११० ०२५

२३. **पार्थ पोळके**
पवित्रा, यशवंत नगर,
गेंडामाळ, सातारा - ४१५ ००२

२४. **भावना भार्गवे**
१२३, देवप्रभा
डिसुझा कॉलनी, कॉलेज रोड,
नाशिक - ४२२ ००५

२५. **सोपानदेव चौधरी**
—

२६. **विजय जाधव**
प्लॉट नं. ११६, रू. नं. २०७
दौलत सहकारी गृहनिर्माण संस्था,
मॉडर्न टाऊन अंधेरी (प.),
मुंबई - ४०० ०५३

२७. **अरुण काळे**
एन/३४, एस/२/६/१,
स्वामी विवेकानंद नगर,
सिडको, नाशिक - ९

२८. **फ. मु. शिंदे**
यमुना, ८३, महात्मा गांधी नगर,
पद्मपुरा, औरंगाबाद ४३१ ००५

२९. **ग. त्र्यं. माडखोलकर**
—

३०. **एन. एस. कांबळे**
—

३१. **जे. डी. जाधव**
—

३२. **एम. डी. शेवाळे**
अहिल्याश्रम, नाना पेठ, पुणे

३३. **रूपा साळवे**
गीताई, कन्या छात्रालय,
५, मोरीजवळ, दिंडोरी रोड,
नाशिक - ४२२००२

३४. **ॲड. बाजीराव कांबळे**
अंजली हॉस्पिटल,
१२ वा ताडीवाला रोड,
पुणे - ४११००१

३५. **भाई वैद्य**
साने गुरुजी स्मारक
सिंहगड रस्ता
पुणे - ४११ ०३०

